ॐ

श्रीमत् परमहंस

# स्वामी रामतीर्थ

यांचे

## समग्र ग्रंथ



खण्ड १ ला

( प्रथमावृत्तींतील भाग १ ला व २ रा )



संपादक

कै० भास्कर विष्णु फडके, बी. ए.

व

कै० रामकृष्ण वासुदेव बर्वे, बी. ए.



प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी, गिरगांवरोड-मुंबई



किंमत ३॥ रुपये

# विषयानुक्रमणिका.



स्वामी रामतीर्थ यांचे समग्र ग्रंथ, खण्ड १ ला.

# गणेश महादेव आणि कंपनी

गिरगांवरोड, मुंबई यांचीं

# आजकालचीं पुस्तकें

| क्र. | पुस्तक | किंमत |
|---|---|---|
| १ | स्वराज्याचा श्रीगणेशा. ( श्री नाथमाधव ) | २–४–० |
| २ | स्वराज्याची घटना. ,, | २–४–० |
| ३ | स्वराज्याची स्थापना. ,, | २–४–० |
| ४ | स्वराज्याचा कारभार. ,, | २–४–० |
| ५ | स्वराज्यावरील संकट. ,, | २–४–० |
| ६ | मराठी रियासत, मध्य वि.३(श्री. सरदेसाई) | २–४–० |
| ७ | ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध. ,, | ३–८–० |
| ८ | श्रीएकनाथ चरित्र. ( श्री. पांगारकर ) | ०-१२-० |
| ९ | भक्तिमणिमाला. ,, | १–८–० |
| १० | अजिंक्य तारा. ( श्री. ना. ह. आपटे ) | १–८–० |
| ११ | निकोलाय लेनिन. ( श्री. भिडे ) | ०-१२-० |
| १२ | ग्रेट ब्रिटनची शासनपद्धति. (श्री.रं.वि.लळीत) | ०-१०-० |
| १३ | नवजीवन.( नाटक ) ( श्री. अस्नोडकर ) | ०-१०-० |
| १४ | जोसेफ मॅझिनी. ( श्री. जोगळेकर ) | २–०–० |
| १५ | महात्मा गांधी. ( श्री. सीता–कान्त ) | २–४–० |
| १६ | मानवी कर्तव्यें. ( श्री. जोगळेकर ) | १–०–० |
| १७ | माधवानुज ( कविता ) ( कै. मोडक ) | २–०–० |
| १८ | वीर वैरागी ( श्री. ग. दा. सावरकर ) | १–०–० |
| १९ | गोमांतक ( ऐ. काव्य ) (महाराष्ट्रभाट) | २–०–० |
| २० | श्री. चापेकरांचे निवडक लेख (श्री.चापेकर) | २–८–० |
| २१ | सैतानी–संक्रांत. ( नाटक ) (श्री. चौगुले) | १–०–० |
| २२ | शृंगेरीची लक्ष्मी. ( प्रो. भानू ) | २–०–० |
| २३ | कुठें ! ( सौ. कमलाबाई सोहनी ) | १–०–० |
| २४ | स्वामी रामतीर्थ भाग १ ( कै. फडके ) | २–८–० |
| २५ | हिंदुत्व ( मराठी )(डॉ. सावरकर) | ( छापत आहे.) |
| २६ | स्वामी रामतीर्थ भाग २(कै. फडके) | ( छापत आहे.) |





# स्वामी रामतीर्थ

## चरित्राची रूपरेषा

### पूर्वस्थिति



एकोणिसावें शतक हें जगाच्या इतिहासांत अनेक दृष्टींनीं अत्यंत महत्वाचें झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अनेक भौतिक शास्त्रांचा या शतकांत उदय होऊन त्यांची अतोनात प्रगति झाली. भौतिक सुधारणेची ही वाढ विसाव्या शतकांतहि चालू आहे; इतकेंच नव्हे तर या प्रगतीच्या लाटेचा पल्ला कोठपर्यंत जाऊन पोहोंचेल, याचा अद्याप अंदाजहि करवत नाहीं. पाश्चात्य व पौर्वात्य राष्ट्रें यांचा संबंध याच शतकांत विशेष दृढतर जडला असल्यामुळें पाश्चात्यांच्या या संस्कृतीचा आणि सुधारणेचा परिणाम ओघाओघानें पूर्वेकडील राष्ट्रांत दिसून येऊं लागला. हिंदुस्थानांत तर सदरहू संस्कृतीचीं स्पष्टतर चिन्हें दृग्गोचर झालीं. पाश्चात्यांच्या सहवासामुळें आणि सुधारणेमुळें हिंदुस्थानांत एक प्रकारचें विलक्षण आणि अपूर्व स्थित्यंतर घडून आलें. आगगाड्या, तारायंत्रें, इत्यादिकांच्या योगानें देशाची परिस्थिति अजिबात पालटून गेली, दळणवळणाचीं साधनें वाढलीं आणि व्यापाराची वाढ बेसुमार होऊं लागली. बाह्यस्थितीबरोबर अंतःस्थितींतहि एक प्रकारची क्रान्ति झाली. पाश्चात्य धर्तीवर इंग्रजी शिक्षणाचीं विद्यापीठें जिकडे तिकडे स्थापन होऊन इंग्रजी

भाषेचा, वाङ्मयाचा आणि भौतिक शास्त्रांचा अभ्यास सर्वत्र होऊं लागला. कायदे बदलले, समाजरचनेचीं तत्त्वें बदलूं लागलीं, व लोकांच्या आचार-विचारांतहि विलक्षण फेरबदल झाला. पाश्चात्य सुधारणेचा नवीनच परिचय झाल्यामुळें त्या सुधारणेच्या तेजानें लोकांचे डोळे प्रथम दिपून गेले, व भौतिक सुधारणेचे पोवाडे गाण्यांत सर्वांना भूषण वाटूं लागलें; व त्या वेळच्या लोकस्थितीचा विचार केला असतां अशी स्थिति होणें अगदीं स्वाभाविक होतें, यांत शंका नाहीं.

परंतु, एकीकडे हें स्थित्यंतर झपाट्यानें चालत असतां दुसरीकडे एका भावी स्थित्यंतराचें बीज पेरलें जात होतें. नाटकाचा एक अंक रंगभूमीवरील प्रेक्षकाच्या नजरेस पडत असतो त्याच वेळीं पडद्याआड पुढील अंकाची तयारी चाललेली असते. जगद्रूपी रंगभूमीवरील नाटकांतहि अशाच मासल्याचा प्रकार दिसून येतो. एकोणिसाव्या शतकांतील पाश्चात्यांची भौतिक सुधारणा आणि संस्कृति जगाला आश्चर्यचकित करून सोडीत होती. त्याच सुमारास आर्यांच्या हजारों वर्षांच्या ज्ञानाचें परिपक्व फल असा जो आर्यधर्म–वेदान्तधर्म त्याचें पुनरुज्जीवन होण्याची आणि पाश्चात्य राष्ट्रांतहि त्याचा दिग्विजय होण्याची तयारी होऊन राहिली होती. व एकोणिसावें शतक भौतिक शास्त्रांच्या प्रकाशानें अलौकिक म्हणून जगाच्या इतिहासांत गाजलें गेलें तर विसावें शतक भौतिक शास्त्रें आणि वेदान्त यांच्या अपूर्व मिलाफानें जगाचा इतिहास गेल्या शतकापेक्षांहि अधिक उज्वल आणि चिरस्मरणीय केल्यावांचून राहाणार नाहीं, असा रंग दिसत आहे.

## भावी स्थित्यंतर.

या भावी स्थित्यंतराला कारणीभूत होणारे पुरुष म्हणजे स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ हे होत. पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृतींचे प्रवाह या दोन विभूतींमध्यें संगम पावले होते. अर्वाचीन विद्यापीठांतून पाश्चात्य शास्त्रांचें पाश्चात्य पद्धतीनुसार त्यांनीं मोठ्या मार्मिकपणानें अध्ययन केलें होतें. तसेंच आर्यांच्या परंपरागत संस्कृतीचें–वेदान्ताचें रहस्य भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस आणि पूज्यपाद भगत धन्नाराम यांच्यासारख्या आर्यसंस्कृतीशीं तद्रूप झालेल्या सत्पुरुषांच्या पायांशीं बसून त्यांनीं आपल्या अंगीं बाणून घेतलें होतें. अशा रीतीनें भौतिकशास्त्रांना त्रिकाला-

बाधित वेदान्तज्ञानाचें अधिष्ठान लाभल्यामुळें विसाव्या शतकांतील स्थित्यंतराचें उर्फ क्रान्तीचें जनकत्व त्यांच्याकडे येऊं शकलें.

## वेदान्ताचा प्रसार.

स्वामी विवेकानंद यांनीं वेदान्तधर्माचा झेंडा युरोप व अमेरिका खंडांत पहिल्याप्रथम रोंविला; व स्वामी रामतीर्थ यांनीं स्वामी विवेकानंद यांच्या कामगिरीला पूर्णता आणिली. आर्यधर्माचा दिग्विजय करण्यासाठीं स्वामी विवेकानंद हे अमेरिकेच्या किनाऱ्यावर उतरले. त्या वेळीं पाश्चात्य राष्ट्रांची स्थिति अशी झाली होती कीं, भौतिकशास्त्रांच्या अलौकिक प्रगतीमुळें त्या राष्ट्रांना अपूर्व ऐश्वर्य प्राप्त झालें होतें. सामान्यतः सर्वसाधारण लोकांच्या मनावर ऐहिक संपत्तीमुळें जडवादाचा पगडा बसला असून धर्म ही आपल्या ऐहिक ऐश्वर्याला शोभा आणणारी एक चीज आहे, अशी त्यांची दृष्टि झाली होती. ऐहिक धनाला ते ईश्वर समजूं लागले होते. आत्म्याच्या अमरत्वाची कल्पना बहुतेक अजिबात लोपून गेल्यासारखी झाली होती. रसायनशास्त्रासारख्या भौतिक शास्त्राच्या गडबडींत वेदान्त उर्फ आत्म्याचें रसायनशास्त्र म्हणून कांहीं असेल ह्याचा मागमूसहि त्यांना नव्हता. अशा स्थितींत सर्व धर्मांची एकवाक्यता करून वेदान्त हा सर्वव्यापी धर्म कसा आहे, व तोच जगताचा भावी धर्म कसा होईल, याचें स्पष्टीकरण स्वामी विवेकानंद यांनीं केलें. वेदान्ताचें खरें हृद्गत काय, याचें विवरण पाश्चात्य लोकांपुढें करून आत्मज्ञानाच्या पारमार्थिक ऐश्वर्याची त्यांनीं जनतेला यथास्थित ओळख करून दिली. याचा परिणाम असा झाला कीं, वेदान्ताचें अध्ययन करण्याकडे त्यांचें लक्ष लागूं लागलें. भौतिक शास्त्रें आणि वेदान्त यांच्यामध्यें जो विरोध भासमान होतो तो वास्तविक खरा नाहीं, एवढेंच नव्हे तर भौतिक शास्त्रांची पूर्णता वेदान्ताशिवाय होऊं शकत नाहीं, ही गोष्ट पाश्चात्यांच्या प्रत्ययास आली, व या गोष्टीचीं स्पष्ट चिन्हें दिवसेंदिवस अधिकादिक दिसून येऊं लागलीं आहेत. येणेंप्रमाणें वेदान्तधर्माच्या दिग्विजयास स्वामी विवेकानन्द यांनीं प्रारंभ केला. व त्याच्यांतच स्वामी रामतीर्थ यांनीं भर टाकून त्या कार्याची परिपूर्णता केली.

## धर्मजागृति.

पाश्चात्य राष्ट्रांत वर वर्णन केल्याप्रमाणें स्थिति झाली होती. या सुमारास पूर्वेकडील राष्ट्रांत व विशेषतः हिंदुस्थानांतहि मोठी विलक्षण स्थिति झालेली होती. ज्या लोकांत व ज्या राष्ट्रांत वेदान्तासारख्या तेजस्वी आणि अत्युच्च शास्त्राचा उदय व परिणति झाली तेथील लोक दैवदुर्विलासाच्या फेऱ्यांत सांपडून अज्ञानतमांत गढून गेले होते. आपल्या ऐहिक व पारमार्थिक कर्तव्याची त्यांना बिलकूल ओळख राहिली नव्हती. आलस्य आणि कर्तव्यशून्यता यांच। पगडा त्यांच्या मनावर पूर्णपणें बसला होता. सर्वत्र धर्मग्लानि होऊन ऐहिक आणि पारमार्थिक कल्याणाला हिंदुस्थानांतील लोक–आर्यांचे वंशज सर्वस्वी पारखे झाले होते. पाश्चात्य लोकांतील आणि सुधारणेंतील स्पृहणीय व आवश्यक तेवढ्या गोष्टी घेण्याऐवजीं त्यांचें सर्व बाबतींत ते अनुकरण करूं लागले होते. पाश्चात्य पद्धतीवर शिकलेल्या बहुतेक लोकांची मनःस्थिति मोठी शोचनीय झालेली होती. आपली स्व-त्वाची ओळख ते विसरले होते. आपल्या धर्माची, आर्यपरंपरेची त्यांना पर्वा वाटत नव्हती; एवढेंच नव्हे तर ' आमच्या अधोगतीचें मूळ जुन्या धर्मांत आहे, ' असले निरर्गल प्रलाप काढून सुधारलेल्या पद्धतीची धर्मरचना करण्यांत अर्थात् नवे नवे पंथ स्थापन करण्यांत बडीं बडीं पाश्चात्यज्ञानसंपन्न माणसें गुंग होऊन गेलीं होतीं. जो तो मोहवश झाला होता व पुढील उन्नतीचा मार्ग हाताच्या बोटांवर मोजतां येण्यासारख्या कांहीं महात्म्यांशिवाय कोणालाच दिसेनासा झाला होता. अशा स्थितींत ' उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यवरान्निबोधित ' असल्या उदात्त तत्त्वांनीं स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांच्यासारख्या सत्पुरुषांनीं लोकांना खडबडून जागृत केलें. पाश्चात्यांच्या योग्य त्या सुधारणा ग्रहण करून व समाजरचनेंत सद्यःस्थितीला व कालाला आवश्यक असलेल्या सुधारणा करून वेदान्ताच्या पायावर आपली उन्नति कशी करून घ्यावी, याचा बोध जनतेच्या अंतःकरणावर ठसविण्याचें कार्य त्यांनीं केलें. तसेंच ' वसुधैवकुटुंबकम् ' ही वृत्ति लोकांनीं आपल्या अंगामध्यें बाणून घ्यावी; व उदात्त कल्पना प्रत्यक्ष अमलांत आणण्यासाठीं संन्यस्तवृत्तीचे ऐहिक ऐश्वर्यावर आपल्या ध्येयासाठीं पाणी सोडणारे–पुरुष उत्पन्न झाले पाहिजेत, व त्यांतच जगताचें कल्याण आहे, ही कल्पना

त्यांनीं लोकांच्या डोळ्यांपुढें उभी केली, अशा रीतीनें या सत्पुरुषांनीं जगदुद्धाराची व धर्मजागृतीची अशी दुहेरी कामगिरी बजाविली, तसेंच वेदान्त आणि भौतिक शास्त्रें यांच्या योग्य मर्यादा आंखून वेदान्तसूर्याचा जगावर प्रकाश पाडला; व विसाव्या शतकांतील स्थित्यंतराला प्रारंभ केला. असलीं अपूर्व आणि अलौकिक कामगिरी ज्यांनीं केवळ आपल्या वाणीच्या प्रभावानें, पवित्राचरणाच्या दिव्य तेजानें, आणि अध्यात्मिक ज्ञाननिष्ठेनें घडवून आणली त्यांना अवतारी विभूति असें श्रेष्ठ आणि गौरवदर्शक नामाभिधान देणें यथार्थ नाहीं काय ?

## आर्यांचा आलंब.

प्रत्येक राष्ट्राची एक विशिष्ट परंपरा असते, व त्या परंपरेच्या धोरणानें त्या राष्ट्राची उन्नति व अवनति नियमित होत असते. धर्म हा अनादिकाला-पासून आर्यांच्या इतिहासाचा ध्रुवबिन्दु ऊर्फ आलंब होय. व त्याच्या भोंवती आर्यांच्या उत्कर्ष व अपकर्ष यांच्या दशेचें चक्र प्राचीन कालापासून फिरत आलेलें आहे; व पृथ्वीवरील अनेक राष्ट्रें एकामागून एक किंचित्काल प्रकाशमान होऊन नामशेष होण्याच्या स्थितीप्रत पोहोंचलीं तरी आर्यांचें राष्ट्र हजारों संकटांतून आणि विपत्तींतून आज हजारों वर्षें टिकाव धरूं शकलें, यांतील बीज हें होय कीं, त्यांनीं आपला अध्यात्मशास्त्राचा ऊर्फ वेदान्ताशास्त्राचा ध्रुवबिंदु प्रसंगामध्यें सोडून दिला नाहीं, व हा ध्रुवबिंदु जोंपर्यंत ते सोडणार नाहींत तोंपर्यंत कसल्याहि आपत्तींतून ते उन्नतीच्या स्थितिप्रत पोहोंचल्याशिवाय राहाणार नाहींत. अशा रीतीनें धर्म हा आमचा राष्ट्रीय आलंब असल्यामुळें या धर्मांचे प्रवर्तक हेच आमच्या राष्ट्राचा आत्मा होय. ‘ यदा यदाहि धर्मस्य ’ या भगवंताच्या उक्तींत ही आमची परंपरा टिकण्याचें रहस्य भरलेलें आहे. अर्थात् सत्पुरुषांचा इतिहास हा आमच्या राष्ट्राचा अंतर्गत इतिहास होय. श्रीशंकराचार्य, ज्ञानेश्वर, एक-नाथ, श्रीसमर्थ, तुकाराम, स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांच्या-सारख्या श्रेष्ठ विभूतींचे ग्रंथ व त्यांचीं चरित्रें हा आमच्या राष्ट्रीय परंप-रेच्या रहस्याचा इतिहास होय. व त्याचें जितकें सूक्ष्म दृष्ट्या आम्हीं मनन करूं, तितका आमच्या पुढील उन्नतीच्या मार्गावर जास्त प्रकाश पडून त्या मार्गांतील आमचा भावी प्रवास सुकर होणार आहे.

अशा श्रेष्ठ अवतारी विभूतींपैकीं स्वामी रामतीर्थ हे आहेत. वास्तविक सत्पुरुषांचें खरें चरित्र म्हणजे त्यांच्या मुखानें बाहेर आलेले उद्गारच होत. व त्यांच्या चरित्राचें खरें प्रतिबिंब जर कोठें पाहावयाचें असेल तर तें त्यांच्या ग्रंथांमध्येंच पाहिलें पाहिजे. परंतु एखाद्या ग्रंथकाराच्या ग्रंथाचें परिशिलन करण्यापूर्वी त्याच्या चरित्रांतील महत्वाच्या गोष्टी आगाऊ माहीत असणें पुष्कळ वेळां आवश्यक असतें. कारण, चरित्राच्या परिचयामुळें ग्रंथांतील अनेक विकट मुद्यांवर बरेच वेळां विशेष प्रकाश पडत असतो. यासाठीं स्वामींच्या चरित्रांतील कांहीं ठळक ठळक प्रसंग तूर्त आम्हीं वाचकांस सादर करीत आहों. स्वामींच्या चरित्राचें हें स्थूल स्वरूप आहे; किंवा ही केवळ रूपरेषा आहे, असें म्हटलें तरीहि चालेल. स्वामींच्या अंगच्या अनेक सद्‌गुणांचें आणि बुद्धिविशेषाचें, तसेंच त्यांच्या ग्रंथांतील रहस्याचें सविस्तर विवरण पुढें मागें करण्याचा विचार आहे. तूर्त इतकी प्रस्तावना करून स्वामींच्या चरित्राकडे आपण वळूं.

## जन्म आणि कुल.

या महात्म्याचा जन्म शके १७९५च्या कार्तिकशुद्ध प्रतिपदेस म्हणजे बरोबर दिपवाळीच्या दिवशीं गुजराणवाला जिल्ह्यांतलि मुरालीवाला या गांवीं झाला. स्वामींच्या जन्मानें विभूषित झालेलें कुल हें वासिष्ठगोत्रोत्पन्न गोस्वामी कुल होय. या कुलाच्या पवित्राचरणाबद्दलची ख्याति उत्तरेकडील प्रदेशांत फार दिवसांपासून आहे. वाल्मीकिचा अवतार म्हणून प्रसिद्ध असलेले आणि हिन्दी रामायणाचे प्रणेते भक्तशिरोमणि तुलसीदास ज्या कुलांत अवतीर्ण झाले तेंच हें कुल होय. भक्ताग्रणी तुलसीदास यांनीं प्रदीप्त केलेली पण कालमानानें विझत चाललेली आत्मज्ञानाची पवित्र ज्योत प्रज्वलित करून स्वामी रामतीर्थ यांनी गोस्वामी कुलाच्या पूर्वापार चालत आलेल्या लौकिकांत अधिक भर टाकली; इतकेंच नव्हे तर सनातन वैदिक धर्माचा झेंडा सातांसमुद्रांपलीकडे पक्का रोंवून अखिल भारतवर्षाच्या लौकिकांत भर घातली.

## आजोबांचें भविष्य.

स्वामींच्या वडिलांचें नांव गोस्वामी हिरानंद हें होय. हे स्वभावतः फार सरळ, पण तामसी वृत्तीचे व दुराग्रही होते. स्वामींचा जन्म झाल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांच्या परम सुशील मातुःश्रीनें इहलोकींची यात्रा

संपवली. त्यानंतर स्वामींचें पालनपोषण त्यांचे वडील बंधु गोस्वामी गुरुदास व त्यांची वृद्ध आत्या ह्यांनीं केलें. लहानपणीं आईचें दूध न मिळाल्यामुळें स्वामींचें शरीर कृश व रोड असें होतें. परंतु त्यांना समजूं लागल्यापासून शरीर सुधारण्याकडे व शक्ति कमविण्याकडे त्यांचें लक्ष लागलें, व त्याचा परिणाम किती विलक्षण झाला, हें पुढें दिसून येईल. आपल्या जन्माच्या वेळची एक गोष्ट स्वामींनीं एका व्याख्यानांत येणेंप्रमाणें सांगितली आहे:—" रामाचे आजोबा ज्योतिषशास्त्रांत निष्णात होते. रामाचा जन्म झाला त्या वेळीं त्याची जन्मकुंडली पाहून त्यांच्या डोळ्यांतून एकदम अश्रु आले व लगेच थोड्या वेळानें ते हंसूं लागले. अशा या परस्परविरोधी वर्तनाचें कारण काय, असें विचारलें असतां ते म्हणाले, ' या मुलाचा जन्म अशा कुयोगावर झाला आहे कीं, एकतर हा स्वतःच मरेल किंवा निदान आपल्या आईला तरी तो मारक होईल ! या विचारानें मला रडूं आलें. लगेच हंसूं येण्याचें कारण हें कीं, दैववशात् हा मुलगा जगला वांचला तर हा लोकोत्तर महात्मा होऊन आपल्या कुलाचा उद्धार करील; इतकेंच नव्हे तर जगदुद्धाराचें महत्कार्यहि याच्या हातून निःसंशय होईल. ' ग्रहांची वक्रदृष्टि मुलाला किंवा मातुःश्रीला अशा कोणा तरी एकाला बाधक होणार होती. परंतु मातेचा अपत्यस्नेह मोठा विलक्षण असतो. व आपल्या स्नेहबलानें रामाच्या मातुःश्रीनें ग्रहांची वक्रदृष्टि जणूं काय आपणाकडे आकर्षून घेतली आणि हिंदु समाजाच्या तसेंच जगाच्या उत्कर्षाकरितां रामाला मागें ठेवून स्वतः तिनें परलोकचा रस्ता धरला. स्वामींच्या सायन व निरयण अशा दोन्ही तऱ्हांनीं तयार केलेल्या जन्मलग्नकुंडल्या सोबत जोडल्या आहेत त्यांवरून फलज्योतिषाच्या दृष्टीनें स्वामींच्या चरित्राचा विचार करण्यास तज्ज्ञांस उपयोग होईल.

## बालवृत्ति व प्राथमिक शिक्षण.

स्वामीचें पाळण्यांतलें नांव तीर्थराम असें होतें. तीर्थरामाला लहानपणीं त्याच्या आत्याकडून लागलेलें वळण त्याच्या पुढील उन्नतीस साधनीभूत झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याची आते फार भाविक व श्रद्धाळू होती. ही नित्य नियमानें देवदर्शनास जात असे, आणि देवाला जातांना

तीर्थरामाला ती आपल्याबरोबर घेऊन जाण्याला कधीं चुकत नसे. आत्याच्या भाविकपणाचा आणि प्रेमळ मनोवृत्तीचा त्याच्या मनावर विशेष परिणाम झाला. लहानपणापासूनच तीर्थरामाची वृत्ति मोठी विलक्षण होती. ईश्वर-भजनाची इतक्या बालपणींहि त्याला फार गोडी लागली. तसेंच देवालयां-तील शंखाचा गंभीर नाद किंवा प्रणवाचा—ॐकाराचा ध्वनि ऐकून त्याचें अंतःकरण सद्गदित होऊन जात असे. या आपल्या बालवृत्तीसंबंधानें स्वामींनीं स्वतःच असें वर्णन केलें आहेः—' लहानपणीं सुद्धां ॐकाराचा उच्चार किंवा देवळांतील शंखाचा ध्वनि हीं रामाच्या अंतःकरणाला आप-ल्याकडे ओढून घेत असत आणि त्यांचा रामाच्या अंतःकरणावर इतका परिणाम होत असे कीं, राम जरी रडत असला तरी ॐचा उच्चार किंवा शंखाचा ध्वनि ऐकून त्याचें रडणें एकदम बंद होत असे. '

वयाच्या पांचव्या वर्षींच तीर्थरामाच्या प्राथमिक शिक्षणास सुरवात झाली. मुरालीवाला येथें एक ऊर्दू शाळा होती, व या शाळेचे मुख्य अध्यापक मौलवी महम्मद्दीन यांची तीर्थरामावर फार मर्जी असे. तीर्थरामाची बुद्धिमत्ता विलक्षण असल्यामुळें शाळेंतील क्रमिक पुस्तकांशिवाय ' गुलि-स्तान ' आणि ' बोस्तान ' हे फारसी भाषेंतील दोन अवघड ग्रंथ त्यानें तोंडपाठ केले होते. पुढें प्राथमिक शिक्षण आटोपल्यानंतर गांवांत इंग्रजी शाळा नव्हती, सबब मुरालीवाला येथून पांच कोसांवर असलेल्या गुज-राणवाला येथील इंग्रजी शाळेंत त्यास पाठविण्यांत आलें. या वेळीं तीर्थ-रामाचें वय अवघें दहा वर्षांचें होतें. इतक्या पोरवयांत मुलाला परक्या ठिकाणीं एकटें ठेवणें दूरदर्शीपणाचें न वाटल्यामुळें त्याच्या वडिलांनीं आपले मित्र भगत धन्नाराम यांच्या देखरेखीखालीं त्यास ठेवून दिलें.

## गुरुसान्निध्य व अध्यात्मिक प्रगतीचा पाया.

भगत धन्नाराम यांना तीर्थराम गुरु म्हणून मानीत असे. हे आज-मितीस विद्यमान असून पंजाबांत गुजराणवाला येथें 'पुराणी मंडींत' राहातात. यांचें चरित्र बोधप्रद असून तें सवडीनुसार वाचकांपुढें मांडण्याचा आमचा मनोदय आहे.

भगतजींजवळ तीर्थराम यास ठेवण्यांत आलें, त्या वेळीं त्यांचा योग-वासिष्ठाचें प्रवचन करण्याचा नित्य नियम असे. योगवासिष्ठासारखा गहन

विषय भगतजी इतक्या प्रेमळपणानें सांगत असत कीं, त्यांचें प्रवचन ऐकण्यास जमणारा श्रोतृसमुदाय अगदीं तल्लीन होऊन जात असे. अभ्यासांतून थोडा वेळ काढून तीर्थरामहि हें प्रवचन मोठ्या आवडीनें ऐकत असे; व शाळेच्या अभ्यासाव्यतिरिक्त त्याचा सर्व वेळ भगतजींच्या सहवासांतच जात असे. भगतजींचें प्रेमळ प्रतिपादन, त्यांचें सान्निध्य व प्रत्यक्ष उपदेश यांचा त्याच्या कोमल अंतःकरणावर इतका अद्भुत परिणाम झाला कीं, भगतजींशिवाय त्याला दुसरें कांहीं दिसेनासें झालें. भगतजींची भक्तिपुरःसर सेवा करणें, हाच त्याच्या आवडीचा विषय होऊन बसला, कोणतेंहि काम करावयाचें झालें तरी त्यांच्या आज्ञेशिवाय पाऊल टाकूं नये, असा त्यांचा परिपाठ होऊन बसला होता. स्वामींच्या हस्ताक्षराचा नमुना म्हणून जें पत्र सोबतच्या पानावर दिलें आहे, त्यावरून इतक्या बालवयांतहि तीर्थरामाच्या मनांत गुरूबद्दल किती विलक्षण प्रेम आणि पूज्यबुद्धि वसत होती याचें कोणालाहि सहज अनुमान करतां येण्यासारखें आहे. पुढील आयुष्यक्रमांत स्वामींच्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेलें दिव्य अध्यात्मिक ज्ञान आणि त्यांच्या हातून घडून आलेली अलौकिक कामगिरी यांचें बीज भगतजींच्या सहवासामध्यें पेरलें गेलें. तीर्थरामाची श्रद्धा, भक्ति आणि गुरुसेवा याच्या योगानें भगतजींचेंहि त्याच्यावर इतकें प्रेम जडलें कीं, त्याच्याशिवाय त्यांना क्षणभरहि चैन पडत नसे.

भगतजींच्या सहवासांत व वेदान्तप्रवचन ऐकण्यांत तीर्थरामाला जरी आनंद वाटत असे, तरी त्यामुळें शाळेंतील ठराविक अभ्यासाकडे त्यांचें दुर्लक्ष्य कधींहि होत नसे. प्रत्येक वर्गांत तो नेहमीं पहिलें स्थान पटकावीत असे. शाळेंतील मध्यम परीक्षा व त्यानंतरची प्रवेश परीक्षा अशा दोन्हीहि परीक्षांमध्यें तो सर्व पंजाब प्रांतांत पहिला आला. प्रवेशपरीक्षेनंतर तीर्थरामानें नोकरी पतकरावी, अशी त्याच्या वडिलांची फार इच्छा होती, आणि तसें करण्याविषयीं त्यांनीं त्याच्यामागें एकसारखा लकडा लावला. बापाची मनःस्थिति अशा प्रकारची होणें हें अगदीं स्वाभाविक होतें. कारण, त्यांची घरची फार गरिबी होती. सरहद्दीकडील पेशावर आणि स्वात या प्रांतांतील कित्येक हिंदु कुटुंबांचे हिरानंद हे कुलोपाध्याय होते. असल्या उपाध्येपणांत द्रव्यप्राप्ति कितपत होणार, हें दिसतच आहे. ह्या उपाध्ये-

गिरीबद्दल जें कांहीं अल्पस्वल्प द्रव्य मिळे त्यावरच कुटुंबाचा चरितार्थ हिरानंद यांना चालवावा लागे. सबब, लवकर इंग्रजी शिकून मुलगा एकदा दोन पैसे मिळवूं लागला म्हणजे गंगेंत घोडे न्हाइले, अशा प्रकारची त्यांच्या मनाची स्थिति व्हावी, यांत वस्तुतः कांहीं आश्चर्य नव्हतें. परंतु इतक्या अल्पवयांत सेवाधर्माचा भुंगा आपल्यामागें लावून घेतला तर आपल्या पुढील उन्नतीचा मार्ग निःसंशय खुंटला जाणार अशी खात्री वाटल्यामुळें बापाचें म्हणणें तीर्थरामाला मुळींच आवडेना, व म्हणून नोकरी धरण्याचें त्यानें साफ नाकारलें. यावर ' तुला नोकरी करणें नसेल तर याउप्पर विद्येला म्हणून माझ्याकडून एक पैहि मिळणार नाहीं ' अशा तऱ्हेचें खडखडीत उत्तर या पंधरा वर्षांच्या मुलाला त्या हट्टी बापानें दिलें. व इतक्यानेंच समाधान न पावतां त्यानें त्याला घरांतून घालवून दिलें! परंतु या हट्टी बापाचा मुलगा त्याच्याचप्रमाणें किंबहुना त्याच्यापेक्षांहि थोडा जास्त हट्टी असल्यामुळें असल्या धमकीनें तो गेला नाहीं. उच्च आणि उदात्त ध्येय प्राप्त करून घेण्याच्या आपल्या सत्यसंकल्पाला परम कारुणिक ईश्वर साहाय्य केल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं, अशा दृढ विश्वासानें आणि श्रद्धेनें पुढील अध्ययनाचा मार्ग आक्रमण करण्याच्या हेतूनें तीर्थराम घरांतून निघाला तो तसाच लाहोर येथें जाऊन पोहोंचला. इतक्या बालवयांत एवढी आत्मश्रद्धा व ईश्वराच्या ठिकाणीं दृढनिष्ठा बाणणें सामान्य गोष्ट नव्हे; त्याला आरंभीं आपल्या आत्याच्या संगतींत मिळालेलें गृहशिक्षण, व पुढें भगतजींच्या सहवासांत मिळालेलें आत्मिक शिक्षण अशा दोहींच्या मिलाफामुळेंच त्याच्या चित्तवृत्तीचें स्थैर्य टिकलें असलें पाहिजे, यांत शंका नाहीं. अध्यात्मिक शिक्षणाचा पाया लहानपणींच तीर्थरामाच्या अंतःकरणांत मजबूत घातला गेल्यामुळें पुढील आयुष्यक्रमांत स्वामी रामतीर्थ या नात्यानें जगाला थक्क करून सोडणारी कामगिरी या बाल तीर्थरामाच्या हातून व्हावी, यांत कांहीं नवल नाहीं.

## शिक्षणक्रमांतील अडचणी.

प्रवेश परीक्षेंत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांत तीर्थराम पहिला आला. यामुळें महाविद्यालयांतील सर्वांहून मोठी छात्रवृत्ति त्याला मिळाली. या छात्र-

वृत्तींतून महाविद्यालयांत शिक्षणासंबधानें होणारा खर्चवेंच झेंपण्यासारखा होता. राहतां राहिली काळजी प्रत्यक्ष निर्वाहाची, सबब, हा खर्च भागविण्यासाठीं एकदोन शिकवण्या पतकरून पुढील अभ्यासक्रम चालविण्याचा तीर्थरामानें निश्चय केला, व लाहोर येथील ‘ फोरमन ख्रिश्चन महाविद्यालया ’ मध्यें त्यानें आपलें नांव दाखल केलें. तीर्थरामाचा हा निश्चय दृढ होण्याला भगतजींचें उत्तेजन बऱ्याच अंशीं कारणीभूत झालें होतें. त्याला बापानें घरांतून घालवून दिलें होतें, इतकेंच केवळ नव्हे तर तो महाविद्यालयांत असतांना बापानें त्याची कधीं विचारपूस सुद्धां केली नाहीं. परंतु भगतजी मात्र वरचेवर महाविद्यालयांत जाऊन तीर्थरामाच्या शिक्षणासंबंधानें आणि प्रकृतीसंबंधानें मोठ्या आस्थेनें चौकशी करीत असत.

वर सांगितल्याप्रमाणें निर्वाहाकरितां शिकवण्या पतकरण्याची दगदग करणें तीर्थरामाला भाग पडलें असूनहि ‘ एफ. ए. ’ च्या परीक्षेत पंजाबमधील विश्वविद्यालयांमधून उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांत तो पहिला आला. यामुळें पुढील अभ्यासक्रम चालू ठेवण्याकरितां पूर्वींहून मोठी छात्रवृत्ति त्याला मिळाली व या छात्रवृत्तीच्या साहाय्यानें ‘ बी. ए. ’ च्या परीक्षेच्या अभ्यासास त्यानें सुरवात केली. विश्वविद्यालयांत आपल्या मुलानें संपादन केलेला लौकिक ऐकून हिरानंद यांना वास्तविक संतोष व्हावयास पाहिजे होता. परंतु तसें होण्याऐवजीं त्यांनीं तीर्थरामाच्या पत्नीला—तीर्थरामाचें लग्न अगदीं लहानपणींच झालें होतें—लाहोर येथें नेऊन त्याच्या स्वाधीन केली व खर्चाकरितां एक पैहि देणार नाहीं, असें पुनः एकदा त्याला त्यांनीं निक्षून सांगितलें. असें करण्यांत वडिलांचा हेतु इतकाच कीं, बिऱ्हाडाच्या जबाबदारीची बिडी मुलाच्या पायांत अडकविली म्हणजे सहजच अभ्यासाला कंटाळून नोकरीची बिडी पतकरण्याला तो कबूल होईल. पण बापाचा हा अंदाज चुकला ! वास्तविक वरीलसारख्या बिकट परिस्थितींत एखादा सामान्य मनुष्य असता तर त्याची उमेद अजिबात खचून जाती व अध्ययनाच्या जबाबदारीचें हें ओझें शिरावरून फेंकून देऊन तो एकदम मोकळा झाला असता. परंतु अध्ययन आणि अध्यापन यांच्याकरितां ज्याचा जन्म झाला,

तो असल्या अडचणींना थोडीच भीक घालणार ! परंतु असल्या पेंचातून सुटून आपल्या मनाप्रमाणें आपलें उच्च शिक्षण पूर्ण करण्यासाठीं तीर्थरामाला किती खटपट पडली असेल, याची कल्पना अत्यंत गरिबीच्या आणि अडचणींच्या स्थितींत ज्यांनीं विद्याभ्यासंग केला असेल अशांनाच होणारी आहे. ‘ पाण्यामध्यें मासा झोंप घेतो कैसा । जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ’ अशी जी तुकारामाची उक्ति आहे, ती या ठिकाणीं बरोबर लागू पडते. स्वानुभवाशिवाय दुसऱ्याच्या स्थितीची कल्पना बहुधा होतच नाहीं, असा नियम आहे. महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांची रहाणी साधारणपणें थाटाची असते, पण तीर्थरामाची स्थिति याच्याकडून अगदीं निराळी होती. अंगामध्यें खादीची बंडी, तसलीच एक तुमान, व एक छोटासा फेटा, एवढाच त्याचा नेहमींचा पोषाख असे. रहाणी इतकी साधी व काटकसरीची असूनहि एखादेवेळीं अभ्यासासाठीं दिव्यांत तेल नाहीं, किंवा एखादें जरूरीचें पुस्तक घेण्यासाठीं जवळ पैसा नाहीं, अशी स्थिति असे. व यासाठीं उपासमार काढून आपल्या गरजा भागविणें त्याला भाग पडत असे. आपल्याइकडे रस्त्यावरील कंदिलाखालीं किंवा एखाद्या झाडाच्या वाळलेल्या पानांचा ढीग करून व तो पेटवून त्याच्या प्रकाशांत विद्याभ्यास केल्याबद्दलच्या कांहीं विद्वानांच्या गोष्टी प्रसिद्ध आहेत. तीर्थरामाची स्थितिहि अशाच मासल्याची होती. परंतु इतक्या अडचणींच्या प्रसंगांतहि आपली विपन्नावस्था लोकांच्या निदर्शनास येऊं न देण्याबद्दल त्याची नेहमीं खटपट असे. अशा प्रकारच्या अनेक गोष्टी त्याच्या सहाध्यायांनीं सांगितलेल्या आहेत. परंतु ज्यांची आत्मनिष्ठा दृढ आहे, त्यांच्यावर असल्या संकटांचे प्रहार कितीहि झाले तरी त्यांचा दृढनिश्चय यत्किंचित्‌हि ढळत नाहीं. अशा मनुष्यांना संकटें जशीं येतात तशीं तीं नाहींशीं होतात व आकाशांतील अभ्रें नाहींशीं झाल्याबरोबर तें जसें निर्विकार असतें, त्याप्रमाणें अलौकिक पुरुषांच्या मनाची स्थिति असते. जो प्रसंगांस भीत नाहीं, त्याला ईश्वरी योजनेनें त्यातून बाहेर निघण्यांचा कांहीं तरी मार्ग उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. तीर्थरामाची स्थितिहि अशीच झाली. लाहोर येथील सुप्रसिद्ध धनिक गृहस्थ रायबहादुर लाला मेलाराम यांनीं आपल्या दोन मुलांना थोडें शिकवीत जाण्याविषयीं तीर्थरामाला विनंति केली.

अर्थात् वाढलेल्या खर्चासंबंधाची काळजी अशा रीतीनें दूर झाली. त्यावेळीं तो आपला आयुष्यक्रम किती नियमितपणानें, आनंदानें व उत्साहानें घालवीत असे, हें त्यानें भगतजींना पाठविलेल्या अनेक पत्रांवरून स्पष्ट होत आहे. वयाच्या सोळाव्या वर्षापासून स्वामी रामतीर्थ यांनीं भगतजींना लिहिलेलीं सुमारें अकराशें पत्रें त्यांच्याजवळ आहेत. व त्यांमध्यें स्वामींच्या आत्मिक उन्नतीचें प्रतिबिंब यथास्थित उतरलें असल्यामुळें स्वामींच्या आत्मानुभवाच्या इतिहासाच्या दृष्टीनें सदरहू पत्रें अत्यंत महत्वाचीं आहेत. हीं सर्व पत्रें व स्वामींनीं आपल्या हातांनीं केलेलीं कांहीं टांचणें आमच्या उपयोगाकरितां देण्याचें भगवतजींनीं अत्यंत कृपाळूपणानें कबूल केलें आहे, व हीं पत्रें आमच्या वाचकांच्या माहितीसाठीं पुढें केव्हां तरी देण्याचा आमचा विचार आहे.

## मित्रांचें प्रेम व उपदेश.

तीर्थरामाची शालीनता पाहून त्याचे सहाध्यायी मोठ्या आदरानें व प्रेमानें त्याला गोस्वामी तीर्थराम असें म्हणत असत. पुढें पुढें तर त्याचे मित्र प्रेमातिशयामुळें गोस्वामी तीर्थराम याच्याऐवजीं ' गुरुसाईजी ' असेंच त्याला म्हणत असत व महाविद्यालयांतहि त्याचें हेंच नांव पडलें.

बी. ए. च्या वर्गांत दाखल होईपर्यंत तीर्थरामाला संस्कृत मुळींच येत नव्हतें. व हिंदीसुद्धां म्हणण्यासारखें येत होतें असें नाहीं. फारसी भाषेंत मात्र त्याचा हातखंडा होता व यामुळें महाविद्यालयांतलि मौलवी साहेबांची त्याच्यावर फार मर्जी होती व त्याची तारीफ करण्यांत मौलवी साहेबांना मोठें कौतुक वाटत असे. मौलवींकडून होणारी ही त्याची प्रशंसा व फारसी भाषेंतील त्याचें प्राविण्य हीं पाहून संस्कृत ही दुसरी भाषा घेणाऱ्या त्याच्या वर्गांतील कांहीं मित्रांना फार वाईट वाटे व तीर्थरामानें संस्कृत घेतलें नाहीं, ही गोष्ट त्यांच्या मनाला लागे. एक दिवस तीर्थरामाला गांठून ते म्हणाले, ' गुसांईजी, आपण एक तर ब्राम्हण, तशांत गोस्वामी भक्तशिरोमणि तुलसीदास यांच्या पवित्र कुलांत आपला जन्म झालेला; अशा स्थितींत आपल्या कुलाची मुळची जी संस्कृत भाषा तिच्याकडे दुर्लक्ष्य करून यावनी भाषेचा रात्रंदिवस अभ्यास करण्यांत आपण दंग होऊन गेलां

आहां, हें आश्चर्य नव्हे काय ? फारसी भाषेंत प्राविण्य संपादन करून स्वतःच्या संस्कृत भाषेची अवहेलना करणें, हें ब्राह्मणांना लाजिरवाणें नाहीं काय ? गोस्वामीकुलासारख्या उत्तमोत्तम ब्राह्मणकुलांत फारसी भाषेचा पुरस्कार होऊन संस्कृत भाषेचा व विद्येचा अनादर होऊं लागेल, तर ब्राह्मणसमाजाचें ब्राह्मणत्व नष्ट होण्याचे दिवस नजीक आले असेंच म्हटलें पाहिजे. आणि या नाशाला परकी भाषेच्या अध्ययनांत तन, मन, धन अर्पण करून संस्कृताच्या अभ्यासाविषयीं बेफिकीर राहणारे आपणांसारखे उच्चकुलोत्पन्न ब्राह्मणच कारणीभूत व्हावे, ही खरोखर लज्जास्पदतेची कमालच होय ! '

मित्रांच्या शब्दांतील बाणेदार प्रेमळपणा व खोंच यांचा तीर्थरामाच्या अंतःकरणावर विलक्षण परिणाम झाला. आपल्या मित्राचा उपदेश तीर्थरामाला पटला. मनाला अत्यंत वाईट वाटलें व डोळ्यांत अश्रु आणून नम्रतापूर्वक पण निश्चयानें तो आपल्या मित्रांना म्हणाला, ' बी. ए. च्या परीक्षेंत दुसरी भाषा फारसी घेतली तर नांवाचा ब्राह्मणच नव्हे ! उद्यांपासून संस्कृत शाखेंत मी आपलें नांव दाखल करतों आणि बी. ए. च्या परीक्षेंत हा तीर्थराम संस्कृतच घेईल हें पक्कें लक्ष्यांत ठेवा ! '

## संस्कृत शिकण्याची प्रतिज्ञा.

आपल्या बालमित्रांजवळ वरीलप्रमाणें प्रतिज्ञा केल्यावर दुसऱ्या दिवशीं संस्कृत शाखेंत आपलें नांव दाखल करण्यासाठीं महाविद्यालयाच्या मुख्य गुरूकडे तीर्थरामानें अर्ज केला. ही बातमी समजल्यावर विद्यालयांत मोठीच चळवळ उडाली. विशेषतः फारसीचे अध्यापक मौलवी साहेब यांना ही बातमी ऐकून तर फार दुःख झालें. कारण, तीर्थरामावर त्यांचें तसेंच प्रेम होतें. व यामुळें फारसी सोडून संस्कृत न घेण्याविषयीं तीर्थरामाला उपदेश करून युक्तिप्रयुक्तीनें त्याचें मन वळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण खडकावर पेरलेल्या बियाप्रमाणें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मोठीं माणसें कोणत्याहि गोष्टीचा पूर्ण विचारांतीं निश्चय करीत असतात. व तसा निश्चय झाल्यानंतर त्यांचा तो निश्चय अढळ राहातो. मग प्रत्यक्ष वज्राचे जरी आघात त्यांच्यावर येऊन कोसळले तरी त्यांचा निश्चय बदलत नाहीं. लोकोत्तर पुरुषांच्या अंतःकरणाची स्थिति भवभूतीनें

झटल्याप्रमाणें 'वज्रापेक्षां कठोर व कुसुमापेक्षांहि कोमल' अशी असते. तीर्थरामाचा निश्चय पूर्ण विचारानें झालेला होता व म्हणून मौलवी साहेबांचा उपदेश त्याचा तो निश्चय ढळविण्याला समर्थ झाला नाहीं. तीर्थराम संस्कृताच्या वर्गांत जाऊन बसला, पण या ठिकाणींहि एक अकल्पित अडचण उत्पन्न झाली. ती अडचण म्हणजे संस्कृतचे अध्यापक पंडितजी महाराज यांनीं केलेली नसती उठाठेव होय. वास्तविक पंडितजींना तीर्थराम संस्कृत घेत आहे, हें पाहून वाईट वाटण्याचें कांहीं कारण नव्हते. परंतु तसें तें वाटलें असावें असें दिसतें. कारण, विद्यालयाच्या मुख्य गुरूंकडे जाऊन त्यांनीं तक्रार केली कीं,' तीर्थरामाला अद्यापपर्यंत संस्कृताचा गंध नाहीं. आजपर्यंत हा फारसीच शिकत आला. अर्थात् आतांच संस्कृतच्या वर्गांत याला दाखल करतां येत नाहीं; शिवाय बी. ए चा संस्कृतचा अभ्यास याला आतां झेंपणार नाहीं. आणि हा नापास झाला म्हणजे विनाकारण माझी मात्र अपकीर्ति होईल !' पंडितजींची तक्रार मोठी चमत्कारिकच खरी, पण मुख्य गुरू झाले तरी त्यांनीं तरी ही जबाबदारी आपल्यावर काय म्हणून घ्यावी ? पुढें याचा परिणाम असा झाला कीं, तीर्थरामाला संस्कृतच्या वर्गांत दाखल करणें किंवा न करणें, हें त्यांनीं पंडितजींच्या मर्जीवरच सोंपविलें. यामुळें तीर्थरामाची मात्र त्रिशंकूसारखी स्थिति झाली. संस्कृतच्या वर्गांत पंडितजी बसूं देईनांत आणि फारसीच्या वर्गांत पुनः बसण्याला त्याचें मन घेईना. तीर्थरामाला मोठा विचार पडला. आतां पुढें काय करावें, या विवंचनेंत त्याचें मन घोटाळूं लागलें. परंतु जरा विचार करून संस्कृत घेतलेल्या आपल्या मित्रांच्या साहाय्यानें घरीं थोडेंसें संस्कृत शिकून पंडितजींची पुनः प्रार्थना करावी, असा त्यानें बेत करून संस्कृत शिकण्यास प्रारंभ केला. बी. ए. च्या परीक्षेला त्या वेळीं 'रघुवंश' नेमला होता. त्यांतील एकदोन सर्ग मित्रांच्या मदतीनें थोड्याच दिवसांत त्यानें तयार केले. व तसें केल्याचें पंडितजींस जाऊन सांगितलें. पंडितजींनीं कांहीं प्रश्नहि विचारून पाहिले. व त्यांचीं उत्तरें समाधानकारक मिळाल्यामुळें आश्चर्यचकित होऊन पंडितजी म्हणाले, 'तीर्थरामा, तुझी स्मरणशक्ति इतकी विलक्षण असेल अशी मला कल्पनाहि नव्हती. आजच मुख्य गुरूजवळ तुझ्या बुद्धिमत्तेची मी तारीफ करतों आणि आरंभींच संस्कृत-

वर्गात तुला बसूं न देण्यांत माझी चूक झाली, असें स्पष्टपणें कबूल करून त्यांच्या परवानगीनें तुझें नांव संस्कृतच्या वर्गात दाखल करतों.'

## निराशेचा प्रसंग!

अशा रीतीनें तीर्थरामाचा संस्कृतच्या वर्गांत एकदांचा प्रवेश झाला. पण हा विषय नवीन असल्यामुळें व यांत प्राविण्य संपादन करण्याचा त्याचा निर्धार असल्यामुळें संस्कृतच्या अध्ययनांत त्याचा सर्व वेळ जाऊं लागला. आणि इतर विषयांच्या अभ्यासाकडे आवश्यक तितकें लक्ष पुरविण्याला त्याला वेळ मिळेनासा झाला. संस्कृत घेण्याची प्रतिज्ञा पूर्ण करण्याच्या भरांत इतर विषयांची साहजिक हेळसांड झाली व त्यामुळें बी. ए. च्या परीक्षेंत त्याला यश आलें नाहीं. परीक्षा न उतरल्यामुळें शिष्यवृत्ति अर्थात् बंद झाली व निर्वाहाकरितां आतां काय उद्योग पहावा, अशा विवंचनेंत तो पडला. या वेळच्या त्याच्या मनःस्थितीचें चित्र तीर्थराम हा स्वामी रामतीर्थ झाल्यानंतर त्यानें आपला शिष्य नारायणस्वामी याजपाशीं पुढीलप्रमाणें रेखाटलें आहे. " परीक्षा नापास झाल्याची बातमी रामाला समजली तेव्हां अंतःकरणावर एकदम वज्रप्रहार झाल्याचा भास झाला, व अंतःकरणाचे शतशः तुकडे होतात कीं काय, अशी भीति वाटली. डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहूं लागला; आणि दुःखाचा डोंगरच कोसळल्याप्रमाणें मनाची स्थिति झाली. एक पैहि मदत न करण्याचा वडिलांनीं संकल्पच केला होता. मदत तर बाजूलाच राहिली, पण रामाच्या अर्धांगीला त्यांनीं रामाजवळ आणून ठेविली होती. अशा रीतीनें एफ. ए. च्या वर्गात असतांना गृहस्थाश्रमाचा बोजा रामावर लादण्यांत आला होता. शिष्यवृत्तीच्या जोरावर तो कसाबसा सोसला जाई. परंतु परीक्षा न उतरल्यामुळें शिष्यवृत्तीहि जेव्हां बंद झाली व दुसरीकडून मदत येण्याची आशा दिसेनाशी झाली, तेव्हां चित्त भांबावून गेलें. अशा उद्विग्न आणि श्रांत स्थितीमध्यें स्वरूपाचें ध्यान करणें किंवा श्रीकृष्णाचें प्रेमपुरस्सर नामस्मरण करणें, हाच चित्ताला शांति येण्याला एकच उपाय उरला. या वेळीं अश्रूंच्या प्रवाहाबरोबर अंतःकरणांतून मुखावाटे पुढील श्लोक निघत असे.

'त्वमेव माता पिता त्वमेव
त्वमेव बंधुः सखा त्वमेव

त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव ॥

अभ्यासक्रम पुढें चालू कसा ठेवावा, या विवंचनेंत असतां रामाची देवाजवळ नित्य हीच प्रार्थना असे कीं, " आतां राम तुझा आणि तूं रामाचा. तुझें नित्य नामस्मरण हेंच रामचें आतां कर्तव्यकर्म. तुझ्या इच्छे-बाहेर आतां तो नाहीं. त्याला सर्व प्रकारचें सहाय्य करणें, हें आतां देवा ! तुझें कर्तव्य आहे. रामाच्या शरिरावर आतां त्याची मालकी नाहीं. त्यानें आतां सर्वस्व तुला अर्पण केलें आहे. राम आतां सर्वस्वी तुझा झाला. आतां पाहिजे तर त्याला तार किंवा मार ! " जगांत दुःखाचे प्रसंग हे सर्वांवरच येतात, त्यांतून कोणीहि सुटला आहे असें नाहीं. व वास्तविक पाहिलें तर परीक्षा नापास होण्याचें दुःख तीर्थरामासारखें अनेक अप्रतिम बुद्धिमान विद्यार्थ्यांच्याहि वांट्याला येत नाहीं असें नाहीं. व सामान्य विद्यार्थ्यांपेक्षां अलौकिक बुद्धीच्या विद्यार्थ्यांना परीक्षा नापास होण्याचे प्रसंग थोडे येत असल्यामुळें तशा प्रसंगीं त्यांना अत्यंत वाईट वाटावें यांतहि नवल नाहीं. परंतु याच्याहिपेक्षां मोठमोठाले प्रसंग प्रपंचामध्यें जरी अनेकांवर येऊन कोसळतात, तरीसुद्धां वरील उद्गारांत ईश्वरविषयक भावनांशी जी उत्कटता दिसून येते ती मात्र फारच थोड्यांच्या ठिकाणीं प्रसंगामध्यें दिसून येते. रामतीर्थांचें अलौकिकत्व या ठिकाणीं विशेष स्पष्टरीतीनें दृग्गोचर होत आहे. सामान्य मनुष्य व सत्पुरुष यांच्यांमध्यें जो विशेष फरक दिसून येतो तो या ठिकाणीं लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. अज्ञ मनुष्यांवर केवढालेहि मोठे प्रसंग आले तरी प्रपंचविषयक वैराग्य व ईश्वराविषयक भक्ति दृढ करण्याला ते फारसे कारणीभूत होत नाहींत. संकटांत-विपत्तींत ते रडतात मात्र; परंतु आपल्या या सर्व दुःखाचें बीज काय व तें कोणत्या साधनानें नाहींसें होईल, या प्रश्नाचा विचार त्यांच्या मनाला कधीं शिवलाहि नाहीं. किंवा कधीं शिवलाच तर स्मशानवैराग्याप्रमाणें त्यांच्या मनांतील उद्वेगाच्या व वैरा-ग्याच्या लहरि फारच थोडा वेळ टिकतात, व ईश्वराचें स्मरण प्रसंगांत जरी प्रत्येकाला होत असलें तरी दुःखाचे दिवस सरल्याबरोबर त्यांच्या अंतःकरणांतील ईश्वराचें स्मरण नामशेष होऊन जातें. सामान्य मनुष्यांची अशी स्थिति असते. परंतु सत्पुरुषांकडे पहावें तर याच्यापेक्षां अगदीं

भिन्न स्थिति दिसून येते. दिसण्यांत अगदीं सामान्य असे दुःखाचे प्रसंगहि ज्ञात्या पुरुषांना वैराग्य उत्पन्न करण्याला पुरेसे होतात. वैराग्य हें सारासार-विचारांत आहे, नुसत्या दुःखाच्या प्रसंगांत नाहीं; व सामान्य मनुष्यांचीं अंतःकरणें ज्या प्रसंगांत कोरडीं ठणठणीत राहातात त्यांच्यापेक्षांहि कमी महत्वाच्या संकटांत ज्ञात्यांच्या हृदयांत भक्ति, ज्ञान, वैराग्य, यांचा अखंड प्रवाह वाहूं लागतो. व सत्पुरुषांचें लक्षण यांतच आहे.

## आशेचा अंकुर.

वर वर्णन केल्याप्रमाणें परमेश्वराची आराधना करण्यांत तीर्थराम तत्पर असे. ईश्वरभजनांत चित्तवृत्ति तल्लीन झाली असतां एके दिवशीं त्याच्या मावशीचा नवरा रघुनाथदास यांच्याकडून पुढील उत्तेजनपर पत्र आलें. 'बेटा तीर्थराम! घाबरूं नकोस; धैर्य धर आणि नेटानें पुढें अभ्यास चालव. महाविद्यालयांतील खर्चाकरितां दरमहा वीस पंचवीस रुपये तुला मी पाठवीत जाईन. शिवाय एकदोन शिकवण्याहि धर; तात्पर्य कोणत्याहि रीतीनें नाउमेद न होता मोठ्या उत्साहानें आणि हिंमतीनें आपला अभ्यास जारीनें सुरू कर.' येणेंप्रमाणें रघुनाथदास व दुसरे एकदोन हितचिंतक यांची मदत मिळाल्यामुळें तीर्थरामानें बी. ए. च्या परीक्षेची पुनः तयारी केली; व परीक्षेंत सर्व विश्वविद्यालयांत तो पहिला आला. यामुळें एम्. ए. चा अभ्यास करण्याकरितां त्याला मोठी छात्रवृत्ति मिळाली. हा अभ्यास लाहोर येथील 'सरकारी महाविद्यालयांत' त्यानें सुरू केला. पहिल्यापासून गणित हा त्याचा आवडीचा विषय असल्याकारणानें तोच विषय त्यानें एम्. ए. करितां घेतला. सदरहू अभ्यास चालू असतां 'फोरमन खिश्चन महाविद्यालयां'त कांहीं दिवस बी. ए. च्या विद्यार्थ्यांना गणित विषय शिकविण्याचें काम तो करीत असे, व तेंहि कोणत्याहि तऱ्हेचा मोबदला न घेतां केवळ हौसेनें म्हणून करीत असे. अशा रीतीनें गणितासारखा गहन विषय शिकविण्याचें जबाबदारीचें काम करीत असतांहि एम्. ए. च्या परी-क्षेंत तीर्थराम पहिलाच आला. या वेळीं त्याचें वय सुमारें बावीस वर्षांचें होतें.

## आणीबाणीची वेळ!

एम. ए. च्या परीक्षेचा निकाल लागल्यानंतर थोड्याच दिवसांत तीर्थ-रामजींच्या आयुष्यक्रमांतील आणीबाणीचा प्रसंग येऊन ठेपला. या प्रसं-

गानें त्यांच्या भविष्यकालीन कर्तबगारीचें घोरण कोणत्या वळणावर जाणार, हें निश्चित व्हावयाचें होतें. तो प्रसंग असाः—पंजाब विश्वविद्यालयातर्फे सरकारी छात्रवृत्ति देऊन विलायतेंतील 'रँगलर'च्या-गणित विषयांतील अत्युच्च दर्जाच्या आणि बहुमानाच्या-परीक्षेकरितां तीर्थरामजींना लंडन येथें पाठविण्याचा त्यांच्या अध्यापकांचा विचार होता, व त्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेमुळें व गणितविषयांतील प्राविण्यामुळें ही छात्रवृत्ति वास्तविक त्यांनांच मिळणें न्याय्य होतें. परंतु 'सीनियर रँगलर' होण्यापेक्षां तीर्थरामजींनीं वेदान्तधर्मप्रवर्तक आचार्य व्हावें, अशी ईश्वरी योजना व नेमानेम असल्यामुळें त्यांचा हक्क असतांहि ही छात्रवृत्ति त्यांना न मिळतां एका मुसलमानाला मिळाली. लाहोरच्या सरकारी महाविद्यालयाचे तत्कालीन मुख्य अध्यापक बेलसाहेब यांना तीर्थरामजींच्या विलक्षण बुद्धिमत्तेचें अतिशय कौतुक वाटे व प्रांतिक 'सनदी नोकरीच्या' परीक्षेकरितां त्यांनीं खटपट करावी, अशी साहेब मजकुरांची फार इच्छा होती परंतु हा विचार तीर्थरामजींच्या अंतःकरणाला बिलकुल पटला नाहीं. लहानपणापासून एकान्तवासांत एकाग्रतेनें निरनिराळ्या विषयांचें अध्ययन करण्यांत त्यांचे दिवस गेले होते. ज्या ज्या विषयांच्या अध्ययनानें बुद्धीचें सामर्थ्य निरनिराळ्या दृष्टींनीं पूर्णावस्थेस पोहोंचेल, अशा विषयांवरील ग्रंथांचें अत्यंत परिश्रम घेऊन परिशीलन करणें, हा एकच ध्यास त्यांच्या मनाला अहोरात्र लागून गेलेला होता. एखादा चित्रकार एखादें चित्र काढण्यांत गुंतलेला असतां चित्राच्या निरनिराळ्या अवयवांची सौंदर्याच्या दृष्टीनें रेखाटणी करण्यांत गढून गेलेला असतो, त्याप्रमाणें आपल्या बुद्धीची सर्वांगपरिपूर्ण परिपक्वता करण्यांत त्यांचें चित्त अखंड वेधून गेलेलें होतें. तीर्थरामजींचा व्यासंग केवढा दांडगा होता, याचें वर्णन ह्या भागांतील 'मृत्यूनंतरची स्थिति' या व्याख्यानांत त्यांनीं स्वतःच केलें आहे. यांत विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे ती ही कीं, आपण अत्यंत परिश्रमपूर्वक संपादन केलेल्या ज्ञानाचा सर्वत्र प्रसार करावा हें उदात्त ध्येय दृष्टिपुढें अहोरात्र ठेवण्यांत त्यांच्या सर्व अध्ययनाचें पर्यवसान झालेलें होतें. अर्थात् बेलसाहेबांनीं तीर्थरामजीच्या पुढें 'सनदी नोकरी'चें ध्येय मांडलें तेव्हां त्यांना उत्तर देतांना या सर्व गोष्टींचा त्यांनीं विचार केला. व डोळ्यां-

तून अश्रु चालले आहेत व नम्रतेनें मान खालीं वांकली आहे. अशा स्थितींत तीर्थरामजींनीं असे उद्गार काढले कीं, 'आजपर्यंत इतक्या कष्टांनीं बुद्धिरूपी शेतामध्यें जी पेरणी करण्यांत आली आहे तिचें अंतिम एखाद्या जिल्ह्याचा अंमलदार व्हावें, हें खास नाहीं. तर बुद्धिरूपी शेतामध्यें उत्पन्न होणाऱ्या ज्ञानरूपी धान्याचा धर्मोपदेशक म्हणून सर्वत्र प्रसार करावा, हेंच रामाचें ध्येय आहे!' रँगलरच्या परीक्षेचा अभ्यास करण्याकरितां तीर्थरामजींस छात्रवृत्ति मिळाली नाहीं, हें एका दृष्टीनें ईश्वरी सूत्रच म्हटलें पाहिजे. 'सीनियर रँगलर' काय किंवा 'सनदी नोकर' काय वर्षाला कोणी तरी होतातच. आजपर्यंत किती तरी 'रँगलर' आणि 'सनदी नोकर झाले आहेत! परंतु स्वामी विवेकानंद किंवा स्वामी रामतीर्थ यांच्यासारखा लोकोत्तर जगदुद्धारक अनेक शतकांत एकदाच निर्माण होत असतो व केव्हांहि एकदांच निर्माण होणार! आकाशांत नक्षत्रें असंख्य आहेत, पण भगवान् सविता मात्र एकच आहे. तीर्थरामजींनींहि छात्रवृत्तीकरितां जो अर्ज केला होता तो करण्यांत त्यांचा हेतु केवळ रँगलर होऊन रहावें, एवढाच नव्हता. त्यांच्या मित्रांनीं जेव्हां त्यांना विचारलें कीं, 'विलायतेला जाऊन तूं कसला अभ्यास करणार?' तेव्हां तीर्थरामानें—भावी रामतीर्थ स्वामींनीं—हाच जबाब दिला कीं, 'मी अध्यापक होईन किंवा धर्मोपदेशक तरी होईन. अर्थात् गणितशास्त्राचा किंवा तत्त्वज्ञानाचा मी अभ्यास करीन.' 'सनदी नोकरी' करितां मात्र मी बिलकुल खटपट करणार नाहीं.' असो; तीर्थरामजींनीं केलेला अर्ज नामंजूर झाला; परंतु ज्या जागेकरितां त्यांनीं अंतर्यामीं ईश्वराकडे अर्ज केला होता किंवा ईश्वरानें ज्या जागेकरितां त्यांना निर्माण केलें होतें, त्या जागेवर ते विराजमान झाले, हें भारतवर्षाचें किंबहुना सर्व जगाचें भाग्यच म्हटलें पाहिजे.

## नोकरीचा राजीनामा.

एम. ए. झाल्यावर सियालकोट येथील विद्यालयाच्या मुख्य अध्यापकाचें काम तीर्थरामजींनीं कांहीं दिवस केलें. तदनंतर लाहोर येथील महाविद्यालयांत अध्यापकाचें काम केलें. तें चालू असतां त्यांचा अध्यात्मिक अभ्यास सतत चालू होता. यामुळें पुढेंपुढें अध्यापनासारख्या व्यावहारिक कार्यांत रोज पांच पांच तास घालविणें त्यांना जड वाटूं लागलें, व अशे-

रीस केवळ आत्मोन्नतीकडे आपला काल घालवितां यावा, अशा उत्कट इच्छेनें प्रेरित होऊन ' सरकारी विद्यालयांतील नोकरीचा त्यांनीं राजीनामा दिला. परंतु ' प्रपंचांत सुवर्णाशिवाय चालणार कसें ? ' ह्या विचारानें प्रपंचाचा आवश्यक तेवढा खर्च चालावा, म्हणून लाहोर येथील ' पौर्वात्य विद्यालयांत, एक तासभर गणित व वेदान्तविषय शिकविण्याचें काम त्यांना पतकरावें लागलें. परंतु पुढें परमार्थाची ओढ त्यांच्या मनाला इतकी लागली कीं, हे एक दोन ताससुद्धां प्रपंचाप्रीत्यर्थ खर्चीं घालणें त्यांच्या जीवावर येऊं लागलें व अखेरीस शके १८२३ च्या ज्येष्ठ महिन्यांत याहि नोकरीचा त्यांनीं कायमचा राजीनामा दिला. तीर्थरामजींच्या पूर्ण विरक्तावस्थेस येथूनच प्रारंभ झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## शारीरिक सामर्थ्य.

शरीर अशक्त व दुबळें असलें तर नुसत्या ज्ञानाचा उपयोग काय ? खंबीर मनाला पुष्टि देणारें शरीरहि खंबीर आणि सुदृढ असलें पाहिजे. अशक्त शरीरांत दांडगें मन, ही विरोधी स्थिति फार दिवस टिकूं शकत नाहीं. ज्यांच्या अंगांत शक्ति नाहीं त्यांच्या मेंदूंत केवढालेहि मोठाले विचार असले तरी त्यांचा स्वतःला व जगाला उपयोग कितपत होणार, हें उघडच आहे. व ' शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ' या वाक्याची यथार्थता लक्ष्यांत आणून तीर्थरामजींनींहि शारीरिक शक्ति कमविण्याकडे एम्. ए. झाल्यापासून विशेष लक्ष पुरविलें होतें. शारीरिक, बौद्धिक, व आध्यात्मिक अशा सर्व दृष्टींनीं मनुष्याची उन्नतावस्था होणें, हीच सर्वांगपरिपूर्णतेची त्यांची व्याख्या ठरलेली असल्यामुळें शारीरिक स्थितीकडे दुर्लक्ष्य करून त्यांचें चालण्यासारखें नव्हतें. अगदीं लहानपणीं झालेला मातेचा वियोग, अभ्यासक्रम चालू असतां पुस्तकें विकत घेणें वगैरे गोष्टींकरितां उपासमार काढण्याचे त्यांच्यावर आलेले कित्येक प्रसंग, वाचनाचा अहर्निश हव्यास वगैरे अनेक गोष्टींचा त्यांच्या शरीरसामर्थ्यावर अत्यंत अनिष्ट परिणाम झालेला होता. एम्. ए. च्या परीक्षेंत जेव्हां ते पहिले आले तेव्हां तीर्थरामाच्या अस्थिपंजरांत प्राण कसा राहिला आहे, याचें त्यांच्या कित्येक मित्रांना आश्चर्य वाटे. अस्थि आणि चर्म यांशिवाय त्यांच्या शरीरांत कांहीं राहिलें नव्हतें. मान बगळ्यासारखी उंच दिसे. अतिपरिश्रमानें त्यांचा

आवाज घोगरा झाला होता. व त्यांची प्रकृति इतकी क्षीण झाली होती कीं, पुष्कळ वेळ त्यांच्यानें बोलवतहि नसे. परंतु लवकरच सशक्त आणि मजबूत होण्याचा त्यांनीं निश्चय केला, व्यायामाच्या नवीन नवीन पद्धति शोधून काढून अगदीं नियमितपणानें व्यायाम करून त्यांनीं आपलें शारीरिक सामर्थ्य वाढविलें, व शेवटपर्यंत त्यांचा व्यायाम कधीं अंतरला नाहीं. नियमित व्यायाम आणि इच्छाशक्ति यांच्यायोगानें पुढें हें सामर्थ्य इतकें वाढलें कीं, संन्यास घेतल्यावर हिमालयाच्या टेंकड्यांवर एका दिवसांत वीस कोस चढून जाणें, हें त्यांना कांहींच वाटत नसे. अमेरिकेंत गेल्यावर तेथील पलटणींतिल शिपायांची एकदा वीस कोसांच्या दौडीची शर्यत लागली होती; त्या वेळीं आपणहि शर्यतींत शिरावें, अशी इच्छा होऊन ते धावूं लागले. व ती शर्यत जिंकण्याबद्दल ज्या शिपायाला पदक बक्षीस देण्यांत आलें त्याच्या पूर्वीं दोन तास स्वामी संकेतस्थलीं जाऊन पोहोंचले! मोठमोठे कार्यकर्ते पुरुष नेहमीं झपाट्यानें चालतात, असा सामान्य नियम आहे. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या 'श्रीसमर्थ प्रताप' ग्रंथांत समर्थांच्या चालण्यासबंधानें असें वर्णन आहे:—' समर्थ हनुमानस्वरूप वायोरूप निर्धारें । जातां तीर धरिती मागिल्या करें । समुद्रीं जहाज चाले जेविं त्वरें । तेवी सत्वरें श्रीसमर्थगमन ॥ " स्वामीची नेहमींची चालहि इतकी जलद असे कीं, सान्फ्रान्सिस्को येथील एका रस्त्यांतून चालत असतां एका गृहस्थानें त्यांना थांबवून असे उद्गार काढले कीं, ' स्वामी, आपण इतके जलद चालतां, कीं आपण जमिनीवरून चालत आहां असें वाटत नाहीं, तर जमीनच आपल्यामागून येत आहे कीं जमीन आणि आपण एकच आहां हें पाहाणारास सांगतां येत नाहीं. ' यावर ' हो ' इतकेंच स्वामींनीं हंसत उत्तर दिलें व ते पुढें निघून गेले. फक्त एक व्याघ्रांबर परिधान करून गंगोत्री, जम्नोत्री आणि बदरीनाथ असल्या बिकट यात्रा त्यांनीं पायीं केल्या. जन्मोत्रीहून गंगोत्रीला ते बर्फाच्या नद्यांतून गेले. हिमालयांत किंवा अमेरिकेंत असतांना दाट अरण्यांत किंवा एखाद्या गुहेंत ते अगदीं एकटे राहात असत. हिमालयांतील पहाडी लोक स्वामींना देव समजत असत. कारण, तेथील धनगरांचीं गुरें पावसाळ्यांत नद्यांना पूर आला असतां एका तडीहून दुसऱ्या तडीला आणून देण्याचें

विकट काम ते करीत असत. एखाद्या वेळीं मध्यरात्रीं उठून मृत्यु आणि भय यांचा जणूं उपहास करीत अरण्यांतून ते स्वच्छंदानें फिरत असत. ज्यांनीं लहानपणाचें त्यांचें कृश शरीर पाहिलें होतें, त्यांना पुढें स्वामी झाल्यावर त्यांची ती उल्हासी, आनंदी, सतेज व निर्भय मुद्रा पाहून पूर्वीचा तीर्थराम हाच कीं काय अशी शंका येई.

## कृष्णभक्ति व दर्शन.

तीर्थरामाजींना परमार्थाचें बाळकडु अगदीं लहानपणापासूनच मिळालें होतें. तशांत भगतजींसारख्या महात्म्यांचा सहवास घडून त्यांच्या मुखांतून वेदान्तविषयक प्रवचनें त्यांना ऐकण्यास मिळालीं होतीं. व स्वभावतःच त्यांचें मन प्रेमळ व भक्तियुक्त होतें. यामुळें त्यांच्या अंतःकरणांतील परमार्थाचा अंकुर दिवसेंदिवस वृद्धिंगत होत गेला. श्रीकृष्णाच्या लीला वाचण्यांत आणि त्यांचें मनन करण्यांत तीर्थरामजींचें मन गढून जात असे. महाविद्यालयांत शिकत असतांना उन्हाळ्याच्या सुटीचे दिवस मथुरा व वृंदावन येथें श्रीकृष्णपरमात्म्याच्या रासक्रीडा पाहाण्यांत ते घालवीत असत. व गोपींच्या अनन्यभक्तीचा त्यांच्या मनाला इतका चटका लागून गेला कीं, रासक्रीडेशिवाय त्यांना कांहीं सुचेनासें झालें. या त्यांच्या तीव्रभक्तीमुळें कित्येक वेळां श्रीकृष्णपरमात्म्याचें त्यांना दर्शन होत असे. या विषयासंबंधानें नारायणस्वामींजवळ स्वतः स्वामींनीं असे उद्गार काढले आहेत कीं, ' स्नान करीत असतां कृष्णपरमात्म्यानें मला दर्शन दिलें. आम्हीं एकमेकांना कडकडून भेटलों. परंतु भेट झाल्यानंतर थोड्याच वेळानें हातावर हात मारून भगवान् गुप्त झाले ! ' भक्ताच्या जिज्ञासावस्थेची ही एक विशिष्ट भूमिका असून या स्थितींत असतां भक्ताच्या तीव्र भावना मूर्त स्वरूप धारण करून त्याच्यापुढें उभ्या राहातात. तीर्थरामजींनाच असल्या दर्शनाचा योग आला असें नव्हे; तर प्राचीन कालापासून आज मिती पावेतों होऊन गेलेल्या सत्पुरुषांच्या चरित्रांतून निरनिराळ्या उपास्यदेवतांचीं भक्तांना दर्शनें झाल्याचीं वर्णनें आढळतात. परंतु या ठिकाणीं हें विसरतां कामा नये कीं, हा कांहीं आत्मसाक्षात्कार किंवा प्रत्यक्ष आत्मस्वरूपदर्शन नव्हे; तर तत्पूर्वीची भावनेच्या उत्कर्षाची ती एक विशिष्ट

पायरी आहे. व पुरुष हा श्रद्धामय असून ज्याची जशी भावना असेल तसें त्याला दर्शन व्हावें, ह्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं एक नाहीं. असो.

बी. ए. च्या वर्गांत असतांनाच तीर्थरामजींनीं आपणास कृष्णपरमात्म्याला अर्पण केलें होतें. आपली हरएक आशा आणि कार्य हीं त्यांनीं भगवंताच्या मर्जीवर सोंपविलीं होतीं. आत्मा अकर्ता आहे, ही भावना त्यांच्या ठिकाणीं दृढतर होऊं लागली होती. या सुमारास लाहोर येथील सनातन धर्मसभेच्या मंत्र्याच्या जागीं त्यांची नेमणूक झाली. या सभेपुढें कृष्णपरमात्म्यासंबंधानें व्याख्यानें चालू असतां त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचे प्रवाह वाहूं लागत. व त्यांच्या योगानें त्यांचे कपडे भिजून जात. इतका प्रेमातिशयाचा उमाळा वक्त्याच्या ठिकाणीं दिसून आल्यानंतर श्रोत्यांचीं अंतःकरणें सद्गदित व्हावीं, यांत नवल नाहीं. नारायणस्वामी यांनीं तीर्थरामजींच्या या वेळच्या भक्तियुक्त प्रेमळपणाचा स्वानुभव पुढीलप्रमाणें लिहिला आहे. ' अमृतसर येथें तेथील सनातन धर्मसभेच्या वार्षिकोत्सवानिमित्त जीं व्याख्यानें झालीं, त्या सर्वांत तीर्थरामजींचीं व्याख्यानें अत्यंत सरस व हृदयंगम अशीं झालीं. भगवद्गीता व रासलीला या विषयांवरील गुसाईजींच्या व्याख्यानांचा स्वतः माझ्या अंतःकरणावर झालेला परिणाम तर अवर्णनीय आहे. त्या वेळीं भगवद्गीतेवर माझी श्रद्धा नव्हती; रासक्रीडेंत मला कांहींच अर्थ वाटत नसे. तसेंच श्रीकृष्णपरमात्म्याचें आचरणहि एकंदरींत मला प्रशंसनीय वाटत नसे. पण गुसाईजींच्या वाणींत अशी अजब जादू भरलेली होती कीं, माझ्यासारखा अश्रद्धाळू व अभाविक मनुष्यसुद्धां त्यांचीं व्याख्यानें ऐकून गीतेचा अभ्यास करूं लागला आणि रासक्रीडेचें ह्रद्गत व श्रीकृष्णचरित्राचें यथार्थ रहस्य समजावून घेण्याकडे त्याची प्रवृत्ति झाली.

या दिवसांत तीर्थरामजींच्या अंतःकरणांत कृष्णभक्ति किती तीव्रतेनें बाणली होती आणि परमार्थाकडे त्यांचा किती जोराचा ओढा होता, हें शके १८१९ त लाहोर येथून त्यांनीं आपल्या वडिलांस पाठविलेल्या एका पत्रावरून स्पष्ट होत आहे. सदरहू पत्रांत तीर्थरामजी लिहितातः—"आपला मुलगा तीर्थराम याचें शरीर आतां विकलें गेलें—खास विकलें गेलें ! रामाजवळ आतां मीपणा बिलकुल राहिला नाहीं. आज दिपवाळीच्या दिवशीं हें शरीर भगवान् श्रीकृष्णाला अर्पण करून त्याला आपला—वश करून

घेतला. आपण खरोखर धन्य आहां ! आतां आपल्याला जें जें पाहिजे असेल तें तें माझ्या धन्याजवळ मागा. तें तो स्वतः देईल किंवा माझ्या-मार्फत आपणांकडे पोहोंचतें करील. पण कसेंहि करून दृढ निश्चयानें त्याच्याकडे मागून तर पहा. रामासंबंधानें म्हणाल तर गेले एकुणीस वीस दिवस तो त्याचीं सर्व कामें काळजीनें करीत आहे ! मग आपलींच कां करणार नाहीं ? घावरून जाणें चांगलें नव्हे. धन्याची जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें सर्व कांहीं होत जाईल. आम्हां गोसाव्यांचें—गोस्वामींचें श्रीकृष्ण-परमात्मा हेंच धन—हेंच सर्वस्व—होय. आपलें हें वास्तविक ऐश्वर्य सोडून प्रपंचांतील भिकारड्या कवड्यांच्या पाठीमागें लागणें आपल्याला उचित नाहीं. आणि ह्या कवड्या मिळाल्या नाहींत म्हणून खेद करणें तर अगदींच अनुचित होय. आपलें हें अस्सल धन आहे, त्याचा एकदा स्वाद घेऊन तर पहा !

## आचार्यांची मुलाखत व सहवास.

तीर्थरामजी यांनीं वर वर्णन केल्याप्रमाणें स्वतःला ईश्वरचरणीं वाहून घेतल्यानंतर थोड्याच दिवसांनीं अशी स्थिति झाली कीं, द्वारका मठाचे जगद्‌गुरू श्रीमच्छंकराचार्य यांची स्वारी संचार करीत असतां सुदैवानें लाहोर येथें येऊन पोहोंचली. आचार्य सर्व शास्त्रांत अत्यंत निष्णात असून वेदान्तनिष्ठ म्हणून त्यांची सर्वत्र फार प्रसिद्धि होती. आचार्यांचा हा लौकिक तीर्थरामजींच्या कानावर होता, व तेथील सनातन धर्मसभेचे तीर्थरामजी हे मंत्री असल्यामुळें जगद्‌गुरूंची सेवा करण्याचें काम स्वाभाविकच त्यांच्याकडे आलें; आणि तें त्यांनीं मोठ्या उत्साहानें व श्रद्धेनें बजाविलें. तीर्थरामजींच्या प्रेमळ स्वभावानें आचार्यांची त्यांच्यावर इतकी मर्जी बसली कीं, आपल्या सहवासांत तीर्थरामजींनीं कांहीं दिवस राहावें, असें त्यांना वाटूं लागलें. आणि एक दिवस तर बोलतां बोलतां श्रींच्या तोंडून सहज उद्गार निघाले कीं, ' संचारार्थ आम्हीं पुष्कळ ठिकाणीं आजपर्यंत हिंडलों, परंतु तीर्थरामासारखा भगवद्भक्त आणि ब्रह्मविद्येचा जिज्ञासु आमच्या पाहण्यांत एकही आला नाहीं. हा थोडे दिवस आमच्या जवळ राहील तर त्यामुळें आम्हांला फार आनंद होईल. कदाचित् हा स्वतः लौकरच निजानंदांत रंगूं लागेल ! ' आचार्यांचे हे उद्गार तीर्थराम-

जींच्या कानीं आले, तेव्हां त्यांनाहि परम संतोष झाला. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें विद्यालयाला सुटी होती व थोडी अधिक रजा घेऊन ते जगद्गुरूंबरोबर निघाले. काश्मीर प्रांतांतील श्रींच्या संचारांत त्यांच्या मंत्र्याचें काम तीर्थरामजींनीं केलें. आचार्यांच्या प्रेमपुरःसर सेवेचा व सत्संगतीचा त्यांना असा लाभ मिळाला कीं, खुद्द आचार्यांच्या मुखांतून ब्रह्मसूत्रें व उपनिषदें ह्यांवरील भाष्याचें विवरण ऐकण्याचा योग सुदैवानें त्यांना आला; व त्यामुळें त्यांच्या शुद्ध अंतःकरणांत वेदान्ताचीं तत्वें पूर्णपणें ठसलीं गेलीं. वैराग्य व ज्ञान ह्यांचें तेज त्यांच्या तोंडावर झळकूं लागलें. आचार्यांच्या उपदेशाचा तीर्थरामजींच्या मनावर इतका विलक्षण परिणाम झाला कीं, श्रींना परमगुरु समजून त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यांची ही श्रद्धा व भक्ति पाहून आचार्य फार प्रसन्न झाले, व काश्मीर प्रांतांतील संचार संपवून आचार्य जेव्हां लाहोराहून परत निघाले तेव्हां तीर्थरामजींना जवळ बोलावून त्यांनीं पुढील उपदेश केला:— ‘ बेटा तीर्थराम ! ज्ञानाचें हें तेज व हा आनन्द कमी होऊं न देतां तो नित्य वाढत जाईल, असा प्रयत्न सुरू ठेव. ज्ञानाची पूर्ण स्थिति होईतों आत्मोन्नतीचा अभ्यास शिथिल होऊं देऊं नको......’ हा उपदेश मिळाल्यापासून मनन व निदिध्यास ह्यांशिवाय त्यांना दुसरें कांहीं सुचेनासें झालें. आतां उपनिषदें नेहमीं त्यांच्या हातांत राहूं लागलीं. मथुरा व वृन्दावन येथें जाण्याचा त्यांचा पूर्वीं परिपाठ असे. व आतां हृषीकेश व हरिद्वार ह्या पवित्र तीर्थांच्या ठिकाणीं एकान्तवास करण्याकरितां जाण्यास त्यांनीं सुरुवात केली. प्रपंचापासून त्यांचें चित्त पूर्णपणें उपराग पावूं लागलें होतें. दरसाल उन्हाळ्याच्या सुटींत हृषीकेषापासून चार साडेचार कोस अंतरावर असलेल्या तपोवनांत आत्मानुभव करून घेण्याच्या इराद्यानें ते जाऊं लागले. एक दोन वेळां त्यांनीं असा प्रयत्न करून पाहिला. परंतु त्यांचें संकल्पित कार्य घडून आलें नाहीं. तेव्हां तिसऱ्या वेळीं पूर्ण निर्धार करून तपोवनांत जाण्यासाठीं ते निघाले. ह्या निश्चयाचें स्वरूप त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें सांगितलें आहे;—‘ आत्मानुभूति झाल्याशिवाय राम आतां लाहोरास कदापि परत येणार नाहीं. उपनिषदांचा सारभूत जो ब्रह्मानंद त्याचा अनुभव घेईन, नाहीं तर या जड देहाला तपोवनांतच ठेवीन ! ’

## साक्षात्काराची भीष्मप्रतिज्ञा !

वर सांगितल्याप्रमाणें मनाचा दृढ निश्चय करून तीर्थरामजी तपोवनाला जाण्यास निघाले, ते प्रथम हरिद्वार येथें आले. या ठिकाणीं ते एक आठवडा राहिले. इतक्या अवधींत आपल्या जवळची तीन महिन्यांच्या पगाराची रक्कम साधु, बैरागी व गोरगरीब ह्यांना भोजन देण्यांत त्यांनीं खर्च करून टाकली व अशा रीतीनें कफल्लक बनून अनवाणी पायानें, उघड्या माथ्यानें, व उपनिषद्ग्रंथ हातांत धारण करून आत्मसाक्षात्कार करून घेण्याकरितां पक्क्या निर्धारानें तीर्थरामजी हृषीकेशाकडे निघाले. हृषीकेश येथें एकदोन दिवस मुक्काम करून तपोवनाजवळील ब्रह्मपुरी नामक स्थळीं ते जाऊन पोहोंचले. ह्या ठिकाणाजवळून गंगानदीचा प्रवाह वहात जातो. भगवति गंगेच्या ह्या पवित्र तीरावर आसन ठोकून तीर्थ-रामजी ह्या निश्चयानें बसले कीं, ' हे ब्रह्मनंद ! तुझ्या दाराशीं धरणें धरून बसलों आहें. राम मजनून बनेल आणि तुला लैली बनवील. अंगावर कफनी धारण करून तुझ्या दारांत तो बसला आहे. आतां तूं स्वतः उठविल्याशिवाय तो बिलकुल उठणार नाहीं. तुझ्याशिवाय त्याला उठविण्याची कोणाची छाती आहे ? तुला स्वाधीन करून घेईल तेव्हांच हा राम उठेल. व तसें होईपर्यंत ह्या देहाचें कांहीं झालें तरी बिलकुल फिकीर नाहीं ! ' त्यांनीं या वेळीं आपल्या वडिलांस लिहिलेल्या एका पत्रांत आणखीहि पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. ' बाबा ! तुमचा मुलगा आतां ( घरीं ) परत येत नाहीं. प्रिय विद्यार्थ्यांनों ! तुमचा गुरु आतां परत येत नाहीं. आप्तेष्टांनों ! तुमचें नातें किती दिवस टिकणार ! बकऱ्याची आई किती दिवस नवस करणार ! बाबा ! आतां तुमच्या सर्व आशांवर आणि संकल्पांवर लेखणीच्या एका फटकाऱ्यानें पाणी सोडलें जाईल ! रामाच्या निजानंदाच्या लहरींत एकतर देश, काल, व निमित्त कोठल्या कोठें पार विरून जातील किंवा निदान रामाचें शरीर तरी गंगेच्या प्रवाहांत अदृश्य होईल. शरीर व मन ह्यांची आतां इतिश्री होणार ! मेल्यानंतर सर्वांच्याच अस्थि गंगेंत पडतात म्हणा; पण रामाला अपरोक्षानुभूति झाली नाहीं, शारीरिक अध्यासाची—देहबुद्धीची दुर्गंधि जर शिल्लक राहिली तर जिवंत-पणींच रामाचीं हाडें व मांस हीं भागीरथींतील माशांना अर्पण करण्यांत

येतील. रामाच्या चरणांतून गंगा झुळझुळ वाहूं न लागेल तर रामाचें शरीर तरी श्री गंगेच्या तरंगांवर जरूर वाहूं लागेल!'

इतक्या खंबीर मनानें गंगातटाकीं बसल्यानंतर तीर्थरामजींच्या अंतःकरणाची जी स्थिति झाली तिचें त्यांनींच पुढील शब्दांनीं चित्र रेखाटलें आहेः—"डोळ्यांतून अश्रूंचा वर्षाव होत आहे; थंड आणि दीर्घ निश्वास चालले आहेत. सोंसाट्याच्या वाऱ्याप्रमाणें अश्रूंच्या वर्षावाला ते जणूं काय साथ करीत आहेत. बाहेर अश्रूंच्या धारा! आणि अन्तर्यामींहि अश्रूंच्या धारा!! अश्रूंच्या प्रवाहावरोबर अन्तर्हृदयांतून असे उद्गार निघत आहेत. 'भगवति गंगे! रामाचें सर्वस्व तुझ्या चरणीं अर्पण करण्यांत आलें आहे. राम आपल्या अस्थि आणि चर्म ह्यांना फुलें आणि बत्तासे ह्यांच्या ऐवजीं तुझ्यावरून ओंवाळून टाकीत आहे. राम आतां आपलें मन तुझ्या तीरावरील वानरांना देऊन टाकित आहे; आणि बुद्धि तुझ्या प्रवाहाच्या स्वाधीन करीत आहे. पापपुण्याला पेटवून त्यांतून निघणारी ज्योति नीरांजन म्हणून राम तुला ओंवाळीत आहे. स्वरूपांत अशी दडी मारून बसतों कीं, बाहेर येईन तेव्हां तूंच बनून येईन. इतकेंच नव्हे तर जल, स्थल, आणि आकाश या सर्वांना आतां रामच बनवून सोडितों. तूं आणि मी हा भेदच उरूं देत नाहीं. तुझ्यांत—आत्मस्वरूपांत आतां पूर्णपणें लीन झालों नाहीं तर स्वतःला राम म्हणणार नाहीं!'

या वेळच्या अंतःस्थितीचें त्यांच्या लेखणींतून आणखीहि असें वर्णन उतरलें आहेः—"संध्याकाळची वेळ आहे. राम एका लहानशा टेंकडीच्या शिरोभागीं बसला आहे. काय विलक्षण अवस्था! हिला धड उदासीनताहि म्हणतां येत नाहीं, दुःख म्हणतां येत नाहीं किंवा संसारी मनुष्याची ख्यालीखुशाली असेंहि म्हणवत नाहीं. ही जाग्रतावस्था म्हणावी कीं सुषुप्ति! खरें पाहूं जातां अवस्थात्रयापैकीं कोणत्याहि अवस्थेशीं या स्थितीची तुलना करतां येणें शक्य नाहीं.* कदाचित् ही देहातीत अवस्था असेल. पण किती रसभरित अवस्था ही!"

---

* निद्रादौ जागरस्यान्ते यो भाव उपजायते।
तं भावं भावयन्साक्षादक्षयानन्दमश्नुते॥ योगवासिष्ठ, अ. १०

## वैराग्याची प्रखरता.

तीर्थरामजींची अन्तःस्थिति अशा प्रकारची झाली असतां घराहून त्यांना एक पत्र आलें. त्यांत घरीं परत येण्याविषयीं त्यांना आग्रहपूर्वक लिहिण्यांत आलें होतें. हें पत्र तीर्थरामजींनीं पाहतांच गंगेच्या प्रवाहांत सोडून दिलें व या पत्राला उत्तर म्हणून पुढील मजकूर लिहिण्यांत आलाः—' ईश्वराचा निदिध्यास लागल्यामुळें माझें सर्व रक्त आटून गेलें आहे, व शरीर वाळून गेलें आहे. गृहस्थाश्रमाचा भार वाहण्याची आतां त्यांत मुळींच ताकद राहिली नाहीं; गृहस्थाश्रम चालविण्याची माझी आतां मनःस्थिति नाहीं. मग संसारांत मी परत कसा येऊं ! माझ्यासारख्या ईश्वरपरायण मनुष्याला प्रपंचांत पडण्याचा उपदेश करणाऱ्या लोकांचा बुद्धिभ्रंश झाला असावा, असें मला वाटतें. इतके दिवस लोकांच्या उपहासाला आणि निंदेला मी भीत होतों. परंतु आतां मला कशाचीच पर्वा नाहीं. माझें जग म्हणजे ही भागीरथी. हे गंगे ! मी तुझ्या चरणापाशीं येऊन बसलों आहें. आतां पाहिजे त्यानें हवें तितकें मला चिडवावें, त्याची मला पर्वा नाहीं; वाग्बाणच काय, पण प्रत्यक्ष बाणहि आतां माझ्यावर कांहीं परिणाम करूं शकणार नाहींत. त्या बाणांचीं तीव्र टोकें शरिराला स्पर्श करतांच वितळून जातील. हा त्यांचा दोष नव्हे, तर अंतःकरणांत उदित झालेल्या प्रेमाच्या ज्योतीचा तो परिणाम होय.........प्रापंचिक क्षुल्लक बाबींसंबंधानें तुम्हांला किती तरी काळजी वाटते; परंतु प्रपंचाला आधारभूत असें जें तुमचें वास्तविक घर–आत्मगृह त्याचा तुमच्या डोक्याला कधीं तरी विचार शिवतो काय !

परमेश्वरा ! तुझ्या स्वरूपांत मिळून जाण्याची तयारी चालली आहे...तूं आणि मी हा द्वैतभाव राम आतां राहूं देणार नाहीं. आपला अन्तरात्मा आपल्या हृदयांत, नेत्रांत, इतकेंच नव्हे तर प्रत्येकाच्या हृदयांत, प्रत्येकाच्या नेत्रांत प्रत्येक वस्तुमात्रांत पाहिल्याशिवाय, मीच सर्व चराचराला व्यापून राहिलों आहें त्याचा अनुभव घेतल्याशिवाय–रामाला चैन पडणार नाहीं. रक्तमांसादि पंचनद्यांच्या चिखलानें बनलेल्या शरीरा ! तूं आतां निजधामास जा—आपल्या मूळस्वरूपांत लीन हो. हा पंजाब देश—हा पंचनद्यांचा चिखल—सोडून पुनः आपल्या स्वस्थानाप्रत गमन कर. अथा

केंद्रस्थानीं स्थिर हो कीं, जेथून पुनः (प्रपंचांत) परत येण्याची शक्यताच राहणार नाहीं. आतां हे प्रपंचाचे—मायेचा आंधळ्या कोशिंबिरीचे डाव तूं किती दिवस खेळत राहाणार? रामाच्या चरणांतून गंगा वाहतांना दिसली नाहीं. तर त्याचें शरीर गंगेच्या प्रवाहांत वहात जातांना लोकांना दिसेल...शिंपेंतून निघालेलें मोतीं फिरून शिंपेंत परत जात नाहीं, हें लक्ष्यांत ठेवा! माझीहि हीच अवस्था आहे. प्रपंचांत होतों खरा. पण आतां त्यांतून बाहेर पडलों...मला आतां जगाची पर्वा नाहीं, लोकलज्जेची चाड नाहीं. लोकांनीं पाहिजे तें म्हणावें, अंतःकरणांत आतां परमात्म्यानें कायमचें ठाणें दिलें आहे. आत्मानुभव होण्यापूर्वी तीर्थरामजींच्या अंतःकरणांत वैराग्यरूपी अग्नीची ज्योत कशी प्रज्वलित झाली होती, ह्याची वरील उद्गारांवरून कोणालाहि सहज कल्पना करतां येण्यासारखी आहे.

## आत्मसाक्षात्कार.

तीर्थरामजींच्या अन्तःकरणांत प्रखर वैराग्य बाणल्यानंतर अल्पकालांत म्हणजे शके १८२० च्या भाद्रपदी पौर्णिमेच्या एक दोन दिवस पूर्वी (सन १८९८ च्या सपटंबर महिन्यांत) त्यांना आत्मसाक्षात्कार झाला. ही स्थिति ज्या ठिकाणीं व ज्या वेळीं झाली त्या ठिकाणाचें व वेळेचें त्यांनीं पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहेः—'भागीरथीच्या तीरावर बसलों आहें. बाजूला निबिडतर कान्तार पसरलें आहे. पुष्पांच्या योगानें वनश्री जणूं स्मित करीत आहे.....उपनिषदांचें कार्य झालें! ब्रह्मानन्द प्राप्त झाला! या आनन्दाचें वर्णन करण्याचें हे रसने, तुझ्या अंगीं सामर्थ्य आहे काय? मी धन्य आहें. मी धन्य आहें. आजपर्यंत अज्ञानावरणामुळें, माझ्या प्रिय श्रीकृष्णाचें केवळ अंधुक आणि अस्पष्ट असें दर्शन होत होतें. पण आज त्याच्याशीं पूर्ण मिलाफ झाला. प्रत्यग्वृत्ति होऊन त्याला पोटभर पाहिलें. तो नंगा व मीहि नंगा! छातीला छाती लावून कडकडून भेटलों. हे अस्थिचर्माच्या हृदया! तूं मधून निघून जा; व जीव आणि शिव यांची भेट—पूर्ण तादात्म्य होऊं दे. हे भेददृष्टे, माये! दूर! एकदम दूर! मी प्यारा! प्यारा मी! काय हा आनंद! डोळ्यांतून आनंदाश्रूंची धार चालली आहे.

हा विवाहोत्सवाचा आनंद कीं मृत्युसमयींचा शोक! * सर्व संस्कारांवर शेवटचा संस्कार झाला; वासनांचें निर्मूलन झालें. सूर्यप्रकाश पडला असतां अंधःकार नाहींसा व्हावा त्याप्रमाणें दुःख आणि दारिद्य ह्यांचा मागमूसहि नाहींसा झाला. पापपुण्याची शृंखला अजिबात तुटून गेली. ह्या मनाचें एकदा मोठें स्तोम माजलें होतें, पण आतां पहावें तों त्याचा कोठें पत्ताहि लागत नाहीं. अर्थात् मन हें उन्मन झालें. देवाची कृपाच म्हणावयाची! मित्राच्या—श्रीकृष्णाच्या भेटीमुळें—ब्रह्मभाव झाल्यामुळें वासनेचा पूर्णपणें क्षय झाला. मीच जर आतां मित्र झालों तर आतां पत्र तरी कोणाला पाठवूं! निजानंदांत निमग्न झाल्यामुळें खाण्यापिण्याचें सुद्धां भान नाहीं. अन्तरालांत भ्रमण करतां करतां अदृश्य होणाऱ्या विहंगमाप्रमाणें तुर्यातीत स्थितीप्रत जाऊन पोहोंचलों. भगवंताला निराळा म्हणून मानीत होतों. आतां तोच मी झालों!

हा सामान्य अश्रुपात कीं भगवद्भावाच्या निरतिशयानंदाचा हा वर्षा-काल! हे मस्तका! तुझा जन्म आज सफल होय. नेत्रानों! तुह्मींहि धन्य आहां—तुम्हीं आज कृतार्थ झालां. कर्णानों! तुम्हींहि आज कृतकृत्य आहां. हा आनंद धन्य होय! धन्य होय!! धन्य होय!!! धन्य हा शब्दहि आज धन्य होय!' †

## साक्षात्कार झाल्यावर.

वर वर्णन केलेल्या परमानन्दाची स्थिति अनुभूत करून घेतल्यानंतर तीर्थरामजी जेव्हां लाहोरास परत आले तेव्हां त्यांच्या चेहऱ्यावर एक

---

* आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां। तो जाहला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥
आनंदें दाटलीं तिन्हीं त्रिभुवनें। सर्वात्मकपणें भोग झाला ॥ २ ॥
एकदेशी होतों अहंकारें आथिला। त्याच्या योगें झाला सुकाळ हा ॥ ३ ॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें। मी माझ्या संकोचें दुरी झालों ॥ ४ ॥
नारायणें दिला वसतीस ठाव। ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे दिलें उमटूनि जगीं। घेतलें तें अंगीं लावूनियां ॥ ६ ॥

तुकाराम.

† आजि आनन्दु रे एकी परमानंदु रे। जया श्रुति नेति नेति म्हणति गोविंदु रे ॥

तुकाराम.

प्रकारचें अपूर्व आणि अलौकिक हास्य विलसूं लागलें. लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्यांच्या दर्शनास नित्य येऊं लागल्या; आणि त्यांच्या महानुभावित्वा-मुळें लोकांच्या चित्तवृत्ति वेधल्या जाऊं लागल्या. त्यांच्या दर्शनमात्रें करून लोकांच्या वासना तृप्त होऊं लागल्या, व निराश झालेलीं अंतःकरणें त्यांच्या दर्शनानें प्रफुल्लित आणि हर्षभरित होऊं लागलीं. तीर्थरामजींची अमृतदृष्टि आणि सुहास्य हीं दर्शनास येणाऱ्या लोकांच्या शंकांचें किंवा प्रश्नांचें निरसन करण्याला समर्थ होऊं लागलीं. अशा रीतीनें भक्तांची संख्या नित्यशः वाढूं लागली, परंतु तीर्थरामजींना मात्र ती एक प्रकारची उपाधिच वाटूं लागली. प्रपंचाकडे आतां त्यांचें पूर्ण दुर्लक्ष्य झालें होतें, व द्रव्यसंचयाबद्दल त्यांची वृत्ति इतकी उदासीन झाली होती कीं, पगार आल्याबरोबर एकदोन दिव-सांत तो सर्व ते खर्च करून टाकीत असत.

## अमरनाथाची यात्रा.

शके १८२१ मध्यें महाविद्यालयाला उन्हाळ्याची सुटी मिळाली असतां तीर्थरामजींनीं अमरनाथाची यात्रा केली. सदरहू यात्रेंत श्रीनगरपासून अमरनाथपर्यंतचा सर्व प्रवास त्यानीं केवळ एका वस्त्रानें केला. अमर-नाथाच्या मंदिरांत कित्येक तास त्यांनीं नग्न स्थितींत घालविले ! ही यात्रा करून परत आल्यावर त्यांच्या अंतःकरणांत शांति ओतप्रोत नांदूं लागली आणि आत्मानंदामध्यें ते रंगून जाऊं लागले.

## नारायणस्वामी.

या दिवसांत तीर्थरामजींच्या संगतीचा नारायणस्वामींना विशेष लाभ घडला. यासंबंधानें नारायणस्वामी म्हणतातः—“ वेदान्ताकडे माझी त्या वेळीं बिलकूल प्रवृत्ति नव्हती. परंतु गुसांईजींनीं केलेल्या उपदेशानें गीतेचा अभ्यास सुरू होता आणि इतर वेदान्तविषयक ग्रंथांतील रहस्य समजावून घेण्याचा जोरानें प्रयत्न चालविला होता. परंतु तें मनांत बरोबर उतरत नसल्यामुळें नानातऱ्हेच्या शंका उपस्थित होत. कोणा शास्त्रीपंडिताकडे शंकानिवारणार्थ जावें तर एखाद्या शंकेचें निवारण होऊन चित्ताला किंचित् शांति मिळे, तर क्वचित्प्रसंगीं शंकेचें समाधान न होतां रिकाम्या हातांनीं परत यावें लागे. अनेक शास्त्रीपंडितांकडे गेलों. परंतु सर्व शंकांचें निरसन एकालाहि करतां आलें नाहीं. गुसांईजींच्या सहवासाचा लाभ घडल्यावर

मात्र दोन दिवसांच्या आंत सर्व शंका जागच्याजागीं नाहींशा झाल्या. शंकानिवृत्ति होऊन मनाला शांति प्राप्त झाल्यावर गुसांईजींच्या सहाय्यानें उपनिषदांच्या अध्ययनास सुरवात केली. ज्या वेळीं अंतःकरणांत कोणत्याहि तऱ्हेची शंका किंवा संशय राहिला नाहीं, व चित्त निश्चल होऊन तें आनंदानें भरून गेलें, त्या वेळीं मी आपला देह गुसांईजींच्या सेवेला अर्पण केला आणि मी सर्वस्वी गुसांईजींचा झालों."

## "भारतवर्षाचा भाग्योदय!"

यानंतर थोड्या दिवसांनीं तीर्थरामजी आजारी पडले. पोटांत कांहीं विकार झाल्यामुळें त्यांचें शरीर इतकें दुर्बळ आणि अशक्त झालें कीं, एकदोनदा त्यांना भयंकर मूर्च्छा आली. अशा स्थितींत नारायणस्वामी ह्यांनीं दोन दिवसपर्यंत अहोरात्र त्यांची सेवा केली. एके दिवशीं रात्रीं दोन वाजेपर्यंत त्यांना झोंप आली नाहीं. पण पुढें थोडीशी झोंप लागून जरा बरें वाटल्यावर तीर्थरामजी उठून बसले आणि नारायणस्वामींना म्हणाले, "नारायणा, भारतवर्षाला कदाचित् चांगले दिवस येणार असें दिसतें. कारण, रामाच्या शरीराला आराम पडत चालला!" हें वाक्य वाचून पुष्कळांना मोठा अचंबा वाटेल, व कांहींजण कदाचित् स्वामींवर अहंकाराचा आरोप करण्यासहि मागें पुढें पाहाणार नाहींत, हें आम्हीं जाणून आहोंत. कारण, ते म्हणतील कीं, 'काय हो, हें काय! स्वामी रामतीर्थ केवढेहि अलौकिक पुरुष असले म्हणून काय झालें? त्यांच्या शरीराला बरें वाटत चाललें त्याबरोबर 'भारतवर्षाला भाग्याचे दिवस येणार!' असे उद्गार त्यांनीं काढावे, हें काय गौडबंगाल आहे? स्वामींच्या प्रकृतीला आराम पडणें आणि भारतवर्षाची उन्नति होणें, यांचा अर्थाअर्थी संबंध तरी काय?" वरवर विचार करतां असल्या आक्षेपकांचें हें म्हणणें बिनतोड आहेसें दिसतें. पण तीर्थरामजींच्या वरील उद्गारांतील रहस्य काय, याचा खुलासा करण्याच्या हेतूनें स्वामी रामतीर्थ यांनीं लिहिलेल्या एका लेखांतील उतारा आम्हीं वाचकांस सादर करीत आहों. संयुक्तप्रांतांतील माजी जिल्हा न्यायाधीश रावबहादुर लाला बैजनाथ, बी. ए., हे स्वामींचे एक प्रमुख शिष्य असून त्यांनीं 'प्राचीन व अर्वाचीन हिंदुधर्म' या नांवाचें एक पुस्तक इंग्रजींत लिहिलें आहे. सदरहू पुस्तकास स्वामी रामतीर्थ यांच्या

हातची इंग्रजी प्रस्तावना जोडण्यांत आली आहे. तींत स्वामींनीं नमूद केलेल्या विचारांचें यथास्थित मनन करून नंतर त्यांच्याशीं वरील वाक्याची सांगड घातली म्हणजे तीर्थरामजींच्या मुखांतून सहजस्फूर्तीनें बाहेर आलेल्या या वाक्याचें हृद्गत विचारी मनुष्याच्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. सदरहू प्रस्तावनेंत स्वामी लिहितातः—" आपण स्वदेशभक्त बनावें, अशी तुमची इंच्छा आहे काय ? तसें असेल तर आपलें राष्ट्र आणि आपल्या राष्ट्रांतील जनपद यांच्यावर प्रेम करून त्यांच्याशीं एकतानता पावा—त्यांच्याशीं तादात्म्य करून घ्या. तुम्हीं आणि राष्ट्रांतील जनता यांच्या दरम्यान आपल्या अहंकाररूपी वृत्तीची यत्किंचित्हि छाया पडूं देऊं नका. मातृभूमीच्या हितार्थ आपलें जीवित अर्पण करणारे खरे खुरे अध्यात्मदृष्टीचे शिपाई बना. आपल्या देहावरील अहंकार काढून टाका, आणि स्वतः सर्व राष्ट्र बना. म्हणजे स्थिति अशी होईल कीं, तुम्हीं ज्या भावना कराल त्या तुमच्या राष्ट्राच्या भावना होऊन बसतील. मग तुम्हीं पुढें चालूं लागा, राष्ट्र तुमच्या मागोमाग आलेंच म्हणून समजा. तुम्हीं आरोग्याची भावना करा म्हणजे तुमच्या राष्ट्रांतील लोक आरोग्यसंपन्न झाल्यावांचून राहणार नाहींत. तुमचें सामर्थ्य, तुमची शक्ति सर्व लोकांच्या रक्तवाहिन्यांतून वाहूं लागेल. ' मी भरतखंड—अखिल भरतखंड आहें. भरतभूमि माझें शरीर आहे. कन्याकुमारी हे माझे पाय व हिमालय हें माझें शिर. माझ्या केंसांपासून भागिरथी वाहाते. मस्तकापासून ब्रह्मपुत्र व सिंधु हे नद उगम पावतात. विंध्याचल हा माझा कमरपट्टा आहे. कारोमांडल हा उजवा व मलबार हा माझा डावा पाय आहे. सर्व भरतखंड मी असून त्याच्या पूर्व व पश्चिम बाजू हे माझे हात आहेत व अखिल मानवजातीला आलिंगन देण्यासाठीं हे हात मीं पुढें केलेले आहेत. माझ्या शरीराची स्थिति अशी आहे; पण माझें प्रेम मात्र विश्वव्यापी आहे. अनंत आकाशाला व्यापून माझी दृष्टि आहे. सर्वांचा आत्मा तोच माझा अंतरात्मा ! जेव्हां मी चालूं लागतों तेव्हां सर्व भरतखंड चालत आहे, असें मला वाटतें. मी भाषण करतों, तेव्हां भरतखंडच बोलत आहे, अशी माझी भावना होते. जेव्हां मी श्वासोच्छ्वास करतों, तेव्हां सर्व भरतखंड श्वासोच्छ्वास करीत आहे, असें मीं पहातों. मी भरतखंड आहें—शंकर,

शिव आहे. स्वदेशभक्तीचें अत्युच्च ध्येय तें हेंच आणि यालाच प्रवृत्तिपर वेदान्त म्हणतात.'

## अलफ मासिक.

दुखण्यांतून बरें झाल्यावर ऊर्दू भाषेंत एक मासिक पुस्तक काढण्याचा विचार तीर्थरामजींच्या मनांत आला. सदरहू मासिकाकरितां लागणारें द्रव्यसहाय्य देण्याचें आश्वासन त्यांचे एक भक्त लाला हरलालसाहेब यांनीं दिलें. या मासिकाकरितां एक मुद्रणालयहि उघडण्यांत आलें. मुद्रणालयाची व मासिकाची सर्व व्यवस्था त्यांनीं नारायणस्वामींकडे सोंपविली, व नोकरी संभाळून ही जबाबदारी उरकणें शक्य नसल्यामुळें नारायणस्वामींनीं नोकरीचा राजीनामा दिला. सदरहू मासिकाचें नांव अलफ असें ठेवण्यांत आलें व त्याचा पहिला अंक शके १८२१ च्या पौषाच्या सुमारास निघाला. मासिकांतील सर्व लेख तीर्थरामजी स्वतःच लिहीत असत. तीर्थरामजींच्या अंतःकरणांत बाणलेलें कडकडीत वैराग्य त्यांच्या या वेळच्या लेखांतून प्रतिबिंबित झालेलें होतें. सदरहू लेखांचा वाचकांच्या मनावर परिणाम होवो वा न होवो, त्यांच्या स्वतःवर मात्र तो इतका झाला कीं, मासिकाचे तीन अंक निघण्यापूर्वींच त्यांनीं आपल्या नोकरीचा राजीनामा दिला, व तपोवनाचा मार्ग पुनः धरला.

## वानप्रस्थाश्रम.

या वेळीं आपला सर्व परिवार त्यांनीं आपल्या बरोबर घेतला होता. यांना मदनमोहन व ब्रह्मानंद असे दोन मुलगे व एक मुलगी, अशीं तीन अपत्यें होतीं. हीं मुलें व आपली पत्नी यांना बरोबर घेऊन ते लाहोराहून निघाले. संन्यासग्रहण करण्यापूर्वींचा हा त्यांचा वानप्रस्थाश्रम होय. ते जेव्हां लाहोर येथून निघाले तेव्हां त्यांच्याबरोबर नारायणस्वामीहि होते. व इतउत्तर गृहस्थाश्रमांत येण्याचा त्यांचा विचार नसल्यामुळें त्यांचा निरोप घेण्यासाठीं हजारों लोक निवासस्थानीं जमले होते. घरांतून निघाल्यापासून विश्रामस्थानीं पोहोंचेपर्यंत त्यांना पोहोंचविण्याकरितां त्यांच्या भक्तमंडळीची सारखी घडी लागून राहिली होती; पण स्वतः तीर्थरामजी मात्र केवळ एक वस्त्र परिधान करून अनवाणी पायांनीं राजरस्त्यांतून चालले होते आणि त्यांची

भक्तमंडळी वैराग्यपूर्ण कवनें म्हणत त्यांच्या मागोमाग चालली होती. त्यांच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. घरांतून निघाल्यापासून त्यांच्या गळ्यांत पुष्पांचे हार अगणित पडले होते आणि रस्त्यानें ठिकठिकाणीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि होत होती. लोकांचा समुदाय निवासस्थानीं पोहोंचल्यावर तेथील चौथऱ्यावर त्यांच्या भक्त मंडळीचें भजन चाललेंच होतें. पुढें स्वामीजी जेव्हां गाडींत बसले तेव्हां जमलेल्या सर्व मंडळीचें हृदय द्रवून गेलें आणि त्यांचे नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले. तीर्थरामजी, त्यांची धर्मपत्नी, तीन मुलें व नारायणस्वामी यांच्याशिवाय कित्येक स्नेही व भक्त हरिद्वारपर्यंत त्यांना पोहोंचविण्याकरितां गेले व तेथून बाकीची मंडळी परत आली. पुढें तीर्थरामजी व इतर मंडळी तेथून टिहरी येथें गेली. त्या शहरापासून एक कोसावर गंगातटाकीं शेट मुरलीधर यांच्या सुंदर बगीच्यांत तीर्थरामजीनीं जवळजवळ एक वर्ष एकान्तवास केला. परंतु तेथें गेल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांच्या पत्नी आजारी पडल्या व जंगलांत राहाण्याचे कष्ट त्यांना सहन होईनात, म्हणून तीन महिन्यांनीं त्यांना घरीं पोहोंचविण्यांत आलें. या वेळीं त्यांच्याबरोबर फक्त नारायणस्वामीच राहिले. व तेव्हांपासून अखेरपर्यंत नारायणस्वामींनीं तीर्थरामजींच्या सेवेंत अंतर पडूं दिलें नाहीं.

इकडे तीर्थरामजींची पत्नी आजारी पडून परत आली, परंतु तिची तब्येत सुधारण्याऐवजीं दिवसेंदिवस अधिकाधिक खंगतच गेली. त्या दुखण्यामधून तिनें फिरून डोकें म्हणून वर काढलें नाहीं. व ता. २४ मे १९०७ रोजीं म्हणजे स्वामींच्या समाधीनंतर सात महिन्यांनीं तिचा अंत झाला.

## संन्यास.

द्वारकामठाधीश श्रीकच्छंकराचार्य यांनीं तीर्थरामजींस पूर्वींच उपदेश केला होता कीं, ' चित्त पूर्णपणें निर्वासन झालें म्हणजे तत्काल विद्वत्संन्यास घ्या; ' विद्वत्संन्यास घ्या, असें सांगण्याचें कारण, हें कीं, त्यांचा विविदिषा संन्यास पूर्वींच झाला होता. तपोवनांत एक वर्ष एकान्तांत घालविल्यानंतर त्यांच्या हृदयांत वैराग्यज्योति पूर्णपणें प्रज्वलित झाली, व स्वरूपस्थिति पूर्णपणें बाणली. यामुळें शके १८२२ च्या मार्गशीर्ष महिन्यांत पूर्वीं ठरल्याप्रमाणें त्यांनीं विद्वत्संन्यास घेतला. संन्यासदीक्षा घेण्याविषयीं

तीर्थरामजींस उपदेश करणारे आचार्य हे तीर्थसंन्यासी होते म्हणून तीर्थरामजींचें संन्यासाश्रमींचें नांव रामतीर्थ असें प्रसिद्ध झालें. तीर्थरामजींनीं संन्यास घेतला तो सुखसोहाळा पाहाण्याचें भाग्य त्यांचे पट्टशिष्य नारायणस्वामी यांना प्राप्त झालें. स्वामींचीं वस्त्रें भगवीं करण्याचें काम त्यांनीं मोठ्या आनंदानें केलें, व अशा रीतीनें संन्यासग्रहण केल्यानंतर तीर्थरामजी हे स्वामी रामतीर्थ झाले.

## तीर्थाटन.

संन्यासग्रहणानंतर सहा महिनेपर्यंत एकान्तवास करून शके १८२३ च्या चातुर्मास्यांत स्वामींनीं उत्तरखंडाची यात्रा केली. प्रथम ते जन्मोत्रीस गेले. तेथें एक महिनाभर राहून तेथून आठ नऊ कोसांवर असलेल्या बंदर पूंछ ( वानरपुच्छ ) या तीर्थाची त्यांनीं यात्रा केली. पुढें खालीं उतरून चामसरूच्या मार्गानें ते गंगोत्रीकडे गेले. तेथें एक महिना वास करून वृद्धकेदार आणि त्रिजुगी नारायण यांवरून बडेकेदार व बदरीनारायण या तीर्थांची त्यांनीं यात्रा केली. अशा रीतीनें सुमारें सहा महिने तीर्थाटन करून स्वामी आलमोरा येथें गेले, व तेथून पुढें मथुरेस गेले.

## मथुरेंतील मौजेचा प्रसंग.

या वेळीं ' भारतधर्ममहामंडळा'च्या आश्रयाखालीं भरलेल्या धर्ममहोत्सवाच्या अध्यक्षाच्या जागीं स्वामींची निवड करण्यांत आली होती. या धर्मसभेच्या व्यासपीठावरून त्यांनीं केलेल्या उपदेशानें श्रोतृगण इतका मोहित झाला कीं, किती वेळ व्याख्यान झालें तथापि श्रोत्यांची तृप्ति म्हणून होईना. स्वामींच्या वाणींत प्रेमळपणाचा इतका उत्कर्ष झाला होता कीं, ज्यांच्या ज्यांच्या कानांवर स्वामींची अमृततुल्य वाणी पडे त्यांच्या त्यांच्या अंतःकरणांत आनंद भरून जाई आणि तेथून हालूं नये असें त्यांना वाटे. या महोत्सवाच्या वेळची एक मौजेची गोष्ट नारायणस्वामींनीं नमूद करून ठेविली आहे ती अशीः— महोत्सवांत अनेक विद्वान वक्त्यांचीं झालेलीं भाषणें ऐकतां ऐकतां श्रोतृसमुदाय कंटाळून गेला होता आणि स्वामींचें भाषण केव्हां एकदा ऐकावयास सांपडतें, याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. लोकांची ती उत्सुकता पाहून स्वामी एकदांचे बोलावयास उभे राहिले. पण व्याख्यान

देण्याऐवजीं ते इतकेंच म्हणाले, 'आजच्या उत्सावाकरितां ठरविण्यांत आलेला काल होऊन गेला आहे. येथील कार्यक्रम आतां संपल्यामुळें या ठिकाणीं मला व्याख्यान देतां येत नाहीं. सर्वांची तशीच इच्छा असेल तर आपण यमुनेच्या वाळवंटांत जाऊंया.' असें म्हणून स्वामीजींनीं सभा विसर्जन केली आणि ते तेथून थेट यमुनेच्या वाळवंटाकडे निघाले. त्याबरोबर मंडळीहि खुर्च्या सोडून त्यांच्या मागोमाग निघाली! वाळवंटाकडे जातांना आपण स्वामींच्या अगदीं जवळून चालावें, अशी प्रत्येकाची इच्छा असल्यामुळें मंडळीची खेंचाखेंच होऊं लागली. वाळवंटांत येऊन स्वामी मध्यभागीं उभे राहिले, त्या वेळीं अंधार पडूं लागला होता. ते शरद् ऋतूचे दिवस असल्यामुळें वाळवंटांतील रेती अगदीं गार झालेली होती. महोत्सवाचा कार्यक्रम सायंकाळपर्यंतचाच असल्यामुळें लोकांनीं गरम कपडे बरोबर नेले नव्हते. थंडी कडाक्याची पडली होती. परंतु थंडीचा विचारहि कोणाच्या मनांत आला नाहीं. सर्वांचीं अंतःकरणें स्वामींकडे इतकीं आकर्षित झालीं होतीं कीं, 'बसा' असें स्वामींच्या तोंडांतून निघतांच मंडळी तशीच रेतींत बसली! महोत्सवाकरितां जमलेल्या मंडळींत शास्त्रीपंडितांसारखी बडी बडी शालजोड्या पांघरणारी विद्वान् मंडळी पुष्कळ होती. परंतु 'आपण आतां रेतींत बसावें कसें, आपल्या योग्यतेप्रमाणें आपल्याला या ठिकाणीं खुर्च्या वगैरे सारखीं उच्चासनें नाहींत,' असला विचार त्या वेळीं कोणाच्या मनाला शिवलाहि नाहीं. आपल्या अंगावरील मौल्यवान उपरणीं आणि शालजोड्या पसरून रात्रीं आठ वाजेपर्यंत सर्व मंडळी एकाग्रतेनें स्वामींचा उपदेश ऐकत राहिली!

## दिग्विजयार्थ संचार.

या धर्ममहोत्सवानंतर म्हणजे शके १८२४ च्या आरंभीं लखनौ, आग्रा इत्यादि शहरीं फिरून स्वामींनीं सनातन वैदिक धर्माचा लोकांना उपदेश केला. या सुमारास त्यांनीं आपला शिष्य नारायण यास संन्यासदीक्षा दिली, आणि सनातनधर्माचा उपदेश करण्याकरितां त्याला सिंध प्रांतांत पाठविला, व यानंतर स्वामी फिरून एकवार तपोवनांत गेले. तेथें चार महिने राहून ते परत टिहरी येथें आले. या ठिकाणीं सिंध प्रांतांतील आपलें उपदेशाचें कार्य करून नारायणस्वामी स्वामीजींना येऊन मिळाले.

या सालीं टिहरीच्या महाराजांची व स्वामींची मुलाखत झाली. आषाढाच्या सुमारास जपानांत टोकियो येथें अमेरिकेंतील चिकागोच्या सुप्रसिद्ध धर्मपरिषदेप्रमाणें एक अद्वितीय धर्मपरिषद् भरणार, अशी अफवा इकडील पत्रांतून प्रसिद्ध झाली. ही बातमी वाचून वैदिक धर्मांत पूर्णपणें पारंगत असलेले आणि ब्रह्मानुभवांत रंगलेले स्वामी रामतीर्थ यांच्यासारखे पुण्यात्मे सनातन धर्माचे प्रतिनिधि म्हणून सदरहू परिषदेंत हजर राहणें अत्यंत आवश्यक आहे, असा विचार महाराजांच्या मनांत आला. व त्याप्रमाणें त्यांनी स्वामींना आपला विचार निवेदन केला, व स्वामींनींहि त्याला आपली संमति दिली. या जपानी धर्मपरिषदेंत हजर राहण्याकरितां नारायण स्वामींना बरोबर घेऊन श्रावण महिन्यांत स्वामी कलकत्याहून निघाले व सुमारें दोन महिन्यांत ते जपानांत जाऊन पोहोंचले. पण टोकियो येथें जाऊन पहातात तों धर्मपरिषदेची ही निव्वळ गप्प होती, असें त्यांना समजलें. पुढें थोडे दिवस जपानांत राहून व तेथील विश्वविद्यालयांत दोन व्याख्यानें देऊन ते स्वतः अमेरिकेकडे निघून गेले व नारायणस्वामी हे स्वामींच्या आज्ञेवरून यूरोप, आफ्रिका, चीन, लंका, ब्रह्मदेश इत्यादि देशांत जाऊन धर्मोपदेश करूं लागले. स्वामींनीं अमेरिकेंत सुमारें अडीच वर्षें राहून अद्वैत सिद्धांताचा स्वामी विवेकानंद यांनीं रोंवलेला झेंडा दृढ केला. ज्या व्याख्यानांच्या द्वारें हें महत्कार्य स्वामींनीं घडवून आणलें तीं क्रमशः वाचकांस वाचावयास मिळणार असल्यामुळें तूर्त त्यासंबंधानें जास्त लिहिण्याचें कारण नाहीं. स्वामींच्या चरित्राचें हें स्थूल स्वरूप असून त्यांच्या एकंदर लेखांतील व व्याख्यानांतील धोरण कोणत्या स्वरूपाचें आहे, वगैरे विषयांचें बारकाईचें स्पष्टीकरण मागाहून करता येण्यासारखें आहे, व सर्व ग्रंथ हातीं पडल्यानंतर हें विवेचन करणें वाचकांच्या दृष्टीनेंहि सोईचें होईल. असो. अशा रीतीनें हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व एकोणिसाव्या शतकांतील सुधारणेच्या शिखरावर पोहोंचलेल्या व भौतिक शास्त्रांत उत्कर्ष पावलेल्या अमेरिकेसारख्या देशांत स्थापन करून ते इजिप्त देशांत गेले व तेथील एका प्रसिद्ध मशिदींत फारसी भाषेंत स्वामींनीं आपल्या मुसलमान बंधूंस बोध केला. अशा रीतीनें आपला संचार आटोपून शके १८२६ मध्यें स्वामी मातृभूमीस परत आले. ते परत येण्यापूर्वीं सहा महिने नारायण स्वामीहि परत आले होते.

आपण अमेरिकेंत असेपर्यंत नारायणस्वामींनीं सनातन धर्माचा उपदेश इतरत्र करावा, अशी स्वामींची त्यांना आज्ञा होती. परंतु लंडन येथील विलक्षण थंडी त्यांना सोसली नाहीं. ते तेथें आजारी पडले आणि स्वामीजींच्या पूर्वींच हिंदुस्थानांत परत आले.

## ' वेदान्ताची मूर्तिमंत प्रतिमा ! '

जपानांत असतां स्वामींचीं व्याख्यानें इंग्रजींत झालीं. इंग्रजी जाणणारे लोक श्रोतृसमुदायांत फारच थोडे होते. तथापि स्वामींचे शब्द ' एखाद्या ज्वालामुखी पर्वतांतून निघणाऱ्या ज्योतीप्रमाणें भासतात आणि विद्युत्यंत्रांतून निघणाऱ्या ठिणग्यांप्रमाणें अंतःकरणावर परिणाम करितात ! ' अशा आशयाचे उद्गार इंग्रजी न समजणाऱ्याहि लोकांच्या तोंडून निघाले. तेथील एका खिस्ती पत्रानें स्वामींची फार स्तुति करून ' स्वामी हे वेदान्ताचे उत्साही आचार्य आहेत, ' अशा तऱ्हेच्या प्रशंसापर शब्दांनीं त्यांच्या व्याख्यानांचा उल्लेख केला. जपानांतील चित्रकारांना तर स्वामींच्या भालप्रदेशीं चमकणारें तेज जपानांतील पवित्र अशा ' फुशिमा ' पर्वताच्या बर्फाच्छादित शिखराप्रमाणें मनोवेधक वाटे आणि त्यांच्या मुखांतून वाहणारे स्फूर्तिजनक शब्द जणूं काय चैतन्याचा गाभाच आहेत कीं काय, असा भास होई. टोकियोमध्यें असतां एक दिवस तेथील एका हिंदी विद्यार्थ्याबरोबर स्वामी फिरावयास गेले होते. कांहीं विषयासंबंधानें त्यांचें त्या विद्यार्थ्याबरोबर बोलणें चाललें असतां ते वाटेंत एकदम थांबले आणि जोरानें ओरडून म्हणाले, ' यांत काय शंका आहे ? वेदान्ताची छाप सर्व जगावर पडली पाहिजे—सत्याची ध्वजा सर्वत्र फडकलीच पाहिजे ! ' टोकियो येथील ' बादशाही विश्वविद्यालयांतील ' संस्कृत भाषेचे मुख्य अध्यापक पंडित ताकाकुत्सू यांची व स्वामींची मुलाखत झाली. सदरहू भेटीचा त्यांच्यावर इतका परिणाम झाला कीं, ते आपल्या एका स्नेह्याजवळ म्हणाले, ' संस्कृत भाषेच्या अभ्यासाकरितां इंग्लंडमध्यें असतांना पंडित मोक्षमुल्लर यांच्या घरीं किंवा जर्मनींतील कांहीं ठिकाणीं हिंदुस्थानांतील मोठमोठाल्या पंडितांच्या किंवा साधु पुरुषांच्या भेटीचा लाभ घडला, परंतु स्वामी रामतीर्थ यांच्यासारखा सत्पुरुष आजपर्यंत मला आढळला नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर स्वामी हे ' वेदान्ताची मूर्तिमंत प्रतिमा

होत !' टोकियो येथील प्रसिद्ध पंडित किन्झा हिराई यांच्या मनावर स्वामींच्या संभाषणाची इतकी छाप पडली कीं, जपानी व चिनी धर्मग्रंथांत बुद्धकालीन महात्म्यांचें जें वर्णन केलेलें आढळतें तसला एखादा महात्मा आज आपण प्रत्यक्ष पहात आहों कीं काय, असें त्यांना वाटलें. हें मत देणारे पंडित किन्झा हिराई हे चिकागो येथें भरलेल्या सुप्रसिद्ध धर्मपरिषदेंत बौध धर्माचे प्रतिनिधि म्हणून हजर होते, व असल्या जाड्या विद्वानाचें वरील म्हणणें आहे, हें विशेषें करून लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. जपानांतून अमेरिकेंत गेल्यानंतर 'केवल ज्ञानी राम' या शब्दांनीं मोठ्या गौरवानें ते स्वामींचा उल्लेख करीत असत.

## अमेरिकेंत असतांना.

हिंदुस्थानांतील मुक्त पुरुष कसे असतात, याची स्वतःच्या आचरणानें आणि उपदेशानें जपानांतील शात्या लोकांना खूण पटवून अमेरिकेंतील सान्फ्रान्सिस्को शहरीं स्वामी येऊन दाखल झाले. सान्फ्रान्सिको येथें किनाऱ्यावर उतरण्याच्या वेळीं एक मोठा विलक्षण प्रसंग घडून आला तो येणेंप्रमाणें:—ज्या बाष्पनौकेंतून स्वामी अमेरिकेस जात होते ती किनाऱ्यानजीक येऊन पोहोंचतांक्षणीं आंतील उतारूंची मारे तारांबळ उडून गेली. आपल्याला उतरून घेण्याकरितां आपला भाऊ, बहीण, बायको, मुलें अथवा इष्टमित्र यांपैकीं कोणी बंदरावर आलें आहे किंवा काय, हें पाहण्यासाठीं जो तो मान वर करकरून पाहूं लागला. कोणी तर दूरदर्शक यंत्रें डोळ्यांना लावून पाहण्याचें काम करूं लागले. एवंच जिकडे तिकडे धांदल व गर्दी उडून गेली होती. स्वामी मात्र एकटे अगदीं निश्चल होते. ते आपल्याबरोबर सामानाचा लवेदा बाळगीत नसत. विशेष सामानसुमानाची त्यांना आवश्यकता भासत नसे. संन्यास घेतल्यापासून ते द्रव्याला स्पर्शही करीत नसत. त्यांची मनःस्थितिच अशी झाली होती कीं, योगक्षेमाची सर्व चिन्ता त्यांनीं भगवन्ताकडे सोपविली होती. अशा निरपेक्ष आणि बेफिकिर स्थितींत स्वामीजी बाष्पनौकेंत बसले होते. त्यांच्या मनांतून तेथें उतरावयाचें आहे किंवा नाहीं, हेंहि त्यांच्या चेहऱ्यावरून समजण्यासारखें नव्हतें. एकीकडे उतारूंची धांदल उडून गेली असतां दुसरीकडे हा विलक्षण आणि तेजस्वी संन्यासी शांतवृत्तीनें बसला आहे

असें पाहून एका अमेरिकेंतील उतारूला फार आश्चर्य वाटलें. व सहज स्फूर्तीनें तो स्वामींजवळ गेला आणि त्यानें स्वामींना बरेच प्रश्न केले. त्या वेळीं उभयतांमध्यें पुढील संवाद झाला.

आपलें सामानसुमान कोठें आहे ?

स्वतःला नेतां येईल इतकेंच सामान राम बाळगतो.

आपणांजवळ कांहीं द्रव्य आहे का ?

नाहीं, राम द्रव्याला स्पर्शहि करीत नाहीं.

आपण येथेंच उतरणार असाल तर ?

होय.

मग आपणांला मदत करतील अशी मित्रमंडळी येथें असेल तर ?

होय आहे,

कोण बरें ?

प्रश्न करणाऱ्या या मनुष्याच्या खांद्याला स्पर्श करून रामानें हलकेंच उत्तर दिलें ' तुम्हीं ' !

या ' तुम्हीं ' चा त्या अमेरिकेंतील गृहस्थावर इतका विलक्षण परिणाम झाला कीं, त्या वेळेपासून पुढें स्वामी अमेरिकेंत असेपर्यंत त्यांची बरदास्त ठेवण्याचें काम तोच करीत असे.

अमेरिकेंत असतांना दुसऱ्या एका गृहस्थानें अशाच तऱ्हेचा एकदा प्रश्न केला असतां स्वामींनीं असें उत्तर दिलें कीं, " मी परमात्म्याशीं एकतानतेनें राहतों. भूक लागली असतां अन्न घालणारा आणि तहान लागली असतां पाणी देणारा ह्या जगांत कोणी तरी आहे, अशी माझी पूर्ण श्रद्धा आहे. * अन्न आणि पाणी यांशिवाय मला कशाचीहि जरूर भासत नाहीं, यामुळें मला कसलीच अडचण पडत नाहीं. "

अमेरिकेंत स्वामीजींचा सुमारें अडीच वर्षें मुक्काम होता. तेथें असतां आपला बहुतेक काळ ते क्यालिफोर्नियाच्या जंगलांत एकान्तवासांत घालवीत. तेथेंहि त्यांची रहाणी इतकी साधी असे कीं, स्वतःचें अन्न शिजविण्याकरितां लागणारीं लांकडें ते जंगलांतून आपल्या डोक्यावर आणीत

---

* आम्हीं काय कुणाचें खातों रे । तो राम आम्हांला देतो रे ॥

रामदास.

असत ! आत्मस्तुतीचा तर त्यांना इतका कंटाळा असे कीं, त्यांच्या तेथील कामगिरीसंबंधानें वर्तमानपत्रांतून आलेल्या प्रशंसापर लेखांचें एक मोठें भेंडोळें त्यांच्या एका भक्तानें मोठ्या प्रेमानें त्यांस अर्पण केलें होतें. पण त्यांनीं तें लगेच साक्रामेन्टो नदींत फेंकून दिलें ! तेथील एका विश्वविद्यालयांत स्वामींनीं एक व्याख्यान देऊन त्यांत प्राचीन आर्यांच्या संस्कृतीचे यूरोप आणि अमेरिका ह्या देशांतील संस्कृतीवर किती उपकार झाले आहेत, हें मार्मिकपणें सिद्ध केलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं, सदरहू विश्वविद्यालयानें अत्युच्च विद्वत्तादर्शक अशी जी एल्. एल्. डी.ची पदवी ती स्वामींना देण्याचा विचार केला होता. परंतु हा बहुमान आपणांस मुळींच नको, असें त्यांनीं साफ सांगितलें !

अमेरिकेंत असतांना स्वामींचा सर्व काल अध्ययन आणि अध्यापन ह्यांतच जात असे. त्यांच्या तेथील कामगिरीचा अमेरिकेंतील लोकांवर इतका परिणाम झाला कीं, वेदान्त विषयाचें अध्ययन करण्यासाठीं कित्येक ‘ रामसभा ’ स्थापन करण्यांत आल्या. स्वामींचीं व्याख्यानें ऐकण्याविषयीं लोकांची उत्सुकता इतकी वाढली होती कीं, एका दिवसांत चारचार पांचपांच व्याख्यानें देण्याचे त्यांना प्रसंग येत असत; एवढेंच केवळ नव्हे तर सार्वजनिक व्याख्यानांशिवाय वेदान्त विषय शिकविण्याचे कांहीं वर्ग त्यांना चालवावे लागत. इतकी सर्व दगदग असतांहि अमेरिकेंतील वाङ्मय वाचण्याचा त्यांचा सपाटा सुरूच असे. व अशा क्रमानें अवघ्या दोन वर्षांच्या मुदतींत तिकडील सर्व वाङ्मयाचें त्यांनीं आलोडन केलें.

## मातृभूमीस आल्यानंतर.

अमेरिकेंतील कामगिरी आटपून मातृभूमीस परत आल्यानंतर स्वामीजींना सहकार्य आणि संघटना ह्या दोन बाबींची उणीव विशेषेंकरून भासूं लागली. व ही उणीव लोकांच्या मनावर ठसविण्यासाठीं संयुक्त प्रांतांत ठिकठिकाणीं त्यांनीं व्याख्यानें दिलीं. तसेंच वेदान्तधर्माचें खरें रहस्य, प्रवृत्तिपर वेदान्त म्हणजे काय आणि निवृत्तिपर वेदान्त म्हणजे काय, वगैरे विषयांची त्यांनीं लोकांस यथार्थ ओळख करून दिली. अशा रीतीनें जागोजागीं उपदेश करून शके १८२७ मध्यें दिपवाळीच्या सुमारास म्हणजे सन १९०५ च्या नवंबर महिन्यांत एकान्तवास करण्याकरितां स्वामींनीं

पुनः एकदां तपोवनाचा मार्ग धरला. नारायणस्वामी त्यांच्या बरोबर होतेच. तपोवनापासून सुमारें दहा कोसांवर बदरीनारायणाच्या रस्त्याला व्यासगुहा आणि व्यासचट्टी ह्यांच्या समीप व्यासाश्रम म्हणून एक अत्यंत रमणीय स्थान आहे. ह्या निसर्गविभूषित एकान्तस्थळीं स्वामीजी पांच महिने राहिले. एवढ्या अवकाशांत त्यांनीं सामवेदाचें अध्ययन करून पातंजल भाष्य व निरुक्त ह्यांच्या कित्येक आवृत्त्या केल्या. अशा रीतीनें सबंद हिंवाळा व्यासाश्रमांत व्यतीत केल्यावर स्वामींच्या अन्तःसरोवरांत असा तरंग उठला कीं, तेथून वसिष्ठाश्रमांत जावें व तेथील अत्यन्त उच्च स्थानीं सर्व ग्रीष्मऋतु आत्मचिंतनांत घालवावा. या वेळीं 'भारतधर्ममहामंडळ' व दुसऱ्या इतर धर्मसंस्था ह्यांच्याकडून धर्मोत्सवांत वेदान्ताचा उपदेश करण्यासाठीं स्वामींनीं यावें, अशी त्यांस विनंति करण्यांत आली. परंतु स्वामींना आत्मचिंतनाशिवाय इतर सर्व विषय तुच्छ वाटत असल्यामुळें तें पवित्र स्थान सोडून जाण्यास त्यांचें मन घेईना.

## वसिष्ठाश्रमांत.

ज्या वनांत वसिष्ठाश्रम आहे तें टिहरी शहरापासून सुमारें पंचवीस कोसांच्या अंतरावर असून समुद्रसपाटीपासून अदमासें आठशें हात उंचीवर आहे. हें वन नानाप्रकारच्या दिव्य वृक्षांनीं आणि लतांनीं निसर्गदेवतेनें सुशोभित केलें असून ह्या वनाकडे जाण्याचा रस्ता टिहरी येथूनच फुटतो.

शके १८२७ च्या अखेरीस स्वामी टिहरी येथें आले. तेथें दोन दिवस राहून ते इष्टस्थलीं जाण्याकरितां निघाले. स्वामींच्या भोजनाची व्यवस्था करण्याचा भार टिहरीच्या महाराजांनीं आपण होऊन पत्करला. परंतु ही व्यवस्था स्वामींना सुखकर झाली नाहीं व ते लौकरच आजारी पडले. ह्या वेळीं नारायण स्वामी तेथें नव्हते. स्वामींना ज्या ठिकाणाहून निमंत्रणपत्रें व विद्युत्संदेश आले होते, त्या ठिकाणीं त्यांना पाठविण्यांत आलें होतें. पुढें प्रकृति विशेष नादुरुस्त झाल्यामुळें स्वामींनीं नारायणस्वामींस पत्र पाठवून बोलावलें; व पत्र पोहोंचतांच नारायणस्वामी वसिष्ठाश्रमीं परत आले. स्वामींची प्रकृति या वेळीं थोडी सुधारूं लागली होती; पण शरीरयष्टि अत्यंत कृश झाली असून अशक्तता बरीच वाढली होती.





वसिष्ठाश्रमांत आल्यावर नारायण स्वामिहि आजारी पडले. महाराजांकडून येणाऱ्या शिध्यांतील अन्न इतकें वाईट असे कीं, तें पचण्यासारखें नसे. पुढें जरा बरें वाटल्यानंतर तेथील हवापाणी कदाचित् चांगलें नसेल, अशा कल्पनेनें तें स्थान सोडून दुसरीकडे जाण्याविषयीं नारायणस्वामींनीं स्वामी महाराजांस विनंति केली व त्याप्रमाणें तेथून सुमारें दोन तीन कोसांच्या अंतरावर ते राहावयास गेले. तेथून थोड्या अंतरावर एका पर्णकुटिकेंत नारायणस्वामी राहूं लागले. महाराजांकडून येणारा शिधा चांगला नाहीं, असें समजून तेथून कांहीं अंतरावर असलेल्या खेड्यापाड्यांतून मधुकरी मागून आणण्याचा नारायणस्वामींनीं क्रम सुरू केला. यामुळें त्यांची प्रकृति ठीक राहूं लागली. परंतु स्वामीजी शिध्यांतील अन्न सेवन करीत असल्यामुळें त्यांची प्रकृति मात्र सुधारली नाहीं. उलट शरीर पूर्वींहून जास्त दुर्बल आणि कृश होऊं लागलें. तेव्हां अन्न अगदीं वर्ज करून ते केवळ दुधावर आपला निर्वाह करूं लागले. यामुळें प्रकृति थोडी सुधारली, पण शरीराची कृशता मात्र अधिक वाढूं लागली !

## दर्शनाकरितां मंडळीचें आगमन.

या सुमारास स्वामींचे शिष्य पूर्णसिंहजी तसेंच पं. जगत्रामजी व पं. हरिशर्मा हे स्वामींच्या दर्शनासाठीं वसिष्ठाश्रमांत येऊन दाखल झाले. स्वामींनीं अन्न अजिबात वर्ज केलें आहे, ही गोष्ट मंडळीला माहीत नसल्यामुळें भोजनाच्या वेळीं त्यांनीं स्वामींमहाराजांस जेवणाचा आग्रह केला; ‘ राम जेवल्याशिवाय आम्हीं जेवणार नाहीं, ’ असा त्यांनीं हट्ट धरला. मंडळीचें तें प्रेम पाहून स्वामींनीं दोन घांस खाल्ले. पुढें मंडळीचा रोज असाच आग्रह चाले आणि मंडळीच्या आग्रहास्तव स्वामीहि थोडें थोडें अन्न खात असत, परंतु यामुळें ते जास्त आजारी पडले. व त्यानंतर स्वामींनीं पूर्वीं अन्न वर्ज कां केलें होतें, याचें कारण त्यांच्या लक्ष्यांत आलें, व मग मात्र जेवण्याविषयीं त्यांनीं स्वामींस आग्रह केला नाहीं.

## हतभागी हरिशर्मा !

नारायणस्वामींची पर्णकुटी दोनतीन कोसांवर होती. व तेथून स्वामींच्या आज्ञेप्रमाणें ते दर रविवारीं त्यांच्याकडे जात असत. परंतु

पूरणजी आल्यावर त्यांनीं मुद्दाम मनुष्य पाठवून नारायणस्वामींस बोलावलें, व ' पूरणजी येथें असेपर्यंत नारायणानेंहि येथेंच राहावें, ' अशी आज्ञा केली. त्याप्रमाणें ते कांहीं दिवस स्वामींच्या कुटिकेशेजारीं निराळी कुटि करून राहिले. पूर्णसिंहजी व पं. जगत्‌रामजी हे सुमारें एक महिनाभर तेथें राहिले. पं हरिशर्मा मात्र तिसऱ्याच दिवशीं तेथून निघाला. वास्तविक वसिष्ठाश्रमासारख्या अतिरमणीय आणि पवित्र स्थलीं कोणाचेंहि चित्त प्रसन्न आणि आनंदपूर्ण झालें पाहिजे. तशांत स्वामींचें दर्शन व सहवास यांचा लाभ घडावयाचा. पण हतभागी हरिशर्म्याच्या चित्ताला तेथें उदासीनताच वाटूं लागली ! ' दैव देतें आणि कर्म नेतें,' अशांतलाच हा न्याय झाला ! वसिष्ठाश्रमामध्यें घरचा संसार त्याला दिसूं लागला ! वरच्यावर तो आपल्या प्रपंचाची हकीगत सांगू लागला. ' बायको घरांत गरोदर आहे. महिने भरून गेले आहेत, यामुळें माझें सर्व लक्ष तिकडे लागलें आहे. माझ्यानें आतां एक पळभरहि येथें राहवत नाहीं ! अर्ध्या वाटेंतूनच मी परत जाणार होतों. पण पूरणजीच्या जबरदस्तीनेंच मी येथें आलों. पण आतां मला लवकर जाऊं द्या. ' अशा तऱ्हेचें त्याचें रडगाणें एकसारखें चालू असे. नारायणस्वामींनींहि त्यांची समजूत पाडण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. ' असें पहा. पुरणजींच्या जबरदस्तीनेंच कां होईना, पण स्वामींच्या दर्शनाचा आपल्याला लाभ घडला. आपलें मोठें भाग्य, म्हणूनच हा योग जुळून आला. प्रवासाचे इतके कष्ट सोसून आपण येथवर आलांत; त्यासारखें चार दिवस येथें राहून या सत्संगतीचा व उपदेशाचा लाभ करून घेतलात, तरच तुमच्या येण्याचें चीज. ' अशा रीतीनें त्यांनीं परोपरीनें सांगून पाहिलें, परंतु त्याचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. बायकोशिवाय त्याला दुसरें कांहीं सुचेना. वारंवार तिचाच उल्लेख तो करीत असे. शेवटीं बाकीची मंडळी आपलें म्हणणें कांहीं केल्या ऐकत नाहीत, असें पाहून तो स्वामींकडे गेला आणि त्यानें आपलें रडगाणें त्यांच्यापुढें गाईलें. तें ऐकतांच स्वामींनीं आपल्या घरीं बायकामुलांत जाण्याविषयीं त्याला अनुज्ञा दिली. हरिशर्म्याला काय ! पडत्या फळाचीच आज्ञा पाहिजे होती. त्यानें लगेच तेथून कूच केलें ! जन्मांतरींच्या संस्कारांची चांगली तयारी असली तरच सत्पुरुषांचा सहवास घडतो व त्याच्यापासून इष्ट तो परिणाम घडूं शकतो !

## पूरणजींस निरोप.

वसिष्ठाश्रमांत असतांना तेथील विचित्र अन्नाचा तेथें गेलेल्या मंडळी-वरहि परिणाम झाला, व पूरणजी व जगत्‌राम असे दोघेहि आजारी पडले. स्वामी तर दिवसेंदिवस थकतच चालले होते. म्हणून सर्वांनीं त्यांची प्रार्थना केली कीं, 'एकतर हें अन्न एकदम बंद करा आणि आम्हांला पहाडासारख्या गांवांतून भिक्षा मागून आणण्याची परवानगी द्या, किंवा हें ठिकाण सोडून आपण टिहरी येथें चला म्हणजे त्या ठिकाणीं आम्हांला आपल्या भोजनाची योग्य व्यवस्था ठेवतां येईल व असें केल्यानें आपली प्रकृति सुधारेल.' मंडळीच्या आग्रहावरून स्वामींनीं टिहरी येथें येण्याचें कबूल केलें. स्वामींचीं पुस्तकें वगैरे टिहरी यथें नेण्याची व्यवस्था करण्यासाठीं नारायणस्वामी टिहरी येथें आले. पूरणजींना तेथें येऊन जवळ जवळ एक महिना झाला होता व अधिक राहण्याला सवड नसल्यामुळें तेहि टिहरी येथें आले. वशिष्ठाश्रम सोडून पुरणजी निघाले. त्या वेळीं स्वामी त्यांना पोहोंचविण्यासाठीं सुमारें अर्धा कोसपर्यंत गेले होते. वाटेंत ते अगदीं मंद स्वरानें पूरणजींस म्हणाले ' प्यारे पूरण, राम आतां कदाचित् लव-करच शांत होईल ! आतां तुम्हींच राम व्हा. यापुढें कदाचित् रामाचें तुमच्याशीं बोलणें चालणें, भेटणें सवरणें किंवा पत्रव्यवहार हीं बंद होतील.' हे शब्द स्वामींच्या तोंडून निघाले मात्र, तों लगेच पूरणजींच्या डोळ्यां-तून अश्रुधारा वाहूं लागल्या. ही स्थिति अवलोकन करतांच स्वामी तत्काळ तेथून निघून गेले. व तसें झाल्यामुळें पूरणजींना अधिक रडूं कोसळलें आणि दुःखाचा उद्वेग वाढला. पुढें कित्येक तासपर्यंत भ्रमिष्टा-प्रमाणें कशींबशीं पावलें टाकींत ते पुढें चालले होते.

## नारायणस्वामींस उपदेश.

स्वामींचीं पुस्तकें टिहरी येथें आणण्यासाठीं मजुरांचा बंदोबस्त करून नारायणस्वामी वशिष्ठाश्रमांत आले. पुढें पांच सहा दिवसांनीं स्वामीजी टिहरी येथें जाऊन पोहोचले, व त्यांच्या पुस्तकांच्या पेट्या खालीं पोहों-चत्या करून पांच सहा दिवसांनीं नारायणस्वामीहि परत आले. टिहरी येथें महाराजांच्या सिमलासु बागेंत दोन आठवडे राहिल्यानंतर टिहरी शहरानजीक भागीरथीच्या तटाकीं पक्की पर्णकुटिका बांधून तेथें एकान्त-

वासांत राहावें, असा विचार स्वामींच्या मनांत आला. नारायणस्वामींनींहि थोड्या अंतरावर निराळी पर्णकुटि करून राहावें, अशी त्यांची इच्छा होती.

टिहरी शहरापासून दोन अडीच कोस अंतरावर मालीदेवल नामक गांवाच्या शेजारी गंगेच्या किनाऱ्यावर एक मोठें विस्तीर्ण मैदान आहे. ही जागा स्वामींनीं आपल्याला राहाण्याकरितां पसंत केली. सदरहू स्थान उत्तम असून ह्या ठिकाणीं प्रसिद्ध संन्यासी केशवाश्रम यांनीं साठ वर्षेंपर्यंत एकान्तवास करून ह्याच ठिकाणीं समाधि घेतली. केशवाश्रमाच्या निवासानें पवित्र झालेल्या ह्या भूमींत एक पक्की पर्णकुटी बांधण्याची आज्ञा स्वामींनीं दिली. या स्थानापासून थोड्या अंतरावर गंगेच्या तीरावर बमूरोगी नांवाची दगडी गुहा आहे, ती नारायणस्वामींनीं स्वतःकरितां पसंत केली व त्या ठिकाणीं जाण्याकरितां नारायणस्वामी निघाले असतां 'मीहि थोडा वेळ फिरावयास येतों,' असें म्हणून स्वामीहि त्यांच्या बरोबर निघाले. थोडें अंतर चालून गेल्यावर स्वामीजी म्हणाले, 'बेटा' कदाचित् राम लवकरच शांत होईल. तूं पाहतो आहेस कीं, शरीर प्रत्यहीं अधिकाधिक कृश आणि कमजोर होत आहे. जगाचा आतां वीट आला आहे! कांहींच करावेंसें वाटत नाहीं. असें वाटतें कीं, कदाचित् थोड्याच दिवसांत रामाची लेखणी बंद पडेल. रामाचें शरीर जड आणि मूक बनेल. रामाचें शरीर खालील प्रदेशांत जाऊं शकणार नाहीं. असें दिसतें कीं, भागीरथीचा किनारा आतां सुटणार नाहीं! उपदेशाकरितां रामाला निमंत्रणें येतील त्या ठिकाणीं तुलाच जावें लागेल. म्हणून म्हणतों, प्यारे नारायण! गुहेंत दडी मारून बैस. निजस्वरूपांत रंगून जा आणि स्वयंसिद्ध राम हो-मूर्तिमंत वेदान्त बनून बाहेर पड. शोक, भीति यांचा अंतःकरणाला स्पर्श होऊं देऊं नको. सर्वत्र राम विराजमान आहे, असा अनुभव करून घे. रामाचें तन, मन धन, आपणच आहों, हें नित्यशः मनांत वागव! हा हृदयवेधक उपदेश ऐकून नारायण स्वामींच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या. स्वामींच्या पायांवर त्यांनीं मस्तक ठेविलें. स्वामींनांहि गहिंवर येऊन त्यांनीं नारायणाला पोटाशीं धरलें आणि मस्तकावर वरदहस्त ठेवून सांगितलें, 'बाळा! घाबरूं नको. एकान्तात वेदान्ताचा अभ्यास कर. अहर्निश आत्मचिंतन कर आणि स्वरूपांत स्थिर रहा.

सध्यां 'स्वानंद साम्राज्य' नांवाचा जो लेख चालू आहे, तो पूर्ण झाल्यावर तुला तत्काल बोलावण्यांत येईल. पर्णकुटि तयार झाली आणि राम तेथें राहूं लागला म्हणजे आठ आठ दिवसांनीं रामाकडे येत जा. रामापासून शारीरिक वियोग होणार, याबद्दल चिंता करूं नको. तसेंच रामाच्या शरीराची सेवा करण्यास सांपडत नाहीं, याबद्दलहि वाईट वाटूं देऊं नको. रामाचें शरीर लवकरच थंड पडणार! आतां केवळ आत्मोन्नतीचाच विचार कर; दुसऱ्या कोणाच्या मदतीची अपेक्षा करूं नको. आपल्या पायांवर उभें राहाण्यास शीक. तात्पर्य, वेदान्ताची मूर्ति बन.'

## समाधि.

वरील अमृततुल्य उपदेश करून स्वामी परत फिरले. बमरोगी गुहेंत जाऊन पांच चार दिवस झाले असतील नसतील तो स्वामींकडून पुढील संदेश आला. 'स्वानंद साम्राज्य' पुरें झालें! करितां येत्या रविवारीं तूं जरूर ये. आणि त्या लेखाची नक्कल कर म्हणजे ती प्रत 'जमाना' मासिकांत किंवा दुसऱ्या एखाद्या नियतकालिकांत प्रसिद्धीकरितां पाठवूं. सदरहू निरोपान्वयें नारायणस्वामी भेटीस जाणार होते; परंतु शनिवारीं संध्याकाळीं टिहरीच्या महाराजांचा नोकर नारायणस्वामींकडे आला आणि स्वामींचें शरीर गंगेंत वाहून गेल्याची बातमी त्यानें त्यांस कळविली. ही अशुभ वार्ता समजतांच नारायणस्वामींनीं टिहरीकडे धूम ठोकली. आठ वाजण्याच्या सुमारास ते टिहरी येथें पोहोंचले. नगरांतून झाडून सर्व लोक शोक करीत होते. नारायणस्वामींनीं स्वामींचा आचारी जो भोलादत्त त्याला प्रश्न केला असतां त्यानें पुढील हकीगत सांगितली:—“स्वामी व मी बरोबर गंगेवर गेलों. गंगेंत बुडी मारून मी तीरावर आलों. स्वामींनीं प्रथम व्यायाम केला आणि नंतर ते गंगेंत उतरले. गंगेचा प्रवाह जोरानें वाहात होता अशा ठिकाणीं जाऊन त्यांनीं स्नानास सुरवात केली. त्या जागीं पाणी गळ्याखालींच होतें. गंगेत बुडी मारून ते बराच वेळ झोंतांत उभे राहिले. ते अंग चोळीत होते. अंग चोळून झाल्यावर त्यांनीं फिरून बुडी मारतांना त्यांच्या पायाखालचा दगड निसटला आणि ते खोल पाण्यांत वाहात गेले. त्यांना उभें राहतां येईना. ते वाहात वाहात भोंवऱ्यांत जाऊन सांपडले.

तें पहातांच मोठ्यानें ओरडून मी लोकांना बोलावूं लागलों. परंतु दुर्दैवानें आसपास कोणीहि नव्हतें. टिहरीचे महाराज गंगोत्रीहून परत येत असल्यामुळें सर्व नोकर चाकर त्यांना आणण्याकरितां गांवाच्या वेशी-वर गेले होते. मी खूप ओरडलों, पण कोणी मदतीस येऊं शकलें नाहीं. मला घाबरलेला पाहतांच स्वामीजींनीं ओरडून सांगितलें, ' घाबरूं नको, बाहेर येण्याचा मी प्रयत्न करीत आहें. हा आलोंच तुझ्याजवळ ! ' स्वामींनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला. शेवटीं कंटाळून त्यांनीं भोंवऱ्यांत बुडी मारली व सुरकांडीसरसे तेथून सुमारें वीस हातांवर ते बाहेर पडले. परंतु त्यांचा दम छाटेना. तोंडांत पाणी शिरलें. धड हा पार नाहीं आणि तोहि नाहीं, अशी त्यांची स्थिति झाली. तीरावर येण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, परंतु शरीर स्वाधीन न राहिल्यामुळें प्रवाहाबरोबर ते खालींच जाऊं लागले. मात्र ॐ चा उच्चार दोनदां माझ्या कानावर पडला. व ते हात जोडून आसनमांडी घालीत असावे, असें मला दिसलें. "

स्वामींचें शरीर वाहात गेलें तें दोनशें हातांवर नदीच्या प्रवाहाला लागून एक गुहा होती, तींत जाऊन अडकलें. स्वामींची जलसमाधि झाली त्या वेळीं तोफांचे आवाज ऐकण्यांत आले. सदरहू तोफा वास्तविक टिहरीचे महाराज साहेब ह्यांच्या स्वागतार्थ उडविल्या जात होत्या. परंतु बरोबर स्वामींच्या जलसमाधीच्या वेळींच त्या उडाल्यामुळें महाराजांच्या सलामीच्या निमित्तानें स्वामी ब्रह्मीभूत झाल्याची बातमीच त्या जगाला जणूं जाहीर करीत होत्या !

भोलादत्ताच्या तोंडचा वर दिलेला समग्र वृत्तांत मंडळीनीं ऐकला तेव्हां सर्वांना परमावधीचें दुःख झालें. नारायण स्वामींच्या अंतःकरणाची स्थिति तर काय झाली असेल, ह्याची कल्पनाच केली पाहिजे. नारायण-स्वामी हे स्वामीजींचे पट्टशिष्य असून अखेरपर्यंत त्यांची सेवा करण्याचें कार्य त्यांनीं अंगीकारिलें होतें. परंतु अखेरच्या वेळीं स्वामींबरोबर आपण नव्हतों, या विचारानें त्यांच्या अंतःकरणांत कालवाकालव सुरू होऊन चित्तवृत्तीमध्यें शोकानें आणि उद्वेगानें अनेक कल्पनातरंग उद्भवूं लागले. " स्वामी तर इच्छामरणी होते ! रामाची इच्छा असल्याशिवाय त्याचा देह वाहून नेण्याचें सामर्थ्य प्रत्यक्ष भागीरथींतहि नाहीं. कारण रामाची आज्ञा अनुल्लंघनीय आहे. स्वामीमहाराज नेहमीं असेंच म्हणत कीं,

रामाचा हुकूम पाळील तर प्रत्यक्ष मृत्यूलाहि मृत्यु येणार नाहीं ! मग आज हा उलटाच प्रकार कसा घडून आला ? " अशा तऱ्हेच्या विचार-तरंगावर हलकावे खातां खातां त्यांचें लक्ष जेव्हां स्वामींचा कमंडलु, त्यांच्या छाट्या, तसेंच पुस्तकांच्या पेट्या यांजकडे जाई, तेव्हां त्यांचे डोळे पाण्यानें भरून येत; आणि वेड्याप्रमाणें मोठ्यानें ओरडून ते म्हणत ' हे लेख, तसेंच हे ग्रंथ यांचें संशोधन आतां कोण करील ! रामासारखें वेदान्तावर भाष्य आतां कोण लिहील ! '

उद्वेग आणि निराशा यांच्या काहुरानें त्यांचें चित्त इतकें भ्रान्त होऊन गेलें कीं, स्वामींच्या निवासस्थानाकडे जाण्याला त्यांना पाऊल पुढें टाकवेना; तसेंच त्यांनीं लिहिलेलीं पुस्तकें व लेख ह्यांच्याकडे नुसतें पाहाण्यालाहि त्यांना बिलकुल सुचेना. ' सिमलासु ' बाग सोडून शहरांत जावें तर तेथील लोक शोकाकुल झालेले पाहून त्यांच्या चित्ताची उदासीनता द्विगुणित होई. तात्पर्य, त्यांच्या अंत:करणाला शान्ति म्हणून मिळेना. व कांहीं दिवसपर्यंत सिमलासु बागेच्या आसपास एखाद्या भ्रमिष्टाप्रमाणें ते फिरत राहात !

स्वामी ब्रह्मलीन झाल्याचें ऐकून त्यांना जितका शोक झाला त्यापेक्षां त्यांची वाणी अन्यथा झाल्याचें पाहून त्यांच्या चित्तांत जास्त तळमळ उत्पन्न झाली. ' संन्यासग्रहणानंतर ' राम बादशहा ' नेहमीं म्हणत कीं, रामाची तशी इच्छा असल्याशिवाय रामाच्या देहाला स्पर्श करण्याचीहि ताकद मृत्यूमध्यें नाहीं. मग हा प्रकार झाला तरी कसा ? ' अशा संशयी स्थितींत टिहरी शहरच्या आसपास उदासीनपणें भटकत असतां पुरणजींची व त्यांची मुलाखत झाली. स्वामी ब्रम्हलीन झाल्याचें ऐकून ते तांतडीनें टिहरी येथें आले व त्यांनाहि मोठा प्रश्न पडला तो हाच कीं, ' रामाचा अशा रीतीनें अन्त होणें म्हणजे त्यांच्या आजपर्यंतच्या लेखांवर आणि वचनांवर हरताळ लागण्यासारखें आहे. अशा स्थितींत रामाच्या वचनांवर विश्वास तरी कसा बसावा ? '

अशा रीतीनें त्या दोघांनीं बराच वेळ शोकांत घालविल्यानंतर त्यांचीं अंत:करणें किंचित् हलकीं झालीं. आणि मनांतील खळखळ जरा शांत

झाली. दुःखाच्या उद्वेगामुळें रामाच्या पुस्तकांकडे आणि कागदपत्रांकडे नारायणस्वामींचें आतांपर्यंत लक्ष गेलें नव्हतें, परंतु कागदपत्र पहाण्याचा निश्चय करून ते दोघे स्वामींचे शिष्य ' सिमलासु ' बागेंतील स्वामींच्या निवासस्थानीं आले. त्या ठिकाणीं स्वामींच्या पुस्तकांच्या पेट्या पडल्या असून कांहीं सुटे कागद अस्ताव्यस्त पडले होते. त्यांमध्यें स्वामीजींच्या लेखणींतून उतरलेला शेवटचा लेख—' स्वानंद साम्राज्य ' नामक लेख त्यांच्या नजरेस पडला. ज्या लेखाची नक्कल करण्याकरितां स्वामींनीं त्यांस रविवारीं बोलाविलें होतें तोच हा लेख होय. लेखाच्या पानावर अनुक्रमांक घातलेले नव्हते, यामुळें जें पान हातीं लागलें तें घेऊन त्यांनीं वाचण्यास सुरुवात केली. अशा रीतीनें दोन तीन पानें चाळलीं असतील नसतील तों पुढील मजकुराचा कागद त्यांच्या हातीं लागला.

## स्वामींचा शेवटचा लेख.

" ब्रह्मा, विष्णु, शिव, इंद्र, गंगा, भारत ! हे मृत्यो, हें शरीर पाहिजे तर बेलाशक घेऊन जा. मला त्याची बिलकुल पर्वा नाहीं. दुसरीं असंख्य शरीरें मला कांहीं कमी नाहींत ! चंद्राचे स्वच्छ शीतल किरण परिधान करून मोठ्या आनंदानें मी राहूं शकेन. पर्वतांतून वाहणारे ओढे आणि नद्या ह्यांच्या खळखळ वाहणाऱ्या प्रवाहरूपानें मला स्वच्छंद फिरतां येईल. समुद्रांतील लहरींच्या रूपानें मी आनंदानें नृत्य करीत राहीन. शीतल, मन्द आणि सुगंधित असा वायु मीच आहें. माझीं हीं सर्व रूपें नित्यशः बदलणारीं आहेत. पर्वतांच्या शिखरांवरून मी खालीं आलों. दरवाजे ठोठावले, मृतांना सजीव केलें, पुष्पकलिकांना हंसविलें, बुलबुलांना रडविलें, कांहींचे अश्रु पुसले, कित्येकांवर पांघरुण घातलें, कित्येकांचें ( मायेचें ) आवरण दूर सारलें; याला छेड, त्याला छेड, इकडे फिर, तिकडे फिर, असें करीत हातावर हात मारून गेला ! हा गेला ! त्यानें आपल्या बरोबर कांहीं नेलें नाहीं. तो कोणाच्या हातीं सांपडला नाहीं— सांपडणार नाहीं ! "

सदरहू लेख वाचून नारायणस्वामी व पूरणजी यांच्या सर्व शंका दूर झाल्या आणि त्यांचें चित्त ठिकाणावर आलें. ' राम आतां लौकरच शान्त





होईल ! ' अशा अन्धुक शद्वांनीं स्वामींनीं आपली पुढील स्थिति त्यांच्या-पाशीं पूर्वीं सूचित केली होती. पण त्या शद्वांचें त्यांस विस्मरण पडलें होतें.

वरील लेखासंबंधानें नमूद करण्यासारखी गोष्ट ही होय कीं, तो स्वामींनीं आपल्या मातृभाषेंत लिहिला असून तो समाधीच्या फारच थोडा वेळ पूर्वीं त्यांच्या लेखणींतून उतरला होता.

लेखाचें वाचन झाल्यानंतर नारायणस्वामी व पूरणजी यांनीं सर्व पेट्या उघडून स्वामींचे लेख लक्ष्यपूर्वक तपासले व विषयानुरोधानें त्यांचें सात भागांत वर्गीकरण केलें. हे सर्व भाग अलीकडे तीन खण्डांत प्रसिद्ध झाले आहेत.

## भोलादत्ताची हकीकत.

वरील लेखासंबंधानें नारायण स्वामींनीं भोलदत्तास विचारतां तो म्हणाला:—

" स्नानास जाण्यापूर्वीं बराच वेळपर्यंत स्वामी महाराज या कागदावर कांहीं लिहीत होते. त्या वेळीं त्यांचा चेहरा लाल व आनंदमय दिसत होता. डोळ्यांतून मोत्यांसारखे अश्रु ठपकत होते. त्यांचें चित्त इतकें एकाग्र झालें होतें कीं, शरीराचा एक केंसहि हालत नसावा असें वाटे. लेख लिहिण्यांत ते इतके चूर होते कीं, किती वेळ तरी मी त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिलों; पण माझ्याकडे त्यांनीं पाहिलें सुद्धां नाहीं. अकरा वाजण्याचा सुमार असल्यामुळें भिक्षा तयार असल्याचें कळविण्यासाठीं मी तेथें गेलों होतों. पण पाहतों तों स्वामी समाधिस्थ ! कागदलेखणीहि हातांतून खालीं पडलेली. भीतभीत जवळ जाऊन भिक्षा तयार असल्याबद्दल महाराजांना हात जोडून सांगितलें. पण कांहीं जबाब येईना ! थोड्या वेळानें पुनः बोललों ' भगवन् ! भिक्षा आपली वाट पाहात आहे. ' माझा आवाज ऐकून स्वामींनीं नेत्र उघडले. आणि माझ्याकडे वळून हंसून स्वामी मला म्हणाले, ' बेटा, काय म्हणतोस ?' मी पुनः हात जोडून म्हणालों, 'महाराज ! भोजन तयार आहे. स्नानाकरितां गंगाजल वर आणूं कीं आपणच गंगेवर जाणार आहांत ? ' यावर ते म्हणाले ' तूं अजून कांहीं खाल्लेंबिल्लेंस कीं नाहीं ? " मीं उत्तर दिलें, ' महाराज, नाहीं. कांहीं खाल्लें नाहीं. मींहि आज गंगास्नान करून नंतरच जेवणार आहें. ' माझें उत्तर ऐकून, कां

नकळे, स्वामींना हंसूं कोसळलें; व आश्चर्यानें ते म्हणाले, ' प्यारे भोलादत्त ! काय, आज तूं गंगेवर स्नानाला येणार ! असें आज विशेष काय आहे ?' मी म्हणालों, ' महाराज, आज मोठें पर्व आहे. एक तर आज दिपवाळी, तशांत संक्रांत, शिवाय अमावास्या ! म्हणून म्हणतों, गंगास्नान करूनच जेवावें. ' व्यायाम करतांना स्वामींच्या पायाला थोडें लागलें असल्यामुळें समाधीपूर्वीं दोन चार दिवस गंगा वर मागवून ते स्नान करीत असत. भोलादत्ताचें उत्तर ऐकून तेथेंच स्नान करणें स्वामींना बरें न वाटल्यामुळें ते म्हणाले, ' ठीक आहे. आज राम गंगेवरच जाऊन स्नान करील. चल, आपण दोघेजण बरोबरच जाऊं. ' हें भाषण झाल्यानंतर आम्हीं दोघे गंगेवर गेलों. "

## समाधीनंतर.

स्वामी रामतीर्थ हे शके १८२८ आश्विन वद्य अमावास्या, बुधवार तारीख १७ आक्टोबर १९०६ रोजीं बरोबर ३३ वर्षें पूर्ण होऊन ऐन दिपवाळीच्या दिवशीं समाधिस्थ झाले. स्वामींचा जन्महि दिपवाळींत ! स्वामींचें कृष्णार्पणहि दिपवाळींत ! व समाधिहि दिपवाळींत !

समाधीनंतर सात दिवसांनीं त्यांचा देह फुगून वर आला. ज्या वेळीं तो गंगेच्या तीरावर लागला त्या वेळीं तो समाधिस्थितींतच होता. दोन्ही हात एकावर एक असे छातीवर ठेऊन आसनमांडी घालून बसलेले, अशी त्यांच्या शरीराची स्थिति होती. डोळे मिटलेले होते. जणूं काय अजूनहि ते समाधिस्थच आहेत ! मान ताठ होती. आणि तोंड ॐ म्हणतां म्हणतां उघडें राहिलें असावें. जणूं काय ॐ चा उच्चार अजूनहि चालला आहे ! देह इतके दिवस पाण्यांत असूनहि गंगेतील जलचरांचा त्याला स्पर्श झाला नव्हता. देह बाहेर काढल्यावर एका पेटींत घालून विधिपूर्वक ती पेटी भागीरथींत सोडण्यांत आली. अशा रीतीनें भागीरथीमातेनें आपल्या लाडक्याला आपल्या पोटांत घेतलें !

या ठिकाणीं स्वामींचें साक्षात् अवतारकृत्य समाप्त झालें. स्वामींच्या सारख्या विभूति कांहीं विशिष्ट कार्यासाठीं क्वचित्कालीं जगांत अवतीर्ण होतात. या विश्वरूपी अफाट सागरांतून प्रवास करणाऱ्या मनुष्यरूपी तारवांना सत्पुरुष हे दीपस्तंभाप्रमाणें मार्गदर्शक होत व आपल्या पवित्र

कार्याची जनतेला नुसती दिशा दाखवून देऊन आपण आरंभिलेली कामगिरी पूर्ण करण्याची जबाबदारी त्यांच्यावर सोंपवून विद्युत्प्रकाशाप्रमाणें ते जगांतून एकदम नाहींसे होतात. स्वामींसारखे प्रतिभासंपन्न अद्वितीय पुरुष हे संघटनात्मक शक्तीचें केंद्र असून जगाला त्यांची अवश्यकता भासूं लागते, अशाच वेळीं ते जन्माला येतात. आपणांमधील अद्भुत शक्तीच्या प्रभावानें ते जनतेचें अंतःकरण आकर्षण करून व जनता आपल्यावर अवलंबून राहूं लागली असतां तिला स्वावलंबनाचें शिक्षण देण्यासाठींच कीं काय आपली अवतारसमाप्ति करतात !

## रामबाण.

स्वामी रामतीर्थ हे अशा रीतीनें वेदान्तधर्माची विघडलेली घडी जनतेच्या अंतःकरणांत बसविण्याचें महत्कार्य करून समाधिस्थ झाले ! हिंदु समाजाची शोचनीय स्थिति अवलोकन करून त्यांचें अंतःकरण नेहमीं हळहळत असे आणि ही स्थिति कोणत्या उपायानें सुधारेल, या विचारांत त्यांचें चित्त सदासर्वदा व्यग्र असून या दिशेनें त्यांची अहोरात्र खटपट चाललेली असे. आर्यांचा अत्यंत पूज्य असलेला जो महाभारत ग्रंथ त्यांत शेवटीं सांगितल्याप्रमाणें धर्म हा हिंदू जनतेची किंबहुना सर्व जगताची स्थिति सुधारण्यास एकच रामबाण उपाय आहे,* हा त्रिकालबाधित सिद्धान्त स्वामींना अनुभवांतीं पूर्णपणें पटला होता. स्वामी म्हणतातः—" रोग एकच आहे व त्यावर उपायहि एकच आहे. धर्म हा तो उपाय होय. धर्म राष्ट्राच्या राष्ट्रें उन्नतीस नेतो व त्यांना मुक्त करतो. मनुष्य सत्पुरुष बनतो—देवांचाहि देव होऊन राहतो, तोहि धर्माच्यामुळें. ईश्वरभावनेंत मुरून जा म्हणजे कसलीहि विवंचना करण्याचें तुम्हाला कारण उरणार नाहीं. स्वतः ईश्वर बना आणि दुसऱ्यांना तसें बनवा, यांत सर्व कांहीं आलें ! या सत्यसिद्धान्तावर श्रद्धा ठेवा कीं, तुमच्या दुःखाची इतिश्री झाली; या सत्याला झुगारून द्या म्हणजे दुःखपरंपरा तुमच्यामागें लागलीच म्हणून समजा. "

---

* न जातु कामान्न भयान्न लोभाद् धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ।
नित्यो धर्मः सुखदुःखेत्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्यत्वनित्यः ॥

महाभारत,स्वर्गपर्व, अ० ५।६३.

# रामसुधा

वेदान्त म्हणजे कांहीं ढोंग नव्हे व या जगाला पारमार्थिक सत्यता मुळींच नाहीं. जग सत्य आहे, अशी ज्याची भावना असेल तो मरेल. सत्तत्त्व म्हणून कांहीं असलें तर तें फक्त ईश्वरच आहे.

जोंपर्यंत यत्किंचित्‌हि वासना मनुष्याच्या हृदयांत वास करीत आहे, तोंपर्यंत सच्चिदानंदस्वरूपाचा अनुभव होणें अशक्य आहे. परंतु ' यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः । अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥ श्रुति.

आत्म्याशिवाय जगांतील दुसरी कोणतीहि वस्तू–कोणताहि विषय सत्य आहे, अशी ज्याची श्रद्धा असेल त्याला ती वस्तु, तो विषय फसवून दुःखांत लोटल्याशिवाय राहणार नाहीं. ( ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद ।) सर्व विषय अनित्य अतएव दुःखरूप आहेत, हें ज्ञान फक्त आत्मानुभवच करून देतो.

देहाभिमानाला जोंपर्यंत आपण चिकटून आहों, तोंपर्यंत जगांतील यच्चयावत् रोगांना आपण जणूं निमंत्रणच करीत आहों.

जे आपलें सुख विशिष्ट परिस्थितीवर अवलंबून ठेवितात त्यांना आपल्या सुखाचे दिवस मृगजलाप्रमाणें नेहमीं दूरदूर जात आहेत, असा प्रत्यय येईल. जगांत ज्याला धन म्हणून मानण्यांत येतें तें खरें धन नसून सृष्टीचें सौंदर्य व ऐश्वर्य आणि आपण यांच्यामध्यें आडपडदा उत्पन्न करण्यालाच तें कारणीभूत होतें.



# प्रस्तावना

## स्वामींचें ध्येय

जगांत ऐहिक सुखांची लालसा वाढत जाऊन लोक खऱ्या सुखाला पारखे होऊं लागले, धन हेंच सर्वस्व मानलें जाऊन परमार्थाचा विचार लोकांच्या अंतःकरणाला शिवेनासा झाला, आत्यंतिक श्रेयापासून जनसमूह पराङ्मुख होऊं लागला, अर्थात् धर्मग्लानि झाली म्हणजे अध्यात्मिक ज्ञान-जागृति करून जनतेला धर्माकडे प्रवृत्त करण्याकरितां ईश्वरी योजनेनें सत्पुरुषांचा उदय होत असतो. अशा सत्पुरुषांपैकीं स्वामी रामतीर्थ हे एक होत. त्यांचें अवतारकार्य काय होतें, कोणतें प्राप्तव्य त्यांनीं सतत डोळ्यांपुढें ठेवलें होतें, ह्याचें त्यांनीं स्वतःच एका पत्रांत वर्णन केलें आहे. सदरहू पत्रांत स्वामी लिहितातः—"तुम्ही कोणीहि असा, विद्वान् असा किंवा अविद्वान् असा, श्रीमान् असा किंवा दरिद्री असा, स्त्री असा किंवा पुरुष असा, पुण्यात्मे असा किंवा पापी चांडाळ असा; ख्रिस्ती असा किंवा ( दीड दमडीच्या स्वार्थाकरितां त्याला विकणारे ) जूडास असा, कृष्ण असा किंवा गोपी असा, सर्वांत रामच भरलेला आहे. मेघगर्जनेप्रमाणें गर्जना करून माझें ईश्वरत्व, तुमचें ईश्वरत्व सर्वांना पटवून देण्याचा माझा निर्धार आहे. तुमच्या प्रत्येक कृत्यांत आणि हालचालींत ईश्वरत्व भरलेलें आहे—त्या सर्वांचें अधिष्ठान ईश्वरच आहे, हें जगताला जाहीर करावयाचें आहे. जर्मनी, इंग्लंड, अमेरिका, हिंदुस्थान, तसेंच सर्व देश यांना जागृत करून स्वतंत्र करणें—स्वाधीन—मुक्त करणें, हें माझें कर्तव्य आहे. तुमच्या त्या जुन्यापुराण्या खेळांचा मला आतां वीट येऊन गेला आहे. स्वप्नांत भटकणाऱ्या लोकांनों ! माझ्या तुताऱ्यांचा आवाज तुमच्या कानांपर्यंत पोहोंचला नाहीं काय ? प्रत्यक्ष हिमालयालाहि हालवून सोडणारी मेघगर्जना तुमच्या कानांवर येऊन आदळली नाहीं काय ? ही गर्जना कांहीं स्वप्नस्थितींतील नव्हे, हें पक्कें लक्ष्यांत बाळगा. रामाचा—तुमच्यांतील परमात्म्याचा हा हुकूम आहे. आणि रामाची आज्ञा अलंघ्य आहे."

**स्वातंत्र्य ! स्वाधीनता !! मुक्तता !!!**

बुद्ध, महंमद, ख्रिस्त किंवा इतर अवतारी पुरुष ह्यांच्याप्रमाणें लाखों

अनुयायांची खोगीरभरती करणें, हें कांहीं रामाचें कर्तव्य नव्हे. तर यच्च-यावत् स्त्रीपुरुषांमध्यें भरलेला जो राम त्याची सर्वांना ओळख करून देणें, हेंच रामाचें इतिकर्तव्य आहे. ह्या शरीराला पायांखालीं तुडवा, ह्या व्यक्तीला खाऊन टाका, ( ह्या शरीराची फाजील वडेजाव माजवूं नका, ) व तीमधील आत्मतत्त्वरूपी रस प्राशन करा—आपलासा करून घ्या. अर्थात् रामाच्या उपदेशाचा निदिध्यास करून त्याच्याशीं तद्रूप व्हा; व असें झालें तरच रामाचें यथार्थ स्वरूप तुम्हीं ओळखलेंत असें होईल ! ”

वरील उताऱ्यावरून स्वामींचें ध्येय व त्यांच्या कार्याचें महनीय स्वरूप यांची वाचकांना कल्पना आल्याशिवाय राहाणार नाहीं. हें विशिष्ट ध्येय लहानपणापासून त्यांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेविलें होतें, व त्यांचा सर्व व्यासंग असल्या उच्च दृष्टीनें झालेला होता. ही व्यापकदृष्टि त्यांच्या सर्व उपदेशाचें रहस्य होय. त्यांच्या उपदेशाचें अलौकिकत्व ह्यांतच आहे. स्वामींच्या एकंदर उद्गारांसंबधानें लक्ष्यांत ठेवण्यासारखी अशी एक विशेष गोष्ट आहे; ती ही कीं, स्वानुभवाशिवाय कोणतीहि गोष्ट ते सांगत नाहींत. ‘ आधीं केलें मग सांगितलें’ ही समर्थोक्ति त्यांच्या सर्व विवेचनाला तंतोतंत लागू पडते. त्यांच्या प्रत्येक शब्दांत स्वानुभव खचून भरलेला आहे. अनुभवसिद्ध सिद्धान्त किंवा तत्त्वें सांगावयाचीं असल्याशिवाय स्वामी आपली लेखणी उचलीत नसत आणि जिव्हेला व्यर्थ शीण देत नसत. त्यांच्या उद्गारांपैकीं प्रत्येक उद्गार सहजस्फूर्तीचा आहे, व यामुळें श्रोत्यांवर आणि वाचकांवर त्यांचा विलक्षण परिणाम व्हावा, यांत कांहीं नवल नाहीं. स्वामींचें प्रत्येक वाक्य वाचतांना ते आपला अनुभव वाचकांच्या हृदयांत जणूं ओतीत आहेत कीं काय असें वाटतें. तशांत भगवद्भक्तीचा सहज प्रेमळपणा त्यांच्या वाङ्मयांत ओतप्रोत भरलेला असल्यामुळें त्यांचे ग्रंथ वाचतांना वाचकांची चित्तवृत्ति तल्लीन होते.

## स्वामींच्या वाङ्मयाचें महत्व.

वर निर्दिष्ट केलेल्या कारणास्तव स्वामींचें एकंदर वाङ्मय अत्यंत मौल्यवान् आहे. तशांत त्यांनीं वेदान्ताच्या गहन सिद्धान्ताचें अर्वाचीन भौतिक शास्त्रांच्या प्रकाशांत व विसाव्या शतकांतील सुशिक्षित समाजाला सहज पटतील, अशा अगदीं व्यावहारिक शब्दांत—रुपये, आणे, पैच्या भाषेंत मार्मिक

विवेचन केलेलें असल्यामुळें स्वामींच्या उद्गारांना विशेष अलौकिकत्व प्राप्त झालेलें आहे. ' आधींच सोन्याचें वरि जडावाचें ' अशा प्रकारचें त्यांच्या ग्रंथांचें अत्यंत रमणीय आणि ओजस्वी स्वरूप आहे. स्वामींचें वाङ्मय जसें अपूर्व आहे, तसेंच तें विपुलहि आहे. हिंदी, ऊर्दू व इंग्रजी अशा तिन्ही भाषांना त्यांनीं आपल्या ग्रंथरचनेनें अलंकृत केलें आहे. जगाच्या भावी पिढ्यांकरितां हें वाङ्मय म्हणजे एक अपूर्व ठेवाच होय. विशेषतः हिंदू लोकांना तर सदरहू वाङ्मय ही एक दैवी देणगीच मिळाली आहे, असें म्हटलें तरी चालेल. स्वामींच्या ग्रंथांत अध्यात्मिक विषयाबरोबर हिंदुस्थानापुढें सध्यां असलेल्या अनेक सामाजिक, नैतिक व व्यवहारिक प्रश्नांचें सोपपत्तिक विवेचन आलेलें आहे. अर्थात् स्वामींच्या समग्र ग्रंथाच्या परिशीलनानें आपणांपुढील अनेक बिकट प्रश्नांवर नूतन आणि दिव्य असा प्रकाश पडणार असून भावी पिढ्यांच्या आयुष्यक्रमाला आणि विचारसरणीला त्यामुळें अत्यंत श्रेयस्कर असें वळण लागल्यावांचून राहाणार नाहीं.

## स्वामींचा अधिकार.

एकोणिसाव्या शतकांत पाश्चात्य भौतिक शास्त्रांची अपूर्व वाढ झाल्यामुळें हिंदुस्थानांतील लोकांचे डोळे दिपून गेलेले होते. जगांत सुधारणा म्हणून कांहीं असेल तर ती भौतिक शास्त्रांचीच होय; जगांत सुख मिळविण्याचा कांहीं मार्ग असेल तर तो पाश्चात्य शोधांच्या योगानें ऐहिक जीवनक्रमांत उत्पन्न होणारें सुख हाच आहे; या शास्त्रांच्या पलीकडे अत्यन्त श्रेयस्कर अशी अध्यात्मज्ञानाची अपूर्व, अद्वितीय, आणि पूर्वपरंपरागत अशी एक श्रेष्ठ स्थिति आहे, याची इकडील लोकांत सामान्यतः कल्पना उरली नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. आपला प्राचीन वैदिक धर्म, आपल्या वेदांमध्यें सांगितलेले दिव्य सिद्धांत यांची लोकांमधील ओळख जवळजवळ बुजून गेली होती. पाश्चात्य पद्धतीवर इकडे नवीन नवीन धर्मपंथ एका पाठीमागून एक उत्पन्न होत चालले असून खरा धर्म कोणता, याची जाणीव बहुतेक अस्तंगत होऊं लागली होती. नुसत्या पुस्तकी ज्ञानानें, आणि अर्ध्या बोबड्या पाश्चात्य विचारांनीं आपले हात गगनाला लागले आहेत, अशी इकडील सुशिक्षित पाश्चात्यज्ञानसंपन्न

लोकांची स्थिति झालेली होती. धड पाश्चात्य ज्ञानहि पुरें नाहीं, आणि पौर्वात्य ज्ञानाचा तर मागमूसहि नाहीं, अशी अर्धवट स्थिति हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांत दृग्गोचर होत होती; अशा वेळीं स्वामी रामतीर्थ यांच्यासारख्या पौर्वात्य व पाश्चात्य शास्त्रांत निष्णात असलेल्या अवतारी विभूतीचा जन्म झाला. आपल्या इकडील पूर्वपरंपरागत अध्यात्मज्ञानांत स्वामी पूर्णपणें मुरून गेलेले होते. वेदान्तज्ञान हें 'यज्ज्ञातेन सर्वं ज्ञातं भवति' ह्मणजे जें जाणलें असतां मनुष्याच्या अंगीं सर्वज्ञता येते, अशा तऱ्हेचें असल्यामुळें, व सर्व विश्वावर आत्मैक्यभावनेनें त्यांच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न झालेलें असल्यामुळें, विसाव्या शतकाच्या आरंभीं जगांतील ज्ञात्या पुरुषांच्या बुद्धीमध्यें व्यामोह उत्पन्न करणाऱ्या अनेक बिकट प्रश्नांवर स्वामींना दिव्य व अद्भुत असा प्रकाश पाडतां आला. पाश्चात्य राष्ट्रांमध्यें भौतिक शास्त्रासंबंधाचे जे शोध झालेले आहेत व होत आहेत ते सर्व वेदान्तज्ञानाकडे—अद्वैताकडे अप्रत्यक्ष रीतीनें कां होईना, पण पाश्चात्य लोकांना हळुहळू कसे नेत आहेत, भौतिक शास्त्रें हीं वेदान्ताला विरोधी नसून त्यांचा प्रवाह अद्वैतज्ञानाकडे निश्चयानें गेल्याशिवाय कसा राहाणार नाहीं, वगैरे तत्त्वांचें प्रतिपादन स्वामींना आपल्या अंगच्या वेदान्तज्ञानामुळें करतां आलें; व स्वामींचे हे सिद्धान्त भौतिक शास्त्रांच्या मागें धडपडणाऱ्या विद्वानांना हळुहळू पटत चालले आहेत.

सर्व विश्वावर अध्यात्मदृष्टीनें प्रेम करणाऱ्या ज्ञानी मनुष्याचें वजन सर्वत्र पसरावें, यांत कांहीं नवल नाहीं; व स्वामींची स्थितिहि तशीच होती. 'सर्व अफाट विश्व हें माझें घर असून यच्चयावत् लोकांचें कल्याण हाच माझा धर्म होय,' अशा आशयाचे जे उद्गार स्वामींच्या तोंडून निघाले आहेत, त्यांवरून त्यांच्या अंतःकरणांतील विश्वव्यापी प्रेमाची कल्पना करतां येण्यासारखी आहे. स्वतः संन्यस्तवृत्तीनें राहून जगांतील सर्व लोकांना पूर्ण निरपेक्षपणानें आणि अत्यंत कळकळीनें ज्ञानदान करावें, व तेंहि केवळ ईश्वरी प्रेमानें करावें; इतकी ज्यांच्या अंतःकरणाची दिव्य आणि अलौकिक स्थिति झाली, अशा विभूतींना सर्व जगाला अधिकारानें उपदेश करण्याचा अधिकार प्राप्त व्हावा, ही गोष्ट ओघाओघानेंच प्राप्त होणारी आहे. जपान, अमेरिका, वगैरे सारख्या कोणत्याहि देशांत स्वामी

गेले तरी आपण कोणत्या तरी परकी देशामध्यें किंवा परक्या लोकांमध्यें आलों आहों, अशी त्यांची कधींहि भावना नसे. सर्व जगांतील लोक हे आपले देशबांधव किंबहुना आपल्या आत्म्याचीं निरनिराळ्या रूपांत व्यक्त झालेलीं स्वरूपें, अशी भावना त्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें बाणून गेली होती व अशा दिव्य आत्मैक्यभावनेमुळें त्यांना सर्व ठिकाणीं अधिकारानें उपदेश करतां आला. उदाहरणार्थ, स्वामी जपानांत गेले असतां टोकियो येथील एका महाविद्यालयांत 'यशाची गुरुकिल्ली' या विषयावर त्यांचें जें व्याख्यान झालें, त्या व्याख्यानाच्या आरंभीं त्यांनीं काढलेल्या उद्गारांवरून वरील विधानाची सत्यता कोणासहि पटल्याशिवाय रहाणार नाहीं. स्वामी म्हणाले:—"जपान हा माझा देश आहे. व जपानांतील लोक हे माझे देशबांधव आहेत असें मी समजतों. तुमचे पूर्वज पूर्वकालीं हिंदुस्थानांतून इकडे आलेले आहेत, ही गोष्ट सयुक्तिक प्रमाणांनीं सिद्ध करतां येण्यासारखी आहे; अर्थात् तुमचे पूर्वज ते माझे पूर्वज; व अशी स्थिति असल्यामुळें तुमचा बंधु या नात्यानें तुमच्याशीं प्रेमसंवाद करण्याकरितां मी या देशांत आलों आहें, परकी या नात्यानें आलेलों नाहीं. दुसऱ्या एका दृष्टीनें विचार केला तरीहि तुम्हांला उपदेश करण्याचा अधिकार मला पोहोंचतो. माझा जन्मतः स्वभाव, माझ्या संवयी आणि मनःप्रवृत्ति, तसेंच माझ्या अंगचें प्रेम या सर्वांचा विचार केला असतां मी जपानीच आहें, अशी माझी भावना आहे." स्वामींच्या अंगच्या प्रेमाचें हें किती ढळढळीत उदाहरण आहे! 'यशाची गुरुकिल्ली' या व्याख्यानाच्या आरंभीं त्यांनीं आणखी जे उद्गार काढले आहेत, तेहि लक्ष्यांत ठेवण्यासारखे आहेत. ते म्हणतात:—"'यशाची गुरुकिल्ली' असल्या विषयावर, कीं ज्यांत जपानानें हिंदुस्थानापेक्षां जास्त अधिकार प्राप्त करून घेतला आहे, अशा विषयावर हिंदुस्थानांतून आलेल्या एका परकी मनुष्यानें तुम्हाला उपदेश करण्याचा आव घालावा, हें प्रथमारंभीं मोठें चमत्कारिक दिसेल नाहीं बरें? परंतु तें कसेंहि असो, मी आज जो तुमच्यापुढें उभा राहिलों आहें तो गुरु या नात्यानें असून त्याला अनेक कारणें आहेत. एखादी गोष्ट युक्तिप्रयुक्तीनें व्यवहारांत आणणें हें निराळें, व तींतील रहस्य यथार्थ रीतीनें समजणें हें निराळें, आजकालच्या स्थितींत ज्या तत्त्वांचा अवलंब केला

असतां राष्ट्र भरभराटीस येऊं शकतें त्यांच्या योगानें एखाद्या राष्ट्रानें आपली ऐहिक उन्नत्ति करून घेतली, तरी तेवढ्यानें ती टिकाऊ झाली, असें म्हणतां येणार नाहीं. राष्ट्रांतील लोकांना उन्नतीचें खरें ह्रद्गत आणि रहस्य यथास्थित रीतीनें समजलें नसेल, तर तें राष्ट्र अधोगतीस जाण्याचा बराचसा संभव असतो. एखादा मजूरसुद्धां रसायनशास्त्रांतील एखादा प्रयोग ठराविक पद्धतीनें करूं शकेल; म्हणून तेवढ्यावरून तो रसायनशास्त्रज्ञ झाला असें कोणीहि म्हणणार नाहीं. बाष्पयंत्रांत कोळसे मारणारा मजूरहि तें यंत्र चालवूं शकतो, परंतु तेवढ्यानें तो यंत्रशास्त्रज्ञ झाला, असें म्हणतां येत नाहीं. तात्पर्य, प्रत्येक क्रियेचीं मूलतत्वें त्या क्रियेबरोबर पद्धतशीर रीतीनें समजावून घेणें, ही गोष्ट अत्यंत आवश्यक आहे." या उद्गारांवरून स्वामींच्या अंगच्या अधिकाराची चांगली कल्पना करतां येण्यासारखी आहे.

## स्वामींचा सिद्धान्त.

अध्यात्मज्ञान व भौतिक शास्त्रें यांच्या अपूर्व मिलाफानें विसाव्या शतकांतील जगाची उत्क्रान्ति झाली पाहिजे, व तशी झाली तरच ती टिकाऊ होईल, असा स्वामींचा सिद्धान्त आहे; व हा सिद्धान्त त्यांनीं आपल्या व्याख्यानांमध्यें बिनतोड रीतीनें प्रतिपादन केला आहे. पाश्चात्य ज्ञानांत प्रावीण्य संपादन केलेल्या लोकांपुढें वेदान्तज्ञानाची महती स्वामींनीं गाइली, व पौर्वात्य राष्ट्रांमध्यें भौतिक शास्त्रांचें महत्व वर्णन केलें, यांतील रहस्य हेंच होय.

## जपानांत.

जपानी लोकांना उद्देशून स्वामांनीं पुढील आशयाचे उद्गार काढले आहेत. " जो धर्म राम जपानांत घेऊन आला आहे, तो धर्म बुद्धानें कांहीं शतकांपूर्वी इकडे आणलेल्या धर्माहून भिन्न नाहीं. परंतु, आधुनिक कालाला अनुसरून एका विशिष्ट दृष्टीनें त्याची पुनः मांडणी केली पाहिजे. पाश्चात्य भौतिक शास्त्रें आणि तत्त्वज्ञान यांच्या प्रकाशांत त्या धर्माचें दिव्यत्व लोकांच्या प्रत्ययास अधिक स्पष्ट रीतीनें आणलें पाहिजे. या माझ्या धर्माचा मूलभूत सिद्धान्त जर्मन कवि गटे याच्या पुढील शब्दांनीं मांडतां येण्यासारखा आहे. तो म्हणतो--" मनुष्याच्या आत्यन्तिक श्रेयाचें रहस्य, त्याचें अत्यंत श्रेष्ठ कर्तव्य काय आहे तें मी तुम्हांला सांगतों. ' माझ्यापूर्वी या जगाला अस्तित्व

नव्हतें. त्याची उत्पत्ति माझ्यापासून आहे; तो केवळ मी आपल्या कल्पनेनें उत्पन्न केलेला खेळ आहे. सूर्यानें समुद्रांतून निघून आकाशांत उदय पावावें, चंद्रानें प्रतिदिवशीं कलाकलांनीं वृद्धिंगत व्हावें आणि क्षय पावावें, ही माझी करामत होय. ' एकदा हें तत्त्व प्रत्यक्ष अनुभवास आणून घ्या म्हणजे तुम्ही त्या क्षणींच मुक्त आहां. या रहस्याचें एकदा प्रत्यंतर घेऊन बघा म्हणजे तुम्हीं सदोदित यशस्वी व्हाल. या द्वैताचा एकदां रसास्वाद घ्या म्हणजे प्रत्यक्ष अंधारकोठड्याहि जागच्याजागींच दिव्य बनून जातील. "

## हिंदुस्थानांत.

वर निर्दिष्ट केलेला सिद्धान्त हिंदुस्थानांतील लोकांस उद्देशून स्वामींनीं आपल्या एका व्याख्यानांत पुढील शब्दांनीं प्रतिपादन केला आहे; स्वामी म्हणतात:—"प्राचीन ऋषींच्या विसाव्या शतकांतील वंशजांनो ! श्रुतींचें खरें मर्म आपणांस समजावें अशी जर तुमची आकांक्षा असेल तर निरनिराळे जातिभेद आणि पंथभेद यांच्या संकुचित घरकुलांत तुम्हीं जे चेपले जात आहां—कोंबले गेलां आहां त्यांना फोडून बाहेरच्या स्वतंत्र वातावरणांत तुम्हांला आलेंच पाहिजे. आत्मज्ञानाच्या दिव्य प्रदेशांत असल्या बंधनांना बाजूला सारून तुम्हांला आलेंच पाहिजे, एरव्हीं गत्यंतर नाहीं. परंतु, तुम्ही आत्मज्ञान संपादन करून घेणार नाहीं, श्रुतींच्या दिव्य सिद्धान्तांना लाथाडून स्मृतींना चिकटून बसत असलां, गतकालीन अशा हिंवाळ्याच्या दिवसांकरितां बनविलेल्या कपड्यांना प्रत्यक्ष उन्हाळ्याच्या दिवसांतहि चिकटून बसत असलां, आधुनिक कालांत आपल्या पुराण चालरीतीचें अंध अनुकरण करण्याचें व्रत कायम ठेवण्याचा तुमचा निश्चय असला, तर राम तुम्हांला विनंति करून सांगतो कीं, तुम्ही प्राचीन ऋषींचे वंशज आहां ही गोष्ट ध्यानांत ठेवा; व आपल्या सभोंवतालच्या परिस्थितीचें यथार्थ ज्ञान करून घेतल्याशिवाय राहूं नका. ज्या अर्थीं तुम्ही जीवदशेंत आहां त्याअर्थीं दिक्कालादिकांनीं बद्ध आहां. कालदृष्टीनें हिमालयांत वसत असलेल्या पूर्वकालीन ऋषींचे तुह्मी वंशज असाल, परंतु स्थूलदृष्टीनें यूरोप व अमेरिका या खंडांतील भौतिक शास्त्रें आणि कला यामध्यें पारंगत असलेल्या राष्ट्रांशीं तुमचा संबंध जोडला आहे, ही गोष्ट तुम्हांला नाकबूल करतां येणार नाहीं. उपनिषदांमध्यें प्रतिपादन केलेलें दिव्यज्ञान तुह्मीं आपल्या अंगीं जरूर बाणून

घ्या. परंतु, त्याबरोबर जपान आणि अमेरिका या देशांतील लोकांच्या ठिकाणीं मुरलेलें आधिभौतिक शास्त्रांचें आणि कलाकौशल्याचें ज्ञान आपलेंसें करण्यांत कसूर करूं नका; व असें केलेंत तरच तुह्मी सध्यांच्या जीवनकलहांत टिकाव धरूं शकाल. एखादा सागाचा वृक्ष बाल्यावस्थेंत असतां आपल्या बीजाच्या ऐश्वर्यासंबंधानें नसती प्रौढी मिरवूं लागला आणि आपल्या भोंवतालची जमीन, पाणी, हवा, व प्रकाश यांच्यामधील आपल्या वाढीस आवश्यक अशा पोषणद्रव्यांचा उपयोग करून घेईनासा झाला, तर मृत्यूशिवाय दुसरी कोणती गति त्याच्या वांट्यास येणार ? यावरून आपल्या राष्ट्राचें विशिष्टत्व तुम्हीं सोडून द्यावें, त्याचा त्याग करावा, असा रामाच्या प्रतिपादनांतील आशय नाहीं. परंतु तुमची वाढ झालीच पाहिजे, तुमची उन्नति झालीच पाहिजे. भूतकाल आणि वर्तमानकाल यांच्यामधील योग्य, हितावह, व आवश्यक अशा सर्व तत्त्वांचें ग्रहण करून तम्ही आपली उन्नति करून घेतली पाहिजे, अशी रामाची आज्ञा आहे. भौतिक शास्त्रांचा दृढ परिचय करून घ्या, त्यांचें यथास्थित अध्ययन करा व ज्याप्रमाणें पाश्चात्य राष्ट्रें तुमच्या अध्यात्मज्ञानाचा उपयोग करून घेत आहेत त्याप्रमाणें त्यांचीं भौतिक शास्त्रें आपलींशी करून तुम्ही उन्नति करून घ्या.

## एका शब्दांत.

सारांश, आत्मज्ञानाच्या पायावर उभें राहून भौतिक शास्त्रांची वाढ झाली तरच जगाची खरी उन्नति होईल, हा स्वामींचा ठाम सिद्धान्त आहे. सदरहू सिद्धान्तासंबंधानें स्वामींनीं पुढील आशयाचे उद्गार काढले आहेतः—" एखाद्या मनुष्यानें एका शद्वामध्यें आपलें सर्व तत्त्वज्ञान सांगा असें मला म्हटलें तर त्याला मी सांगेन कीं, ' स्वावलंबन ' हाच तो शब्द होय. ' स्वावलंबन ' म्हणजे आत्मज्ञान—अध्यात्मज्ञान. हेंच तें तत्त्वज्ञान होय. जगांतील लोकांनो ! ऐका. आत्मज्ञान संपादन करा. ही गोष्ट अगदीं निश्चित आहे, अक्षरशः खरी आहे कीं, तुम्ही आपली उन्नति स्वतःच करून घेऊं लागलां, आत्मज्ञानाच्या पायावर उभे राहूं लागलां, म्हणजे ईश्वराची मदत तुम्हांला झाल्याशिवाय राहाणार नाहीं. तुम्हांला मदत करणें हें परमेश्वराला भाग आहे. तुम्ही स्वतःच ईश्वर आहां, तुमचा आत्मा हाच अनंत, सर्वशक्तिमान् सच्चिदानंदस्वरूपी आहे,

ही गोष्ट सिद्ध करून देतां येईल. हें तत्त्व तुम्हांला प्रत्यक्ष अनुभवतां येण्यासारखें आहे. तें परमात्मत्व, तुमचें तें सत्स्वरूप तुह्मी स्वतः प्रयत्न करण्याची फक्त वाट पहात आहे. आपल्या स्वतःवर, आपल्या आत्म्यावर अवलंबून राहा; म्हणजे तुम्हांला पाहिजे त्या गोष्टी निःसंशय प्राप्त करून घेतां येतील. तुम्हांला अशक्य असें जगांत कांहींच शिल्लक राहाणार नाहीं."

## ग्रंथप्रकाशनाचे प्रयत्न

आजपर्यंत स्वामींचें वाङ्मय लोकांपुढें मांडण्याचे कांहीं प्रयत्न झालेले आहेत, व त्यांचा निर्देश करणें जरूर आहे. चित्रशाळा छापखान्याचे उत्साही चालक श्रीयुत वासुदेवराव जोशी यांनीं या बाबतींत पहिला प्रयत्न केला. स्वामी अमेरिकेंत होते त्या वेळीं श्रीयुत जोशी हेहि अमेरिकेंत होते; व त्या ठिकाणीं असतानां स्वामींचीं तीन व्याख्यानें त्यांनीं इंग्रजींत प्रसिद्ध केलीं. परंतु त्यानंतर या बाबतींत त्यांनीं पुढें प्रयत्न केलेला नाहीं. त्यानंतरचा दुसरा प्रयत्न ह्मणजे मद्रास येथील 'गणेश आणि मंडळी'चा होय. इंग्रजी मासिकांतून प्रसिद्ध झालेले स्वामींचे कांहीं लेख स्वामी ब्रह्मलीन झाल्यावर ह्या मंडळानें प्रसिद्ध केले. या बाबतींतील तिसरा आणि महत्वाचा, मोठ्या प्रमाणावरील आस्थेवाईक प्रयत्न म्हटला म्हणजे स्वामींचे पट्टशिष्य श्रीमान् नारायणस्वामी यांचा होय. स्वामी ब्रह्मलीन झाल्यानंतर त्यांच्या पुस्तकांच्या सर्व पेट्या नारायणस्वामींनीं तपासून पाहिल्या. त्यांत स्वामींचे बरेच लेख ( कांहीं पुरे कांहीं अपुरे, कांहीं इंग्रजी कांहीं ऊर्दू, व क्वचित् हिंदी ) कविता, अमेरिकेंतील व्याख्यानांचीं शिष्यांनीं घेतलेलीं टांचणें वगैरे बरीच ग्रंथसंपत्ति त्यांना मिळाली. ही ग्रंथसंपत्ति लाला पुरणसिंह यांच्या सहाय्यानें नारायणस्वामी यांनीं प्रकाशित करण्याची योजना करून तिचें सात भागांत वर्गीकरण केलें, व ती छापण्याचें काम स्वामींचे एक भक्त लाला अमीरचंद ह्यांनीं मोठ्या हौसेनें स्वीकारलें आहे. आजपर्यंत सुमारें पांचशें पृष्ठांचा एक असे तीन खण्ड त्यांनीं प्रकाशित केले असून चौथा खण्ड लवकरच प्रसिद्ध होईल. या चारी खंडांत किंवा पुस्तकांत मिळून स्वामींनीं अमेरिकेंत दिलेलीं व्याख्यानें, इंग्रजी मासिकांतून त्याचे वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले लेख, अमेरिकेंत असतांना झालेले संवाद, इंग्रजींत लिहिलेल्या कविता वगैरे स्वामींचा इंग्रजी भाषे-

तील ग्रंथसंग्रह प्रसिद्ध झालेला आहे. परंतु या व्यतिरिक्त ऊर्दू भाषेंतहि स्वामींचें महत्वाचें बरेंच वाङ्मय आहे. आपले गुरु पूज्यपाद भगत धन्नाराम यांना स्वामींनीं लिहिलेलीं सुमारें अकराशें पत्रें ऊर्दू भाषेंतच आहेत. शिवाय अनेक महत्वाचे लेखहि आहेत. हेंहि वाङ्मय इंग्रजी भाषेच्या किंवा देशी भाषांच्या द्वारें लोकांपुढें येणें अत्यंत जरूर आहे. व त्या दिशेनें श्रीमान् नारायण स्वामी यांचा विचार व प्रयत्नहि आहे. याशिवाय, इंग्रजी, मराठी, गुजराती, हिंदी व ऊर्दू या भाषांत स्वामींचें वाङ्मय आणण्याचे कांहीं किरकोळ प्रयत्न झालेले आहेत. येथील ' मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें ' सन १९१० मध्यें स्वामींचीं कांहीं व्याख्यानें मराठीमध्यें ग्रंथरूपानें प्रसिद्ध करून रामवाङ्मयाचा महाराष्ट्रवाचकांस प्रथम परिचय करून दिला. परंतु प्रमाणशुद्ध आणि विस्तृत अशा पायावरील प्रयत्न म्हणजे श्रीमान् नारायणस्वामी यांचाच होय.

## आमचें धोरण.

स्वामींचे समग्र ग्रंथ मराठींत आणण्याची जी योजना आम्हीं प्रसिद्ध केली आहे, तीमध्यें श्रीमान् नारायण स्वामी यांनीं संपादित केलेल्या चार खण्डांच्या भाषांतराचा मुख्यतः अंतर्भाव होतो. परंतु स्वामींच्या ज्या इतर वाङ्मयाचा आम्हीं वर उल्लेख केला आहे, तेंहि क्रमाक्रमानें मराठींत आणण्याचा आमचा मनोदय आहे. हें सर्व वाङ्मय मराठीमध्यें आलें असतां मराठी भाषेंतील अध्यात्मविषयक वाङ्मयांत अत्यंत महत्वाची भर पडणार आहे. ही गोष्ट मनांत आणून स्वामींच्या समग्र-ग्रंथांच्या प्रकाशनाची योजना करण्यांत आलेली आहे. हा आमचा उद्दिष्ट हेतु श्रीमान् नारायण स्वामी यांस कळवितांच त्यांनीं अत्यंत उदार अंतःकरणानें मराठींत भाषांतर करण्याची आम्हांस नुकती परवानगी दिली इतकेंच नव्हे तर सदरहू कार्य जरूर करण्याविषयीं आशिर्वादपूर्वक प्रोत्साहन दिलें; हे नारायण स्वामी यांचे ह्या कार्यावर परम उपकार आहेत. त्यांची सहानुभूति व प्रत्यक्ष मदत यांच्या अभावीं ह्या कार्यास इतक्या लवकर आरंभ होणें शक्य नव्हतें. स्वामींचे गुरु पूज्यपाद धन्नाभगतजी यांचीहि सदरहू कार्यावर पूर्ण कृपादृष्टि असून ह्या कार्याला त्यांनीं अंतःकरणपूर्वक आशीर्वाद दिला आहे. या व अशा सर्व प्रकारच्या मदतीमुळें आमचा उत्साह

द्विगुणित झाला असून हातीं घेततेलें कार्य यशस्वी होईल, असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे.

स्वामींच्या ग्रंथांचीं आम्हीं जीं भाषांतरें देत आहों तीं श्रीमान् नारा- स्वामी यांनीं संपादित केलेल्या ग्रंथांच्या आधारें देत आहों, हें वर सांगितलेंच आहे. सदरहू ग्रंथांसंबंधानें लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, या ग्रंथांपैकीं फारच थोडे लेख स्वामींच्या देखत प्रसिद्ध झाले होते. हे थोडे लेख म्हणजे श्री. जोशी यांनीं अमेरिकेंत प्रसिद्ध केलेलीं स्वामींचीं तीन व्याख्यानें, व मासिकांतून प्रसिद्ध झालेले त्यांचे लेख हेच होत. बाकीचे बहुतेक सर्व लेख त्यांच्या पेटींत सांपडलेल्या व्याख्यानांच्या कच्च्या टांचणांवरून प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांवरून स्वामींची लेखणी फिरलेली नाहीं. यामुळें पद्धतशीर आणि सुसंगत विवेचनाच्या दृष्टीनें त्यांमध्यें बऱ्याच उणीवा आहेत. त्या टांचणांवरून एकवार स्वामींची लेखणी फिरली असती—आणि तसा स्वामींचा हेतुहि होता—तर सध्यां आहे त्याहून या सर्व वाङ्मयाचें स्वरूप निराळें झालें असतें. त्यांतील बराच खडबडीतपणा निघून गेला असता, वर्ण्य विषयांची मांडणी अधिक सुव्यवस्थित आणि पद्धतशीर झाली असती; स्वामींच्या भाषाविशेषाची चमक अधिक स्पष्ट रीतीनें दिसूं शकली असती. व कांहीं ठिकाणीं दिसून येणारा द्विरुक्तीचा दोषहि नाहींसा झाला असता. परंतु स्वामींच्या अल्पायुषतेमुळें तसें होऊं शकलें नाहीं, ही एका दृष्टीनें दुर्दैवाची गोष्ट आहे. परंतु दुसऱ्या एका दृष्टीनें विचार केला असतां त्यामुळें स्वामींच्या उद्गारांतील सहजावस्था कदाचित् भंग पावली असती असें वाटतें. एकंदरींत ईश्वरी योजनाच तशी असावी असेंच म्हणावें लागतें. स्वामींनीं आपल्या स्वतःच्या ग्रंथांच्या सुव्यवस्थित रचनेसंबंधानें, तसेंच एकंदर कार्यासंबंधानें जे उद्गार काढले आहेत तेहि या बाबतींत लक्ष्यांत ठेवण्यासारखे आहेत. 'आपलें कार्य पूर्ण झालें नाहीं,' अशा तऱ्हेचे उद्गार त्यांच्याजवळ त्यांच्या एका शिष्यानें एकदा काढले असतां स्वामी म्हणाले, "मीं आरंभिलेलें कार्य परिपूर्ण झालें नाहीं, असें कदाचित् दिसेल; परंतु मी गेल्यानंतर तें केव्हां तरी पूर्ण झाल्याशिवाय निःसंशय राहणार नाहीं. माझ्या मनामध्यें ज्या कल्पना भरून राहिलेल्या आहेत व ज्यांच्या धोरणानें माझा जीवितक्रम नियमित झाला, त्या पुढें मार्गें योग्य काल आला असतां जगांत पसरतील, यांत

मला बिलकूल शंका वाटत नाहीं. व मी ईश्वरभावनेंत जितका अधिक मुरून जाईन व अंगीकृत कार्यासंबंधाचे सर्व उद्दिष्ट हेतु, इच्छा व ध्येय यांना रजा देऊन निजानंदांत जितका अधिक निमग्न होऊन राहीन तितकें तें कार्य झपाट्यानें सिद्ध होईल, अशी माझी श्रद्धा आहे." स्वामींच्या प्रत्येक कल्पनेंत, प्रत्येक लेखांत, प्रत्येक वाक्यांत किंबहुना प्रत्येक शब्दांत त्यांचें अंतःकरण प्रतिबिंबित झालेलें आहे. स्वामींचे उद्गार हे त्यांच्या परमात्म-भावनेंतील आनंदवृत्तीचे प्रतिध्वनि होत. मनुष्य हा प्रति ईश्वर आहे, 'नराचा नारायण' होण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य आहे, ह्या दिव्य सिद्धान्ताचा ठसा त्यांच्या अक्षराअक्षरांत उमटलेला आहे. अशी स्थिति असल्यामुळें स्वामींचे ग्रंथ जसेच्या तसेच लोकांपुढें मांडण्याचा नारायण स्वामी यांनीं निश्चय केला व तसें करण्यांत त्यांनीं फार दूरदर्शीपणा केला, असेंच म्हणावें लागतें. श्रीमान् नारायण स्वामी यांनीं सदरहू वाङ्मयांत आवश्यक तो फेरफार केला असता तर त्यांत कदाचित् अधिक सुसंगतपणा आणि चित्तवेधकता आली असती; परंतु, त्याबरोबर त्यांतील स्वाभाविकपणाहि नाहींसा झाला असता; तो तसा नाहींसा होऊं न देतां त्यांनीं विषयानुरोधानें स्वामींच्या लेखांचे व व्याख्यानांचे सात विभाग केले आहेत व तेंच धोरण कायम ठेवण्याचा आमचा विचार आहे. परंतु मराठी भाषांतराचे सर्व भाग सारखे आल्हादकारक व्हावे, या हेतूनें त्यांनीं केलेल्या भागांचा किंवा भागातील व्याख्यानांचा अनुक्रम मात्र मराठींत तसाच ठेविलेला नाहीं. 'वेदान्तगिरिवरून अवलोकन' या मथळ्याखालील मूळ ग्रंथाच्या सहाव्या भागांतील आठ व्याख्यानें ह्या भागांत आलेलीं आहेत. इंग्रजी-मधील सदरहू भागांतील व्याख्यानें ओळीनें न देतां प्रत्येक भागांत कांहीं सोपे, कांहीं अवघड असे सरमिसळीनें विषय यावे, या धोरणानें त्यांची निवड करण्यांत आली आहे. व हेंच धोरण पुढेंहि कायम ठेवण्याचा विचार आहे. प्रत्येक भागांत शंभर सव्वाशें पानें व्याख्यानांकरितां राखून ठेवून बाकीच्या पंचवीस तीस पानांत आरण्यक संवाद, सुखसंवाद, कविता, पत्रें वगैरे स्फुट विषय देण्याचें योजिलें आहे.

## भिन्न भिन्न सूचना

स्वामींचीं पुष्कळ व्याख्यानें अमेरिकेंत झालीं व त्यांतहि बहुतेक गोल्डन-

ग्रेट हॉल, अकॅडेमि आफ सायन्सिस व हर्मोटिक ब्रदरहुड या ठिकाणींच झालेलीं आहेत. या ठिकाणांपैकीं एकेका ठिकाणीं झालेलीं सर्व व्याख्यानें निवडून काढून कालानुक्रमानें त्यांचें वर्गीकरण करावें व त्या अनुक्रमानें तीं एकत्र छापावीं; तसेंच हिंदुस्थानांतील व्याख्यानांचा एक स्वतंत्र भाग करावा, अशी कांहीं मित्रांनीं सूचना केली होती. अशाच तऱ्हेच्या दुसऱ्या दोन तीन सूचनाहि आलेल्या होत्या. कांहींचें म्हणणें असें कीं, एकेका ठिकाणचीं व्याख्यानें अनुक्रमानें छापण्याऐवजीं कालानुक्रमानें सर्व ग्रंथांची आगाऊ रचना करून मग त्या अनुक्रमानें व्याख्यानें व लेख प्रसिद्ध करावे. दुसऱ्या कित्येकांनीं असें सुचविलें कीं, स्थलानुक्रम किंवा कालानुक्रम यांच्यापेक्षां विषयानुक्रमानें धोरण स्वीकारणें, हेंच सर्वांत उत्तम. कांहींचें तर असेंहि मत पडलें कीं, निरनिराळ्या विषयांवर निरनिराळ्या स्थळीं व निरनिराळ्या वेळीं स्वामींचीं जीं व्याख्यानें व जे लेख प्रसिद्ध झाले असतील, त्यांचा निष्कर्ष काढून तो प्रसिद्ध करावा, व असें केल्यानें स्वामींच्या ग्रंथांतील अनेक ठिकाणचा द्विरुक्तीचा अनवश्यक भाग गाळला जाईल. या सर्व सूचना त्या त्या दृष्टीनें चांगल्या आहेत; त्या आम्हांला मान्यहि आहेत, व या सर्व सूचना करणारांचे आम्हीं अंतःकरणपूर्वक आभार मानतों. कारण, स्वामी रामतीर्थ यांच्या ग्रंथांसंबंधानें लोकांमध्यें आस्था व कळकळ वाढत चालली असल्याचें तें निदर्शक आहे, व ही खरोखर अभिनंदनीय गोष्ट होय. परंतु या सर्व सूचनांचा विचार करतां श्रीमान् नारायण स्वामी यांनीं आपल्या ग्रंथांत विषयानुरोधानें जें वर्गीकरण केलेलें आहे तें कायम ठेवणें आम्हांला इष्ट वाटतें. व त्याच धोरणाचा अवलंब करण्याचा आमचा विचार आहे. दुसरी एक गोष्ट अशी कीं, श्रीमान् नारायण स्वामी यांचा चवथा खण्ड अद्याप प्रसिद्ध व्हावयाचा आहे. सबब त्यांनी स्वीकारलेल्या वर्गीकरणाहून भिन्न तऱ्हेचें कोणतेंहि धोरण स्वीकारणें कितपत इष्ट आहे, याचाहि बरोबर अंदाज अगोदर करतां येण्यासारखा नव्हता. वरील सूचनांपैकीं एक सूचना अशी कीं, स्वामींच्या सर्व ग्रंथांचा गोषवारा प्रसिद्ध करावा आणि तोहि कां ? तर केवळ द्विरुक्तीचा अनवश्यक भाग गाळण्याच्या हेतूनें ! पण ही कल्पना आमच्या समजुतीनें बरोबर नाहीं. कोणत्याहि ग्रंथकाराच्या ग्रंथांमध्यें कांहीं ठिकाणीं द्विरुक्ती असणें, स्वाभाविक आहे. त्यांत स्वामींच्या ग्रंथांपैकीं बहुतेक भाग व्याख्यान-

रूपाचाच असल्यामुळें व तीं व्याख्यानेंहि निरनिराळ्या ठिकाणीं झालेलीं असल्यामुळें त्यांच्यामध्यें द्विरुक्ति असणें, अपरिहार्यच आहे. परंतु ही द्विरुक्ति कंटाळवाणी, नीरस किंवा निरुपयोगी आहे, असें म्हणतां येत नाहीं. पुष्कळ वेळां स्थिति अशी असते कीं, वर्तमानपत्रांतून एखाद्या विषयावर एका आठवड्यांत कांहीं स्फुटें यावीं, व पुढील आठवड्यांत त्याच विषयावर विस्तृत अग्रलेख यावा, अशाच मासल्याची स्वामींच्या व्याख्यानांतील द्विरुक्ति आहे. व आम्हांला तर ती कंटाळवाणी वाटत नसून उलट वर्ण्यविषय विशद करणारी आहे, असेंच वाटतें. कारण, ज्या विषयाचें एखाद्या व्याख्यानांत स्वामींनीं नुसतें दिग्दर्शन केलेलें असतें, त्याचें पुढील एका किंवा अनेक व्याख्यानांतून अधिक स्पष्टीकरण केलेलें त्यांच्या ग्रंथांत आढळून येतें. शिवाय एकच विषय निरनिराळ्या प्रसंगानें व अनुरोधानें निरनिराळ्या दृष्टीनें मांडण्यांत आलेला असल्यामुळें ही द्विरुक्ति उपकारकच झाली आहे, असें वाचकांसहि वाटेल, अशी आमची खात्री आहे. या सर्व गोष्टींचा विचार करून श्रीमान् नारायण स्वामी यांचें धोरण आम्हीं कायम ठेवलें आहे. त्यांतल्या त्यांत विषयाची शक्य तितकी संगति राखून कांहीं सोपे व कांहीं कठीण असे विषय प्रत्येक भागांत यावे, व अशा रीतीनें सर्व भाग सारखेच चित्ताकर्षक व्हावे, अशी शक्य तितकी योजना करण्यांत आली आहे.

स्वामींचीं अमेरिकेंतील व्याख्यानें ख्रिस्ती समाजाच्या पुढें झालेलीं असल्यामुळें त्यांतील बरेच दृष्टान्त ख्रिस्ती धर्मग्रंथांतील व तिकडील वाङ्मयांतील आहेत. सदरहू दाखले मराठी भाषांतरांतून अजिबात गाळून टाकावे, अशीहि एक सूचना कांहीं मित्रांनीं केली होती. परंतु मराठींतील वेदान्तविषयक वाङ्मयामध्यें असले नवीन दृष्टांत व दाखले यांची भर पडून त्या वाङ्मयाला एक प्रकारची बहुविधता येणार असल्यामुळें सदरहू दाखले भाषांतरांत कायम ठेवण्याचें आम्हीं ठरविलें असून जरूर त्या ठिकाणीं स्पष्टीकरणासाठीं टीपा दिलेल्या आहेत.

## भाषांतराचें धोरण.

सारांश, भाषांतरामध्यें होतां होईतों इंग्रजी व्याख्यानांचें मूल स्वरूप जसेंच्या तसें कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु यावरून भाषांतर

शब्दशः केलें आहे, असा अर्थ नाहीं. तसें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं. मूळांत कांहीं ठिकाणीं वाक्यें अपुरींच आहेत, कांहीं ठिकाणीं शब्द सुटले आहेत, तर कित्येक ठिकाणीं छापतांना चुकीचे शब्द पडले आहेत. अशा ठिकाणीं श्रीमान् नारायणस्वामी यांच्या सल्लयानें योग्य त्या सुधारणा केल्या आहेत. व्याख्यानांतून ज्या जागीं फारच द्विरुक्ति झाली असें वाटलें त्या जागीं भाषांतरांत क्वचित् संक्षेप केला आहे. एकंदरींत व्याख्यानांचें मर्म सुटूं न देतां मूळाचें हुबेहुब कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

भाषांतरांत होतां होईतों परकी शब्द येऊं द्यावयाचा नाहीं, असा प्रयत्न आहे. कोणत्याही भाषेंत परकी शब्द मुळींच असतां कामा नयेत, असा हट्ट चालणें जरी शक्य नसलें तरी कोणत्याहि भाषेंत परकी शब्दांचें प्रमाण एका विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे जाऊं न देणें, हें भाषेची शुद्धि व अभिवृद्धि अशा दोन्ही दृष्टींनीं श्रेयस्कर आहे; विशेषेंकरून वेदान्तासारख्या आर्यांच्या खास विषयांत तरी त्यांचा उपयोग करणें इष्ट नाहीं. म्हणून मराठींत अगदीं रूढ झालेले तिकीट, कॉलेज वगैरे सारखे जे शब्द त्यांनाहि मराठी प्रतिशब्द योजले आहेत. तसेंच महत्वाचे सर्व शास्त्रीय पारिभाषिक शब्द श्रीयुत निळकंठ बाबाजी रानडे यांच्या ' विसाव्या शतकांतील इंग्रजी मराठी कोशां'तून घेतले आहेत. पारिभाषिक शब्दयोजनेच्या कामीं आम्हांला या कोशाची अत्यंत मदत झाली. अशा तऱ्हेचा अपूर्व कोश तयार करण्याचें काम श्री. रानडे यांनीं स्वार्थत्यागपूर्वक हिंमतीनें चालविलें आहे, हे त्यांचे महाराष्ट्रावर व मराठी भाषेवर मोठे उपकार आहेत. या भागांतील सर्व पारिभाषिक शब्दांची यादी दुसरीकडे दिली आहे, ती आधीं वाचून नंतर वाचकांनीं व्याख्यानांकडे वळावें, अशी विनंती आहे.

भाषांतरांत कांहीं ठिकाणीं वर्ण्यविषयावर प्रकाश पाडणारे संस्कृत व मराठी ग्रंथांतील समानार्थक उतारे टीपांतून दिले आहेत.

या भागांत आलेल्या कविता आमचे कविमित्र ' वसंत–विहार ' यांनीं करून दिल्या आहेत. स्वामींच्या कवितांचें भाषांतर करणें जवळ जवळ अशक्यच आहे. परंतु होतां होई तों सर्व भाव मराठींत उतरविण्याचा आमच्या मित्रांनीं प्रयत्न केला आहे. कवितारूपानें या ग्रंथांच्या प्रकाशनास ते जी अंतःकरणपूर्वक कळकळीची मदत करीत आहेत, त्याबद्दल आम्हीं

त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. याशिवाय हरएक बाबतींत ज्या ज्या मित्रांनीं या कार्यास कळकळीनें मदत केली, त्या सर्वांचेहि आम्हीं अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

---

## विषयप्रवेश

या भागांत प्रसिद्ध झालेल्या व्याख्यानांतील महत्वाच्या मुद्यासंबंधानें दोन प्रास्ताविक शद्ब लिहून व्याख्यानांशीं वाचकांचा अल्प परिचय करून देणें इष्ट आहे. परंतु, तसें करण्यापूर्वीं स्वामींच्या सर्व ग्रंथांना सामान्य अशा एक दोन बाबींचा उल्लेख करणें जरूर आहे.

## राम व मी

स्वामींचे ग्रंथ वाचतांना लक्ष्यांत ठेवण्यासारखी एक गोष्ट अशी आहे कीं, ते आपल्यासंबंधानें बोलतांना किंवा लिहितांना 'मी' असा प्रथमपुरुषी शद्बप्रयोग न करतां 'राम' असा तृतीयपुरुषी शद्बप्रयोग बहुतेक ठिकाणीं करतांना दिसतात. असें करण्यांत स्वामींचा हेतु काय असावा, असा प्रश्न ओघानेंच उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, 'मी' हा शद्ब संकुचित अर्थाचा, अहंभावअभिमानवृत्तिचा द्योतक आहे. 'मी' हा शद्ब उच्चारल्याबरोबर 'हा आपला साडेतीन हातांचा देह' अशी भावना सर्वांच्या मनांत तावडतोब उभी राहाते. अविद्येमुळें ही देहात्मबुद्धि सर्वांना इतकी चिकटून गेली आहे कीं, ती कांहीं केल्या सुटत नाहीं. आतां, आपणा सर्वांच्या हाडींमासीं खिळून गेलेली ही कल्पना आत्मसाक्षात्कारामुळें ज्यांची सर्वथा बदलून गेली आणि आत्म्याचें अकर्तृत्व ज्यांच्या प्रत्ययास आलें, 'सर्वं खल्विदं ब्रह्म' ही श्रुतिप्रतिपाद्य भावना—हा ब्रह्मानुभव ज्यांच्या वृत्तींत दृढाभ्यासानें पूर्णपणें बाणून गेला; सारांश, 'मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें । सबाह्य अभ्यंतरी अवघें रामरूप कोंदलें ॥' असल्या व्यापक आणि उच्च अनुभवपदावर जे आरूढ झाले त्या स्वामी रामतीर्थांनीं देहात्मबुद्धीबरोबर तिचा दर्शक जो 'मी' त्याला रजा द्यावी, आणि 'सर्व वासुदेव' ही अत्युच्च भावना जागृत करणारा जो 'राम' त्याचाच नेहमीं निर्देश करावा, यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु याबरोबर हेंहि विसरतां कामा नये कीं, शद्बांत खरें

महत्व नाहीं, भावनेंत आहे. व स्वामींचाहि 'मी'पणा—देहात्मभाव—अहं-कर्तृत्वबुद्धि जरी पूर्णपणें नाहींशी झाली होती तरी 'मी' शब्द कधींच वापरावयाचा नाहीं, असा कांहीं त्यांनीं पण केला होता, असा अर्थ नाहीं. स्वामींनीं कांहीं ठिकाणीं 'मी' शब्द वापरला आहे, परंतु त्या ठिकाणींहि त्यांचा अभिप्रेत अर्थ लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. एकदां अमेरिकेंत असतांना त्यांना एका मनुष्यानें प्रश्न केला कीं, 'स्वामी ! ईश्वर आहे, अशी आपली खरोखर श्रद्धा आहे का ?' सदरहू प्रश्नावर 'मी ईश्वरच आहें' असें उत्तर देऊन त्याचा खुलासा त्यांनीं असा केला कीं, 'ज्याला आपण सामान्यतः 'मी' असें मानतों तें म्हणज देह, मन, बुद्धि, अहंकार यांपैकीं कोणीहि आपण खास नव्हे; देहमनबुद्ध्यादिक सर्व मृगजलवत् मिथ्या असून फक्त ईश्वरच कायतो आहे व तेंच माझें खरें स्वरूप होय, व तेंच तुमचें खरें स्वरूप होय, व अशा रीतीनें रामच सर्वत्र व्यापून राहि-लेला आहे.' अशा सर्वात्मभावानें स्वामी 'मी' शब्द वापरतात. ह्या भागांतील 'जगाचा प्रारंभकाल कोणता ?' या व्याख्यानांतहि सदर मुद्यासंबधानें थोडेंसें स्पष्टीकरण करण्यांत आलेलें आहे. (पान ७२ पहा.). तसेंच 'मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे' या व्याख्यानाच्या शेवटच्या कविता (पान ५५ पहा) वाचल्या असतां या मुद्यावर बराच प्रकाश पडेल. तात्पर्य 'मी' अजीबात काढून टाकणें किंवा तो सर्वव्यापी करणें, या दोहोंचा अर्थ एकच आहे. संकुचित देहात्मभाव नाहींसा होऊन सर्वात्मभाव होणें, हीच कायती मुख्य मुद्याची बाब आहे. व अशा दृष्टीनें 'राम' व 'मी' या दोन्ही शब्दांत स्वामींची भावना एकच आहे. परंतु 'मी' हा शब्द रूढार्थानें देहात्मबुद्धीचा दर्शक मानला गेलेला असल्यामुळें स्वामी बहुतकरून 'राम' शब्दाचा प्रयोग करतांना आढळतात.

## राम बादशहा

दुसरी गोष्ट अशी कीं, स्वामी हे आपल्याला 'राम बादशहा' असेंहि म्हणत असत एका ठिकाणीं स्वामी लिहितातः—"मी राम बादशहा आहें व तुमचीं सर्वांचीं अंतःकरणें हें माझें सिंहासन होय. वेदांच्या रूपानें पूर्वीं मीं जगाला ज्ञान दिलें; कुरुक्षेत्र, जेरुसलेम, मक्का या ठिकाणीं मीं धर्मोपदेश केला; पण माझें हृद्गत लोकांना बरोबर समजलें नाहीं.

यासाठीं मी पुनः उपदेश करीत आहें. ' तत्त्वमसि ' हें माझ्या उपदेशाचें रहस्य होय. तेंच तुमचें वास्तविक स्वरूप आहे. जें जें कांहीं दिसतें तें तें सर्व तुम्हीच अहां. जगांतील कोणतीहि शक्ति या तत्त्वाला प्रतिबंध करूं शकत नाहीं. कोणतेहि राजे, असुर किंवा देव यांना या तत्त्वाचा प्रतिकार करतां येणें शक्य नाहीं. घाबरून जाऊं नका. माझें शिर तें तुमचें शिर आहे. तें पाहिजे तर कापून टाका, त्यांतून हजारों नवीं शिरें उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहींत. " जगात एकंदर सत्ताधीशांचे सात वर्ग केलेले आहेत. पण या सर्वांपेक्षां ब्रह्मानंद अनुभवणारा जीवन्मुक्त वरच्या कोटीचा होय, असें वर्णन केलेलें दिसून येतें; ( पान १४ वरील टीप पहा. ) व या दृष्टीनें विचार केला असतां स्वामी आपणांस ' राम बादशहा ' असें कां म्हणतात, याची बरोबर उपपत्ति लागते.

## वेदान्त

तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे वेदान्तासंबंधाची. वेदान्त हा स्वामींचा अत्यंत आवडता शब्द असून स्वामींच्या ग्रंथांतून सदरहू शब्दाचा वारंवार उपयोग केलेला दिसून येतो. व याचा अर्थहि फार व्यापक आहे. वेदान्त हा शब्द एखादा विशिष्ट धर्म, पंथ, किंवा तत्वज्ञानाची एखादी शाखा, अशा अर्थानें स्वामी वापरीत नाहींत. स्वामींचा वेदान्त असल्या संकुचित दृष्टीचा नाहीं. तसेंच या वेदान्ताचें रहस्य समजावून घेण्यासाठीं आपल्याला तात्विक व गूढ अशा तर्कवितर्कांच्या भानगडींत शिरण्याचें प्रयोजन नाहीं; ' मतामतांच्या गलबल्यांत ' किंवा शब्दजालाच्या गहनारण्यांत घोंटाळण्याची बिलकूल जरूर नाहीं.

स्वामींचा वेदान्त हा निसर्गदेवतेच्या रमणीय चेहऱ्यांत ओतप्रोत भरलेला आहे. उषःकालाच्या कोमल प्रकाशांत, गुलाबाच्या मुग्धकलिकेंत, दंवबिंदूंच्या मौक्तिकवृष्टींत, पक्ष्यांच्या मंजुल लकेऱ्यांत, पावसाच्या सरींत तसेंच चराचरांतील यच्चयावत् जीवसृष्टींत स्वामींचा वेदान्त व्यापून राहिला आहे व त्याचें दर्शन ते आपणांस करून देतात. विश्वांतील रम्य, उदात्त आणि चमत्कृतिजनक देखाव्यांत त्यांना जगांतील सर्व धर्म दिसतात. प्रभातकालच्या विकसित कुसुमांमध्यें त्यांना बायबल दिसतें; सायंकालच्या आकाशमंडलांत चमकणाऱ्या ताऱ्यांत स्वामींना वेदांचा प्रकाश दिसतो; व

भूतमात्रांच्या नानाविध चरितविलासांत त्यांनां कुराण दृग्गोचर होतें. मानवी हृदयकमलाच्या पाकळया हीं स्वामींच्या वेदान्तग्रंथाचीं पृष्ठें असून तीं वाचून त्यांचें हृद्गत ते आपल्याला शिकवतात. उन्नतीकडे जाणारें प्रत्येक राष्ट्र किंवा जाति वेदान्त कृतींत उतरवीत असल्याचें व अधोगतीस जाणारें प्रत्येक राष्ट्र वेदान्तापासून च्युत झाल्याचें त्यांना दिसून येतें. जगांतील प्रत्येक वीरपुरुष, साधु, कवी, चित्रकार यांच्या नेत्रांमध्यें वेदान्ताचें तेज चमकत असलेलें स्वामींना दिसून येतें. एखादा समाधानी आणि आनंदवृत्तीचा मनुष्य त्यांच्या नजरेस पडला असतां ' हा वेदान्ती चेहरा आहे ' असें ते म्हणत. एखाद्या विजयी योद्धयाला पाहतांच ' हा वेदान्ताचा पुतळा आहे ' अशा आशयाचे उद्गार त्यांच्या तोंडून निघत. जपानी लोकांचा एकंदर जीवितक्रम अवलोकन केल्यानंतर ' हे लोक प्रवृत्तिपर वेदान्ताचे अनुयायी आहेत ' असें स्वामींनीं बोलून दाखविलें. आल्पससारख्या प्रचंड पर्वतावरील बिकट जागीं चढून जाण्याचें अमेरिकेंतील कांहीं लोकांनीं धाडस केलें व कांहींनीं नायगाराच्या धबधब्यांतून पोहून जाण्याची छाती केली; अशी बातमी ऐकून ' वेदान्ताचें रहस्य अंगांत भुरल्याचा हा परिणाम होय ' अशा तऱ्हेचे उद्गार त्यांच्या मुखांतून निघाले. शास्त्रीय शोधांची प्रगति व्हावी, अशा उदात्त हेतूनें कांहीं इसम जिवंतपणीं आपल्या शरीरांवर शस्त्रप्रयोग करून घेण्याला मोठ्या उदारपणें कबूल झाल्याची बातमी वाचून स्वामी म्हणाले ' प्रवृत्तिपर वेदान्ताचें हें साक्षात् उदाहरण आहे ! ' असल्या सर्व प्रसंगांचें वर्णन करीत असतां त्यांचा चेहरा तेजस्वी दिसूं लागे, व डोळे पाण्यानें भरून येत. अशा वेळीं त्यांचे उद्गार निघत कीं, ' सत्याची–धर्माची खरी सेवा ह्मणतात ती हीच ! ' अलीकडे जगांत लोकसत्ताक राज्यपद्धति व समत्ववाद यांच्या संबंधानें चळवळ सुरू झालेली आहे ' व ही चळवळ म्हणजे वेदान्ताचा विजय होय ' असें त्यांचें म्हणणें असे.

स्वामींचा असा ठाम सिद्धान्त आहे कीं, वेदान्त म्हणजे नुसता बौद्धिक वाद नव्हे, तर वेदान्त म्हणजे विश्वव्यापी प्रेम–ईश्वरी प्रेम. असलें दिव्य प्रेम अंगीं बाणणें, ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. त्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा यज्ञ करावा लागतो, आपलें शरीर व मन यांच्या सर्व क्रिया अनिर्वचनीय प्रेमस्वरूपी ईश्वराप्रीत्यर्थ अर्पण कराव्या लागतात, व असें झालें

म्हणजेच वेदान्ताचें रहस्य मनुष्याला समजूं लागलें असें म्हणतां येईल. वेदान्ताचा तात्त्विक अनुवाद करणें किंवा बुद्धीला वेदान्तविषय समजणें, बुद्धीची नुसती खात्री पटणें एवढ्यानेंच केवळ रामाचा वेदान्त समजला, असें म्हणतां येणार नाहीं. विश्वव्यापी प्रेम ही या वेदान्ताची खूण आहे, व बुद्धीच्या उत्कट भावनेशिवाय आणि दृढ अभ्यासाशिवाय असल्या प्रेमाची अंतःकरणांत ज्योति पेटणें अशक्य आहे. सर्व जडाचा निरास होऊन तद्व्यतिरिक्त जें आत्मस्वरूप त्याचा मनुष्याला साक्षात्कार झाला व चित्त चिन्मय होऊं लागलें, सर्व वस्तूंमध्यें आत्मा व आत्म्यामध्यें सर्व वस्तु असा प्रत्यक्ष अनुभव आला म्हणजेच ' आत्मवत्सर्वभूतेषु ' अशा सर्वव्यापी प्रेमाचा मनुष्याच्या अंतःकरणांत उदय होतो, परशान्ति हृदयांत नांदूं लागते, व जिकडे तिकडे ईश्वरस्वरूपाशिवाय दुसरें कांहीं दिसेनासें होतें. मग सर्व वादविवाद विराम पावतात, झाडून सर्व दुःखें विलयास जातात, भीति, शंका, दौर्बल्य यांचा मागमूसहि उरत नाहीं, व सर्व वासनांचा पूर्णपणें क्षय होतो. आपणच सर्वत्र व्यापून राहिलों आहों, सर्व चराचर हें आपलें शरीर आहे, चराचर ही आपली केवळ कल्पना आहे, त्या सर्वांचे आपण साक्षी आहों, अशा अनुभवामुळें आनंदाच्या पराकोटीप्रत मनुष्य जाऊन पोंहोंचतो. हाच स्वामींचा वेदान्त व स्वतः स्वामी हे या वेदान्ताची साक्षात् प्रतिमा होत. त्यांच्या सर्व उद्गारांत प्रेम, विश्वव्यापी प्रेम भरून राहिलेलें आहे--त्यांचें प्रत्येक वाक्य जणूं प्रेमाच्या मुशींतून ओतल्यासारखें भासतें. यच्चयावत् स्त्रीपुरुषांमधील अविनाशी व अचल असें जें सत्स्वरूप त्याची सर्वांनां जाणीव व्हावी. अशा उदात्त हेतूनें प्रेरित झाल्यामुळें त्यांच्या शब्दांत अद्भुत प्रेम भरलेलें आहे. व्याख्यानाच्या आरंभीं श्रोतृसमुदायाला संबोधून ' सभ्य स्त्रीपुरुषहो ! ' असे शब्द वापरण्याचा वक्त्यांचा नेहमींचा परिपाठ असतो. पण स्वामी असल्या सामान्य शब्दांचा उपयोग न करतां ' स्त्रीपुरुषरूपानें नटणाऱ्या परमेश्वरा ' या किंवा अशाच तऱ्हेच्या शब्दांचा विषयानुरोधानें प्रयोग करतात. खाजगी पत्रांतून सुद्धां ' प्रेममया ईश्वरा ' असल्या भिन्नभिन्न शब्दांनीं प्रत्येक मनुष्याला उद्देशून लिहिण्याचा स्वामींचा नेहमीं नियम असे. या व दुसऱ्या शेंकडों उदाहरणांवरून स्वामींच्या अंगीं विश्वव्यापी प्रेम कसें ओतप्रोत भरून राहिलें होतें, याची साक्ष पटते व या

प्रेमामुळें स्वामी जिकडे जिकडे जात तिकडे तिकडे सर्वांची अंतःकरणें तें आपल्याकडे आकर्षण करून घेत असत.

## व्याख्यानांचा गोषवारा

पहिलें व्याख्यान 'वेदान्त' या विषयावर आहे. त्यांत आत्म्याचें स्वरूप तत्त्वतः नित्य, शुद्ध, बुद्ध, 'एकमेवाद्वितीयम्' असतां त्यावर भेद कसे दिसतात –मूळसत्तत्त्व एक असून जगांत नानाविधता–अनेकत्व कसें दृग्गोचर होतें, या मुद्याचें आरंभीं वेदान्तदृष्ट्या स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे. वेदान्त प्रतिपादन करतो कीं, आपण वास्तविक ईश्वरच आहों व या परमार्थ-स्वरूपाचें आपल्याला विस्मरण झालें आहे इतकेंच काय तें. ज्याप्रमाणें एखाद्या राजानें स्वप्नांत भिक्षा मागूं लागावें त्याप्रमाणें ही भ्रमाची स्थिति- स्वप्नस्थिति अविद्येमुळें उत्पन्न झालेली आहे किंवा झाल्यासारखी भासते, अशी तत्त्वदृष्ट्या वास्तविक स्थिति आहे. परंतु तें कांहींहि असलें तरी आपल्या परमात्म-स्वरूपांत खरोखर कांहीं विकार-बदल झाला आहे असें नाहीं. एखाद्या मनुष्याला स्वप्नांत वाघानें खाल्ल्याचा भास झाला तर त्याचा तो भ्रम नाहींसा करण्याला त्याला जागृत करणें हाच उपाय होय. या न्यायानें आत्मसाक्षात्कार झाल्यानें आपल्या बुद्धीवर अज्ञानानें उत्पन्न झालेलें देहात्मबुद्धीचें आवरण नाहींसें होईल व आपण बद्ध कधींच नव्हतों, नेहमीं मुक्तच आहों, असा आपल्याला प्रत्यय येईल. यापुढें यहुदी लोकांतील ईश्वरविषयक कल्पनेचें रहस्य 'जसे जीव तसे देव' या तत्त्वानें स्वामींनीं मोठ्या मार्मिकपणानें समजावून दिलें आहे. तसेंच 'मी ईश्वर' हा वेदान्तप्रतिपाद्य अद्वैतसिद्धान्त इतर सर्व द्वैतकल्पनांपेक्षां कसा श्रेष्ठ आहे, याचें विवेचन करून शेवटीं आत्मसाक्षात्कार करून घेऊन आपलें अध्यात्मिक ऐश्वर्य आविष्कृत करण्याबद्दल स्वामींनीं उपदेश केला आहे.

'मृत्यूनंतरची स्थिति' या व्याख्यानांत जीवांच्या मृत्यूनंतर होणाऱ्या स्थितीसंबंधानें निरनिराळ्या धर्मांच्या कल्पना सांगून त्या वेदान्तदृष्ट्या किती संकुचित आणि अपूर्ण आहेत, याचें विवरण करण्यांत आलें आहे. जगांतील हिंदुधर्माव्यतिरिक्त इतर धर्मांचे अनुयायी जीझस, महंमद, झोरोॲस्टर अशा आपापल्या एकेकट्या धर्मप्रवर्तकाला पूज्य मानतात, व 'आमच्या धर्मप्रवर्तकावर जे लोक विश्वास ठेवतील तेवढेच तरतील–

उत्तम स्थितीप्रत पोहोंचतील, व बाकीचे सर्व अधोगतीला जातील,' अशा संकुचित तत्त्वाचें प्रतिपादन करतात. परंतु वेदान्त धर्म असल्या संकुचित पायावर उभारला गेलेला नाहीं. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' 'यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति। तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्॥' असल्या व्यापक तत्वांचें प्रतिपादन करून वेदान्त सर्व धर्मांचा मेळ घालून देतो, असें विवेचन करण्यांत आलें आहे. यानंतर मृत्यूनंतरच्या स्थितीकडे वळून इतर धर्मांच्या कल्पना वेदान्त दृष्टीनें कशा अपुऱ्या आहेत, हें स्वामींनीं प्रतिपादन केलें आहे. मृत्यूनंतर जीवांना मिळणारी स्वर्गाची किंवा नरकाची स्थिति शाश्वत असते, असें इतर धर्मांचें म्हणणें आहे. पण ही कल्पना सर्वथैव चुकीची आहे. कारण, ती सृष्टि-नियमांविरुद्ध आहे. या विश्वाचें रहाटगाडगें चक्रनेमिक्रमानें अव्याहत फिरत असतां आणि स्थित्यंतराचा नियम अबाधित व सर्वत्र व्यापक असा असतां मृत्यूनंतरची स्थिति तेवढी अनंतकाल—शाश्वत टिकणारी आहे, हें म्हणणें सृष्टिनियमाला विरोधी अतएव चुकीचें आहे. शिवाय ही कल्पना ईश्वरी-न्यायाशींहि असंबद्ध आहे. इहलोकींच्या अगणित पुण्याईबद्दल अनंतकाल स्वर्गसुख मिळतें, व घोर पातकाबद्दल शाश्वत नरकांत पडावें लागतें, असें प्रतिपादन करणें खास अन्यायाचें आहे. हिंदुधर्मांतहि स्वर्गाची कल्पना आहे, पण 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' अशीच त्या स्वर्गाचीहि वास्तविक स्थिति आहे. इतर धर्मानुयायांचे वरच्यासारखे गैरसमज होण्याचें कारण हें कीं, पुनर्जन्माचा सिद्धान्त त्यांना मान्य नाहीं; मृत्यूनंतरच्या स्थितीची यथास्थित कल्पना नाहीं; व मोक्षासंबंधानें वेदान्तानें प्रतिपादन केलेलें स्वरूप त्यांच्या गांवींहि नाहीं. पुनर्जन्माची कल्पना त्यांना माहित नसल्यामुळें मृत्यूनंतरची स्थिति शाश्वत असली पाहिजे, ही ईश्वरी न्यायाशीं असंबद्ध असलेली कल्पना मानल्यावांचून त्यांना गत्यंतर नव्हतें. परंतु वेदान्त प्रतिपादन करतो कीं, प्रत्येक जन्मापाठीमागून मृत्यु व मृत्यूनंतर फिरून जन्म, अशा रीतीनें हें जीवांचें संचारचक्र सारखें भ्रमण करीत राहणार. या परंपरेंतून सुटण्याला एकच उपाय आहे व तो म्हटला म्हणजे स्वरूपानुभव करून घेऊन निर्वासन होणें विश्वव्यापी त्रिगुणात्मक मायेच्या अतीत होणें हाच होय. आतां मृत्यूनंतरच्या स्थितीसंबंधानें वेदान्ताचें म्हणणें असें आहे कीं, आपली हल्लींची स्थिति ही जर जागृत स्थिति असें मानलें

( कारण, स्वरूपानुभव हीच खरी जाग्रति ) तर मृत्यूची स्थिति ही सुषुप्त्यवस्था आहे, असें म्हटलें पाहिजे. मृत्यु आणि पुनर्जन्म यांच्या दरम्यानचा काल हा दीर्घ निद्रेचा काल होय. व दर चोवीस तासांत कांहीं तास झोंप घेऊन ज्याप्रमाणें आपण पुनः जागे होतों, त्याप्रमाणें मृत्यूनंतरच्या दीर्घ निद्रेचा अनुभव घेऊन जीव फिरून नवीन देह धारण करतो. आपल्याला निद्रा आली म्हणजे ज्याप्रमाणें स्वप्नें पडतात त्याप्रमाणें मृत्यूनंतरच्या दीर्घ निद्रेच्या स्थितींतहि स्वप्नें पडतात. हीं स्वप्नें म्हणजेच स्वर्गनरकादि कल्पना होत. जागृतींत केलेल्या कल्पना ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें उद्भूत होतात त्याचप्रमाणें जिवंतपणीं मनुष्यानें केलेल्या स्वर्गनरकादि कल्पना ' श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छूद्धः स एव सः । ' या न्यायानें त्याला मृत्यूनंतरच्या स्थितींत दिसाव्या, हें स्वाभाविक होय. आतां ही स्थिति अनंतकाल टिकणारी आहे, अशी इतर धर्मानुयायांची कल्पना आहे, ही गोष्ट खरी. व कांहीं दिवसांपूर्वीं टिटानिक बोटीच्या अपघातांत मरण पावलेले विलायतेंतील प्रसिद्ध पं, स्टेड यांचा अनुभव म्हणून जो वृत्तांत अलीकडे प्रसिद्ध झाला आहे, त्यांत ' माझी सांप्रतची स्थिति नित्य असून अत्यंत सुखाची आहे, ' असा आपला अनुभव त्यांनीं अमेरिकेंत रिचमंड नामक बाईच्या मुखानें सांगितला आहे. परंतु वेदान्त म्हणतो कीं, ही मरणोत्तरकालीन स्थिति त्या कालाच्या दृष्टीनें–स्वप्नदृष्टीनें चिरकाल टिकणारी वाटते. पण खऱ्या जागृतीच्या-मुक्तावस्थेच्या दृष्टीनें ती स्थिति क्षणभंगुर आणि मृगजलवत् आहे.

' मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे ' या व्याख्यानांत प्रारब्धाचा सिद्धान्त आधुनिक कालांतील विचारपद्धतीचें स्वामींनीं बिनतोड रीतीनें सिद्ध केला आहे. तसेंच पुनर्जन्माच्या सिद्धांताचें सोपपतिक विवेचन करण्यांत आलें असून मनुष्यांची भिन्न भिन्न परिस्थिति कां व कशी निर्माण होते, हें सांगून मनुष्यांच्या मूळ स्वरूपाशीं त्याचा मेळ घालून दाखविण्यांत आला आहे. आपण तत्त्वतः ईश्वरस्वरूपी आहों, परंतु विषयसुख भोगण्याच्या आपल्या वासनांमुळें आपल्याला जन्ममरणपरंपरेंत पडावें लागतें. आपल्या जन्माला सुद्धां कारण आपले आपणच आहों. इच्छा करण्याला आपण स्वतंत्र असून ' जशा इच्छा तशीं फळें ' आपल्याला

भोगावीं लागतात. आतां आपण दुःखी कां ? असा प्रश्न उत्पन्न होतो व याचें उत्तर आपल्या परस्परविरोधि इच्छा हेंच होय. व उत्क्रान्तीच्या तत्त्वाप्रमाणें जें श्रेष्ठतम असेल त्याचा अखेरीस जय व्हावयाचा, असा नियम आहे. आपण ज्या ज्या वासना करूं त्यांचीं त्यांचीं कर्मतत्वानुसार आपल्याला फळें आज ना उद्यां भोगावीं लागतात व यावरूनहि आपलें ईश्वरत्व स्थापित होतें. कारण, इच्छा म्हणजे प्रेम व परमेश्वर हाहि प्रेमस्वरूपी आहे. व आपलें तत्त्वतः तेंच स्वरूप असल्यामुळें आपल्या सर्व इच्छा या जन्मीं नाहीं तर जन्मांतरीं फलद्रूप झाल्याच पाहिजेत. आतां आपल्या सर्व कामना तृप्त व्हाव्या व आपण पूर्ण सुखी व्हावें, अशी आपली इच्छा असेल तर आपल्या इच्छांमधील मायेचा अंश कमी करावयास आपण शिकलें पाहिजे, असा शेवटीं स्वामीजींनीं उपदेश केला आहे.

'मी केवळ प्रकाशरूप आहें' या व्याख्यानांत जाग्रति, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थांची तुलना करण्यांत आली असून आत्मा परमात्मा हा आपल्या अवस्थात्रयाचा साक्षी कसा आहे, याचें स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे. जाग्रति, स्वप्न व सुषुप्ति या अवस्था भिन्नभिन्न असून त्यांमधील आपला अनुभवहि भिन्नभिन्न आहे. आपला 'मी' या तिन्ही अवस्थांमध्यें बदलत असतो, असा आपला अनुभव आहे. अर्थात् आपलें वास्तविक स्वरूप अवस्थात्रयामध्यें बदलणाऱ्या स्वरूपाहून भिन्न असलें पाहिजे. आपल्या गाढनिद्रेच्या स्थितीवरून आपल्या आत्मस्वरूपाची कल्पना करण्याला आपल्याला पुष्कळ जागा आहे. झोंपेंमध्यें आपला मीपणा शून्यत्वाशीं–अज्ञानतमाशीं तादात्म्य पावतो, पण जागें झाल्यावर 'सुखमहमस्वाप्सम् । नाहं किंचिदवेदिषम् ॥' म्हणजे 'मी सुखानें निजलों होतों व त्या वेळीं काय झालें, याचें मला कांहींच ज्ञान नाहीं,' असें आपण म्हणतों. हा जो आपला अनुभव म्हणून आपण सांगतों तें पूर्वानुभवाचें फक्त स्मरण होय व स्मरण हें पूर्वानुभवाशिवाय असूं शकत नाहीं, असा नियम आहे. आतां, मला कांहीं ज्ञान झालें नाहीं, असा आपला झोंपेंतील अनुभव आपण सांगतों, पण त्या वेळीं ज्याला मी म्हणून मानतों तो तर निद्रेंत होता–शून्यत्वाशीं तद्रूप झाला होता. मग 'मला गाढ झोंप लागली होती व कांहींच ज्ञान नव्हतें' हें ज्ञान–अज्ञानाचें ज्ञान तरी आपल्याला

होतें कसें ? हा प्रश्न आहे. व याचें उत्तर हेंच कीं, आपण निजलों असलों तरी त्या वेळींहि जें जागृत असतें, साक्षी असतें, असें कांहीं तत्व असलें पाहिजे व तेंच आपलें वास्तविक स्वरूप-आत्मस्वरूप होय. सारांश, आपला आत्मा अवस्थात्रयाचा साक्षी आहे व असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. एरवीं आपल्या अवस्थांत्रयांतील अनुभवाचा मेळ पडत नाहीं. ही गोष्ट सिद्ध करून चराचराची मायेपासून उत्पत्ति कशी होते, याचें विवरण करण्यांत आलें आहे व्याख्यानाच्या अखेरीस एकटें फिरावयास जाण्याच्या संवयीपासून किती फायदा आहे, हें स्वामींनीं सांगितलें आहे.

'जगाचा प्रारंभकाल कोणता ?' या व्याख्यानांत स्वामींनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, आत्म्याचें—परमात्म्याचें ज्ञान हें अतद्रिय असून तें इंद्रियांनीं करून घेण्याचा प्रयत्न करणें म्हणजे आंधळ्यांनीं एखाद्या वस्तूचा रंग ओळखण्यासारखें हास्यास्पद आहे. दुसरी, महत्वाची गोष्ट अशी कीं, ब्रह्मज्ञानाच्या बाबतींत केवळ अंधश्रद्धा—नुसतें 'बाबावाक्यं प्रमाणम्' अंतःकरणाच्या समाधानाला फारसें उपयोगी पडत नाहीं. स्वानुभव—स्वप्रत्यय हीच सत्याची खरी आणि टिकाऊ कसोटी होय. सारांश, ईश्वरी साक्षात्कार करून घेण्याचा आपण स्वतः प्रयत्न केला पाहिजे ही गोष्ट सिद्ध करून आत्मानुभव कसा होतो, या मुद्याचें स्पष्टीकरण स्वामींनीं फार मार्मिकपणानें केलें आहे. ज्ञान—मग तें व्यावहारिक असो किंवा परमार्थिक असो—नेहमीं सहवासजन्य असतें. एखाद्या मुलाला आपल्या स्वतःच्या नांवापासून हरएक बाबतींत जें ज्ञान होतें तें घरांतील वडील माणसांच्या सहवासानें होतें. त्याचप्रमाणें ब्रम्हज्ञानहि ज्या सद्गुरुयांच्या अंगीं तें बाणलें गेलें असेल अशांच्या समागमानें होऊं शकतें. श्रीसमर्थहि असेंच म्हणतात कीं, "असो, जयासी मोक्ष व्हावा, तेणें सद्गुरू सेवावा। सद्गुरूवांचूनि मोक्ष पावावा, हे कल्पांतीं न घडे ॥" आतां सद्गुरू कसा असावा, हे मात्र ज्याचें त्यानें पारखून पाहिलें पाहिजे. आत्मज्ञान करून देणारा गुरु मुण्डकोपनिषदांत सांगितल्याप्रमाणें श्रोत्रिय आणि ब्रम्हानिष्ठ, अर्थात् 'शब्दज्ञानें पारंगत, ब्रम्हानंदें सदा डुल्लत' असाच असला पाहिजे. परंतु पुष्कळ वेळां याच्या अगदीं विपरीत स्थिति घडत असल्याचें निदर्शनास येतें. खरे खोटे कांहीं तरी चमत्कार करून आपलें प्रपंचाचें दुकान चालविणाऱ्यांचे भोळ्या लोकांकडून देव्हारे माजविले

जात असलेले समाजांत दिसून येतात. पण चमत्कार करून दाखविणें, हें कांहीं ब्रह्मज्ञानाचें लक्षण खास नव्हे; तसें असतें तर गारोडी हे मोठे ज्ञानी म्हणून मानले गेले असते. तुकारामानें तर या बाबतींत स्पष्ट असा शेरा मारून ठेवला आहे कीं, "भूतभविष्य कळों यावें वर्तमान । हें तो भाग्यहीन त्यांची जोडी ॥...जगरूढीसाठीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धि ॥ ४ ॥ "

'आत्मकेंद्रांत स्थिर व्हा' या व्याख्यानांत आरंभीं चित्तशुद्धिसंबंधाचा विचार आलेला असून स्वरूपाचें अखंड अनुसंधान राखण्याविषयीं उपदेश करण्यांत आला आहे. ॐ किंवा सोऽहम् या मंत्राचा जप, तसेंच ईश्वरस्वरूपाचें यथार्थ रहस्य समजून केलेलें नामस्मरण हें चित्तशुद्धीला आणि क्रमाक्रमानें आत्मसाक्षात्काराला कारणीभूत होतें व स्वरूपाचें अनुसंधान ठेवीत गेल्यानें ज्ञान अंगीं बाणतें. मुक्त झालेल्या मनुष्याची स्थिति कशी असते, याचेंहि वर्णन शेवटीं करण्यांत आलें आहे.

'सोऽहम्' या व्याख्यानांत या मंत्राच्या जपासंबंधानें विवेचन करण्यांत आलेलें आहे. तसेंच आधिभौतिक व अध्यात्मिक व्याधींविषयीं विशेष स्पष्टीकरण करण्यांत आलें असून आपल्या वासना हेंच आपल्या सर्व दुःखाचें मूळ आहे, हा सिद्धांत विशद करण्यांत आला आहे. शेवटीं आत्मज्ञान ही समत्वाची स्थिति आहे व ती प्राप्त झाली म्हणजे सर्व क्रियमाणाचा नाश होतो व प्रारब्ध हें प्रत्यक्ष भोगानें संपतें, ही गोष्ट सांगण्यांत आली आहे. सारांश, कर्मत्रयाचा नाश झाल्याशिवाय मुक्ति नाहीं, आत्मज्ञानानें तर क्रियमाणाचा लोप होऊन अकर्तृत्व प्रत्ययास येतें, व ज्ञानानलानें संचित दग्ध होतें—सर्व वासनांचा पूर्ण क्षय होतो. पण प्रारब्ध मात्र भोगल्यावांचून ज्ञान्यालासुद्धां सुटका नाहीं. गीतेंत भगवंतांनीं असें म्हटलें आहे कीं, "सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । " आतां हें ज्ञान्याचें प्रारब्ध जगताच्या कल्याणाला उपयोगी पडतें, ही गोष्ट मात्र विसरतां कामा नये.

'मूर्च्छानाशास्त्र आणि वेदान्त' या व्याख्यानांत स्थूल, सूक्ष्म व कारण या शरीरांचा संबंध कसा आहे, व कारणशरीराचें महत्व काय,

ऱ्याचें वर्णन करण्यांत आलें आहे. आपल्याला हें जें जग दिसतें तें ज्ञान-दृष्टीनें वास्तविक खरें नसून आपल्या बुद्धीवरील अज्ञानावरणाचा-एक प्रकारच्या मूर्च्छेनेचा तो परिणाम आहे. व आत्मज्ञान म्हणजे बुद्धीवरील विपरीत संस्कार काढून टाकून परमार्थ संस्कार उत्पन्न करणें होय. व अशी स्थिति एकदा प्राप्त करून घेतली म्हणजे जगाच्या कार्यकारणपरंपरेच्या पलीकडे आपण जाऊन पोहोंचूं, असें प्रतिपादन करण्यांत आलें आहे.

'आरण्यक संवादांतील 'वैवाहिक स्थितीचें ध्येय' या मथळ्याखालीं आलेला मजकूर वाचनीय आहे. त्यांत विवाहित स्त्रीपुरुषांनीं आपली अध्यात्मिक उन्नति कशी करून घ्यावी, या मुद्यासंबंधानें स्वामींनीं मार्मिक विवेचन केलें आहे.

---

## वेदान्त आणि भौतिक शास्त्रें—तुलना.

वेदान्त हें सर्वशास्त्रांचें शास्त्र असून पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, वगैरे सर्व भौतिक शास्त्रें हीं सर्व संकुचित आहेत; त्यांचे विषय अत्यंत मर्यादित आहेत. वेदान्तशास्त्र हा सूर्य असून आपल्या ह्या सूर्याभोंवतीं ज्याप्रमाणें निरनिराळे ग्रह फिरत आहेत, त्याचप्रमाणें बाकीचीं सर्व शास्त्रें वेदान्ताभोंवतीं निरनिराळ्या ग्रहांप्रमाणें फिरत आहेत. उदाहरणार्थ, भूगर्भशास्त्र हें पृथ्वीच्या पोटांतील खनिज द्रव्यासंबंधानें विवेचन करतें. वनस्पतिशास्त्र हें वनस्पतींचा व त्यांतील गुणधर्मांचा विचार करणारें शास्त्र आहे. खगोलज्योतिषशास्त्र हें भूलोकापासून आणि मनुष्यसृष्टीपासून अत्यंत दूर असलेल्या आकाशस्थ ज्योतींसंबंधानें, आणि त्यांच्या भ्रमणगतींसंबंधानें प्रतिपादन करतें. शरीररचनाशास्त्र हें मनुष्याच्या स्थूल शरीराचें आणि त्यांतील निरनिराळ्या अवयवांचें वर्णन करतें. मानसशास्त्र हें मनाच्या निरनिराळ्या व्यापारांसंबंधानें नियम शोधून काढतें. अर्थशास्त्र, इतिहासशास्त्र, ह्यांसारखीं शास्त्रें मनुष्य, आणि मनुष्यांचे संघ जीं राष्ट्रें त्यांच्यामधील निरनिराळ्या विषयांच्या हालचालीचें निरीक्षण करतें; गणितासारखीं शास्त्रें हीं व्यवहाराला आधारभूत असलेल्या विषयांचे नियम ठरवितात. यावरून ही गोष्ट दिसून येईल कीं, या सर्व निरनिराळ्या शास्त्रांचें अध्ययन केल्यानंतर बाकीच्या शास्त्रांचें अध्ययन करण्याची आवश्यकता शिल्लक राहातेच. परंतु वेदान्तशास्त्र हें अत्यन्त

व्यापकशास्त्र आहे. तें सर्व चराचराचा, तसेंच आकाशांतील अनंत ज्योतींचा तत्त्वदृष्टीनें—स्थूल दृष्टीनें नव्हे—विचार करणारें शास्त्र आहे; व तें ' जें जाणलें असतां मनुष्य सर्वज्ञ होतो ' अशा ब्रह्माचें म्हणजे व्यापक तत्त्वाचें प्रतिपादन करणारें शास्त्र आहे. बाकीचीं सर्व शास्त्रें हीं बौद्धिक उन्नति करणारीं असून भौतिक सुखें वाढविण्याकडे त्यांचा कल आहे. परंतु वेदान्तशास्त्र हें अतींद्रियज्ञानाचें, बुद्धीच्या पलीकडचें, परंतु बुद्धिग्राह्य असें शास्त्र आहे. तसेंच, मनुष्याला ज्ञानाचें आत्यन्तिक सुख देणें, चित्त निर्विषय व शांत करणें, ऐहिक क्षुद्र विषयांपासून परावृत्त करून मनुष्याला ऐहिक व पारमार्थिक सुखाचा मार्ग दाखविणें हें या शास्त्राचें ध्येय आहे. ' आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुष: । किमिच्छन् कस्य कामाय शरीरमनुसञ्ज्वरेत् ' ; ' तरति शोकमात्मवित् ' ; ' विज्ञानं ब्रह्म चेद्वेद तस्माचेन्न प्रमाद्यति । शरीरं पाप्मनो हित्वा सर्वान् कामान्समश्नुते ' ; म्हणजे ' आत्मज्ञानसंपन्न मनुष्य विषयसुखापासून परावृत्त होतो, ' 'आत्मवेत्ता शोकसागर तरून जातो; ' ' ब्रह्मवेत्ता पुरुष विषयांपासून मिळणारीं सर्व तऱ्हेचीं सुखें एकसमयावच्छेदेंकरून अनुभवितो; ' वगैरे अनेक श्रुतिस्मृतिप्रतिपादित वचनें असून त्यांमध्यें आत्मज्ञानी मनुष्याच्या आत्यन्तिक सुखस्थितीचें वर्णन करण्यांत आलें आहे. मनुष्य जोंपर्यंत द्वैतांत अडकून गेला आहे तोंपर्यंत त्याच्या मागची शोकमोहादिकांची परंपरा टळणें शक्य नाहीं. अद्वैतज्ञान हें आत्यन्तिक सुखाचें स्थान असून तें प्राप्त झालें असतां सर्व वैषयिक सुखें मृगजलाप्रमाणें होतात; भीति, शोक, वगैरे विकारांचें आत्मज्ञानानें निर्मूलन होऊन मनुष्य जन्ममृत्युपरंपरेपासून सुटतो; इतकेंच नव्हे तर शरीरांत असतांहि जीवन्मुक्त होतो; व ज्ञानाची पराकाष्ठा जी परा शांति तीप्रत जाऊन पोहोंचतो. भौतिक शास्त्रें हीं सर्व द्वैतशास्त्रें आहेत, व मनुष्याचें बौद्धिक सामर्थ्य वाढविण्याला त्यांचा बराच उपयोग आहे, ही गोष्ट जरी नाकबूल करतां येत नाहीं तरी जगांतील शोकमोहांच्या पलीकडे मनुष्यास नेऊन पोहोंचविण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें नाहीं, हें निर्विवाद आहे; व अशी स्थिति असल्यामुळें ' तावद्गर्जन्ति शास्त्राणि जम्बुका विपिने यथा । न गर्जति महाशक्तिर्यावद्वेदान्तकेसरी ॥ ' अशा शब्दांनीं वेदान्ताची जी एवढी महती वर्णन करण्यांत

आली आहे, ती यथार्थ आणि समर्पक आहे, ही गोष्ट कोणासहि विचारांतीं पटल्याशिवाय राहणार नाहीं.

भौतिक शास्त्रांच्या योगानें मनुष्याला जीवितक्रमामध्यें जी सुखें मिळतात त्यांच्यायोगानें मनुष्य परावलंबी बनत जातो. सुख हें बाहेरून उत्पन्न होतें, अशी त्याची कल्पना झाल्यामुळें बाह्य जड वस्तूंवर अवलंबून राहण्याची त्याला संवय लागत जाते. भौतिक सुखें हीं खरीं आहेत असें मानलें तरी तीं नश्वर आणि क्षणभंगुर आहेत. तीं सर्व आद्यंतवन्त आहेत; परंतु, आत्मज्ञानानें प्राप्त होणारें सुख शाश्वत आणि टिकाऊ असें असून तें स्वावलंबी आहे. अर्थात्, भौतिक शास्त्रांचा फाजील वडेजाव आणि भौतिक सुखासंबंधाची आसक्ति मनुष्याच्या आत्यन्तिक सुखाला विघातक असल्यामुळें त्यांच्यावर अवलंबून राहणें श्रेयस्कर नाहीं; ही गोष्ट स्वामींनीं आपल्या व्याख्यानांतून पुनः पुनः ठसविली आहे. भौतिक शास्त्रांची प्रगति तत्त्वतः सदोष किंवा अपकारक नाहीं, परंतु त्यांपासून मिळणाऱ्या सुखासंबंधानें मनुष्यानें आसक्त होऊन अध्यात्मसुखापासून पराङ्मुख होऊं नये; ऐहिक सुखें म्हणजे सर्वस्व अशी भावना होऊं देतां कामा नये, हा स्वामींच्या प्रतिपादनांतील आशय आहे. वेदान्ताच्या—अध्यात्मज्ञानाच्या पायावर उभें राहून भौतिक शास्त्रांची वाढ झाली व तीहि केवळ जगाच्या खऱ्या कल्याणासाठीं व सात्त्विक सुखें वृद्धिंगत करण्यासाठीं झाली तर त्यांत दूषणीय असें कांहीं नाहीं, असें स्वामींचें म्हणणें आहे.

## भौतिक शास्त्रांचें स्थान.

मनुष्यानें आपल्या नित्य सुखासाठीं वेदान्तज्ञान अंगीं बाणून घेतलें पाहिजे, ह्या सिद्धान्ताच्या विवेचनाबरोबर भौतिक शास्त्रांचें योग्य तें स्थान स्वामींनीं निश्चित केलेलें आहे; परंतु भौतिक शास्त्रांचें फाजील महत्व आणि वडेजाव मात्र त्यांना मान्य नव्हता. एके ठिकाणीं स्वामी म्हणतातः— " आधिभौतिक उन्नतीनें फुगून गेलेल्या लोकांनो ! दुधखुळे बनलेल्या लोकांनो ! तुमचीं सर्व भौतिक शास्त्रें आणि कला यांना त्यांचें योग्य तें स्थान देण्याला आमची हरकत नाहीं. परंतु, मेहेरबानी करून त्यांचें वाजवीपेक्षां जास्त स्तोम माजवूं नका ! " हिंदुस्थानांत पौर्वात्य आणि पाश्चात्य

शास्त्रांचा योग्य मिलाफ करून उच्च दर्जाचें शिक्षण देण्यासाठीं 'चैतन्य मठ' या नांवाची एक संस्था स्थापन करावी, अशी स्वामींची इच्छा होती; सदरहू संस्थेंत शिक्षण कोणत्या घोरणावर दिलें जावें, यासंबंधाची योजना 'हिंदुस्थानांतील सांप्रतच्या गरजा' या मथळ्याखालीं अमेरिकेंतून लिहिलेल्या एका पत्रामध्यें त्यांनीं दिग्दर्शनरूपानें मांडली आहे. या संस्थेमध्यें जगांतील सर्व घर्म व सर्व तऱ्हेचें तत्त्वज्ञान यांच्या तुलनात्मक अध्ययनाला अग्रस्थान देण्यांत आलें असून त्याबरोबर, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, विद्युच्छास्त्र, भूगर्भशास्त्र, रसायनशास्त्र, खगोलज्योतिषशास्त्र, वगैरे आधिभौतिक शास्त्रांच्या अध्ययनाला योग्य तें स्थान दिलें गेलें आहे; ही गोष्ट लक्ष्यांत घेतली असतां आधुनिक भौतिक शास्त्रांना बाजूला सारण्याचा किंवा त्याचें महत्व कमी करण्याचा स्वामींचा विचार नव्हता, हें प्रत्येकाला कबूल करावें लागेल. हिंदुस्थानांतील विसाव्या शतकांतील उत्क्रान्तीला भौतिक शास्त्रांच्या अभ्यासाची आवश्यकता आहे, हें तत्त्व त्यांनीं अनेक ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे. तसेंच आधुनिक शास्त्रांबरोबर निरनिराळ्या कला आणि हुन्नर यांचेंहि शिक्षण देण्याची व्यवस्था सदरहू संस्थेंत करण्यांत यावी, अशी त्यांची योजना आहे. इतकेंच नव्हे तर सर्व आस्तिकवादी घर्मग्रंथांबरोबर आधुनिक कालांतील नास्तिकवादी तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचें समतोलबुद्धीनें आणि तत्त्वान्वेषणाच्या दृष्टीनें अध्ययन करण्यांत यावें, असें त्यांचें म्हणणें आहे. या संस्थेचें ध्येय 'सत्य, संपूर्ण सत्य, केवळ सत्य व विश्वव्यापी प्रेम ह्या उच्च तत्वांचा सर्वत्र प्रसार करणें हें असावें,' हा मुद्दा स्वामींनीं आपल्या पत्रांत स्पष्टपणें मांडला आहे. यावरून वर्तमानकालांतील लोकांच्या गरजा काय आहेत व त्यांच्या सुधारणेकरितां कोणत्या दिशेनें प्रयत्न केले पाहिजेत, यासंबंधानें स्वामींची दृष्टि किती व्यापक होती हेंहि कळून येतें.

भौतिक शास्त्रासंबंधानें विचार करीत असतां एक महत्त्वाचें तत्त्व लक्ष्यांत ठेवणें जरूर आहे. तें हें कीं, जगांतील यच्चयावत् गति, मग ती सजीव सृष्टींतील असो कीं निर्जीव सृष्टींतील असो, मनुष्यांचे शारीरिक व्यापार असोत, किंवा मानसिक व्यापार असोत; आकाशांतील अनंत ज्योतींची भ्रमणगति असो, किंवा एखाद्या क्षुद्र जंतूची किंवा कीटकाची

हालचाल असो; आब्रम्हस्तम्बपर्यंत चाललेले झाडून सारे व्यापार हे स्थिती-करितां आहेत. स्थिति हें ध्येय व स्थितींतून च्युत होणें किंवा स्थितीकडे परत माघारें फिरणें ही सर्व गति होय. हें सर्व चराचर, किंबहुना ज्याला आपण अनंत कोटिब्रम्हाण्ड म्हणतों तें स्थितीपासून च्युत होणें आहे, असें म्हटलें तरी चालेल. हें स्पष्टीकरण करण्याचें कारण असें कीं, वेदान्तशास्त्रापेक्षां सर्व भौतिक शास्त्रें हीं कमी दर्जाचीं आहेत, अपूर्ण आहेत, हा जो सिद्धान्त स्वामींनीं प्रतिपादन केला आहे, त्यांतील रहस्य लक्ष्यांत यावें. वेदान्त हें स्थितिशास्त्र असून तद्व्यतिरिक्त बाकीचीं शास्त्रें गतिशास्त्रें होत. व सर्व प्रकारची गति ही स्थितीकरितां असल्यामुळें व वेदान्त हें स्थितिशास्त्र असल्यामुळें बाकीचीं शास्त्रें वेदान्ताकडे जाणारीं, अर्थात् त्यापेक्षां निःसंशय कमी दर्जाचीं आहेत. भौतिकशास्त्रें हीं इंद्रियजन्य ऐहिक सुखें उत्पन्न करणारीं शास्त्रें आहेत; व तीं अजून शास्त्रज्ञांच्या दृष्टीनेंसुद्धां पूर्णावस्थेस पोंहोंचलेलीं नाहींत, व तीं कधीं पूर्णावस्थेस पोहोंचतील किंवा नाहीं, याबद्दल वानवाच आहे. आतां, तीं पूर्णावस्थेस पोहों-चणार असें म्हटलें तर त्याचा अर्थ त्यांचें सध्यांचें गतिस्वरूप जाऊन त्यांनीं स्थितिस्वरूपाप्रत अर्थात् वेदान्ताप्रत पोहोंचणें हा होय. भौतिक शास्त्रें हीं ऐहिक सुखें वाढविण्याचा प्रयत्न करतात; परंतु तीं सुखें नश्वर आहेत, त्यांपासून नित्य सुखाची प्राप्ति होणें शक्य नाहीं, असा भौतिक शास्त्रज्ञांना अनुभव येत चालला, व विषयसुखाबद्दल त्यांना वैराग्य उत्पन्न होऊं लागलें म्हणजे भौतिक शास्त्रांचें कार्य आटोपलें. त्यानंतर आत्यन्तिक सुख कशापासून उत्पन्न होईल, या गोष्टीचा शोध करण्याकडे त्यांचें चित्त वेधूं लागेल, व त्या वेळीं वेदान्ताचें खरें महत्व त्यांच्या लक्ष्यांत येईल. एकोणिसाव्या शतकांत सुद्धां स्पेन्सनरसारख्या तत्त्वज्ञान्यांना हा अनुभव आला. भौतिक शास्त्रांच्या अभ्यासानें जगाच्या बुडाशीं कोणतें सत्तत्त्व आहे तें शोधून काढण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता व त्यांत त्यांना अखेरीस हात टेंकावे लागले; व भौतिक शास्त्रांपासून तें अज्ञेय सत्तत्त्व प्राप्त होणें शक्य नाहीं, अशी त्यांची खात्री होऊन गेली. हा अनु-भव इतर शास्त्रज्ञांनाहि क्रमाक्रमानें आल्यावांचून राहाणार नाहीं. भौतिक शास्त्रांतील शोध करण्यामध्यें बुद्धीचा विकास होत जातो ही गोष्ट खरी, व अशा दृष्टीनें त्या शास्त्रांचें महत्व मानणें जरूर आहे. परंतु जडापासून खरें

सुख होणें शक्य नाहीं, चित्ताचें खरें समाधान ऐहिक सुखप्राप्तीमुळें होणार नाहीं, या कल्पनांचा शास्त्रज्ञांच्या मनामध्यें उदय झाल्याशिवाय वेदान्त-शास्त्राकडे नुसत्या बौद्धिक दृष्टीपलीकडच्या दृष्टीनें त्याचें लक्ष वेधूं लागणार नाहीं हें खास आहे. 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' असें जें भगवंतांनीं गीतेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हाच कीं, कर्म हें ज्ञानाकरितां आहे, ज्ञानामध्यें त्याची परिसमाप्ति होते, अर्थात् ज्ञानाकडे जाण्याची ती एक पायरी आहे. गति ही नेहमीं स्थितीकरितां असते, व कर्म म्हणजे गति, व ज्ञान म्हणजे स्थिति, अशा दृष्टीनें विचार केला असतां कर्माला ज्ञानापेक्षा कमी दर्जाचें कां मानण्यांत येतें, कर्माची ज्ञानामध्यें परिसमाप्ति कां होते, याचा बोध होण्यासारखा आहे. व गीतेंतील वरील श्लोकार्धामध्यें कर्म शब्दाऐवजीं भौतिक शास्त्रें, व ज्ञान शब्दाऐवजीं वेदान्त असे शब्द वापरले असतां भौतिक शास्त्रें व वेदान्त यांच्या परस्पर महत्वासंबंधाच्या मुद्याचा आमच्या मतें बरोबर उलगडा झाल्यावांचून राहाणार नाहीं.

## वेदान्त हें अनुभवाचें शास्त्र.

वेदान्त हें अनुभवाचें शास्त्र आहे, अन्धश्रद्धेचें शास्त्र नव्हे, या मुद्यावर स्वामींचा विशेष कटाक्ष सर्वत्र दिसून येतो. रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, वगैरे शास्त्रांतील सिद्धान्तांची प्रत्यक्ष प्रयोगानें खात्री करून घेतां येते. वेदान्तशास्त्राचीहि स्थिति अशीच आहे. तेंहि अनुभवगम्यशास्त्र आहे. 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः' वगैरे श्रुतिप्रतिपादित वचनांत सांगितल्याप्रमाणें आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे; तरच अध्यात्मशास्त्रामध्यें मनुष्याची खरी प्रगति होईल व आत्यन्तिक श्रेयोरूप जो मोक्ष त्याप्रत मनुष्य जाऊन पोहोंचेल. 'नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया, न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥' हें तत्त्व श्रुतीमध्यें स्पष्टपणें सांगण्यांत आलें आहे. याचा अर्थ असा कीं, 'आत्मज्ञान हें प्रवचनांच्या योगानें, केवळ बुद्धिकौशल्याच्या योगानें, किंवा नुसतें वेदाध्ययन केल्यानें प्राप्त होणें शक्य नाहीं. ज्याला आत्मज्ञानाविषयीं अत्यन्त तळमळ लागून राहिली असेल त्यालाच आत्म्याचें स्वरूप गोचर होतें.' हाच सिद्धान्त स्वामींनीं आपल्या व्याख्यानांमध्यें जागोजागीं अत्यंत मुद्दे-

सूद रीतीनें प्रतिपादन केला आहे. नुसतें कोरडें बौद्धिक ज्ञान किंवा अन्धश्रद्धा म्हणजे परमार्थ नव्हे; तर परमार्थ म्हणजे आत्मानुभूति, असें त्यांनीं पुनः पुनः बजावून सांगितलें आहे.

## वेदांचें महत्व.

वेदान्ताचें महत्व म्हणजे अर्थात् वेदांचेंच महत्व होय. कारण, वेद हे कर्म, उपासना, आणि ज्ञान अशा तीन कांडांनीं बनलेले असून ज्ञानकांड म्हणजेच वेदान्त होय. कर्म व उपासना हीं मनुष्याला क्रमाक्रमानें आत्मज्ञानाकडे पोहोंचविणारीं आहेत. ' सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते,' म्हणजे ' कर्माचें अन्तिम आत्मज्ञान प्राप्त करून घेणें, ' हे असल्यामुळें ज्ञानकांडाला—उपनिषदांना विशेष महत्व आलेलें आहे. पाश्चात्य शास्त्रें हीं श्रुतीला विरोधी नाहींत, इतकेंच नव्हे तर हीं शास्त्रें मनुष्याला वेदान्तप्रवण करणारीं आहेत; तीं वेदांचें महत्व प्रस्थापित करीत आहेत; सारांश, वेदान्ताच्या दिग्विजयाला मदत करीत आहेत, ही गोष्ट स्वामींनीं ' वेदान्तावरील शंकासमाधान ' या प्रश्नोत्तररूप व्याख्यानांत प्रतिपादन केली आहे.

## वेदान्त व समाजसत्तावाद.

पाश्चात्य राष्ट्रांत समाजसत्तावाद, व्यक्तिस्वातंत्र्यवाद, वगैरे वाद अलीकडे विशेष जोरानें उत्पन्न होऊं लागले आहेत. जगामध्यें सर्वत्र समता नांदावी, या धोरणावर हे सर्व वाद व तद्विषयक चळवळी उत्पन्न झालेल्या आहेत. समत्व हें वेदान्ताचेंहि ध्येय आहे; व अशा दृष्टीनें विचार केला असतां वेदान्त व असले वाद यांच्यामध्यें एक प्रकारचें साम्य आहे. तरी समाजसत्तावाद काय, किंवा व्यक्तिस्वातंत्र्यवाद काय, ह्यांना जगांत समता कां असावी, व ती कोणत्या सुलभ उपायानें घडवून आणतां येईल, यासंबंधानें सयुक्तिक विवेचन करतां येत नाहीं. परंतु जगांतील विषमता कां नाहींशी करावी, या विषयाची सयुक्तिक मांडणी वेदान्त करतो. व्यक्तिविषयक मालकीची कल्पना अजिबात नाहींशी झाल्याशिवाय समाजांत समता उत्पन्न होणार नाहीं, समाजांतील व्यक्तींमध्यें मी आणि माझें या स्वार्थी कल्पना प्रबळ होऊं लागल्या म्हणजे तंटेबखेडे व मारामाऱ्या उत्पन्न होऊन समाजांतील शांतता नाहींशी होणें अपरिहार्य आहे. अर्थात्,

ही सर्व आपत्ति टळली जावी अशी इच्छा असेल तर समतेचें तत्त्व समाजां-तील लोकांच्या अंतःकरणावर चांगलें ठसलें गेलें पाहिजे, ही गोष्ट समा-सत्तावादाप्रमाणें वेदान्तालाहि मान्य आहे. परंतु मालकीची कल्पना कां सोडावी, ती सोडल्यापासून समाजाचें हित कसें होईल, या संबंधानें वेदान्ताचें उत्तर अत्यंत समर्पक आहे. सुख हें आत्म्याव्यतिरिक्त दुसऱ्या कशांतहि नाहीं, ममत्वाच्यां कल्पनेंत काल्पनिक सुखाचा भास मनुष्याच्या अज्ञानामुळें कांहीं काळ झाला तरी त्यापासून परिणामीं दुःख उत्पन्न झाल्या-शिवाय राहणार नाहीं. जें जें दिसतें तें तें सर्व नश्वर आहे, असा वेदा-न्ताचा ठाम सिद्धान्त आहे. अर्थात् जो मनुष्य सुखासाठीं आत्म्याव्यति-रिक्त इतर वस्तूंवर अवलंबून राहातो, त्याच्या भ्रमाचा भोंपळा फुटून दुःखाची उत्पत्ति झाल्याशिवाय कशी राहील ? सुख आणि दुःख यांचीं लक्षणें आत्मज्ञानसंपन्न अशा आमच्या शास्त्रकारांनीं किती बिनतोड करून ठेविलीं आहेत ! "यद्यत् परवशं दुःखं यद्यदात्मवशं सुखम् । एतद्विद्यात्स-मासेन लक्षणं सुखदुखयोः ॥" समाजसत्तावाद, व्यक्तिस्वातंत्र्यवाद असले वाद उत्पन्न करणाऱ्या पाश्चात्य लोकांची दृष्टि इतकी सूक्ष्म नाहीं, हें निर्विवाद आहे. समाजांत सुख असावें व त्याकरितां समतेच्या कल्पनेचा समाजांत प्रसार व्हावा, असें त्यांचें म्हणणें आहे ही गोष्ट खरी; परंतु आत्म्या-व्यतिरिक्त इतर कोणत्याहि गोष्टीवर अवलंबून राहणें म्हणजे खरें सुखच नव्हे असें प्रतिपादन करणाऱ्या आमच्या शास्त्रकारांची दृष्टि ऐहिक सुखाबरोबर पार-मार्थिक सुखाकडे लोकांचें लक्ष लावून देण्यास कारणीभूत होते. हीच गोष्ट स्वामींनीं अतिशय मार्मिकपणानें सिद्ध केलेली आहे. स्वामी विचार-तात कीं, 'सुख कशांत आहे ? मनुष्य संग्रहाकरितां इतकी धडपड करतो ती कां ?" लोकेषणा, पुत्रेषणा, वित्तेषणा यांच्यामागें लोकांची सारखी धांवपळ सुरू आहे; परंतु लोकांची कल्पना कांहींहि असली, स्वार्थी विचारांचा पगडा त्यांच्या मनावर कितीहि असला तरी वास्तविक स्थिति काय आहे ? सुख हें घेण्यांत—संग्रहांत नसून दानांत—त्यागांत आहे. एखादा कंजुष मनुष्य पै पै करून द्रव्याचा संचय करून ठेवतो. जणूं काय मरतांना ही सर्व संपत्ति आपल्याबरोबर नेतां येईल, अशीच त्याची कल्पना असते ! हें त्याचें अज्ञान होय. परंतु तें कसेंहि असलें तरी त्याची संपत्ति त्याच्या इच्छांना न जुमानतां दुसऱ्यालाच मिळत असते ! कोणी

खुषीनें दान करतात, कोणाला खुषीच्या विरुद्ध सोडावें लागतें! तात्पर्य एकच. जो कंजूष असतो तो एका दृष्टीनें अतिशय मोठा दाता असतो, असें सुभाषितकारांनीं विनोदानें लिहिलें आहे व त्यांतील रहस्यहि हेंच होय. दुसरी गोष्ट अशी कीं, प्रत्यक्ष वस्तूंत सुख नाहीं, तिच्यासंबंधाच्या कल्पनेंत सुख आहे किंवा वाटतें असेंच म्हणणें रास्त होईल! सारांश, बाह्य जगांतील नश्वर वस्तूंवर जो अवलंबून राहातो, त्यांपासून आपणांस सुख होईल, अशा भ्रामक कल्पनेंत जो गुरफटला जातो, त्याच्या वांट्याला दुःखाशिवाय दुसरें कांहीं येणें शक्य नाहीं. यासाठीं स्वामी म्हणतात, वस्तूंचें नश्वरत्व ओळखा, जडापासून सुख मिळण्याच्या कल्पना झुगारून द्या, व ज्याच्यापासून सर्व सुखांची प्राप्ति होते, शाश्वत् आणि आत्यन्तिक सुखाची प्राप्ति होते, अशा आत्म्याचें ज्ञान संपादन करा, असा वेदान्ताचा उपदेश आहे. अशा वेदान्तज्ञानानें संपन्न झालेलीं मनुष्यें राष्ट्रांत उत्पन्न होऊं लागलीं म्हणजे त्यामुळें समाजांत समतेचें तत्त्व प्रसृत झाल्यावांचून राहणार नाहीं. तसेंच, असलीं ज्ञानसंपन्न मनुष्येंच पूर्ण निरपेक्ष आणि निष्कामबुद्धीनें वागून लोककल्याण करूं शकतील. ऐहिक स्वार्थाच्या मागें स्वतः लागलेल्या मनुष्यांनीं समत्वासारख्या उच्च दर्जाच्या तत्त्वांचा कितीहि घोष केला तरी त्यापासून कितपत उपयोग होणार? व झाला तरी तो कितपत टिकणार? ज्यांना जगाचें नश्वरत्व समजलें नाहीं, आत्मज्ञानानें विषयांबद्दल ज्यांच्या ठिकाणीं वैराग्य बाणलें नाहीं, ते जगाचें खरें कल्याण कितपत करणार हें दिसतच आहे! स्वतः बद्ध झालेला मनुष्य दुसऱ्याला कधींतरी बंधमुक्त करूं शकेल काय? या दृष्टीनें विचार केला असतां नीतीचीं उदात्त तत्त्वें, ऐहिक दृष्टीनें अमलांत आणूं पाहणाऱ्या समाजसत्तावादी लोकांपेक्षां वेदान्तज्ञानसंपन्न अशा मनुष्यांच्या पूर्ण निरपेक्ष बुद्धीनें जगाचें कल्याण खात्रीनें जास्त होईल, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते. वेदान्तज्ञानी जगाकरितां झटतो; परंतु त्याच्या सर्व क्रिया ईश्वरार्पण बुद्धीनें, निष्काम यज्ञाच्या बुद्धीनें होत असतात. त्याला स्वतः-करितां त्यांपासून कांहींहि प्राप्त करून घ्यावयाचें नसतें. तो केवळ आत्म-दृष्टीनें जगावर प्रेम करितो व यासाठींच लोकांकरितां झटतो. नश्वर जगा-पासून त्याला नश्वर सुखाची प्राप्ति करून घ्यावयाची नसते; व सर्व स्वार्थी इच्छांचा आत्मज्ञानाच्या योगानें त्याच्या ठिकाणीं पूर्ण निरास झालेला

असल्यामुळें जगाच्या कल्याणासंबंधाच्या त्याच्या निरपेक्ष इच्छांना एक प्रकारचें विलक्षण आणि अद्भुत सामर्थ्य प्राप्त होतें.

## वेदान्तसमतावादाचें सत्ययुग.

वर वर्णन केल्याप्रमाणें विषयसुखांस तुच्छ मानणारे, जगाचें मिथ्यात्व जाणलेले असे अध्यात्मज्ञानसंपन्न महात्मे जगांत उत्पन्न झालें आणि त्यांचा उपदेश जनसमुदायाच्या अंत:करणांत बाणला गेला म्हणजे जी अत्यंत स्पृहणीय स्थिति उत्पन्न होईल, तिला वेदान्तसमतावादाचें सत्ययुग असें नांव स्वामींनीं दिलें आहे. ह्या सत्ययुगाचें रसभरित आणि काव्यमय असें वर्णन वेदान्त आणि समाजसत्तावाद ह्या लेखाच्या शेवटीं त्यांनीं केलें आहे. तें वाचून ह्या केवळ स्वामींच्या कल्पनेच्या भराऱ्या आहेत, असा कित्येक अज्ञ लोकांचा समज होण्याचा संभव आहे. परंतु, भविष्यकालाचें स्वामींनीं केलेलें वर्णन दिव्य ज्ञान दृष्टीनें आहे व त्यांच्या त्या दृष्टीशीं शुद्ध भावनांच्या योगानें तादात्म्य करून घेण्याचें सामर्थ्य ज्यांच्या बुद्धीमध्यें नसेल त्यांना स्वामींच्या कल्पनेला मनोराज्य असें म्हणण्याचा बिलकुल अधिकार नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, जशा भावना दृढ असतील त्याप्रमाणें आपल्याला फळें मिळतील, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे. 'यादृशी भावना कुर्यात् सिद्धिर्भवति तादृशी,' हा सिद्धान्त सर्वच बाबतींत लागू आहे. 'श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः' हें वचन अक्षरशः खरें आहे. जे लोक दौर्बल्याचे विचार करतात, आपण अशक्त, दीन, दुबळे, आहों अशा क्षुद्र कल्पनांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि विचारांना ज्यांच्या बुद्धींत थारा मिळत नाहीं, त्यांच्यामध्यें सामर्थ्य उत्पन्न होणार कोठून ? व अशा लोकांची स्थिति सुधारावी तरी कशी ? ज्यांच्यामध्यें आत्मश्रद्धा नाहीं, आपल्या वास्तविक स्वरूपाच्या प्रभुत्वाची आणि सर्वशक्तिमत्वाची ज्यांच्या डोक्याला कल्पना शिवत नाहीं, ते लोक हतभागी आणि दुर्दैवी बनण्याकरितांच उत्पन्न झालेले आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ज्यांना पूर्वेतिहासाचा अभिमान नाहीं, त्यांचा भविष्यकाळचा इतिहासहि दुर्दैवी बनल्याशिवाय राहणार नाहीं, असें मेकॉलेचें एक वाक्य आहे, व त्यांतील इंगित हेंच होय. मेकॉले हा जर हिंदुस्थानांत जन्मलेला व अध्यात्मज्ञानांत मुरलेला असता तर ' पूर्वेतिहासाचा अभिमान ' या शब्दांऐवजीं ' आ-

त्म्याचें—परमात्म्याचें ऐश्वर्य व सर्वशक्तिमत्व,' असेच शब्द त्यानें वापरले असते. सारांश, स्वामींनीं वेदान्तसमतावादाच्या सत्ययुगाचें जें चित्र रेखाटलें आहे, तें केवळ काल्पनिक आहे, असें मानणाऱ्यांचें दुर्दैव होय. त्याचा दोष स्वामींकडे नसून त्यांच्या स्वतःच्या संकुचित भावनांकडे आहे व असल्या क्षुद्र भावना नाहींशा व्हाव्या, ह्यासाठींच तर स्वामींचा एवढा कंठशोष चाललेला आहे. स्वामी म्हणतातः—" हिंदुस्थानांतील राजपुत्रांनो, धर्मगुरूंना, शूद्रांनो, आणि राजेमहाराजांनो ! कांहीं वर्षांनंतर काय स्थिति होईल, याची तुम्हांला कल्पना करतां येण्यासारखी आहे काय ? तुम्हांला कदाचित् मी सांगतों हें गौडबंगाल आहे असें वाटेल; कांहीं तरी काल्पनिक भारुड रचलें आहे, अशी तुमची कल्पना होण्याचा संभव आहे; परंतु माझ्या दृष्टीपुढें स्वामींनीं भरलेलें एक जग दिसत आहे. पृथ्वीच्या पृष्ठभागावर प्रत्यक्ष देव अवतीर्ण झाले आहेत; मनुष्यानें उत्पन्न केलेले सर्व काल्पनिक भेदाभेद साफ नाहींसे झाले आहेत; 'हा हिंदुस्थान,' 'हा चीन,' 'ही अमेरिका,' 'हें इंग्लंड' असले सर्व कृत्रिम भेद अस्तंगत झाले आहेत; नवीन नवीन पुरुष, निरनिराळ्या संस्था, उदय पावत असून त्याहि कालमानानें नष्ट होत असलेल्या माझ्या दृष्टीपुढें दिसत आहेत. भ्रमनिमग्न बालकांनो ! आपल्या डोळ्यांवरील पटलें बाजूला सारा, म्हणजे अत्यंत उच्चस्थितीस पोहोंचलेले संन्यासी नीच मानल्या गेलेल्या शूद्रांच्या हातांत हात घालून प्रेमानें काम करीत असलेले तुम्हांलाहि दिसून येतील. पहा, तो पहा, संन्याशाचा कमंडलु रूपांतर पावून त्यांतून कुदळी आणि खोरीं उत्पन्न होत आहेत ! संन्याशांनीं आपल्या अंगांतील आलस्य टाकून दिलें आहे, आणि शूद्रांच्या सेवाधर्माला खऱ्या संन्यासवृत्तीचें दिव्यत्व प्राप्त झालेलें आहे; जिकडे तिकडे वैराग्याचा ध्वनि दुमदुमून राहिला आहे. वेश्यांगनांचा निर्लज्ज उद्दामपणा व रामाचें निःस्पृह पावित्र्य आणि उदात्तपणा यांचा संयोग झाला आहे; मेंढराचा दीनपणा आणि सिंहाचें शौर्य यांचें एकीकरण झालेलें आहे; प्रत्येक स्थितीचीं दोन्ही अंतिम टोकें संयोग पावलीं असून मध्यंतरींचे अस्वभाविक भेद आणि विषमता विलय पावत आहेत. सारांश, सर्व जग एक कुटुंब बनलें आहे पहा ! पहा !! हें सर्व दूर अंतरावर तुमच्या नजरेस येईल. ही दिव्य स्थिति प्राप्त होण्यासाठीं तरवारीच्या धारेची

किंवा सर्वत्र आगपोळ करून सोडण्याची जरूरी आहे काय? नाहीं. कोतवालचावड्यांची तरी आवश्यकता आहे काय? नाहीं. शेखमहंमदाचें मनोराज्य आहे काय? नाहीं. ही कांहीं क्षुद्र आणि निरर्थक स्वप्नकल्पना खास नव्हे; तर मग हा समाजसत्तावाद तरी आहे काय? कदाचित् असेल! परंतु हिंदुस्थानच्या भूमींत निसर्गानें उत्पन्न होणारी स्थिति अशाच प्रकारची असली पाहिजे. वेदान्त प्रत्यक्ष अमलांत आल्यानें ही स्थिति अगदीं स्वाभाविक रीतीनें उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांनों! तुह्मीं आपल्या अंगीं आत्मज्ञान बाणून घेतलेंत व वैराग्याची संवय लावून घेतलीत ह्मणजे तुमच्या कच्छपीं बसलेलें दैन्य–तुमचा रोग हिंदुस्थानांत कधींतरी राहूं शकेल काय? मानसिक रोग नाहींसा करा, ह्मणजे शारीरिक रोग तुमच्यापासून दूर पळालाच ह्मणून समजा. यांत कांहीं गुप्त नाहीं, कारस्थान लढविण्याचा बिलकुल संबंध नाहीं. भीति आणि शंका यांचें नांवहि नको. तुमच्यांतील सर्व भित्र्या लोकांनीं–भेकडांनीं याच मार्गाचें अनुकरण करणें आवश्यक आहे."

## वेदान्त आणि हिंदुस्थानची अधोगति.

कित्येक अप्रबुद्ध, अदूरदर्शी, किंवा परप्रत्ययनेयबुद्धि अशा लोकांमध्यें एक समज अथवा खरें पाहिलें तर गैरसमज रूढ होऊन गेलेला आहे. या लोकांचें ह्मणणें असें कीं, वेदान्तामुळें आमचें राष्ट्र अधोगतीस गेलें; आमच्यांतील साधुसंतांनीं आम्हांला बुडविलें! अशा तऱ्हेची विचारपरंपरा या लोकांच्या मनांत खिळून गेलेली आहे. तसेंच वेदान्तानें मनुष्य आळशी बनतो, अशी या लोकांची कल्पना होऊन गेलेली आहे. परंतु, या दोन्ही प्रश्नांना स्वामींनीं समर्पक व सयुक्तिक उत्तरें दिलीं असून ऐतिहासिक पुराव्याच्या आधारावर असल्या आक्षेपांचें मार्मिक रीतीनें खंडन केलें आहे. हिंदुस्थानच्या राजकीय अधोगतीचें खापर जे लोक वेदान्ताच्या माथ्यावर फोडतात, अशा लोकांनीं हिंदुस्थानच्या प्राचीन कालापासून आज तागायताच्या इतिहासाचें सूक्ष्म आणि विवेचक बुद्धीनें बिलकुल पर्यालोचन केलेलें नसतें व इतिहासाच्या खऱ्या मर्माची त्यांना ओळख पटलेली नसल्यामुळें असले आक्षेप केवळ अज्ञानामुळें उत्पन्न झालेले आहेत, ही गोष्ट स्वामींनीं सिद्ध केली आहे. वेदान्तामुळें हिंदु-

स्थानची राजकीय अधोगति झाली नाहीं, इतकेंच नव्हे तर वेदान्तकल्पनांचा ऱ्हास हेंच आमच्या अधोगतीचें वास्तविक कारण आहे. कारण इतिहासावरून असें दिसतें कीं, ज्या ज्या वेळीं आमच्या राष्ट्रांत वेदान्ताचे सिद्धांत लोकांच्या अंतःकरणांत प्रतिबिंबित झालेले होते, त्या त्या वेळीं तर राष्ट्रांच्या हल्लयांपुढें हिंदुस्थानाला माघार घेण्याचा प्रसंग कधींहि आलेला नव्हता; व ज्या वेळीं हिंदुस्थानांतील जनसमूहाच्या मनावरील वेदान्ताचा पगडा नाहींसा झाला, ऐहिक विषयसुखांत काळ घालविणें यांतच लोकांनाः आपल्या आयुष्याचें इतिकर्तव्य वाटूं लागलें, त्या वेळीं हिंदुस्थानचें नष्टचर्य ओढवलें आहे. हें तत्त्व प्राचीन इतिहासाचें सिंहावलोकन करून स्वामींनीं लोकांच्या निदर्शनास आणून दिलें आहे. ( पान ४६, ४७ ) दुसरीहि एक गोष्ट स्वामींनीं नमूद करून ठेविली आहे. ती ही कीं, " हे ईश्वरा, मी पापी आहें, मी दास आहें, नीच आहें " ही कल्पना बहुजनसमाजाच्या मनांत पूर्णपणें ठसली गेली, व त्यांच्या भावना आपण दुबळे आहों अशा होऊं लागल्या. व वेदान्तप्रतिपादित ' अहं ब्रम्हास्मि ' ही कल्पना हळुहळू मागें पडत चालली. व या दुबळेपणाच्या कल्पनेमुळें ' जशा भावना तशीं फळें ' हा कर्मतत्त्वाचा नियम लागू पडून हिंदुस्थानची अधोगति होऊं लागली, ही स्वामींनीं सांगितलेली गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

## वेदान्तामुळें मनुष्य आळशी बनतो काय ?

राष्ट्रदृष्ट्या वेदान्तामुळें हिंदुस्थानची अधोगति झाली नाहीं, ही गोष्ट स्वामींनीं ज्याप्रमाणें सिद्ध केली त्याचप्रमाणें व्यक्तिदृष्ट्या वेदान्तानें मनुष्य आळशी बनतो कीं काय, या प्रश्नाचेंहि त्यांनीं उत्तर दिलें आहे. स्वामींनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, ( पान ४. ) वेदान्तामुळें मनुष्य आळशी बनतो, ही गोष्ट निखालस खोटी आहे; इतकेंच नव्हे तर वेदान्ती मनुष्य हे मोठे जबर उद्योगी आणि व्यासंगी असतात आणि हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विषयांवर जे शेंकडो अत्युच्च व वरच्या दर्जाचे ग्रंथ झालेले आहेत, ते वेदान्ती महात्म्यांच्या अत्यंत परिश्रमाचेंच फल होय. ज्ञानी मनुष्य आपल्या स्वतःच्या दृष्टीनें—आत्मज्ञानाच्या दृष्टीनें अकर्ता बनलेला असतो, ही गोष्ट खरी; व श्रीमच्छंकराचार्य यांनींहि

असेंच प्रतिपादन केलें आहे कीं, आत्मज्ञानसंपन्न मनुष्य कांहींच करीत नाहीं. ' कर्मण्यकर्म यः पश्येत् ' अशीच ज्ञानी मनुष्याची नेहमीं स्थिति असते. परंतु, ही ज्ञानी मनुष्याची स्वतःची दृष्टि झाली. ज्ञानदृष्टीनें ' नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन । न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः॥ ' अशी त्याची स्थिति झालेली असते. म्हणजे आत्मा हा अकर्ता असल्यामुळें ज्ञानदृष्टीनें आपलें अमुक एक कर्तव्य आहे किंवा अमुक एक अकर्तव्य आहे, अशा प्रकारची त्याच्या मनाची स्थिति नसते. तत्त्वतः त्याला कांहींच करावयाचें नसतें; त्याला कांहींच प्राप्तव्य नसतें. अमुक एक ऐहिक विषय प्राप्त करून घ्यावा, अशा प्रकारची कोणतीच इच्छा त्याच्या ठिकाणीं नसते. देहाकडून कर्म होत असतां आपण अकर्ते आहों, हा ज्याचा प्रत्यक्ष अनुभव तोच ज्ञानी. विषय हे मिथ्या आहेत, या प्रत्यक्ष अनुभवामुळें आत्मज्ञानी मनुष्याला ऐहिक इच्छा उत्पन्न होणें शक्य नसतें. परंतु एवढ्यानें त्याच्या शरीराकडून क्रिया होत नाहींत असें नव्हे. फक्त कर्तृत्वाचें ओझें तो आपल्या डोक्यावर बाळगीत नाहीं इतकेंच. परंतु यावरून त्याच्याकडून कोणत्याहि क्रिया होत नाहींत, किंवा तो आळशी आहे, असें विधान करणें हें गैर आहे, हें स्वामींनीं स्पष्ट करून दाखविलें आहे. ते म्हणतातः—" ज्ञानी मनुष्य आळशी किंवा ऐदू बनणें शक्य आहे काय ? असें विधान करणें म्हणजे निसर्ग आळशी आहे आणि सूर्य निरुद्योगी आहे, असें म्हणण्यासारखें आहे! सर्व ज्ञान्यांचे ज्ञानी, अकर्तृतेचे अध्वर्यु अशा श्रीशंकराचार्यांच्या अलौकिक कामगिरीकडे पाहा. सर्व जगाचा इतिहास चाळून असला एक तरी पुरुष मला दाखवा कीं, ज्याच्याकडून आयुष्यांतील इतक्या अल्पकालांत इतकी अपूर्व आणि अलौकिक कामगिरी बजावली गेली आहे. आचार्यांकडून अनेक ग्रंथ लिहिले गेले; कित्येक संस्था स्थापल्या गेल्या; अनेक राजांनां त्यांनीं आपले अनुयायी करून सोडलें; व हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत अनेक संघ आणि समुदाय निर्माण केले. ज्याप्रमाणें एखाद्या ताऱ्यामधून प्रकाशाचा झोतच्याझोत बाहेर पडून सर्वत्र पसरला जावा, एखाद्या पुष्पापासून सुगंध-परिमल सर्व दिशांना दरवळून जावा, त्याप्रमाणें महत्कार्य—दिव्य कामगिरी आचार्यांच्या हातून लीलेनें होऊन गेली ! "

स्वामींचें हें समाधान बिनतोड आणि समर्पक नाहीं, असें कोणाला

तरी म्हणतां येईल काय ? स्वामींनीं स्वत: आचार्यांसारख्यांचीं उदाहरणें देऊन वरील आक्षेपाचें खंडन केलें. परंतु वेदान्तानें मनुष्य आळशी बनतो कीं काय, याचें प्रत्यंतर पहाण्यासाठीं आपल्याला इतक्या दूरच्या कालाकडे नजर फेंकण्याचें कारण नाहीं. आजमितीसही हिमालयासारख्या एकान्तवासाच्या ठिकाणीं किंवा समाजांत बिनबोभाट रीतीनें राहून जगताच्या कल्याणासाठीं अहर्निश चिंतन करणाऱ्या अनेक अप्रसिद्ध वेदान्तनिष्ठ महात्म्यांचीं उदाहरणें सोडून दिलीं तरी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आणि विसाव्या शतकाच्या आरंभीं आपल्या दिव्य ज्ञानानें आणि उपदेशानें ज्यांनीं जगाला ज्ञानामृत पाजलें व आपल्या आयुष्यांतील प्रत्येक क्षणाचा लोकोपकारार्थ निष्कामयज्ञ केला अशा लोकोत्तर आणि अद्वितीय स्वामी विवेकानंद आणि स्वामी रामतीर्थ यांच्यासारख्या विभूतींना आळशी किंवा दुबळे म्हणण्याचें धाष्ट्यं कोणी तरी करील काय ? मग अशा स्थितींत भलभलते कार्यकारण संबंध जोडून वेदान्त मनुष्यांना आळशी बनवतो, असले कुतर्क लढविणें, म्हणजे आपल्या अज्ञानाचें आणि असमंजसपणाचें प्रदर्शन करणें नव्हे काय ?

## चमत्कारांत अर्थ काय !

पुष्कळ लोकांची सामान्यतः अशी कल्पना झालेली असते कीं, चमत्कार म्हणजेच परमार्थज्ञान. जो कांहीं तरी चमत्कार करून दाखवतो तोच ज्ञानी. ज्या मनुष्याला कांहीं सिद्धि वश नाहींत, त्याला ज्ञानी कसा म्हणावयाचा ? अशी लोकांची सामान्यतः कल्पना होऊन गेलेली असते. व याच दृष्टीनें अमेरिकेंतील एका मनुष्यानें स्वामींना प्रश्न केलेला होता. आणि त्यावर स्वामींनीं दिलेलें उत्तर बिनतोड आहे. कित्येक लोकांना क्षुद्र सिद्धि मिरविण्यांत मोठें भूषण वाटतें. आपल्याला अदृश्य वस्तूंचें ज्ञान होतें, अशी कांहीं लोक प्रौढी मिरवितात; परंतु क्षुद्र सिद्धि म्हणजे मायाच होय, आत्मज्ञानाशीं त्यांचा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं; किंबहुना सिद्धींचा अभिमान, सिद्धी मिरवणें ही गोष्ट ज्ञानसिद्धीला निश्चयानें विघातक आहे, ही गोष्ट आपल्या इकडील अनेक सत्पुरुषांनीं प्रतिपादन केलेली आहे. ज्ञान आणि सिद्धि एकत्र असूं शकत नाहींत, असा याचा अर्थ नव्हे. कांहीं सत्पुरुषांच्या हातून वेळप्रसंगीं सामान्य लोकांना अद्भुत वाट-

णाऱ्या अशा गोष्टी किंवा चमत्कार घडून आल्याचीं अनेक उदाहरणें आहेत, नाहीं असें नाहीं; परंतु आत्मज्ञान आणि चमत्कार यांचा अर्थाअर्थी कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं. एवढेंच नव्हे तर ज्यांच्या-कडून असले चमत्कार घडून आल्याचीं उदाहरणें आहेत त्यांनीं स्वतःहि आपण ते चमत्कार केले, अशी प्रौढी कधींहि मिरविली नाहीं. त्या गोष्टी ईश्वरी लीलेनें घडून आल्या, आपण ते चमत्कार केले किंवा तसे करून दाखवतों, असे उद्गार त्यांनीं कधींहि काढलेले नाहींत; व स्वतःकडून त्या गोष्टी घडल्या, अशी त्यांची केव्हां भावनाहि झाली नव्हती. अमेरिकन मनुष्यानें स्वामींनाहि 'कांहीं चमत्कार करून दाखवा, तर आम्हीं तुमच्यावर विश्वास ठेऊं,' असे उद्गार काढले असतां स्वामींनीं फार मार्मिक उत्तर दिलें आहे. चमत्कारांत कांहीं अर्थ नाहीं. ही केवळ माया आहे, पोरखेळ आहे, असें सांगून 'विश्वाचा हा अफाट चमत्कार ज्याच्या सत्तेनें उत्पन्न होतो व ज्याच्यामध्यें या सर्वांचा लय होत असतो, असा अनंत, सर्वशक्तिमान् व सर्व चराचराला आधारभूत असणारा जो परमात्मा तोच आपण आहों; ह्या विश्वांत प्रतिक्षणीं चालणारे अद्‌भुत चमत्कार, निसर्गाच्या लीलेचे अद्‌भुत खेळ, हे सर्व आपलेच चमत्कार आहेत; येशू ख्रिस्तानेंहि जे चमत्कार ह्मणून करून दाखविले तेहि वास्त-विक आपणच केले असून तसे चमत्कार या देहाकडून झाले असतां या देहाचें फाजील महत्त्व तुह्मीं वाढवूं लागाल व ती गोष्ट तुमच्या अध्यात्म-प्रगतीला अपाय करणारी आहे,' अशा तऱ्हेचें स्पष्टीकरण स्वामींनीं केलें आहे ( पान. ३४ ) चमत्कार करून दाखविणें आणि आत्मज्ञान असणें यांचा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं, ही गोष्ट स्वामी विवेकानंद यांच्या चरित्रांतील एका गोष्टीवरून चांगली व्यक्त होण्यासारखी आहे. स्वामी विवेकानंद हे अमेरिकेंत जाण्यापूर्वीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या तीर्थांची यात्रा करण्यासाठीं हिंडत होते, त्या वेळीं एका विद्वान् गृहस्थानें—'ब्रह्म-विद्येच्या विद्यार्थ्यानें' स्वामींना असा प्रश्न विचारला कीं, "महाराज, आपल्याला हिमालयांतील महात्म्यांचें दर्शन घडलें आहे काय ? हे महात्मे म्हणजे मोठे दिव्य पुरुष असतात, त्यांचीं शरीरें मोठीं भव्य असतात, त्यांच्या डोक्यांवरून लांबलांब जटा लोंबत असतात व ह्या महात्म्यांच्या अंगांत अद्‌भुत चमत्कार करून दाखविण्याचें सामर्थ्य असतें. ही गोष्ट

आपणास माहीत आहे काय ?" यावर त्या मनुष्याची चांगली कानउघाडणी करण्याच्या हेतूनें स्वामींनीं त्या मनुष्याच्या विधानांचें प्रथमारंभीं पूर्णपणें समर्थन केलें व महात्म्यांच्या अद्‌भुत चमत्कारांचें इतक्या उठावानें वर्णन करून दाखविलें कीं, प्रश्न करणारा तो गृहस्थ आश्चर्यानें स्तब्ध आणि चकित होऊन राहिला. यावर त्यानें पुनः प्रश्न केला, 'जगाची स्थिति पुढें कसकशी होत जाणार, यासंबंधाचें वर्णन त्या महात्म्यांनीं आपणांपाशीं केलें आहे काय? या प्रश्नावरहि स्वामींनीं खूपसें वर्णन करून जगाची उत्क्रान्ति पुढें अशा अशा रीतीनें होणार, या उत्क्रान्तीमध्यें महात्मे निरनिराळ्या युगांत अमुक तऱ्हेनें लोकांना मदत करणार व अशा रीतीनें पुनः सत्ययुग सुरू होणार, वगैरे वर्णन केलें. स्वामींच्या तोंडांतून निघणारा प्रत्येक शब्द ब्रम्हवाक्य समजून त्या भोळ्या मनुष्यानें स्वामींचें भाषण कौतुकानें ऐकून घेतलें. शेवटीं स्वामींच्या भाषणापासून आपल्याला कितीतरी नवी माहिती मिळाली, असें त्याला वाटलें व त्यानें स्वामींना आपल्या घरीं पुढीस येण्याविषयीं आग्रह केला. स्वामींनीं त्याच्या विनंतीला मान देऊन त्याच्या घरीं जाण्याचें कबूल केलें. व त्याप्रमाणें स्वामी त्या गृहस्थाच्या घरीं पुढीस गेले. पुढें भोजन वगैरे आटोपल्यानंतर स्वामींना त्या भोळ्या मनुष्याची कींव आली व दयार्द्र बुद्धीनें चमत्कारांच्या गौडबंगालाचा त्याच्या मनावर जो पगडा बसलेला होता तो नाहींसा करून त्यांनीं सदुपदेशाच्या चार गोष्टी सांगण्यास सुरवात केली. स्वामींनीं आपल्या भाषणाच्या आरंभीं त्याच्या मूर्खपणाच्या कल्पनांची त्याला जाणीव उत्पन्न करण्याकरितां थोडीशी कानउघाडणी केली. स्वामी म्हणाले:—"सुशिक्षित मूर्खांनो! आपल्या ज्ञानाची आणि शिक्षणाची तुम्ही एवढी घमेंड मिरवितां, परंतु असल्या चमत्कारांच्या अद्‌भुत आणि काल्पनिक दंतकथांवर तुम्हीं बेलाशक विश्वास ठेवतां हें मोठें आश्चर्य नाहीं काय ?" स्वामींच्या कानउघाडणीचा त्या गृहस्थाच्या मनावर चांगला परिणाम होऊन तोंडांतून एक शब्दहि न काढतां तो मुकाट्यानें मान खालीं घालून बसला. परंतु तो गृहस्थ श्रद्धावान् असल्यामुळें वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान करून देऊन त्याला चांगला बोध करावा व खरें अध्यात्मज्ञान म्हणजे काय याचा त्याच्या मनावर ठसा उत्पन्न करावा, अशा हेतूनें स्वामी मोठ्यानें म्हणाले, "गृहस्था! तूं मोठा बुद्धिमान् दिसतोस.

मग तूं आपल्या सदसद्विवेकबुद्धीचा योग्य उपयोग कां करीत नाहींस ? अध्यात्मज्ञानाचा सिद्धींशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं. आतां लोक सिद्धि मिरविण्याच्या नादीं कां लागतात, याचा विचार करूं लागलें असतां असेंच दिसून येतें कीं, जो मनुष्य चमत्कार करून दाखवतो, तो कामनांचा गुलाम बनलेला असतो व देहाभिमानांत सर्वस्वी बुडून गेलेला असतो. अध्यात्मज्ञान याचा अर्थ ज्या शक्तीच्या–ज्ञानाच्या योगानें मनुष्याचें शील अत्युच्च बनतें ती शक्ति–तें ज्ञान संपादन करणें, विषयवासना पूर्णपणें नाहींशा होणें, ऐहिक इच्छांचें, कामनांचें निर्मूलन होणें, याच गोष्टींचा अंतर्भाव अध्यात्मज्ञानांत होतो. सिद्धींच्या मृगजळापाठीमागें लागणें म्हणजे केवळ भ्रम असून आयुष्यांतील अत्यंत गहन सिद्धांत सोडविण्याच्या कामीं असल्या मायेचा यत्किंचित्‌हि उपयोग नाहीं. सिद्धींच्या मागें लागणें म्हणजे आपल्या शक्तीचा निरर्थक अपव्यय करणें आणि देहाभिमानाची आसक्ति वाढविणें होय. व याचा परिणाम शारीरिक आणि मानसिक सामर्थ्यांच्या क्षयांत झाल्याशिवाय राहात नाहीं. आपल्या राष्ट्राचा जो ऱ्हास होत आहे त्याच्या मुळाशीं हेंच खूळ आहे! आपल्या सभोंवतालच्या जगाच्या बुडाशीं असलेल्या सत्तत्वाकडे लक्ष पोहोंचावेणें हेंच श्रेयस्कर आहे. हल्लीं जर आपल्याला कशाची आवश्यकता असेल तर ती व्यवहारज्ञान, राष्ट्रीय कल्याणाची आकांक्षा, तसेंच ज्या तत्त्वज्ञानाच्या आणि धर्मांच्या योगानें आपण खरे मनुष्य बनूं, ज्याच्या योगानें आपल्याला आपल्या पायांवर उभें राहतां येईल, अशा गोष्टींची आहे. ज्या श्रद्धेच्या योगानें आत्मविश्वास दृढ होईल, राष्ट्रीयत्वाच्या अभिमानाची बुद्धि उत्पन्न होईल, ज्याच्या योगानें आपल्या सभोंवतालच्या हजारों गरीब लोकांना अन्नदान आणि ज्ञानदान करून त्याचें दैन्य नाहींसें करतां येईल असली श्रद्धा व असला धर्म आपणांस पाहिजे आहे. हिमालयांत कोठेंतरी बसणारा एखादा महात्मा आहे व तो एकदम आकाशांतून खालीं पडून तुझ्यासमोर येऊन उभा राहिला तरी त्याचा उपयोग काय ? आपणा भोंवतालीं हजारों लोक अन्नान्न करून प्राण सोडीत असतां व लाखों लोक शिक्षणाच्या अभावीं कुजत पडले असतां तुला त्या महात्म्याशीं काय कर्तव्य आहे ? मूर्खा! तुला ईश्वराची भेट पाहिजे असली तर मनुष्यांची सेवा कर. आपल्या अंगीं सामर्थ्य उत्पन्न व्हावें अशी

जर तुझी इच्छा असली तर लोककल्याण कर. ” स्वामींच्या वरील उद्गारांतील उच्च भावनांमुळें त्या गृहस्थाचा कंठ सद्गदित झाला, स्वामींचें धोरण त्याला बरोबर पटलें. आणि त्यांच्यां उपदेशाप्रमाणें इतःपर वागण्याचें त्यानें कबूल केलें. वरील सर्व विवेचनावरून चमत्कार किंवा सिद्धि ह्या किती फोल आहेत हें सर्वांच्या लक्ष्यांत येईल.

चमत्कार करून दाखविणें हें ज्ञानाला विरोधी आहे, असें म्हणण्याचें कारण असें कीं, ब्रम्हज्ञानाच्या योगानें जगाचें मिथ्यात्व ज्ञानाच्या पूर्णपणें प्रत्ययास आलेलें असतें. अर्थात् कर्तृत्वासंबंधाच्या कल्पनेचा त्याच्या ठिकाणीं सर्वथा निरास झालेला असतो. ज्ञान म्हणजे जाणणें, जगाला आधारभूत असलेल्या सत्तत्वाचा प्रत्यय येणें; अर्थात् ही अकतृतेची—साक्षित्वाची स्थिति आहे. कांहीं करून दाखविण्याचा या स्थितीशीं कांहीं संबंध नाहीं. इतकेंच केवळ नव्हे तर कर्तृत्वाची—कांही तरी चमत्कार करून दाखविण्याची मळमळ जोंपर्यंत मनुष्याच्या चित्तामध्यें वसत असेल तोंपर्यंत, देहाभिमानाच्या पलीकडे मनुष्य जाऊन पोहोंचणें शक्य नाहीं. जोंपर्यंत कर्तृत्वाचा अभिमान आहे, तोंपर्यंत ज्ञानाची पायरी दूर आहे. पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें गति आणि स्थिति यांच्यामध्यें एकात्मता असणें कधींहि शक्य नाहीं. सारांश हा कीं, आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावें अशी ज्यांच्या मनांत जिज्ञासा असेल, त्यांनीं सिद्धींच्या आणि चमत्कारांच्या मोहानें फसून जातां कामा नये. ही गोष्ट स्वामींनीं पुनःपुनः ठिकठिकाणीं बजावून सांगितलेली आहे.

## ईश्वराचें समत्व आणि सदयत्व.

‘ वेदान्तावरील शंकासमाधान ’ या व्याख्यानांत अमेरिकेंतील निरनिराळ्या लोकांनीं वेदान्तासंबंधानें जे जे आक्षेप किंवा शंका स्वामींच्या पुढें निरनिराळ्या वेळीं मांडल्या होत्या, त्यांपैकीं महत्वाच्या शंकांचें समाधान स्वामींनीं केलेलें आहे. स्वामींना विचारण्यांत आलेले प्रश्न व त्यांवर त्यांनीं दिलेलीं उत्तरें, यांचा विचार केला असतां ईश्वराचें समत्व आणि सदयत्व स्वामींनीं खुबीदारपणानें सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें आहे, असें दिसून येतें. ‘ न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः । न कर्म-

फलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभुः । अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ या गीतेमधील दोन श्लोकांमध्यें ईश्वर सम आणि सदय आहे, ह्या सिद्धान्ताचें प्रतिपादन करण्यांत आलें आहे; व हा सिद्धान्त आपल्या डोळ्यांपुढें ठेविला असतां वेदान्तासंबंधानें उत्पन्न होणाऱ्या बऱ्याचशा शंकांचें निरसन होण्यासारखें आहे. ईश्वर हा कल्पवृक्षस्वभाव असून, आपल्या मनांत, आपल्या वृत्तींत ज्या ज्या कल्पना उत्पन्न होतात, त्यांचें त्यांचें फल आपल्याला मिळतें. तें फल वाईट मिळालें म्हणजे लोक ईश्वराला विषम आणि निर्दय ठरवूं पाहतात. परंतु, आपल्याच भावना ईश्वरी सत्तेंत फलद्रूप होत असल्यामुळें ईश्वराला नांवें ठेवण्यांत अर्थ नाहीं. कारण, तो सम आणि सदय आहे. 'समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योस्ति न प्रियः । ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ या श्लोकामध्यें हेंच तत्त्व प्रतिपादन करण्यांत आलें आहे. कल्पवृक्षाखालीं उभें राहिलें असतांहि जो मनुष्य दरिद्री किंवा दुःखी राहतो, त्यानें आपल्या दारिद्र्याबद्दल आणि दुःखाबद्दल कल्पवृक्षाला दोष ठेवणें, हें कधींतरी रास्त होईल काय ? दुसऱ्या एका दृष्टीनेंहि ईश्वराला दोष लावणें गैर आहे. ईश्वरानें जगांत विषमस्थिति कां उत्पन्न केली, कांहीं मनुष्यें भिकारी आणि कांहीं मनुष्यें श्रीमान्, कांहीं सुखांत आणि कांहीं दुःखांत, असा भेदभाव ईश्वर सम आणि सदय असतां कां असावा, असा एक प्रश्न पुष्कळ वेळां विचारण्यांत येतो. या प्रश्नाला स्वामींनीं दिलेलें उत्तर अगदीं समर्पक आहे. स्वामी म्हणतात कीं, 'ईश्वर हा आपणांहून भिन्न असता, तर असल्या आक्षेपांना अवकाश उत्पन्न झाला असता. परंतु आपणच स्वतः तत्त्वतः ईश्वर असल्यामुळें असल्या प्रश्नांना जागाच उरत नाहीं. आपला आत्मा म्हणजेच परब्रम्ह—ईश्वर, तोच सर्वत्र व्यापून राहिलेला आहे, त्याच्याशिवाय दुसरी वस्तुच नाहीं व तेंच आपलें सर्वांचें वास्तविक स्वरूप होय. आपणच ईश्वर आहों. मग अशा स्थितींत ईश्वरापासून भिन्न बनून त्यानें विश्वांतील विविधता उत्पन्न कां करावी, असा प्रश्न विचारण्याला दुसरें कोण आहे ? जीवत्वदशा टाकून ईश्वराशीं तद्रूप झाल्यानंतर असल्या प्रश्नांना वाव उत्पन्न होणार कसा ?' अर्थात् असले सर्व प्रश्न आणि शंका अज्ञानोत्पन्न आहेत, भ्रमांतील आहेत व यालाच माया म्हणतात. या विषयासंबंधानें सविस्तर

विवेचन पुढील भागांत येणार आहे. आपलें खरें स्वरूप ओळखल्यानंतर माया आणि जग यांच्यासंबंधानें प्रश्न उद्भवणें कधींच शक्य नाहीं. अशा आशयाचें स्वामींनीं केलेलें विवेचन कोणाहि समंजस मनुष्याला पटल्या-वांचून राहणार नाहीं.

## पुस्तकीज्ञान आणि अंतर्ज्ञान.

नुसत्या पुस्तकीज्ञानानें आणि बौद्धिक प्रगतीनें चित्ताचें खरें समाधान कधींहि होणार नाहीं, ह्या सिद्धान्तावर स्वामींचा सर्वत्र विशेष कटाक्ष आहे. ज्ञानाचा झरा मनुष्याच्या हृदयांत असून त्याच्याशीं तद्रूप झाल्या-शिवाय, चित्तवृत्तींच्या लहरी आत्मसमुद्रांत लीन झाल्याशिवाय चित्ताला खरी शान्ति येऊं शकणार नाहीं. परंतु, मनुष्यांची जी सर्वांत मोठी चूक होते व त्यांना जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत बद्ध करून टाकण्याला जी कारणीभूत होते ती चूक हीच कीं, सुख हें बाह्य विषयांपासून उत्पन्न होतें, ज्ञान हें बाह्य जगापासून मिळतें, असा अज्ञानामुळें सर्वांना भ्रम होत असतो. भौतिक शास्त्रांची जगांत जी एवढी प्रगति झालेली आहे तिचेंहि कारण हेंच कीं, जगांतील वस्तूंच्या पृथक्करणापासून दिव्य ज्ञान प्राप्त होईल, कांहींतरी विलक्षण शोध लावतां येतील, अशी मनुष्यांची झालेली कल्पना होय. परंतु, वेदान्त प्रतिपादन करतो कीं, आत्मा हाच ज्ञानस्वरूप आहे, ज्ञान बाहेरून पैदा होतें, सुख बाह्य विषयांपासून उत्पन्न होतें, असा जीवांना नुसता भास उत्पन्न होतो व यामुळें आत्मविषयक ज्ञान संपादन करण्या-ऐवजीं ते बाह्य जगाचें निरीक्षण करूं लागतात; जड वस्तूंपासून शोध लावण्याचा प्रयत्न करतात. वास्तविक स्थिति अशी आहे कीं, एखादा मनुष्य एखादी वस्तु प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करूं लागतो, त्या वस्तूंच्या प्राप्तीसाठीं अहर्निश झटत असतो व ती प्राप्त झाली म्हणजे त्याचा जिव एकदांचा खालीं पडतो आणि त्याच्या चित्ताचें समाधान होतें. आतां या ठिकाणीं बाह्य विषय प्राप्त झाल्यामुळें आपल्याला सुख झालें, अशी त्याची कल्पना होते. परंतु वस्तु प्राप्त झाल्यानंतर त्याची वृत्ति, त्याच्या भाव-नेचा क्षोभ किंचित्काल नाहींसा होतो व ही चित्तवृत्ति नाहींशी होणें, हेंच वास्तविक सुख होय. जगांत ज्या ज्या ठिकाणीं जीवांना सुखाचा प्रत्यय येतो, आनंदाचा अनुभव मिळतो, त्या त्या ठिकाणीं वृत्तीचा निरास,

वृत्तींच्या लहरींचें चैतन्यसमुद्राशीं तद्रूप होणें हीच वास्तविक स्थिति होते. हेंच सुखाचें खरें उगमस्थान होय. निद्रेमध्यें जीवांना जो सुखाचा प्रत्यय येतो त्या ठिकाणीं तर बाहेरचे कोणतेहि विषय नसतात, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु त्या ठिकाणीं सुख होतें व तें सुख जीवांना अनुभूत होणाऱ्या सर्व सुखांमध्यें श्रेष्ठ आहे, ही गोष्ट कोणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं. यावरून सर्व सुख आत्म्यापासून होतें असें कबूल करावें लागतें. सुखासंबंधानें जी गोष्ट तीच ज्ञानासंबंधानेंहि आहे. आत्मा हा ज्ञानस्वरूपी आहे, व बाह्य वस्तु, बाह्य विषय हे केवळ निमित्त होय. वृत्तीची लहर आत्मसमुद्रांत मुरली गेली म्हणजेच ज्ञानस्वरूप आत्म्याशीं तादात्म्य होतें. परंतु ज्ञान हें बाहेरून उत्पन्न होतें, असा मनुष्यांचा भ्रम अज्ञानामुळें कायमच राहतो. हा भ्रम नाहींसा व्हावा, सर्व सुख आणि सर्व ज्ञान आपल्याला प्राप्त व्हावें असें ज्याला वाटत असेल त्यानें आत्मज्ञान संपादन केलें पाहिजे, असा स्वामींच्या उपदेशांतील निष्कर्ष आहे व हें तत्त्व निरनिराळ्या तऱ्हेनें स्वामींनीं लोकांना पटवून दिलें आहे.

'हिंदुस्थानांतील प्राचीनकालचें अध्यात्मज्ञान' या विषयावर स्वामींनीं दिलेल्या व्याख्यानांत खरें ज्ञान ह्मणजे काय, ह्या मुद्यासंबंधानें पुढील उद्गार काढले आहेत. स्वामी ह्मणतातः—"ज्ञान संपादन करण्याचे दोन मार्ग आहेत. पहिला मार्ग म्हणजे पुस्तकीज्ञान मोठ्या प्रयासानें डोक्यांत कोंबणें, भूगर्भशास्त्र, ज्योतिषशास्त्र, धर्मशास्त्र, भाषाशास्त्र वगैरे अनेक विषयांवरील पुष्कळशा निरर्थक, निरुपयोगी, किंवा अव्यवहार्य अशा भाराभर कल्पना मेंदूमध्यें भरून ठेवणें, हा एक मार्ग होय. अशा रीतीनें मुळींच ज्ञान उत्पन्न होत नाहीं, असें म्हणण्याचा माझा हेतु नाहीं. परंतु, हे भाग्यवानांनों ! खरें ज्ञान प्राप्त करून घेण्याचा व तें अंगीं मुरविण्याचा दुसरा एक मार्ग आहे. अंतःकरणांतून कुवासना काढून तें एखाद्या आरशाप्रमाणें स्वच्छ आणि निर्मल करणें हा तो मार्ग होय. पुस्तकीज्ञान डोक्यांत कोंबणें हा ज्ञानाचा खरा मार्ग नसून चित्त शुद्ध करून आंतील ज्ञान प्रगट करणें, हाच खरा मार्ग होय. ज्या विचारांच्या योगानें अंतःकरणांतील स्वयंभूज्ञान आविष्कृत होण्यास मदत होईल, विश्वांतील चैतन्याशीं आमच्या हृदयाचें पूर्णपणें तादात्म्य होईल, असलें ज्ञान संपा-

दन करणें म्हणजेच खरें ज्ञान, व असल्या शुद्ध आणि पवित्र भावनांशीं तद्रूप होणें, सर्वत्र आपण आहों, याचा प्रत्यक्ष अनुभव घेणें, हीच ज्ञानाची वास्तविक पद्धति होय." शिक्षणासंबंधानें दुसऱ्या एका ठिकाणीं स्वामींनीं असे उद्गार काढले आहेत कीं, "खऱ्या शिक्षणाचें मुख्य ध्येय लोकांनीं जरूर आणि योग्य अशा सर्व गोष्टी प्रत्यक्ष करून दाखवाव्या एवढेंच नाहीं; तर खऱ्या गोष्टींचें—खऱ्या तत्त्वांचें रहस्य त्यांना समजावें, त्यांतील आनंदाचा त्यांना अनुभव घेतां यावा हें आहे. नुसता एकसारखा उद्योग करीत राहणें, अश्रान्त—अविरत परिश्रम करीत राहाणें हें खरें प्राप्तव्य नसून उद्योगतत्परतेसंबंधाचें खरें मर्म समजून प्रेमानें उद्योग कसा करावा, हें त्यांच्या लक्ष्यांत यावें, हें शिक्षणाचें अन्तिम होय." प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या ज्ञानापेक्षां पुस्तकीज्ञानाला शिक्षणक्रमांत अधिक महत्व दिलें जावें, हा शिक्षणक्रमांतील—आधुनिक शिक्षणक्रमांतील मोठा दोष आहे, हें प्रतिपादन आपल्या इकडील शिक्षणपद्धतीला किती तंतोतंत लागू पडतें, हें विचारी मनुष्यांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहाणार नाहीं.

## इच्छा आणि पुनर्जन्म यांचा संबंध.

विषयेंद्रियसंयोगापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाकडे जीवांची सहज प्रवृत्ति असते. आपल्या वास्तविक स्वरूपाची—परमात्मस्वरूपाची त्यांची ओळख बुजली गेल्यामुळें विषयोपभोगासाठीं त्यांची नेहमीं तळमळ चाललेली असते. आपल्या पारमार्थिक सत्य स्वरूपाचा विसर आणि केवळ भासमय—असत्य अशा विषयांच्या प्राप्तीची तहान हा सर्व जीवांच्या अज्ञानाचा परिणाम आहे व हें अज्ञान जीवांना जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत—संसारांत भ्रमण करावयास लावीत असतें. या जगांतील सर्व वस्तु नश्वर आणि क्षणभंगुर आहेत, असें प्रत्यक्ष दिसत असूनहि मनुष्याला विषयांबद्दल वैराग्य उत्पन्न होत नाहीं. आपल्या भोंवती हजारों लोक मरत असूनहि आपण अमर आहों, अशा कल्पनेच्या जोरावर त्याचे सर्व व्यवहार चाललेले असतात. संसारांतील दुःखें, आपत्ति यांच्या योगानें मनुष्य गांजला जात असून—पोळला जात असून संसार हा दुःखमय आहे, याची जाणीव त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होत नाहीं. याचें कारण मनुष्याचें अज्ञान होय. हें अज्ञान नाहींसें व्हावें व मुमुक्षु दुःखांच्या आणि जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून

आपण मुक्त व्हावें, अशी ज्याला इच्छा असेल त्यानें ईश्वरी साक्षात्कार—आत्मानुभव करून घेतला पाहिजे. व आत्मस्वरूपाचा बोध व्हावा अशी ज्याला इच्छा असेल त्यानें निष्काम, निस्पृह, निरिच्छ बनण्याचा अभ्यास केला पाहिजे. आपणांस राजाची भेट घ्यावयाची असली तर भिकाऱ्याचा वेष टाकून उंची पोषाख अंगावर चढवला पाहिजे. त्याचप्रमाणें परमेश्वराची प्राप्ति व्हावी असें ज्याला वाटत असेल, त्यानें निष्कामतेच्या पोषाखांत त्याला भेटावयास गेलें पाहिजे. तरच त्याची भेट होईल, एरवीं होणार नाहीं. विषयांबद्दल विरक्ति उत्पन्न होऊन कामनांचा—विषयेच्छेचा सर्वस्वी त्याग झाल्याशिवाय आत्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं. हें तत्त्व 'पुनर्जन्म आणि कौटुंबिक संबंध' या व्याख्यानांत स्वामींनीं प्रतिपादन केलें आहे. तसेंच ख्रिस्ती लोकांची 'स्वर्गा'ची कल्पना कशी चुकलेली आहे हें सांगून खरा 'स्वर्ग' म्हणजे आत्मसाक्षात्कार होय, ही गोष्ट बायबलमधील निरनिराळ्या वाक्यांवरून स्वामींनीं सिद्ध केली आहे.

## मालकीची कल्पना.

व्यवहारदृष्टीनें ज्याला आपण ज्ञान किंवा चातुर्य अशीं गौरवाचीं नांवें देतों तेंच पारमार्थिक दृष्टीनें अज्ञान, किंवा खुळेपणा आहे असें ह्मणावें लागतें. संग्रहाची—मालकीची कल्पना ही अज्ञापैकींच आहे. ममत्वाच्या कल्पनेची उत्पत्ति अहंकारापासून—देहाभिमानापासून आहे. 'मी देह' या अज्ञानामुळें जगांतील वस्तु आपल्या ताब्यांत असाव्या, हरप्रयत्नानें त्यांचा आपण संग्रह करावा, त्या सदोदित आपणांपाशीं असाव्या, त्यांचा आपला वियोग कधींहि होऊं नये, ही संग्रहाची—मालकीची बुद्धि मनुष्याच्या ठिकाणीं उत्पन्न होते. सुख हें बाह्य विषयांत आहे, असा भ्रम मनुष्याला होतो व यामुळें बाह्य विषयांच्या प्राप्तीसाठीं त्याचें अंतःकरण तळमळत असतें. सुखाच्या संबंधाची ही जी चुकीची भ्रामक कल्पना ती मनुष्याला खरें सुख कसें मिळूं देणार ? 'सुख सुख म्हणतां हें दुःख ठाकोनि आलें' हाच कडू अनुभव आपल्या वांट्याला येत असल्याचें आपण प्रत्यहीं पहात नाहीं काय ? अज्ञानजन्य भ्रमांतून खऱ्या सुखाची उत्पत्ति कशी होणार ? भ्रमांतून नेहमीं भ्रमाचीच उत्पत्ति व्हावयाची व हाच प्रत्यय मनुष्याला विषयांपासून परिणामीं येतो. खरें सुख हें संग्रहांत नसून दानांत-

त्यागांत आहे, एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष मोक्षहि त्यागानेंच प्राप्त होतो. असा श्रुतीचा सिद्धान्त आहे. सारांश, शाश्वत आणि आत्यन्तिक सुखाची अपेक्षा करणाऱ्या मनुष्यांनीं अशाश्वत वस्तूंच्या संग्रहाची–ममत्वाची कल्पना आपल्या बुद्धींतून काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हें तत्त्व स्वामींनीं प्रतिपादन केलें आहे. या मुद्यासंबंधानें खुलासेवार स्पष्टीकरण पुढील भागांत येणार आहे व त्याकडे वाचकांनीं विशेष लक्ष द्यावें.

## वैराग्याची संवय आणि शक्तीचा ऱ्हास.

मनुष्याला जीवनकलहांत जे अनेक तऱ्हेचे व्यापार करावे लागतात त्यांच्या योगानें मनुष्याच्या बुद्धीला ताण बसतो; दुःख, चिंता, उद्वेग, आणि निराशा वगैरे अनेक विकारांचा पगडा त्याच्या मनावर बसून मनाची शक्ति क्षीण होते व जीवनशक्तीचा ऱ्हास होत जातो. हा ऱ्हास कसा टाळावा, व बुद्धीला विश्रांति कशी द्यावी, हा प्रश्न आहे. यावर स्वामी म्हणतात कीं, वैराग्याची संवय लावून घेतल्यानें, देहाभिमानाचा निरास करीत गेल्यानें व सर्व ऐहिक विषय मिथ्या आहेत, जग हा आपल्या कल्पनेचा केवळ खेळ आहे, आपलें स्वरूप ह्या सर्व मायामय बाजाराच्या पलीकडे आहे, याचें नेहमीं चिंतन करीत गेल्यानें आपल्या शक्तीचा होत असलेला ऱ्हास टाळतां येणें शक्य आहे. व अशा तऱ्हेनें अभ्यास करणाराला स्वामींच्या प्रतिपादनांतील रहस्य समजून आल्याशिवाय राहणार नाहीं. आपला देह म्हणजेच आपलें खरें स्वरूप आहे, आपले जगांतील सर्व ऐहिक संबंध हे सत्य व शाश्वत आहेत, इंद्रियगोचर होणाऱ्या या जगाला आणि त्यांतील विषयांना पारमार्थिक सत्यता आहे, अशा कल्पनेमुळेंच आपण आपलीं दुःखें निर्माण करतों व ऐहिक चिंतेच्या जाळ्यांत आपणांस गुरफटून घेतों. आपल्या वास्तविक स्वरूपाचें आणि जगाच्या मायामयत्वाचें अहर्निश चिंतन करण्याचा अभ्यास करीत गेलें असतां आपल्या सर्व क्रिया, आपले सर्व व्यापार लीलेनें आणि स्वाभाविक रीतीनें होऊं लागतील व त्यामुळें आपल्या शक्तीचा होत असलेला ऱ्हास, विनाकारण होणारा अपव्यय वैराग्याच्या अभ्यासानें आपल्याला बंद करतां येईल, हा स्वामींच्या प्रतिपादनांतील आशय आहे.

## विवाहसंबंध व आत्मसाक्षात्कार.

सामान्यतः लोकांचा असा एक गैरसमज होऊन गेलेला असतो कीं, प्रपंचांत राहून परमार्थ साधतां येणें शक्य नाहीं; ज्याला आत्मज्ञान संपादन करावयाचें असेल त्यानें संसारावर लाथ मारून, बायकामुलांचे, आप्तेष्टांचे सर्व पाश तोडून टाकून बैरागी बनून अरण्यवास पत्करला पाहिजे! परंतु हा समज किती आणि कसा चुकीचा आहे, हें स्वामींनीं प्रतिपादन केलें आहे. प्रपंचांत राहून परमार्थ साधतां येतो, त्यासाठीं बायकापोरांचा त्याग करून अंगाला राख फांसून रानांत जाण्याची आवश्यकताच आहे असें नाहीं; कारण, वेदान्त ज्या त्यागाचा उपदेश करतो तो त्याग म्हणजे प्रत्यक्ष विषय टाकणें नव्हे, बाह्य विषय टाकणें हें कांहीं खरें वैराग्य नव्हे. वैराग्य याचा अर्थ चित्त वासनारहित होणें, विषय हे दुःखरूप आणि मिथ्या आहेत, या प्रत्ययाच्या योगानें मन विषयांपासून परावृत्त होणें, विषयासक्तीचें बीज नाहींसें होणें. प्रत्यक्ष विषयत्याग करून मनांतील विषयप्रीति नाहींशी झाली नाहीं तर त्यांत अर्थ काय? व याला वैराग्य असें कसें म्हणतां येईल? खरें वैराग्य म्हणजे काय, हें योगवासिष्ठांतील चूडाला आणि शिखिध्वज यांच्या कथानकावरून चांगलें दिसून येण्यासारखें आहे. चित्त निर्वासन होणें आणि विषयांचा वरकरणीं हट्टानें त्याग करणें, यांत महदंतर आहे. विवाहित स्थितींत राहूनहि स्त्रीपुरुषांना आपला उद्धार करून घेतां येतो; कारण अध्यात्मज्ञान व विवाहसंबंध यांचा वास्तविक विरोध असण्याचें कारण नाहीं. विवाहसंबंधाचें खरें मर्म समजून त्यासंबंधाचा योग्य उपयोग करून घेतला असतां व विवेकबुद्धि जागृत ठेविली असतां आत्मोन्नतीला अडथळा—व्यत्यय म्हणून वाटणारा विवाह स्त्रीपुरुषांच्या अध्यात्मिक प्रगतीला सहाय्यकारक होतो, व अशा रीतीनें वागलें असतां अविवाहित स्थितीपेक्षां विवाहित स्थितीमध्यें आत्मसाक्षात्कार ज्यास्त सुलभ रीतीनें होणें शक्य आहे, वगैरे गोष्टींचें स्पष्टीकरण स्वामींनीं केलें असून तें सर्वांनीं लक्ष्यांत बाळगण्यासारखें आहे.

## हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व कशांत आहे?

प्रत्येक धर्मांत तत्त्वज्ञान, कर्मकांड आणि पुराणें अशीं तीन अंगें असतात व या तिन्ही अंगांचें अधिकारभेदानें महत्त्व आहे. धर्म म्हटला

म्हणजे त्यानें निरनिराळ्या दर्जांच्या आणि अधिकाराच्या मनुष्यांसाठीं भिन्न भिन्न मार्ग आंखून दिले पाहिजेत. सर्वांना एकाच मार्गाचा अवलंब करण्याचा उपदेश करणारा धर्म सर्वसंमत होणें कधींहि शक्य नाहीं. व हिंदुधर्माचा विशेष हा आहे कीं, तो अधिकारभेदानुसार भिन्न भिन्न मार्गांनीं सर्वांना एकाच ध्येयाकडे क्रमाक्रमानें नेऊन पोहोंचवितो. तत्त्वज्ञान, कर्मकांड, व पुराणें या तिन्ही अंगांचा हिंदुधर्मग्रंथांमध्यें योग्य आणि सुसंबद्ध मिलाफ झालेला आहे, हा आमच्या धर्माच्या अनेक विशेषांपैकीं एक विशेष आहे, ही गोष्ट स्वामींनीं नमूद केली आहे. तसेंच या तीन अंगांमध्यें पुराणांना स्वामींनीं किती उच्च दर्जाचें स्थान दिलें आहे, हें विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. आमचीं पुराणें म्हणजे दंतकथा किंवा भाकडकथा होत, असा अलीकडील पाश्चात्य शिक्षणाच्या अर्ध्या हळकुडानें पिंवळे झालेल्या शिक्षितांचा समज झाला होता. व हा समज किंवा गैरसमज हळुहळू जरी कमी होत चालला असला तरी तो अजिबात नष्ट झाला आहे, असें म्हणतां येत नाहीं. पुराणें हीं तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त सोदाहरण प्रतिपादन करणारीं अर्थात् तत्त्वज्ञानाचीं आदर्शभूत होत. अशा पुराणांतील कित्येक कल्पनांमध्यें किती गूढार्थ भरलेला आहे, याचें दिग्दर्शन स्वामींनीं केलें आहे. आमच्या पुराणांना भाकडकथा म्हणणारांनीं स्वामींनीं दर्शविलेल्या दृष्टीनें पुराणांचें अध्ययन केल्यास त्यांना आपलें मत बदलावें लागेल, यांत बिलकुल शंका नाहीं.



# रामसुधा

सर्व जगाशीं ज्याचें तादात्म्य झालें आहे त्याच्याबरोबर सर्व जग चाललेंच पाहिजे.

जगांतील जड वस्तु मनुष्यांच्या इच्छांना आपल्याकडे निष्ठुरपणानें ओढून घेत असतात. मनुष्यांच्या मनावरील हें दडपण किंवा आकर्षण नाहींसें करून त्यांना स्वावलंबी करणें हें धर्माचें ध्येय आहे.

जेव्हां सर्वस्वाचा त्याग करावा तेव्हां सर्वस्वाची प्राप्ति होते. जें संपादन करण्याची आपल्या अंगीं पात्रता असते तें आपल्याला प्राप्त होतें.

शिक्षणाचें ध्येय स्वातंत्र्य हें आहे, दुसरें कोणतेंहि नाहीं. शिक्षणानें स्वाधीनता आणि स्वातंत्र्य ( मोक्ष ) यांची प्राप्ति होत नसेल तर असल्या शिक्षणाला घेऊन काय चाटावयाचें आहे ? शिक्षणाला बद्धता उत्पन्न होत असेल तर असल्या शिक्षणाचा उपयोग काय ?

पुस्तकें वाचून त्यांतील ज्ञान संपादन करणें हें निराळें आणि सत्तत्त्व जाणणें हें निराळें. जगांतील सर्व धर्मग्रंथांचीं पारायणें तुम्हीं केलींत तरी तेवढ्यानें तुम्हांला परमार्थ प्राप्त झाला असें होणार नाहीं.

दुसरे लोक आपल्या मदतीला येतील, अशा भरंवशावर बसूं नका. फक्त आपल्या स्वतःवर अवलंबून राहा; दुसऱ्या कशावरहि विसंबून बसूं नका. कसलीच अपेक्षा करूं नका. 'भिक्षां देहि' करूं नका. परावलंबी बनूं नका.

# पारिभाषिक शब्दकोश. ( वर्णानुक्रमाप्रमाणें. )

## चरित्राची रूपरेखा आणि प्रस्तावना.

| मराठी पारिभाषिक शब्द. | मूळ इंग्रजी शब्द. |
|---|---|
| अध्यापक | प्रोफेसर |
| आत्मिक आकर्षण | स्पिरीचुअल ॲफिनिटी |
| अनुवंशिकतेचा नियम किंवा तत्त्व | लॉ ऑफ् हेरिडिटी |
| आलंब ( यंत्रशास्त्र ) | फलक्रम |
| उज्ज ( वायु ) | हायड्रोजन |
| उष्णमानमापक | थर्मामिटर |
| कप्पा | पुली |
| कर्ब ( वायु ) | कार्बन |
| कर्ब द्विप्राणिल | कार्बन डायॉक्साइड |
| कल्प | क्लब |
| कसनळी | टेस्ट ट्यूब |
| काटकसरीचा नियम किंवा तत्त्व | लॉ ऑफ पार्सिमनी |
| गतिवृद्धि | ॲक्सिलरेशन |
| चौथरा | प्लॅटफॉर्म |
| जड पदार्थांचें अविनाशित्व | इन् डिस्ट्रिक्टिबिलिटी ऑफ मॅटर |
| दर्शिका | टिकेट |

| मराठी पारिभाषिक शब्द. | मूळ इंग्रजी शब्द. |
|---|---|
| दाहक सोडाक्षार | कॉस्टिक सोडा |
| न्याय | सिऑलिझम् |
| न्यायसभा | पार्लमेन्ट |
| प्रकाश लेख | फोटोग्राफ, फोटो |
| प्रकाश-लेखक | फोटोग्राफर |
| प्रतिज्ञा | प्रॉमिस |
| प्रवर्तन ( विद्युच्छास्त्र ) | इन्डक्शन |
| प्रवेश परीक्षा | एन्ट्रन्स एक्झॅमिनेशन |
| प्राण ( वायु ) | ऑक्सिजन |
| प्रेरणासातत्य | पर्सिस्टन्स ऑफ् फोर्स |
| मध्यम परीक्षा | मिडल एक्झॅमिनेशन |
| महा विद्यालय | कॉलेज |
| मूर्च्छनाशास्त्र | हिप्नाटिझम |
| वहन ( विद्युच्छास्त्र ) | कन्डक्शन |
| वायुभारमापक | बॅरोमिटर |
| विचारसाहचर्य | लॉ ऑफ ॲसोसिएशन |
| विश्राम, निवास | स्टेशन |
| विश्रामाधिकारी | स्टेशनमास्तर |

| मराठी पारिभाषिक शब्द. | मूळ इंग्रजी शब्द. | मराठी पारिभाषिक शब्द. | मूळ इंग्रजी शब्द. |
|---|---|---|---|
| शक्तीचें प्रकृतिनित्यत्व | कॉन्झर्व्हेशन ऑफ एनर्जी | कणांमधील एकमेकांस विकटून बसण्याची शक्ति.) | कोहिजन |
| सनदी नोकर | सिव्हिल सर्विस | स्थितिसातत्य | इनर्शिआ |
| सूचना, संस्कार | सजेस्शन | स्नेहाकर्षण | केमिकल ॲफिनिटी |
| संसक्त्याकर्षण ( पदार्थांच्या | | | |

---

## स्वामी रामतीर्थांचे समग्र ग्रंथ, खण्ड १ ला.

| | | | |
|---|---|---|---|
| आगामी न्याय | इन्डाटिव्ह लॉजिक | ब्रम्हविद्येचे अध्यापक | थिऑसफिकल टीचर्स |
| आंग्ल–आर्य | ॲंग्लो-इंडियन | भूमिका | प्लेन |
| ऋण | नेगेटिव्ह | भौतिकेतर | मेटॅफिजिकल |
| गडगडणारा उषःकाल | थंडरिंग डॉन | मज्जातंतुजाल | नर्व्हस सिस्टिम |
| गृहीत प्रमाण | पॉस्च्युलेट | मूत्रपिंड | किडनी |
| गोलक | सेल | विद्युद्दीप | इलेक्ट्रिक लॅम्प |
| ग्रंथिक ताप | ब्युबॉनिक प्लेग | वेदान्त समतावाद | वेदान्तसोशिॲलिझम |
| जीवशक्ति, जीवनशक्ति | व्हॅयटॅलिटी | व्यक्तिस्वातंत्र्यवाद | इन्डिव्हिजुॲलिझम |
| जुना करार | ओल्ड टेस्टॅमेन्ट | शरीररचनाशास्त्र | ॲनॉटमी |
| घन | पॉझिटिव्ह | शास्त्रीय शोधसदन | अकॅडेमी ऑफ् सायन्सेस |
| नवा करार | न्यू टेस्टमेन्ट | समभुज चतुष्कोण | स्क्वेअर |
| निगामी न्याय | डिडक्टिव्ह लॉजिक | समाजसत्तावाद | सोशिॲलिझम |
| न्यायसभा | पार्लमेन्ट | सिद्धगोष्ट | ॲक्शम |
| बुधग्रह | मर्क्युरी | सृष्टिशास्त्रवेत्ता | नॅचरॅलिस्ट |
| ब्रम्हविद्या | थिऑसफी | स्नायु | मसल |
| ब्रम्हविद्यामंडळ | थिऑसफिकल सोसायटी | | |





# स्वामीरामतीर्थ यांचे समग्र ग्रंथ

## वेदान्त

( हर्मेटिक ब्रदरहुडपुढें तारीख २४ डिसेंबर
१९०२ रोजीं दिलेलें व्याख्यान. )



आजच्या व्याख्यानाला आरंभ होण्याला थोडा उशीर लागला, याचें कारण राम हा सान्फ्रान्सिस्को येथील तुरुंग पाहण्याला गेला होता, हें होय.

सदरहू तुरुंग पाहून परत आल्यावर रामाला विचारण्यांत आलें कीं, "आपल्याला तुरुंग पाहून कसें काय वाटलें ?" रामानें उत्तर दिलें, "फार उत्तम वाटलें." तुरुंग पाहून आनंद वाटणें, हें लोकांना मोठें विलक्षण दिसेल खरें; पण जगांतील कोणतीहि वस्तु पाहून रामाच्या मनांत आनंदाशिवाय कोणताच विचार येत नाहीं. *मोझेसच्या पुस्तकांत असें

---

* मोझेस हा खिस्ती शकाच्या १५०० वर्षीपूर्वी होऊन गेला. हा ज्यू लोकांचा विधिस्थापक किंवा स्मृतिकार होय. ज्यू लोकांच्या भविष्यवाद्यांतहि ह्याची गणना होते. इजिप्त देशांत गुलामगिरींत राबत असलेल्या ज्यू लोकांना यानेंच गुलामगिरींतून सोडविलें. बायबलाच्या जुन्या करारांतील पहिलीं पांच

लिहिलें आहे कीं, ईश्वरानें जगत् निर्माण केलें; आणि त्यांतील प्रत्येक वस्तूंत सौंदर्य आणि उदात्तपणा भरलेला आहे, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. सृष्ट्युत्पत्तीसंबंधाच्या पुस्तकांतहि असाच मजकूर आहे. " ईश्वरा ! तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व घडूं दे " असें बायबलामध्यें एक वाक्य आहे. पण वेदान्तदृष्टि याच्या पलीकडे जाऊन पोहोंचते. ' जें सर्व कांहीं घडत आहे तें माझ्या सत्तेनें, ' असें हिंदू म्हणतात.

पति आणि पत्नी यांच्यामध्यें प्रेमाचा पूर्ण विकास झाला, व दोघांची तादात्म्यवृत्ति झाली म्हणजे पत्नीचे सहज असेच उद्गार निघणार कीं, ' माझ्या इच्छेनुसार सर्व कांहीं होत आहे. ' ' आपल्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं होवो, ' अशी तदनंतर पतीची प्रार्थना करण्याचें तिला कारण उरत नाहीं; कारण, आपण दोन नसून एक आहों, अशी तिची भावना झालेली असते. आतां अशी भावना होण्यासाठीं तिला पतीच्या अंकित राहून त्याचें प्रेम संपादन करण्याचा दृढ अभ्यास करावा लागतो, हें खरें. पण एकदा का ही स्थिति प्राप्त झाली आणि प्रेमरज्जूच्या दृढ बंधनांनीं दोघांची अंतःकरणें एकवटून गेलीं कीं, पतीची सर्व कृति म्हणजे आपलीच कृति, अशा एकतानतेच्या पदवीला ती जाऊन पोहोंचते.

## ज्ञानी मनुष्याची स्थिति.

वेदान्ती मनुष्य याच न्यायानें चराचरांतील सर्व वस्तु आनंदमय पाहतो. ज्ञानी मनुष्याची स्थिति अशा प्रकारची असते:—

( भुजंगप्रयात. )

शिलाभित्ति होती न त्यां बंदिशाला
न लोहार्गला पंजरप्राय त्यांला ॥
मनें शुद्ध सत्वाब्धि ज्यांचीं गभीर
तयां दोन्हि हीं शान्तिदायी कुटीर ॥ १ ॥

## ज्ञानी व अज्ञानी यांची तुलना.

परंतु अज्ञानी लोकांना हें तत्त्व मुळींच समजत नाहीं. ज्यांना आत्म-

---

पुस्तकें यानें लिहिलीं. ह्या पुस्तकांचीं नांवें हीं आहेत:—१ उत्पत्ति, २ निर्गम, ३ लेवीय, ४ गणना, ५ अनुवाद.

ज्ञान नाहीं, व ज्यांच्या बुद्धीवर अहंकार आणि ममत्व यांचा पूर्णपणें पगडा बसलेला असतो, असले मूर्ख आणि अप्रबुद्ध लोक आपले राजवाडे आणि किल्ले यांनाहि तुरुंग, स्मशान, किंवा नरक यांच्यापेक्षांहि जास्त भयंकर करून सोडतात. नीच आणि क्षुद्र महत्त्वाकांक्षा, विषयसुखलालसा, काल्पनिक भीति, आणि मनाची संशयवृत्ति वगैरे विचारांच्या शृंखलांत ते आपण होऊन स्वतःला बद्ध करून घेतात. वेदान्त सांगतो कीं, ऐहिक कामनांच्या जाळ्यांत न अडकतां आत्मसुख संपादन करणें, एवढेंच आपलें इतिकर्तव्य आहे. तत्त्वज्ञान करून घ्या म्हणजे तुम्ही मुक्तच आहां.

वेदान्तज्ञानाचा अनुभव ही दुर्लभ वस्तु आहे. विशेषतः अमेरिका व युरोप ह्या देशांतील लोकांना तर ती जास्तच दुर्लभ आहे. कारण, इकडील बहुजनसमाजाची अशी समजूत आहे कीं, आपणांमध्यें ईश्वरत्व आणावयाचें—उत्पन्न करावयाचें आहे. परंतु ही कल्पना अगदीं भ्रामक आहे. वेदान्ताचा ठाम सिद्धान्त असा आहे कीं, * आपण नेहमीं ईश्वर आहों, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं. व ईश्वरत्व आपणांमध्यें उत्पन्न करावयाचें नसून तें फक्त अनुभूत करून घ्यावयाचें आहे; तें व्यवहारांत आणावयाचें-वापरण्यास शिकावयाचें-आहे.

समजा कीं, एका मनुष्याच्या घरांत पुरून ठेवलेलें पुष्कळ द्रव्य आहे. दुसरा एक मनुष्य आहे, त्याच्यापाशीं असें द्रव्य बिलकूल नाहीं. ते दोघेहि गृहस्थ आपापलीं घरें उकरूं लागले. आतां, ज्यानें द्रव्य पुरून ठेविलें होतें त्याला जरी त्याची विस्मृति झाली असली तरी प्रयत्नांतीं तें त्याच्या हातीं लागण्याचा संभव आहे. पण ज्याच्यापाशीं धनसंचय केलेला नाहीं, त्यानें घर पुष्कळ उकरून पाहिलें तरी त्याचा उपयोग काय होणार ! वेदान्त म्हणतो कीं, जें ज्ञाननिधान तुम्हांला पाहिजे तें तुमच्यापाशीं आहे. मग कंजूष आणि दरिद्री असे कां राहतां ! तें बाहेरून कोठून पैदा करावयाचें नाहीं, तें फक्त बाहेर काढून त्याचा उपयोग करावयाचा आहे.

## आत्म्याचें नित्य, शुद्ध, बुद्ध स्वरूप.

आपला आत्मा स्वभावतःच पापानें लिप्त आणि मलिन आहे, हें विधान निःसंशय चुकीचें आहे. आपली उन्नति किंवा अधोगति दुसऱ्यांच्या पाप-

* चिदानंदरूपः शिवोऽहं शिवोऽहं. ( श्रीशंकराचार्यकृत निर्वाणषट्क. )

घुण्यावर कधींच अवलंबून नाहीं. आपण एखादा फळा घेऊन तो खूप घांसून पुसून काढला तरी तो कधींतरी पारदर्शक होईल काय ? अर्थात् नाहीं. पण तोच एखादा कांचेचा आरसा घ्या, तो धुळीनें कितीहि मलिन झालेला असो, त्याला साफ पुसतांच तो पारदर्शक बनतो. आतां, वास्तविक या ठिकाणीं आपल्या प्रयत्नानें आरसा पारदर्शक बनला, असें म्हणतां येत नाहीं. कारण, तो मुळांतच तसा आहे. तर फक्त आरशाचा पारदर्शकपणा व्यक्त झाला—आविष्कृत झाला, असेंच म्हटलें पाहिजे. परंतु फळ्यामध्यें पारदर्शकता हा गुण मूळचा नसल्यामुळें प्रयत्नांचा त्या ठिकाणीं कांहीं उपयोग होऊं शकत नाहीं. प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत पूर्णपणें बिंबलेली जी नैसर्गिक श्रद्धा, कीं, आत्यान्तिक श्रेय आपल्याला प्राप्त होणें शक्य आहे, त्यावरून आत्म्याचें निष्कलंकत्व आणि निर्लिप्तत्व तत्त्वतः सिद्ध होतें. तात्पर्य, आत्मा हा तत्त्वदृष्टया पूर्णपणें अविकार्य असून बाह्य उपाधींनीं मलिन किंवा लिप्त झाल्यासारखा भासतो इतकेंच. स्वभावतः आत्मा वरील दृष्टांतांतील फळ्यासारखा नसून कांचेच्या आरशासारखा स्वच्छ आहे, व ही गोष्ट सर्वांच्या अंतःकरणश्रद्धेवरून निखालस ठरत आहे; आणि यावरून आत्मा हा स्वभावतःच पापानें लिप्त आहे, हा सिद्धान्त अस्वाभाविक, अतएव खोटा आहे, हें उघड दिसतें.

मनुष्य स्वभावतःच ईश्वर आहे. तसें नसतें तर जगांत अवतारी विभूति—सत्पुरुष कधींहि अवतीर्ण झाले नसते. म्हणून राम म्हणतो, " भिऊं नका, धीर धरून पुढें या, आपलें सर्व सामर्थ्य आणि उत्साह एकवटून ' अहं ब्रह्मास्मि ' हा जो आपला जन्मादारभ्य हक्क, तो बजावण्यास सिद्ध व्हा. भिऊं नका, घाबरूं नका. "

मोझेस हा एकदां ( अरबस्थानांतील ) सिनाई पर्वतावर हिंडत असतां त्याला एका झुडुपामध्यें अग्नीची ज्वाळा दिसली. ती ज्वाळा पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. कारण, त्या ज्वाळेचा जरी प्रकाश दिसत होता तरी तें झुडूप त्या ज्वाळेनें जळत नव्हतें. " या ज्वाळेचा अर्थ तरी काय ? आणि ही या ठिकाणीं कां दिसत असावी ? " असा विचार त्याच्या मनांत आला. त्याबरोबर त्या झुडुपामधून ' मी तूंच आहें ' असा आवाज ऐकूं आला. हें शुद्ध मी म्हणजेच आत्मा होय.

## भेद कसे दिसतात ?

आत्म्याचें खरें स्वरूप स्वच्छ स्फटिकाप्रमाणें आहे. त्याच्या शेजारीं एखादी तांबडी वस्तु ठेवा म्हणजे तो तांबडा दिसूं लागतो, काळी ठेवा म्हणजे लगेच तो काळा दिसूं लागतो. अशा रीतीनें नजीक असलेल्या पदार्थांच्या रंगानुरूप त्याचे रंग पालटत जातात. पण त्याला स्वतःला रंग असा मुळींच नाहीं. तो केवळ वर्णरहित—सर्ववर्णातीत आहे. तो जशाचा तसा नित्य कायम आहे, त्यांत बदल म्हणून कधींच होत नाहीं. आत्म्याचें स्वरूपहि असेंच आहे. तो वर्णनातीत आहे. तो असा आहे आणि तसा आहे, असे कोणतेच शब्द त्याच्यासंबंधानें लागू पडत नाहींत.*

अशा शुद्ध आत्म्याजवळ एखादा काळा पदार्थ ठेवला असतां वरील दृष्टांतांतील विकार पावणाऱ्या स्फटिकाप्रमाणें तो काळ्या रंगाचा दिसूं लागतो. व पूर्वीं जें शुद्ध ' मी आहें ' असें स्वरूप होतें, त्या जागीं ' मी हिंदू आहें ' असा फरक भासमान होऊं लागतो. परंतु जरी असा भास झाला तरी स्फटिकाप्रमाणें आत्म्याच्या स्वरूपांत तत्त्वतः फेरबदल मुळींच झाला नाहीं. आत्म्याच्या शेजारीं पिंवळा पदार्थ ठेवला तर जेथें ' मी आहें ' हा शुद्ध भाव होता, तेथें ' मी अमेरिकन आहें ' असा भास होऊं लागतो. या आत्मस्फटिकाशेजारीं तांबडा पदार्थ ठेवला असतां ' मी आहें ' या शुद्ध स्वरूपाचें रूपांतर ' मी स्त्री आहें ' या अशुद्ध भावनेंत होतें. तसेंच दुसऱ्या एखाद्या रंगाचा परिणाम ' मी एम्. ए. आहें ' असा होतो. अशा रीतीनें ' मी ख्रिश्चन, ' ' मी इंग्लिशमन, ' ' मी हिंदू, ' तसेंच ' मी पुरुष, ' ' मी स्त्री, ' ' मी मूल, ' ' मी व्याघ्र, ' ' मी सिंह, ' वगैरे जे नानाविध विकार आपल्याला जगांत दृग्गोचर होतात, ते आत्म्यावर उपाधीनें आरोपित झाले आहेत. वास्तविक आत्मा हा नामरूपातीत, निष्कलंक, अविकार्य, नित्य, शुद्ध, बुद्ध असा आहे. ' ॐ, ' ' मी आहें ' हें त्याचें शुद्ध स्वरूप आहे, आणि वरील वाक्यांतील ' मी हिंदू आहें, ' ' मी मुसलमान आहें, ' ' मी ख्रिस्ती आहें ' वगैरे तऱ्हेचीं विधानें हीं शुद्ध आत्म्यावर केवळ आरोप असून अज्ञानमूलक, आर्थात् मिथ्या होत, हें निर्विवाद आहे.

* यतो वाचो निवर्तन्तेऽप्राप्य मनसा सह ॥ तैत्तिरीयोपनिषद्, अनुवाक ४.

आतां पूर्वीं निर्दिष्ट केलेल्या स्फटिकाच्या दृष्टांतामध्यें स्फटिकांत जे भिन्न भिन्न रंग दिसतात, ते रंग कांहीं त्या स्फटिकांत प्रविष्ट झालेले असतात असें नव्हे, तर ते रंग वास्तविक स्फटिकाला चिकटून बसलेले नसून फक्त त्यामध्यें प्रतिबिंबित झालेले असतात. स्फटिक स्वतः स्वच्छ, विकाररहित असतो तसा नेहमीं कायम असतो. ' मी ' ही भावना सर्व चराचरांत व्यापून राहिलेली आहे व हें सर्वव्यापी शुद्ध तत्त्व, ज्याला सर्व ' मी ' या नांवानें संबोधितात, तें शुद्ध स्वरूप म्हणजेच आत्मा. आत्म्यावर बाह्य उपाधीनें आरोपित झालेले हे जे विकार त्यांच्याशीं तादात्म्य करून घेण्याला आपल्याला अधिकार नाहीं. कारण, हे सर्व विकार असून ते एकामागून एक नित्य बदलत असतात. आपले हे सर्व क्षणभंगुर आकार—आपलीं हीं शरीरें—हें आत्म्याचें खरें स्वरूप खास नव्हे. प्रत्येकजण जन्मांतरीं केव्हां तरी ' मी व्याघ्र आहें, ' ' मी सिंह आहें ' अशा भावनांना चिकटून बसलेला असलाच पाहिजे. म्हणून आत्म्याचें जें त्रिकालाबाधित सत्य स्वरूप त्याचा अपरोक्ष साक्षात्कार करून घेऊन मुक्त व सुखी व्हा.

## आत्मा दिक्कालादिकांच्या अतीत आहे.

आत्मा हा दिक्कालादिकांनीं अनवच्छिन्न असून त्यांचा स्पर्शहि खऱ्या आत्म्याला होणें शक्य नाहीं. आपण कोणत्याहि शरिराच्या उपाधींत जन्मलों तरी त्याच्यामुळें आपलें आत्मत्व यत्किंचित्सुद्धां विकार पावत नाहीं. सर्व काल आपल्यामध्यें असल्यामुळें कोणताहि काल हा आत्म्याला ' आतांच ' असा वाटणार; आणि केवढेंहि अफाट अंतर असलें तरी त्याचा आत्मदृष्टीला ' या जागीं ' असाच प्रत्यय येणार. ' अहं ब्रह्मास्मि ' म्हणजेच शाश्वत सत्ता—अव्यय, सनातन सत्य होय. हा अनुभव, हा प्रत्यय, ही श्रद्धा " ॐ " या शब्दब्रह्मानें दर्शित केली जाते. फारसी भाषेंत ' ॐ ' शब्द ' ओ अम् ' असा येतो व त्याचा अर्थ ' मी तोच आहें, ' ' मी ब्रह्म आहें ' ( अहं ब्रह्मास्मि ) असाच आहे.

## सर्वत्र ईश्वर.

( शिखरिणी )

गमे नानारूपी चकित करणें हा तव पण ।

अहा प्रेमाधारा ! सहज तुज जाणें तरि पण ॥

जरी देवा ! मायामय विविधवेषांत लपसी ।
विभो ! चिद्रूपा ! तूं तरिहि मजसी शीघ्र कळसी ॥ १ ॥

विकासे सौंदर्यें युवति विमला पुष्पकलिका ।
रसाब्धे ! वर्धिष्णो ! विकसन तिचें तूंच नच का ? ॥
प्रवाहीं गंगेच्या प्रतिकर्णि तुझें रूप विमलीं ।
तुझी कृष्णा ! सारी कृति वसत ती पूर्ण कळली ॥ २ ॥

तसे जे कारंजे उडति गगनीं उद्धतगती ।
तयीं त्वद्रूपाचें सहज सुख घे हर्षित मती ॥
घनीं नानारूपीं दिससि मजसि केलिचतुरा ! ।
अहा ! लीलाकारा ! तव कृति कळे अंबुजधरा ! ॥ ३ ॥

तृणांचे गालीचे, वनिं सुमनमाला रुचिरशा ।
तयांमाजी दिव्या ! लपसि जणु तूं रत्नसदृशा ॥
सहस्र स्कंधांतें तरुवर धरी जेंवि सहज ।
समस्तां लीलेनें धरिसि हृदयीं, जाणित तुज ॥ ४ ॥

उषेच्या हास्याचें–रदनमणिचें तेज झळके ।
महाशैलागारीं मधुर नव कीं दीप चमके ॥
तुला तद्भावें मी नमित सखया हर्षितकरा ! ।
अहा हृत्कंजार्का ! कळुनि कृति ये संस्तुतिपरा ॥ ५ ॥

प्रभा ही त्वद्रूपा, रुचिर रविची व्योमिं भरली ।
जशी नीरीं बिंबासम छवि दिसे कीं उतरली ॥
क्रिया जी जी होते असिसि तिज तूं मूल जगतीं ।
गुरो हे विश्वाच्या ! कळत रमते ही मम मती ॥ ६ ॥

( शार्दूलविक्रीडित. )

कीं उच्चारित जीं अनंतवदनें तीं ईशनामें भलीं ।
ज्यांचा होउनियां प्रतिध्वनि दिशांमाजी घुमूं लागलीं ॥
तीं नामें, प्रतिनाद ते, ठसविती सारा तुझा भाव रे ।
जाणें मी तुज पूर्ण विश्वहृदया ! सर्वेश्वरा ! हे हरे ! ॥ ७ ॥

## भ्रमाचें स्वरूप हें.

राम आतां मोझेसविषयीं दोन शब्द सांगणार आहे.

मोझेस यानें झुडपामधून पूर्वी सांगितल्याप्रमाणें तो विचित्र ध्वनि ऐकला, तेव्हां तो आला असावा कोठून, असा विचार त्याच्या मनांत येत आहे, तोंच त्या झाडींतून एक सर्प फूत्कार करीत बाहेर आला. मोझेस हा तें पहातांच भयचकित झाला; त्याचें सर्व आंग लटलटां कांपूं लागलें; आणि त्याच्या छातींत धडकी भरली. त्याच्या शरीरांतील रक्त जागच्याजागीं गोठून जाण्यापर्यंत मजल आली. आपण आतां खास मरतों, असें त्याच्या मनानें घेतलें. इतक्यांत " भिऊं नको, त्या सर्पाला हातांत घट्ट पकड, जरा धैर्य धरून सर्पाला पकड म्हणजे झालें, " असे शब्द त्याच्या कानावर फिरून पडले. परंतु साप धरण्याचें धारिष्ट त्याच्यानें होईना. त्याच्या शरीराचा कंप मुळींच कमी होईना. पण त्यावर आणखी एकदा तसेच शब्द त्यानें ऐकले; तेव्हां छाती करून त्यानें सापाला पकडलें; व आश्चर्याची गोष्ट कीं, त्या सापाकडे तो पाहूं, लागला तों सर्पाऐवजीं एक सुबक काठी त्याच्या नजरेस पडली !

आतां बायबलामधील या गोष्टीचें रहस्य काय, इकडे आपण वळूं. वरील दृष्टांतामधील साप म्हणजे ' सत् ' होय. तुम्हांला माहीत असेल कीं, पौर्वात्य देशांत विशेषतः हिंदु लोकांत ' सत् ' याची कल्पना सापानें—शेषानें—दर्शित केली जाते. साप हा एकांत एक असें वेंटाळें करून आपलें शेंपूट तोंडांत धरून बसतो. विश्वांतील झाडून सर्व गति अशीच सर्पिल असते; व तिचीं दोन्ही टोंकें एकांत एक मिळत असतात. सर्व चराचरांत व्यापून राहिलेला हा सार्वत्रिक नियम आहे. आतां सापाला पकडणें याचा अर्थ, चराचराचा सत्ताधीश—सृष्टिनियमांचा नियंता जो परमेश्वर, तोच आपण होणें असा आहे.

## जसे जीव तसे देव.

आपण विश्वाचे नियंते आहांत, अशी मनाची भावना करून घ्या आणि परमात्म्याशीं एकतानवृत्तीनें रहा. मोझेस याला प्रथमारंभीं तसें करण्याचें धाडस होईना. अननुभूतत्वामुळें तसें करणें हें मोठें विचित्र आहे, अशी त्याची भावना झाली. गुलामगिरींत राबणाऱ्या एका जातींतील मोझेस हा होता.

प्राचीन काळीं यहुदी लोकांना अत्यंत निष्ठुरपणानें वागविलें जात असे. त्यांना स्वदेशांतून हांकून देण्यांत आलेलें असून जिकडे वाट फुटेल तिकडे भटकत फिरण्याचें त्यांच्या नशिबीं आलें होतें. अनेक तऱ्हेच्या जुलमाखालीं मान वांकविण्याची त्यांना पाळी येत असल्यामुळें त्यांच्या ईश्वरविषयक कल्पनाहि विलक्षण बनल्या होत्या. ईश्वर म्हणजे अनियंत्रित सत्ताधारी, जुलमी असा एक राजाच, अशी त्यांची भावना होणें, हें अगदीं नैसर्गिक होतें. जसे जिव तसे त्यांचे देव, हा ठरलेला नियम आहे. कांहीं बैल एकत्र जमून त्यांनीं आपली धर्मपरिषद् बनविली असें मानलें तर, त्यांची ईश्वराबद्दल काय कल्पना होईल ? ईश्वर हा एक मोठा प्रचंड आणि बलिष्ठ बैल—इतर सर्व बैलांना भीति उत्पन्न करणारा बैल—अशी त्यांची व्याख्या ठरेल, यांत संशय नाहीं. सिंहांनीं आपली परिषद् बोलाविली व ईश्वराबद्दल त्यांनीं वादविवाद चालविला तर एखाद्या भव्य, प्रचंड, सामर्थ्यवान् आणि अत्यंत क्रूर अशा सिंहाची कल्पना करण्यापलीकडे त्यांना ईश्वरासंबंधानें भावना करतां येणें अशक्य आहे. आपल्या शक्तीच्या पलीकडची कल्पना आपल्याला संभवेल तरी कशी ? जीवाला आपल्या शरीरकक्षेच्या पलीकडे उडी मारून जातां येईल काय ? अर्थात् नाहीं. ईश्वराची कल्पना निश्चित करण्याच्या हेतूनें सिंह जमा झाले, तर ते ईश्वराला एक विशाळ व भयंकर असा सिंहच बनवितील. भीतिग्रस्त मनुष्य ईश्वराचें वर्णन करूं लागले तर ईश्वर म्हणजे गुलामांना राबविणारा एक धनी—सवाई सोटा चालविणारा एक अंमलदार—आपल्याला शासन करणारा एक मालक, अशा कांहींतरी तऱ्हेचें ते व्याख्यान करतील. यहुदी लोकांनीं परमेश्वराचें एक मोठा, भव्य, व शक्तिमान् शास्ता, अशा प्रकारचें जें चित्र रेखाटलें आहे, तेंहि या विचारसरणीनें स्वाभाविक होय.

## यहुदी लोकांचा 'मालिक' उर्फ मालक.

पूर्वेकडील भाषांमध्यें आणि विशेषतः सेमिटिक भाषांमध्यें 'मालिक' हा ईश्वरवाची शब्द आढळतो. 'मालिक' म्हणजे मालक किंवा धनी. या शब्दाच्या व्युत्पत्तीसंबधानें थोडेंसें विवेचन या ठिकाणीं केलें असतां तें अस्थानीं होणार नाहीं. पूर्वी यहुदी लोकांत अनेक पंथ असत, व त्या प्रत्येक पंथाचा एकेक देव मानला जात असे. इस्रायलच्या पंथांतील लोक

आपल्या देवाला ' मॉलॉक् ' असें नांव देत. पुढें या निरनिराळ्या पंथां-मध्यें तंटेबखेडे व मारामाऱ्या सुरू होऊं लागल्या. व त्यांत इस्रायलच्या अनुयायांनीं इतर पंथांना चीत करून वर्चस्व मिळविलें. तेव्हां सहजच त्यांचा ' मॉलॉक् ' एकंदर सर्व यहुदी लोकांचा देव मानला जाण्याची वहि-वाट पडली. सेमिटिक लोकांत एकेश्वरी मत कसें स्थापलें गेलें, व त्या त्यांच्या एकेश्वराला 'मालिक' उर्फ मालक असें नांव कसें दिलें गेलें, याब-द्दलची उपपत्ति अशा प्रकारची आहे.

त्या काळांत एक अनियंत्रित शास्ता—गुलामांना राबविणारा धनी—हीच ईश्वरविषक ज्ञानाची परमावधि मानली गेली. आपल्या कल्याणाची परा-काष्ठेची सीमा हीच, असें त्यांना वाटे. या जगाच्या बुडाशीं अज्ञेयतत्त्व कोणतें आहे, याचा शोध करण्याचा यहुदी लोकांचा प्रयत्न इतक्या मज-लेवर येऊन ठेपला आणि त्यांच्या परिस्थितींत हें ध्येय योग्य ठरलें. पण यहुदी लोकांच्या वेळची परिस्थिति कांहीं आजमित्तीस कायम नाहीं, हें विसरतां कामा नये. एकसत्ताक राज्यपद्धति बहुतेक लोकांना सांप्रत नकोशी झाली असून लोकांना स्वराज्य पाहिजे आहे. अमेरिका, इंग्लंड या देशांतील लोकांना स्वातंत्र्य प्रिय आहे. इतरत्रहि तीच प्रवृत्ति दिसते. ईश्वरविषयक कल्पनांची जगांत प्रगति झाली आहे. प्रत्येक गोष्टींत पुढें पाऊल पडलें आहे. अशा स्थितींत जुन्या धर्मकल्पनांची मजल पुढें जावी, हें रास्तच होय. ईश्वर ही कोणीतरी सत्तीचें वर्चस्व गाजविणारी एक व्यक्ति आहे, या जुन्यापुराण्या कल्पनेला आतां चिकटून बसणें गैरशिस्त होय. मनुष्याच्या प्रगतीबरोबर आधुनिक कालांत ईश्वरविषयक कल्पनेचीहि प्रगति झाली पाहिजे. ' मी ईश्वर आहें ' ही वेदान्तप्रतिपादित, स्वातंत्र्य-पोषक व परमोच्च कल्पना असल्यामुळें जुन्या कल्पनेची परिणति या उदात्त कल्पनेंत आतां होणें प्रशस्त आहे. इंग्लंडांत एक काळ अनियंत्रित राज-सत्तेच्या अंमलाचा होता; पण क्रमाक्रमानें ती स्थिति पालटून राजसत्तेला आळा घालण्यांत आला. या न्यायानें जुलमी शास्ता असा जो ईश्वर, त्याची सर्व शक्ति काढून घेऊन आपल्या धार्मिक स्वातंत्र्याची ध्वजा उभारा.

## 'मी ईश्वर' ही वेदान्तकल्पना.

यहुदी लोक राजकीय गुलामगिरीच्या स्थितींत असल्यामुळें ईश्वर हा

आपला जुलमी धनी असून तो आपणांहून भिन्नत्वानें आहे, ही कल्पना त्यांच्या गुलामगिरीला साजेशी हाती. पण तुम्हीं राजकीय व सामाजिक बाबतींत स्वतंत्र आहांत; अर्थात् ईश्वर म्हणजे आपला आत्मा, हीच तुमची ईश्वरविषयक कल्पना असणें रास्त आहे. सांप्रतच्या कालाचा ओघच असा आहे कीं, कोणाला गुलामगिरींत रहाणें पसंत नाहीं. बंध आणि गुलामगिरी यांचा अस्त होत चालला आहे. सध्यांचा काल उत्क्रान्तीचा आहे, व प्रत्येक वस्तु उन्नतीच्या मार्गांत पुढें पुढें गेलीच पाहिजे. तर मग अशा स्थितींत तुमची ईश्वरविषयक कल्पना मात्र एकाच ठिकाणाला खिळून राहील,हें शक्य आहे काय?अर्थात् नाहीं.असें बघा,एका काळीं ईश्वरासहि सैतान हा प्रतिस्पर्धी होऊन बसला होता. आणि त्या वेळीं ईश्वराची सत्ता सुद्धां मर्यादित करणारे कांहीं देवदूतादि होते. तसेंच ईश्वरानें सात दिवसांत सृष्टि उत्पन्न केली वगैरे वगैरे तुमच्या कल्पना आहेत; परंतु ही केव्हांची स्थिति ? तर मोझेस यानें आपलें ज्ञान धर्मपुस्तकांत नमूद करून ठेवलें त्या वेळची. पण त्या स्थितीला आज हजारों हजार वर्षें होऊन गेलीं. इतक्या अवधींत जगांत केवढाल्या तरी क्रान्त्या होऊन गेल्या आहेत. असा कोणता देव आहे कीं, ज्याची वाढ कधीं होत नाहीं ? प्रत्येक वस्तूनें वाढलेंच पाहिजे, उन्नतावस्थेकडे गेलेंच पाहिजे. पूर्वीं कांहीं असलें तरी सैतानासारख्यानें ईश्वराचें प्रतिस्पर्धित्व आतां करतां कामा नये. त्याच्या सत्तेला प्रतिबंध करणारा कोणीहि असतां उपयोगी नाहीं; सृष्टि उत्पन्न करण्याचा धंदा करण्याची त्याला गरज असतां कामा नये. सर्व जगानें वेदान्त ग्रहण करण्याची वेळ नजीक आली आहे. फूत्कार करणाऱ्या सत्सर्पाला पकडण्याचा काळ आला आहे. सत्य तुमच्याजवळ येऊन कंठरवानें तुम्हांला सांगत आहे कीं, तुम्हीं ईश्वर आहां, ईश्वर तुमच्याहून भिन्न नाहीं. अमुक एका पर्वतावर, अमुक एक स्वर्गांत, ईश्वर बसलेला नसून तो तुमच्यांतच आहे, तो तुम्हींच आहां. याचा साक्षात्कार करून घेतलात म्हणजे तुम्हीं पूर्णपणें मुक्तच आहांत.

भीतिग्रस्त होऊन आपल्या मेंदूला व्यर्थ शीण करून कां घेतां आणि आपल्या शक्तीचा दुसऱ्यापुढें लोटांगण घालण्यांत विनाकारण दुरुपयोग कां करतां ? आपल्या हृदयांतील नैसर्गिक ज्ञानशक्तीला दाबून टाकूं नका,

सत्याला पायाखालीं तुडवून टाकूं नका; धैर्यानें पुढें व्हा, आणि आपलें सर्व सामर्थ्य एकवटून निर्धास्तपणें असा घोष चालू द्या कीं, " मी ईश्वर आहें, मी सच्चिदानंदस्वरूपी आहें. " हा आपला निसर्गसिद्ध हक्क आहे. सामान्य लोकांची स्थिति मोझेस याच्याप्रमाणें होते. झुडपांतून आलेला शब्द ऐकून तो जसा घाबरून गेला, तशी लोकांची वरील वाक्य ऐकून हुबेहुब स्थिति होते. मोझेस हा गुलामगिरींत वाढला असल्यामुळें सर्प पाहतांच तो कांपूं लागला. तशीच सामान्य जनांची स्थिति होते. 'मी आहें' ही जी आपणांमधील शुद्ध भावना, शुद्ध ज्ञान, 'ॐ' हें सत्य, लोकांच्या कानीं पडलें म्हणजे त्यांच्या अंगावर कांटा उभा राहतो. ते कचरूं लागतात; आणि हें सत्य ग्रहण करण्याला त्यांची छाती होत नाहीं.

## आत्मसाक्षात्कार करून घ्या.

"तुम्ही अनंत परमात्मरूपी आहां; सर्व मंगलांमध्यें मंगल असें जें, तें तुम्हींच आहां; हें विश्व केवळ मृगजलवत् आहे; पूर्ण सनातन ब्रह्म तें तुम्हींच आहां; सर्व सत्ता, अखिल ऐश्वर्य तुमचेंच आहे. अवाङ्मनसगोचर असें तुमचें स्वरूप आहे. आत्मस्फटिकाशेजारीं असलेल्या पिंवळ्या, तांबड्या, किंवा काळ्या कागदाच्या तुकड्यांना ( बाह्य उपाधींना ) झुगारून देऊन जागृत व्हा; आणि आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेऊन ' मी ब्रह्म आहें सर्व वस्तूंमध्यें मीच व्यापून राहिलों आहें' या अनुभवपदावर आरूढ व्हा. " अशा तऱ्हेचे शब्द जनसमुदायाच्या कानांना सापाच्या फूत्काराप्रमाणें भयंकर वाटतात, व या कल्पनेपासून ते पराङ्मुख होतात. कारण, हा साप दंश करील, अशी त्यांच्या पोटांत धास्ती पडते. पण राम तुम्हांला कळकळीनें सांगत आहे कीं, या सापाला तुम्हीं एकदा गच्च पकडा म्हणजे काय चमत्कार होतो तें पहा तर खरें. तो साप नाहींसा होऊन त्याच्या ठिकाणीं राजदंड तुमच्या नजरेस पडेल; आणि आपण रंकाचे राव बनून गेलों आहों, असें तुम्हांला आढळून येईल. हा फूत्कार करणारा सर्प भूक लागली असतां अन्न, व तहान लागली असतां पाणी तुम्हांला देईल, एवढेंच नव्हे तर तुमच्या मार्गांतील यच्चयावत् संकटें आणि दुःखें नाहींशीं करील. मोझेस याच्या उदाहरणावरून हें स्पष्ट होत आहे. पूर्वीं वर्णन केलेल्या गोष्टीनंतर तो एकदा रानांत फिरत होता. फिरतां फिरतां एका

खडकावर त्यानें सहज आपली काठी आपटली. तों त्या खडकांतून एक सुंदर पाण्याचा झरा वाहूं लागला. इस्त्रायल लोक अनेक संकटाच्या फेऱ्यांत सांपडले असतां स्वसंरक्षणासाठीं पळ काढण्याचा एकदा त्यांच्यावर प्रसंग आला. हिंडतां हिंडतां तांबड्या समुद्राशेजारीं येऊन ते थडकले. तो भयंकर समुद्र पाहून त्यांची छाती दडपून गेली. हा समुद्र आपल्याला खाऊन टाकण्यासाठीं आ पसरून बसला आहे, व आतां आपली इतिश्री होणार, असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें. इतक्यांत मोझेस यानें समुद्राला आपल्या काठीचा स्पर्श केला, व चमत्काराची गोष्ट कीं, तो समुद्र एकदम दुभंग झाला, व इस्त्रायल लोक समुद्रानें दिलेल्या त्या वाटेनें पुढें चालते झाले.

'मी ईश्वर आहें' हा सिद्धांत-हा फोंफावणारा मिथ्या सर्प-तुम्हांला भीतिप्रद वाटेल, पण त्याला घट्ट पकडून धरून ठेवा. याचा परिणाम असा होईल कीं, तुम्हीं चराचराचे एकछत्री राजे, पंचमहाभूतांचे अधिपति, आकाशांतील नक्षत्रांवरहि सत्ता गाजविणारे, सर्व विश्वावर अंमल करणारे असे बनल्याशिवाय निःसंशय रहाणार नाहीं. मग जें जें ब्रह्मांडांत आहे, तें तें सर्व आपणच आहों, असें तुम्हांला आढळून येईल.

हा दिव्य सिद्धांत अनुभूत करून घेण्याला-त्याच्याशीं तादात्म्य पावण्याला-लोक कचरतात. पण राम म्हणतो कीं,पुढें या,कच खाऊं नका. छाती करून हें तत्त्व ग्रहण करा, तें आपल्या हृत्पटलावर खोदून ठेवा, त्याच्याशीं तद्रूप व्हा; त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन पहा म्हणजे तेंच तुम्हांला मुक्त करील. 'मी ईश्वर' अशी श्रद्धा नसणें, याच्याइतकें दुसरें पातक नाहीं. आत्म्याच्या अपलापासारखी भयंकर चोरी कोणतीच नाहीं. 'मी स्त्री आहें,' 'मी पृथ्वीवर सरपटणारा एक क्षुद्र प्राणी आहें,' असें मानणें याच्या पलीकडे केवढीहि मोठी लबाडी आणि नास्तिकवाद जाऊं शकत नाहीं. एखाद्या कंजूष मनुष्यासारखे बनूं नका. जवळ संपत्ति खचून भरली असून त्यापैकीं एक पैहि दुसऱ्याच्या कपाळाला लावूं द्यावयाची नाहीं, असलें व्रत पतकरूं नका.

सर्व विश्व तुमच्यामध्यें आहे, सर्व चराचर तुमचें आहे. तें लपवून कां ठेवतां ? तें गाडलेलें धन बाहेर काढा-त्याचा उपयोग करा. आत्मानुभ-

वाचें अमृत यथेच्छ प्राशन करा. तुम्हीं तत्त्वतः राजे असून भिक्षा मागत भटक्या मारीत कां फिरतां ?

## केवढें चमत्कारिक विस्मरण !

आत्मस्वरूपाचा साक्षात्कार म्हणजे आपल्या गळ्यांतील विस्मृत हाराचें स्मरण होणें होय. हिंदुस्थानांत आत्मानुभवाची कल्पना अशा रीतीनें दर्शित केली जाते. एका मनुष्याच्या गळ्यांत एक मोत्यांचा मौल्यवान् कंठा होता. तो हरवला असें समजून जिकडे तिकडे त्या हाराचा त्यानें शोध चालविला. एवढा अमूल्य हार नाहींसा झाल्यामुळें तो सारखा शोक करूं लागला. त्या एका हाराकरितां अश्रूंचे कितीतरी हार त्याच्या डोळ्यांतून गळले. त्यानें पुष्कळ खटपट केली, व आपल्या मित्राला हारावर लक्ष ठेवण्यासाठीं सांगितलें. इतक्यांत दुसऱ्या एका जवळच्या मनुष्यानें त्या गृहस्थाला विचारलें, 'तुझ्या हाराचा मी पत्ता लावून दिला तर तूं मला काय इनाम देशील ?' तो गृहस्थ आतुरतेनें म्हणाला, 'तूं मागशील तें देईन, मग तर झालें कीं नाहीं ?' त्यानंतर त्यानें त्या गृहस्थाच्या गळ्यांतील हाराला हात लावून सांगितलें कीं, 'हा पहा तुझा हार ! तो तुझ्या गळ्यांतच होता; पण तो सरकून मागें गेला होता, इतकेंच काय तें.' हें उत्तर ऐकून त्या गृहस्थाला किती आनंद व आश्चर्य वाटलें असेल !

हाच न्याय आपल्या स्वरूपाला तंतोतंत लागू पडतो. हें केवढें अज्ञानाचें आवरण कीं, जें आपल्या वास्तविक स्वरूपाची आपल्याला विस्मृति पाडण्याला कारणीभूत होतें ! हें आवरण दूर करा, हा अंधःकार काढून टाका, म्हणजे आपण ईश्वरच आहोंत. स्वभावतः आपण पूर्णपणें मुक्तच आहों, परंतु आपण बद्ध आहों असें समजतों, हा केवळ आपला भ्रम आहे. राजा स्वप्नांत जरी भिक्षा मागूं लागला तरी त्यामुळें त्याचें ऐश्वर्य कोणी हिरावून नेतें, अशांतला अर्थ नाहीं.

---

* जऱ्हीं साम्राज्य भौज्य स्वाराज्य । वैराज्य पारमेष्ठ्य महाराज्य ॥
सातवें तें अधिपत्य राज्य । आठवें सायुज्य ब्रह्मानंदें ॥

रंगनाथकृत योगवासिष्ठ, अ. ६ । ६९.

हे राजाधिराजा, सर्व शरीरांत 'मी' या रूपानें नटणाऱ्या आत्मरूपा, अनंतसत्ताधीशा, आत्यंतिक श्रेयोरूप आत्मस्वरूपा, अविद्येच्या स्वप्नांत गुरफटून आपल्याला बद्ध करून घेऊं नको. जागृत हो, आणि आपलें परमश्रेष्ठ अध्यात्मिक ऐश्वर्य प्रकट कर. तूं परमेश्वर आहेस, दुसरें कोणीहि असणें केव्हांहि शक्य नाहीं. आपल्या सामर्थ्याचें आविष्करण कर; व भीति, शंका, दौर्बल्य, अशक्तता यांना दूर झुगारून आपल्या ईश्वरत्वाच्या पदवीवर विराजमान हो. ईश्वर आणि मी एक आहें, हा नुसता विचार कितीतरी पवित्र आणि सुखकर आहे! ही नुसती कल्पना आपलें सर्व दुःख हिरावून नेते आणि आपलें सर्व ओझें हलकें करते. रिकामी वणवण करीत कां फिरतोस? आत्मकेंद्रांत—स्वरूपांत स्थिर हो. आर्किमिडिज नांवाचा ग्रीक तत्त्ववेत्ता एकदा म्हणाला होता कीं, "मला स्थिर उभें राहण्यास एखादें स्थान मिळेल—एखादें आलंब मिळेल तर मी विश्वाला हलवून सोडीन." हतभागी आर्किमिडिज! बिचाऱ्याला असला ध्रुवबिंदु सांपडूं शकला नाहीं.

वेदान्त प्रतिपादन करतो कीं, हा आलंब म्हणजे आपला आत्मा होय. तो पक्का धरा, म्हणजे सर्व चराचर हलवून सोडण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगीं येईल.

ॐ! ॐ!! ॐ!!!



# मृत्यूनंतरची स्थिति
## अथवा
# सर्वधर्मांची एकवाक्यता

[ गोल्डन् गेट हॉलमध्यें तारीख १९ जानेवारी सन १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान ]

सर्व स्त्रीपुरुषांत दृश्यमान होणाऱ्या, सकल धर्मांतील हे अन्तिम श्रेयोरूप परमात्मन् !



या मंदिरांत आजपर्यंत झालेलीं व्याख्यानें फार कठीण होतीं. व्याख्यानांचे विषय जरा गहन आणि दुर्बोध होते. पण आजच्या रात्रीचा विषय त्यांच्या मानानें सोपा आहे.

## निरनिराळ्या धर्मांच्या कल्पना.

कांहीं वर्षांमागें राम हिंदुस्थानांत असतांना हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांत अध्यापकाचें काम करणाऱ्या एका अमेरिकेंतील गृहस्थानें—खिस्ती धर्मोपदेशकानें लिहिलेलें एक पुस्तक रामाच्या हातीं पडलें. सदरहू पुस्तकांतील विषय 'मृत्यूनंतरची स्थिति' हा होता. लेखकानें एक मोठें सुंदर रूपक केलें असून त्यांत असें प्रतिपादन केलें होतें कीं, हें जग हा आपल्या अत्यंत दूरच्या प्रवासांतील एक मुक्काम होय. तो दूर दूर समुद्राच्या पलीकडे आहे आणि तेथें जाण्यासाठीं आपणांस पैसे खर्चून दर्शिका आगाऊ खरेदी कराव्या लागतात. ज्यांच्याजवळ आपापल्या मुक्कामांच्या दर्शिका नसतील अशा उतारूंना खोल समुद्रांत ढकलून दिलें जातें, व ज्यांच्यापाशीं अशा दर्शिका असतील, अशांनाच त्यांच्या मुक्कामांना अचुक जाऊं दिलें जातें. उतारूंनीं खरेदी करावयाच्या दर्शिका पहिला, दुसरा व





तिसरा अशा भिन्न भिन्न वर्गांच्या आहेत. तसेंच कांहीं बनावट दर्शिकाहि असून त्या पांढरा, काळा, हिरवा वगैरे भिन्नभिन्न रंगाच्या आहेत. परंतु, दर्शिका बनावट कीं खऱ्या हें ओळखण्याची खूण किंवा शिक्का म्हणजे येशु ख्रिस्ताच्या रक्ताचा रंग—तांबडा रंग—होय, व त्या रंगाच्या ज्या दर्शिका असतील तेवढ्याच खऱ्या आणि त्या ज्या उतारूंजवळ असतील तितक्यांनांच आपापल्या मुक्कामांना उतरण्याची परवानगी दिली जावयाची, बाकीच्यांना मज्जाव करावयाचा, असा नियम आहे. तांबड्या रंगाच्या दर्शिका ख्रिस्ती लोकांच्या आणि पांढरा, काळा, हिरवा इत्यादि रंगाच्या दर्शिका इतर धर्मांतील लोकांच्या, असा एकंदरींत लेखकाचा रोंख आहे. पुस्तकाचा विषय वर वर्णन केल्याप्रमाणें असून लेखकानें आपलें होतें तेवढें कल्पनाचातुर्य आणि जाडी विद्वत्ता यांची शिकस्त करून वर्ण्य विषय उत्तम रीतीनें वठविला आहे.

ख्रिस्ती लोकांचाच काय, पण जगांतील सर्व धर्मांतील लोकांचा समज जवळजवळ असाच आहे. महंमदी लोकांचें म्हणणें हें कीं, महंमद हाच काय तो दर्शिका गोळा करणारा, विश्रामाधिकारी, किंवा हिशेव—तपासनीस असून ज्यांच्यापाशीं त्याच्या शिक्कामोर्तबच्या दर्शिका नसतील त्यांना मेल्यानंतर नरककुंडांत फेंकून देण्यांत येईल. इतर धर्मांचें म्हणणेंहि अशाच मासल्याचें आहे. एकंदरींत सर्व धर्मांची ठाम समजूत अशी आहे कीं, मृत्युमुखीं पडलेल्या सर्व जीवांची—मग ते अमेरिका, युरोप, आफ्रिका, आस्ट्रेलिया, आशिया वगैरे कोणत्याहि खंडांत मेलेले असोत त्यांची—वासलात लावण्याचें काम ख्रिस्त, महंमद, बुध, झोरोॲस्टर, कृष्ण अशा कोणा तरी एकाच व्यक्तीकडे सोंपविलें आहे. व जगतांतील धर्माधर्मांमध्यें जो विरोध, द्वेष आणि तंटेबखेडे दिसून येतात, किंबहुना धर्माच्या नांवाखालीं आजपर्यंत जगांत जितका रक्तपात झालेला आहे, त्याचें मूळ बहुतांशीं या दुराग्रहाच्या आणि हटवादीपणाच्या धर्मवेडांतच आहे.

आतां वेदान्तशास्त्राचें या विषयावर काय ह्मणणें आहे, इकडे आपण वळूं. वेदान्त हा जगांतील सर्व धर्मांचा मेळ घालून देतो. व प्रत्येक मनुष्यानें दुसऱ्या धर्मांतील कल्पना हाणून पाडण्याचा यत्न न करतां आपापल्या धर्मसमजुतीप्रमाणें चालावें, असा सर्व धर्मांतील लोकांना उपदेश

करतो—आपल्या कल्पना बरोबर असल्या म्हणजे दुसऱ्याच्या कल्पना निःसंशय गैरशिस्त असल्याच पाहिजेत, असें कोणीहि मानण्याचें कारण नाहीं. हा विषय अत्यंत व्यापक असून एक दोन तासांच्या अवधींत वेदान्तशास्त्रदृष्ट्या या विषयांतील ठळक ठळक मुद्यांचेंच तेवढें विवेचन या व्याख्यानांत करावयाचें आहे.

या जगांतील सर्व प्रकारची उन्नति सौंदर्यतापूर्वक होत असते. (गायनशास्त्रांत ज्याप्रमाणें तालांचे टप्पे असतात, आणि ते ज्याप्रमाणें ठराविक कालानें येतात त्याप्रमाणें ) विश्वांतील यच्चयावत् उत्क्रान्ति व प्रगति ठराविक कालानें होते. ( अर्थात् ती तालबद्ध किंवा लय आणि ताल ह्यांना अनुसरून असते. ) तसेंच या सृष्टींतील सर्व प्रकारचीं आन्दोलनें एकतानात्मक किंवा पूर्वापर अविरोधी अशीं असतात. जगांत उच्च नीच, उन्नति अवनति ही स्थिति क्रमशः ठरलेली आहे. गणितशास्त्रांत म्हटल्याप्रमाणें प्रत्येक महत्तम परिमाणाला एकेक लघुतम परिमाण असतें; व तीं एकामागून एक क्रमानें येतात. दिवस आणि रात्र चक्रनेमिक्रमानें एकामागून येतात. आपल्या पायांच्या गतींत सुद्धां एक पाऊल अगोदर आणि दुसरें त्यानंतर, असा नेहमीं क्रम असतो. वर्षांतील सर्व ऋतूंचें चक्र एकामागून एक क्रमानें फिरत आहे; आणि वर्षानुवर्ष तें तसेंच फिरत रहाणार. या विश्वाचें एकंदर रहाटगाडगें सदासर्वदा सारखें वर्तुलाकार भ्रमण करीत आहे. आपण दररोज सकाळीं जागे होतों आणि रात्रीं झोंपीं जातों, व रात्रीच्या गाढ निद्रेंतून दुसऱ्या दिवशीं पूर्ववत् जागृत होतों. हा क्रम अव्याहत चालला आहे. याच न्यायानें वेदान्ताच्या कल्पनेप्रमाणें जननमरण यांच्या चक्रावर विश्वांतील जीवमात्र फिरत आहेत. जन्मानंतर मृत्यु आणि मृत्यूनंतर फिरून जन्म, या परंपरेंतून कोणीहि सुटत नाहीं. चराचरांतील यच्चयावत् भूतांना स्थिरता म्हणून नाहीं. कालाचा प्रवाह कधीं तरी थांबतो काय ? कालाचा प्रारंभकाल कोणता, हें कोणी सांगूं शकेल काय ? आकाशाला कोठें सीमा आहे का ? अर्थात् नाहीं. नद्या कधीं तरी थांबतात काय ? कदाचित् तुम्हीं 'होय' म्हणून म्हणाल, पण तसें नव्हे; नद्यांची गति अस्खलित आहे. कारण, नद्या समुद्रांत जाऊन मिळतात खऱ्या, पण बाष्परूपानें त्या वर आकाशांत जातात. व तेथून पुनः पर्वतावरून प्रवाहरूपानें पूर्ववत् समुद्राशीं तादात्म्य पावतात. कल्पना करा कीं,

येथें एक मेणबत्ती आहे. एखाददुसऱ्या तासांत तीमधील मेण, वात वगैरे द्रव्यें जळून जातात. आपणांला वाटेल तीं द्रव्यें नाश पावलीं, पण तसें नव्हे. रसायनशास्त्र आपल्याला सांगतें कीं, तीं द्रव्यें कायमचीं नाश पावत नसून फक्त त्यांचें रूपांतर होतें. मेणबत्ती जळल्यानंतर त्यापासून कर्ब, द्विप्राणिल आणि पाणी हीं द्रव्यें उत्पन्न होतात आणि फिरून तीं वनस्पतींमध्यें उदय पावतात. जगांत कायमचा नाश असा कशालाहि नाहीं. विश्वांतील यच्चयावत् प्रगति वर्तुलाकार किंवा खरें म्हटलें तर गोलाकार असते. हें पहा, आपण जिवंत असतों आणि मरण पावतों. आतां ही मरणानंतरची स्थिति कायम राहणें शक्य आहे का ? ती स्थिति कायम राहील, असें म्हणतां येणार नाहीं. असें विधान करणें हें सृष्टिनियमांविरुद्ध आहे. मृत्यूनंतर चिरकाल अधोगति मिळते, फिरून जन्म नाहीं असें म्हणणें, म्हणजे जगतावर सत्ता चालविणाऱ्या अत्यंत सक्त नियमांचा धिःकार करण्यासारखें आहे. असें म्हणण्याला आपल्याला कांहींच हक्क पोहोंचत नाहीं. मनुष्य पंचत्वाप्रत गेल्यानंतर ईश्वर त्याला कायमचें नरकांत पचत ठेवतो, असें गृहीत धरलें तर असला तो ईश्वर खुनशी आहे, असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. एखादा माणूस पूर्णायुषी होऊन मृत्युमुखीं पडला. अशी कल्पना करा कीं, घरच्या गरिबीमुळें त्याला शिक्षण म्हणून कोणत्याच प्रकारचें मिळालें नाहीं, तर केवळ कावाडकष्ट करून उदरंभरण करण्यापलीकडे त्याला कसलीहि कल्पना नाहीं, आत्मोन्नति करण्याचीं साधनें त्याला मुळींच अनुकूल नाहींत, धर्म कशाशीं खातात, हें त्याच्या गांवींहि नाहीं; अशा स्थितींत तो माणूस मेला. आतां येशू ख्रिस्ताच्या रक्तानें माखलेली दर्शिका त्याच्यापाशीं नाहीं, एवढ्यावरून सदोदित त्या इसमाला नरकांत पडावें लागेल, असें मानावयाचें तर ज्या ईश्वराकडून असल्या घोर शासनाची शिक्षा मिळणार, त्याला अत्यंत निर्दय आणि खुनशी असें म्हणण्याला काय हरकत आहे ? असलें विधान करण्याला आपल्याला बिलकूल अधिकार नाहीं. व खऱ्या न्यायदृष्टीनें हें म्हणणें गैरशिस्त आहे. वेदान्त प्रतिपादन करतो कीं, मनुष्य मृत झाला तरी तो कायमचा मृत राहणें शक्य नाहीं. प्रत्येक जन्मापाठीमागून मृत्यु, आणि मृत्यूनंतर फिरून जन्म, ही स्थिति निश्चयानें असलीच पाहिजे. किंबहुना असेंहि म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं कीं, मृत्यु हें स्थित्यंतराला

केवळ एक निराळें नांव आहे. *मृत्यूमध्यें गर्हणीय–भीतिप्रद असें वाटण्यासारखें कांहींच नाहीं. या बुजगावण्यानें आपण भितों, ही आपली मोठी चूक आहे. वास्तविक भयंकर असें मृत्यूंत कांहीं नाहीं, तें फक्त एक रूपांतर आहे इतकेंच.

## पुनर्जन्माचा सिद्धांत.

आपण सत्तर ऐशीं वर्षें जगलों असें मानलें, तर इतका काल आपण मोठ्या थोरल्या जागृतावस्थेंत घालविला, असा याचा अर्थ आहे. आपलें या जगांतील जीवित ही एक प्रचंड जागृत स्थिति अशी कल्पना केली तर, वेदान्तमताप्रमाणें मृत्यूची स्थिति ही एक भली मोठी निद्रावस्था आहे. मृत्यु ही एक प्रकारची झोंप आहे, व ज्याप्रमाणें दर चोवीस तासांच्या अवधींत तीन चार तासांची झोंप घेतल्यानंतर आपण पुनः जागे होतों, त्याप्रमाणें मृत्युरूपी विश्रांति घेतल्यानंतर आपण फिरून जन्म घेऊन या जगांत प्रविष्ट होतों. अल्पशी वामकुक्षी घेतल्यानंतर जागें होणें म्हणजेच पुनर्जन्म होय.

## स्वप्न म्हणजे जागृतीमधील संस्कारांची पुनरावृत्ति.

वेदान्ताचें म्हणणें असें आहे कीं, मनुष्य मरण पावला म्हणजे तो तत्क्षणीं नवा देह धारण करतो, असें नाहीं; तर बीं ज्याप्रमाणें जमिनींत टाकलें म्हणजे त्यांतून एक नवा वृक्ष तावडतोब निर्माण होत नाहीं, त्याला कांहीं वेळ लागतो; जुनें घर सोडलें म्हणजे आपण लगेच ज्याप्रमाणें नव्या घरांत जात नाहीं. कांहीं वेळानें जातों, याच न्यायानें मृत्यूनंतर लगेच नवीन जन्माला तो जात नाहीं, तर मृत्यूच्या किंवा दीर्घ निद्रेच्या मधल्या स्थितींत तो कांहीं काल राहतो, आणि नंतर दुसरा जन्म घेऊन जगांत पुनः प्रवेश करतो. आतां मृत्यूनंतर नवा जन्म धारण करण्यापूर्वी मध्यंतरीं जी ही स्थिति असते, ती कोणत्या प्रकारची असते, असा प्रश्न साहजिक उद्भवतो. त्याचें उत्तर असें आहे कीं, ही दरम्यानची स्थिति सुषुप्त्यवस्थेसारखी असते; निद्रावस्थेचे सर्व धर्म या मधल्या अवस्थेंत पूर्णपणें दिसून येतात. तुम्हांला हें माहितच आहे कीं, मनुष्य निद्रिस्त झाला

---

*देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ गीता, २ । १३.

असतां स्वप्नावस्थेंत त्याला ज्या गोष्टी दिसतात त्या जागृत स्थितीमध्यें त्याच्या मनाचे जे व्यापार चाललेले असतात, त्यांवर अवलंबून असतात, असा सामान्य नियम आहे. याला कांहीं कांहीं अपवाद नसतील असें नाहीं. पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां तेहि वरवरचे आहेत असें दिसून येईल. पण तो प्रश्न बाजूला ठेवला तरी वरील सामान्य नियमाला त्यामुळें बाध येतो, असें नाहीं. अर्थात् जागृतीमधील संस्कारांची स्वप्नामध्यें पुनरावृत्ति होते, असें बहुशः म्हणण्याला प्रत्यवाय नाहीं. विश्वविद्यालयांतील परीक्षांच्या वेळचा ज्यांना अनुभव असेल, ते रामाच्या या विधानाला दुजोरा देतील, यांत संशय नाहीं. परीक्षेची वेळ नजीक येऊन ठेपली ह्मणजे रात्रीच्या रात्रीं जागून विद्यार्थी अभ्यास करीत असतात; अशा वेळीं दिवसा जे विषय त्यांच्या मनांत एकसारखे घोळत असतात तेच रात्रीं स्वप्नांत दृग्गोचर होतात; तसेंच परीक्षा एकदांची संपली आणि परीक्षेच्या निकालाचा दिवस जवळ येऊं लागला म्हणजे या परीक्षेंतून आपण उत्तीर्ण होतों किंवा नाहीं, झालों तर पहिल्या वर्गांत नांव येतें कीं नाहीं, अशा प्रकारच्या संशयसमुद्रांत जेव्हां मन गटंगळ्या खात असतें, अशा समयीं स्वप्नांत परीक्षेच्या निकालाशिवाय दुसरा कोणताहि विषय येत नाहीं. परीक्षेसंबंधाची ही जी तऱ्हा, तीच हवा तो आवडीचा विषय घ्या, त्यासंबंधानें तंतोतंत दिसून येते.

विद्यार्थिदशेंत असतांना राम जेव्हां बी. ए. च्या परीक्षेचा अभ्यास करीत होता, तेव्हां एक सहाध्यायी त्याच्या खोलींत राहात असे. रामाला आपल्या भावाप्रमाणें वाटणारा हा सहाध्यायी मोठा खेळाडू होता. तो आपला वेळ गाणें, बजावणें, नाचणें, बागडणें वगैरे गोष्टी करून फार गमतीनें घालवीत असे; अभ्यासाची चिंता कशी ती त्याच्या जिवाला माहीतच नव्हती. एके दिवशीं एका गृहस्थानें त्याला "तूं अभ्यास किती वेळ करतोस," असा प्रश्न केला. यावर स्मितहास्य करून त्यानें चटकन् उत्तर दिलें कीं, "मी बरोबर अठरा तास अध्ययनांत घालवतों." त्या गृहस्थानें फिरून विचारलें, "अरे, तूं म्हणतोस याचा अर्थ तरी काय? हें पहा, चार पांच तास गप्पाटप्पांत निष्कारण दवडतांना मी तुला प्रत्यक्ष पाहात आहें. दर दिवशीं झोंपेखालीं तुझे आठ नऊ तास तरी जातात, मग तूं अठरा तास अभ्यास कसा करतोस?" यावर त्यानें लगेच उत्तर

दिलें, "महाराज, आपण गणितशास्त्र कधीं चावलेंसुद्धां नाहीं असें दिसतें; यामुळें माझ्या म्हणण्याचा आपल्याला बरोबर उलगडा झाला नाहीं. मी अठरा तास अभ्यास कसा करतों, हें आपल्याला आतां लख्ख सिद्धच करून देतों, म्हणजे तर झालें कीं नाहीं?" गृहस्थ ह्मणाला, "ठीक आहे. पाहूं पाहूं कसें सिद्ध करतोस तें." त्यावर तो विनोदी तरुण बोलला, "मी आणि हा राम एकाच खोलींत राहतों; खरें पाहूं गेलें तर मी बारा तास वाचतों आणि तो चोवीस तास अध्ययन करतो. मिळून एकंदर झाले छत्तीस तास. त्यांची सरासरी काढली तर प्रत्येकाच्या वांट्याला अठरा तास येतात. मग हिशेब बरोबर जुळला कीं नाहीं?" तो गृहस्थ ह्मणाला, "हिशेब तर छान जुळविलास. तें असो; पण राम चोवीस तास अध्ययन करतो असें तूं म्हटलेंस, तें कसें जुळतें? ही असंभवनीय गोष्ट शक्य तरी कशी होईल? राम जबर मेहनती आणि विद्याव्यासंगी आहे, हें मला कबूल आहे. तो परीक्षेसाठीं अनेक विषय तयार करीत आहे; तसेंच, परीक्षेबाहेरच्या कितीतरी विषयांचें तो अध्ययन करीत असतो, हें मी जाणून आहें. तरी पण तो चोवीस तास अभ्यास करीत असेल, हें म्हणणें सृष्टिनियमांविरुद्ध दिसतें, याची वाट काय?" या प्रश्नावर रामाचा तो सहाध्यायी म्हणाला, "त्याची वाट मी आपल्याला लावून दाखवतों; मग तर झालें कीं नाहीं? हें पहा, राम हा जेवावयास बसला तरी तो आपला क्षणमात्रहि फुकट जाऊं देत नाहीं. तो कसा म्हणाल तर, जेवतांना एखादा कागद त्याच्याजवळ असतो आणि त्यावर एखादें शास्त्रीय प्रमेय, किंवा गणितशास्त्र अथवा तत्वज्ञान या विषयांवरील एखादा गूढ सिद्धांत लिहिलेला असून त्याच्या चिंतनांत तो मग्न असतो. क्वचित् एखादें पुस्तक वाचण्यांत, नाहीं तर एखादी कविता पाठ करण्यांत तो गढलेला असतो. केव्हां तर एखादें काव्य किंवा दुसरा कांहीं विषय त्याच्या मनाचा विषय होऊन बसलेला असतो. तात्पर्य काय कीं, भोजनकालांतील एक पळभरहि तो व्यर्थ दवडीत नाहीं. बरें, त्याचें स्नान चाललें असलें तरीहि एकीकडे हातांतील खडूनें खोलीच्या भिंतीवर एखादी आकृति काढण्यांत त्याचें डोकें गुंतलेलें असतें. झोंपेंत असतांना तरी त्याचा वेळ निरुद्योगीपणांत जात असेल असें म्हणावें, तर तेंहि नाहीं. दिवसा ज्या विषयांवर त्याचा विचार चालला असेल त्याच

विषयाच्या ( कल्पनांच्या ) स्वप्नांनीं त्याचीं निद्रावस्था व्यापून राहिलेली असते. ह्मणून मी म्हणतों कीं, त्याची अध्ययनाची तंद्री सारखी चोवीस तास चाललेली असते. ”

वरील विधानांत कांहींसें तथ्य आहे, यांत शंका नाहीं. जो मनुष्य आपले दिवसाचे अठरा तास अभ्यासांत घालवतो, त्याला रात्रीं जीं स्वप्नें पडतील, त्यांमध्यें अध्ययनाशिवाय दुसरा कोणताहि विषय दिसणार नाहीं. केव्हां केव्हां अदृष्टपूर्व किंवा अश्रुतपूर्व असेहि प्रकार आपल्याला स्वप्नांत दृग्गोचर होतात, असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. पण वेदान्त म्हणतो कीं, ‘ असें कधींहि होणार नाहीं. ’ समजा, आपल्याला एखाद्या माणसानें स्वप्नांत एक भयंकर राक्षसी प्राणी पाहिल्याचें सांगितलें. त्याचें म्हणणें कीं, त्या प्राण्याला सिंहाचें डोकें, उंटाचा पृष्ठभाग, सापाचें शेंपूट आणि बेडकाचे पाय होते. आपण असा विचित्र प्राणी कधींहि पाहिला नाहीं, असें त्याचें म्हणणें. आतां वेदान्त यावर असें प्रत्युत्तर देतो, “ मित्रा, तूं सिंह पाहिला आहेस, साप पाहिला आहेस, उंट पाहिला आहेस, आणि बेडूकहि तुझ्या नजरेस पडला आहे. आतां हे जे प्राणी तूं पृथक् पृथक् पाहिलेले होतेस त्यांच्यांतील एकेक अवयव एकत्र करून तो भयंकर प्राणी तूं आपल्या स्वप्नांत बनविलास इतकेंच. तात्पर्य, स्वप्नामध्यें जें जें कांहीं दिसतें—मग तो तुझा बाह्यतः नवीन वाटणारा भयंकर प्राणी असो—किंवा दुसरें कांहीं असो—तें तें जागृतीमध्यें वास्तविक रीत्या पाहिलें तर अनुभूत असलेंच पाहिजे. ”

ज्या मनुष्यानें कधीं रशिया देश पाहिला नाहीं, किंवा त्याच्यासंबंधानें केव्हांहि कांहीं ऐकलें नाहीं, असा मनुष्य रशियाची राजधानी जी सेंट पिटर्सबर्ग तेथें स्वप्नांत जाऊं शकणार नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे.

## मृत्युरूपी दीर्घ निद्रेंतील स्थिति.

अशी स्थिति असल्यामुळें मृत्यु आणि पुनर्जन्म यांच्या दरम्यानचा काल—मृत्युनंतरच्या दीर्घ सुषुप्तीचा काल—कोणत्या स्थितींत जातो, असा प्रश्न उत्पन्न होतो. या प्रश्नाचें वेदान्त असें उत्तर देतो कीं, हा काल स्वर्गांतील सुखोपभोग घेण्यांत किंवा नरकांतील घोर यातना भोगण्यांत, इंद्राच्या नंदनवनांतील ऐश्वर्य अनुभवण्यांत, किंवा

अंधतमाच्या दुःखांत कुजत पडण्यांत, अशा प्रकारच्या कोणत्या तरी स्थितींत जातो. आतां स्वर्ग आणि नरक यांची कल्पना काय असावी, असा विचार पुढें येतो. त्याचें समाधान हें आहे कीं, हें केवळ कल्पनेनें उत्पन्न केलेलें मनोराज्य आहे. समजा कीं, एक कट्टा ख्रिस्ती मनुष्य आहे तो अत्यंत श्रद्धाळु असून ख्रिस्ती धर्मशास्त्राप्रमाणें वागणारा आहे. दर रविवारीं नित्य नियमानें तो प्रार्थनामंदिरांत जाण्यास चुकत नाहीं, प्रतिदिनीं सकाळ संध्याकाळ ईश्वराची भक्तियुक्त अंतःकरणानें प्रार्थना करतो, भोजनाच्या पूर्वीं प्रत्येक वेळीं त्याची कृपा भाकतो, अवघ्या आयुष्यांत ख्रिस्ताचा 'क्रूस' छातीवर लटकाविल्याशिवाय त्याचा एकहि दिवस जात नाहीं; सारांश, ख्रिस्ताचें चिंतन करण्यांत त्यानें आपला सारा जन्म घालविला, व अहोरात्र त्याच्या पवित्र चरित्राशीं त्यानें आपलें तादात्म्य करून घेतलें आहे. अशा रीतीनें आयुष्याचीं ऐशीं नव्वद वर्षें अत्यंत एकनिष्ठतेनें कालक्रमणा करीत असतां मेल्यानंतर आपला मानमरातब करण्यासाठीं देवदूतांच्या झुंडीच्या झुंडी येतील, येशूच्या उजव्या हाताला बसण्याचा मान आपल्या वांट्याला येईल, अशा सुखस्वप्नमय स्थितींत त्यानें आपला काल इहलोकीं कंठला, अशी कल्पना करा. वेदान्तमताप्रमाणें अशा तऱ्हेच्या ख्रिस्ती मनुष्याचें मनोराज्य सिद्धीस जाऊन ख्रिस्ताच्या उजव्या बाजूला विराजरान होण्याचा मान त्याला मिळाल्यावांचून राहणार नाहीं.* त्या मनुष्याचें देहपतन होऊन नव्या देहांत प्रविष्ट होऊन तो फिरून येईपर्यंतच्या मधल्या दीर्घ सुषुप्तीच्या स्थितींत आपण निरनिराळ्या देवदूतांनीं परिवेष्टित असून त्यांचें मधुर ईशस्तवन ऐकत आहों, असा देखवा त्याला दिसेल. अशी स्थिति होणार नाहीं, असें मानण्याला कांहीं आधार नाहीं. वेदान्त म्हणतो, "ख्रिस्ती लोकांनो, तुमच्या अंतःकरणांत दृढ श्रद्धा असेल, उत्कट भावना आणि भक्ति हीं वसत असतील तर तुमच्या धर्मपुस्तकांनीं तुम्हांला दिलेलीं आश्वासनें फलद्रूप होतील, हें निसंशय आहे. पण तुम्ही मुसलमान व हिंदू लोकांना नांवें ठेवणें हें गैर आहे, हें लक्ष्यांत बाळगा." समजा, एक मुसलमान खरा महंमदानुयायी आहे. कुराणाच्या आज्ञेप्रमाणें प्रतिदिवशीं चारपांच वेळ

---

* श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ गीता, अ. १७।३.

निमाज पढण्याचें आपलें कर्तव्य तो बिनचुक करीत आहे, तो महंमदाप्रीत्यर्थ जगत आहे; आणि त्याच्याप्रीत्यर्थ आपलें प्राण अर्पण करण्याची त्याची तयारी आहे; इस्लामी धर्माची सेवा हेंच तो आपल्या जन्माचें इतिकर्तव्य मानतो, महंमदाचें नांव जगाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत दुमदुमून राहिलें पाहिजे, इतक्या मजलेपर्यंत त्याचें इस्लामी धर्मावरील प्रेम किंवा वेड जाऊन पोहोंचलें आहे, अशा मनुष्याचे संकल्प यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाहींत. वेदान्त म्हणतो, सृष्टीमध्यें असा कोणताहि नियम नाहीं, अशी कोणतीहि शक्ति नाहीं कीं, जी त्याचें, मृत्यूनंतर प्राप्त होणाऱ्या सुखोपभोगाचें, हें मनोराज्य फलद्रूप होण्याच्या आड येईल. मेल्यानंतर स्वर्गात सुंदर सुंदर उपवनांत, भव्य आणि विशाल राजमंदिरांत, दिव्य, खप्सूरत पऱ्यांच्या सहवासांत राजविलास भोगण्यास मिळावे, तसेंच मद्यसरितांमध्यें यथेच्छ विहार करण्यास सांपडावा, अशा कल्पनातरंगांच्या लाटांवर हेलकावे खात त्यानें आयुष्य कंठलेलें असल्यामुळें मेल्यानंतरच्या आणि पुनः जन्म पावण्यापूर्वींच्या झोंपेच्या स्थितींत हे सर्व भोग त्याला भोगावयास सांपडतील हें खास. *

पण वेदान्त हेंहि प्रतिपादन करतो कीं, " महंमदानुयायांनो, जगांतल्या सर्व लोकांची मृत्यूनंतर वासलात लावणारा एकटा महंमद पैगंबर आहे, असें म्हणण्याचें धाडस तुम्हीं करूं नका. खिस्ती लोकांना आपापल्या विचारांप्रमाणें वागूं द्या; युरोप, अमेरिका, हिंदुस्थान, जपान, चीन वगैरे देशांत मरण पावणाऱ्या यच्चयावत् लोकांना महंमदाच्या ताब्यांत न देतां त्यांना स्वतंत्र राहूं द्या. ' आमच्या पैगंबरावर विश्वास ठेवाल तर तराल, नाहीं तर तुमचा अधःपात होईल,' असला हट्ट दाखवूं नका. असलें विधान करण्याचा तुम्हांला अधिकार पोहोंचत नाहीं; असला निष्ठुरपणा करण्याचा तुम्हांला हक्क नाहीं. आपल्या धर्मानें आंखून दिलेल्या मार्गानें तुम्हीं श्रद्धेनें जात असलां तर त्याचें फळ तुम्हांला मिळेल; आणि जिवंतपणीं ज्या आकांक्षा तुम्हीं करीत असाल त्याप्रमाणें मेल्यानंतर तुम्हांला गति प्राप्त होईल.† तुमच्या धर्मशास्त्राप्रमाणें स्वर्गाचा दरवाजा तुम्हांला जसा

* यान्ति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः ॥ गीता, अ. ९।२५.

† सदा तद्भावभावितः ॥ गीता; अ. ८।६.

खुला पाहिजे, तसाच इतर धर्मानुयायांना तो खुला ठेवा." वास्तविक विचार केला तर स्वर्ग किंवा नरक आपल्यावरच अवलंबून आहे; आपणच आपला स्वर्गनरक निर्माण करतों.* कारण, स्वर्गनरकाच्या या केवळ कल्पना आहेत, व स्वप्नांतल्या कल्पनांपेक्षां यांना जास्त सत्यत्व नाहीं. तुम्हांला माहितच आहे कीं, स्वप्नकाळीं स्वप्नांतील स्थिति कधीं खोटी वाटत नाहीं. अर्थात् मेल्यानंतरच्या स्वर्ग-नरकाच्या कल्पना त्या त्या काळीं अक्षरशः खऱ्या आहेत, पण तत्त्वदृष्टया मात्र स्वप्नस्थितीपेक्षां त्यांत सत्याचा बिलकूल अंश नाहीं.

एक गोष्ट या ठिकाणीं नमूद करून ठेवणें आवश्यक आहे. लोक म्हणतील कीं, 'आमच्या धर्मशास्त्रांनीं आम्हांला देऊन ठेविलेलीं आश्वासनें खरीं आहेत, असें तुम्हीं कबूल करतां, तर आम्हांला मेल्यानंतर जी गति मिळणार तीहि आत्यंतिक सुखाची—शाश्वत—असली पाहिजे. कारण, आमच्या धर्मांनें असें सांगितलें आहे कीं, मनुष्य मेल्यानंतर त्याला प्राप्त होणारीं स्वर्गनरकादि स्थानें चिरकाल टिकणारीं आहेत. यावर तुमचें काय म्हणणें आहे ?" यावर वेदान्ताचा प्रत्युत्तरादाखल असा प्रश्न आहे कीं, शाश्वत या शब्दाची व्याप्ति किती आहे, असें तुह्मीं समजतां ? तुम्हांला ठाऊकच आहे कीं, शाश्वत म्हणजे अत्यंत दीर्घकाल×—जवळ जवळ अनंतकाल होय. परंतु हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, जाग्रतीमधील कालमापन करण्याच्या पद्धतीपेक्षां स्वप्नस्थितीमधील कालमापन करण्याची पद्धति भिन्न आहे. कारण जाग्रति आणि स्वप्न यांतील कालमान भिन्न भिन्न आहे. कित्येक वेळां स्वप्नांत आपल्या डोळ्यांपुढें अशी स्थिति दिसते कीं, जी पांच हजार वर्षांपूर्वींची असावी, असें आपल्याला वाटतें. उदाहरणार्थ, स्वप्नांत आपण एखादा पर्वत पाहिला तर जाग्रतीच्या दृष्टीनें विचार केला असतां तो पर्वत आपण नुकताच उत्पन्न केलेला असतो. पण स्वप्नस्थितीच्या दृष्टीनें तो पांच हजार वर्षांपूर्वीं उत्पन्न झालेला आहे, अशी आपली भावना होते. याच न्यायानें इंद्राच्या नंदनवनांत, स्वर्ग-

* आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ गीता, अ. ६।५.

× मनुष्याहूनि जीवित्व । अधिक ह्मणूनि अमरत्व । देवांस, तैसें अक्षयत्व । कर्मफलास वेदीं वर्णिती ॥ यथार्थदीपिका, अ. २८।८८२.

सुखांत किंवा नरकांत आपण आहों, असें जें मृत्यूनंतरच्या स्थितींत आपल्याला वाटतें तें, त्या स्वप्नसृष्टींतील द्रष्ट्याच्या दृष्टीनें असूं शकतें, जाग्रतींतील द्रष्ट्याच्या दृष्टीनें नव्हे.

आतां बायबलमध्यें तुह्मांला दिलेल्या आश्वासनांकडे आपण वळूं. तीं आश्वासनें सफळ होतील, यांत तिळमात्र संशय नाहीं. कारण, मरणोत्तर-कालीन स्थितींत असतांना बायबलमध्यें वर्णन केलेली स्थिति ही अनंत-काल टिकणारी—शाश्वत आहे, असेंच तुह्मांला वाटेल. परंतु त्या वेळच्या दृष्टीला चिरकाल भासणारी स्थिति ह्मणजे जाग्रतीच्या दृष्टीनें विचार करतां क्षणभंगुर आणि मृगजलवत् आहे, असेंच ह्मटलें पाहिजे.

वरील विवेचनावरून मृत्यूनंतरच्या स्थितीसंबंधानें जगांतील निरनिराळ्या धर्मांचीं जीं मतें आहेत, त्यांची सांगड वेदान्त कोणत्या दृष्टीनें घालतो, याची तुम्हांला कल्पना होईल.

## मुक्तपुरुषांची स्थिति कशी असते ?

आतां यानंतर असा प्रश्न उद्भवतो कीं, पुनर्जन्मासंबंधाचा काय विचार ? तसेंच ज्यांना 'मुक्त पुरुष' असें म्हणतात त्यांची काय वाट ? यावर वेदान्त असें म्हणतो कीं, प्रत्येक मनुष्य मेल्यानंतर स्वर्गनरकासारख्या स्थितींत गेलाच पाहिजे, अथवा पुनः जन्माला आलाच पाहिजे, असा कांहीं ठरलेला नियम नाहीं; तर कांहीं पुरुष मुक्त होतात. त्यांना जन्म-मरणाच्या फेऱ्यांत पडावें लागत नाहीं, स्वर्गनरकाच्या बंदिवासांत हाल-अपेष्टा भोगण्याचें त्यांना प्रयोजन नाहीं. ते सर्व स्वर्गनरकादि स्थितींच्या अतीत असतात, सर्व चराचर ते आपणामध्यें पाहतात. अशा मुक्त *पुरु-षांबद्दल कांहीं विवेचन करणें अत्यंत जरूर आहे.

## जागृति व स्वप्न ह्यांची तुलना.

आपल्या स्वप्नामध्यें द्रष्टा आणि दृश्य वस्तु असे दोन भाग असतात, हें तुम्हाला ठाऊक असेलच. आपल्या सभोंवतालच्या नद्या, पर्वत, टेंकड्या,

* यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ॥ सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥ ईशावास्योपानिषद्. ६.

कीं ज्यांच्यामध्यें आपण कोंडले गेलेले आहों, त्या सर्व दृश्य वस्तु होत; व त्यांच्यामध्यें कोंडला गेलेला स्वप्नांतील हा आत्मा–प्रवासी–वाटसरू–द्रष्टा होय. स्वप्नांत आपण अनेक गोष्टी पहातों. त्यांपैकीं ज्याला आपण 'मी' असें म्हणतों तो एक असून ज्या वस्तु आपणांहून भिन्नत्वानें आपण पाहतों, त्यांना दृश्य वस्तु असें म्हणतात. ज्याला आपण 'मी' असें म्हणतों तो द्रष्टा आणि आत्मव्यतिरिक्त ज्या इतर वस्तु त्या दृश्य वस्तु होत. येणें-प्रमाणें द्रष्टा आणि दृश्यवस्तु असे स्वप्नाचें दोन विभाग पडतात. स्वप्नांतील द्रष्टा आणि दृश्यवस्तु, अशी ही दुहेरी सृष्टि आपल्या खऱ्या आत्म्यानें-जागृतींतील आत्म्यानें–निर्माण केलेली आहे, असें वेदान्त प्रतिपादन करतो. पंडित जॉन्सन् यांच्या चरित्रांतील एक गंमतीची गोष्ट या बाबतींत लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. पंडित जॉन्सन्–इंग्रजी भाषेचा कोश तयार करणारा पंडित जॉन्सन्–हा संभाषण–वादविवाद करण्यांत मोठा वाकबगार आणि कुशल होता; वादविवादांत हार खाणें, त्याला कधीं खपत नसे. आपला मुद्दा लंगडा पडून बाजू आपल्या अंगावर शेकते असें दिसून येऊं लागलें असतां 'शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायाचा अवलंब करून आपलें म्हणणें सिद्ध करण्यासाठीं तो आकाशपाताळ एक करून सोडी. एकदा त्याला असें स्वप्न पडलें कीं, विलायतेच्या न्यायसभेंतील त्या वेळचा प्रसिद्ध वक्ता आणि जॉन्सनच्या क्लबांतील एक सभासद असा जो एडमंड बर्क त्यानें वादविवादांत आपल्याला चीत केलें आहे. जॉन्सन्सारख्याच्या स्वभावाला असली कल्पना स्वप्नांत झाली म्हणून काय झालें, त्यामुळें एखादें भूत छातीवर बसल्याप्रमाणें त्याला वाटावें, यांत आश्चर्य नाहीं. तो एकदम दचकून झोंपेंतून जागा झाला; त्याचें चित्त अत्यंत अस्वस्थ होऊन गेल्यामुळें त्याला झोंप म्हणून लागेना. सर्वांना हें ठाऊकच आहे कीं, मनामध्यें चलबिचल किंवा अस्वस्थता उत्पन्न झाली म्हणजे तें शांततेकडे धांव घेतें. मनाचा हा सहजधर्म आहे, व शांतता हेंच त्याचें माहेरघर असल्यामुळें मनानें आपल्या मूळाकडे ओढ घ्यावी, यांत कांहीं नवल नाहीं. जॉन्सन् याला झोंप येत नाहींशी झाल्यामुळें त्यानें आपल्या मनाचें समाधान येणेंप्रमाणें करून घेतलें. तो म्हणाला, "मी एडमंड बर्क याच्याकडे गेलों आणि त्याला म्हणालों कीं, 'मित्रा, मी स्वप्नांत तुझ्याशीं वादविवाद करीत होतों, तेव्हां तूं आपल्यातर्फे

कोणते कोटिक्रम पुढें आणलेस ते सांग पाहूं ?' तर बर्क याला कांहीं आपले मुद्दे सांगतां येणार नाहीत. पण तो कशाला सांगावयाला पाहिजे ? मला त्याचा सर्व कोटिक्रम माहित आहे. त्यानें पुढें आणलेले जोरदार मुद्दे मला माहित आहेत, तसेंच जे माझे मुद्दे हाणून पाडून त्यानें माझा पाडाव केला, ते माझे पुळपुळीत मुद्देहि मला ठाऊक आहेत. चढती बाजू कोणाची आणि पडती कोणाची, तें सर्व मी जाणून आहें. एडमंड बर्क याला यांतलें काय ज्ञान आहे ? हां आत्तां आलें लक्षांत ! स्वप्नांत जिंकणारा एडमंड बर्क आणि जिंकला गेलेला जॉन्सन् अशा दोघांनांहि निर्माण करणारा पंडित जॉन्सन्, तो मी आहें."

याच न्यायानें आपल्याला दिसणाऱ्या स्वप्नसृष्टींत ज्या वस्तु दृश्यमान होतात, त्या आणि त्यांचा द्रष्टा, अशा दोन्ही कल्पनांचे जनक आपणच आहों, असें वेदान्त प्रतिपादन करतो. स्वप्नांत दृग्गोचर होणारे पर्वत, नद्या, अरण्यें व त्यांत संचरणारे पशुपक्ष्यादि जीवजंतू व त्यांच्या देखाव्यानें गोंधळून गेलेला वाटसरू, हे सर्व आपणच बनतों. मृत्युरूपी निद्रेची स्थितिहि अशाच मासल्याची आहे, असें वेदान्त म्हणतो. त्या निद्रेंतील स्वर्ग आणि नरक व त्यांत सुखदुःख भोगणारा जीव, या केवळ स्वप्न-कल्पना असून त्यांना अस्तित्व देणारे आपणच आहों, याचा प्रत्यक्ष अनुभव घ्या ह्मणजे तुह्मी मुक्तच आहां.*

एका स्त्रीला हें वेदान्तज्ञान होतें. आपल्या एका हातांत दिवटी आणि दुसऱ्या हातांत पाण्याची घागर, अशीं धारण करून ती रस्त्यांतून हिंडत असे. हें कांहीं लोकांनीं पाहून तिला प्रश्न केला कीं, "बाई, आपण एका हातांत दिवटी आणि दुसऱ्या हातांत पाणी घेतलें आहे, याचा अर्थ तरी काय ?" यावर तिनें उत्तर दिलें. "या दिवटीनें तुमच्या सर्व स्वर्गांना आणि इंद्रचंद्रादि लोकांना मीं पेटवून देणार आहें, आणि या घागरींतल्या थंड पाण्यानें तुमच्या त्या नरकादिकांना थंडगार करून सोडण्याचा माझा

* येथें देह नव्हे, खरें जग नव्हे, हा सत्य मृत्यू नव्हे ।
कांहीं पाप नव्हे, खरा यम नव्हे, नर्कादि कांहीं नव्हे ॥
ज्ञात्या दुःख नव्हे, मुढा गति नव्हे, त्या त्रास खोटा नव्हे ।
ब्रह्मानंदनिमग्न [illegible] असतां कांहींच कांहीं नव्हे ॥ १ ॥

विचार आहे !" या स्वर्गनरकादिक कल्पना आपण उत्पन्न केल्या आहेत, हें यथार्थज्ञान ज्याला झालें, तो तुमच्या स्वर्गाला किंवा नरकाला भीक घालणार नाहीं. असा मनुष्य या सर्व कल्पनांच्या पलीकडे गेलेला असतो; एवढेंच केवळ नव्हे तर, हें आपलें जागृतींतील जग कीं ज्यांतील सुखांना आपण इतके चटावलों आहों आणि ज्याच्यासाठीं अहोरात्र आपण लाळ घोंटीत असतों, त्यांत तरी तथ्य कितपत आहे ? वेदान्ताचा असा ठाम सिद्धांत आहे कीं, आपल्याला प्रत्यक्ष भासणारें हें जड जगहि केवळ स्वप्न होय, व आपली सध्यांची जागृति ह्मणजेहि फक्त स्वप्नस्थिति–मूर्त व जड बनलेली स्वप्नस्थिति–असून या जागृत अवस्थेंतील दृश्य वस्तु आणि द्रष्टा यांना आपणच उत्पन्न केलेलें आहे. जागृति आणि स्वप्न या दोन्ही स्थिति केवळ काल्पनिकच होत; त्यांत कांहीं फरक असला तर तो इतकाच कीं, जागृतीमधील जग जास्त खरें, असा आपल्याला भास होतो. आपला आत्मा मोठमोठाल्या शहरांच्या, नद्यांच्या आणि पर्वतांच्या रूपानें एका बाजूनें नटलेला आहे आणि दुसऱ्या बाजूनें त्यामध्यें निराधार भटक्या मारणारा प्रवासी—वाटसरू हेंहि वास्तविक आपल्या आत्म्याचेंच एक रूप होय. आपल्या जागृत अवस्थेंत जो द्रष्टा म्हणून म्हणविला जातो, तोच दृश्य वस्तूंत परिणत झाला आहे. आणि जो दृश्यरूपानें भासत आहे, त्यानेंच द्रष्ट्याचें रूप पांघरलें आहे.

मृत्यु याचा अर्थ फक्त द्रष्ट्याचें तिरोभवन किंवा अव्यक्त होणें, दृश्याचें नव्हे. कल्पना करा कीं, आपण मुंबईंत निजलों असून स्वप्नांत आपण पुण्यांत हिंडत आहों. आतां स्वप्नांत आपण पुण्यांतील जे देखावे अवलोकन करतों त्या दृश्य वस्तु होत आणि ते देखावे पाहणारे आपण द्रष्टे होय. पुष्कळ वेळां आपल्याला हा अनुभव आला असेल कीं, एका स्वप्नांत आपण दुसरें एक किंवा अनेक स्वप्नें पाहतों; व्याजांत व्याज मिळून जसें चक्रवाढ व्याज बनतें, तसें स्वप्नांत एका ठिकाणीं निजून दुसऱ्या ठिकाणीं जागें झाल्याचा आपणांस केव्हां केव्हां भास होतो. त्याप्रमाणें समजा कीं, स्वप्नांत पुण्यांत हिंडतांना आपण निद्रिस्त झालों. एका नाटकांत दुसरें नाटक दिसावें त्याप्रमाणें एका निद्रेंतील स्वप्नांत ही दुसरी निद्रा आली. त्यांतून फिरून जागे होऊन आपण साताऱ्यास गेलों. आतां स्वप्नांत पुण्यांत पाहिलेला देखावा जशाचा तसा कायम राहिला, पण त्याचा द्रष्टा

अन्यस्थलीं—सातान्यास गेला. तेथून निद्रिस्त होऊन तो महाबळेश्वरास गेला. आतां या सर्व ठिकाणीं दिसणाऱ्या दृश्य वस्तु जशाच्यातशा कायम आहेत, पण त्या सर्वांचा द्रष्टा मात्र स्थलांतर करतो. हा स्थलांतर करणारा द्रष्टा स्वप्नस्थितींतील असल्यामुळें आपण खरोखरी जागे होतांक्षणीं तो स्वप्नद्रष्टा–स्थलांतर करणारा स्वप्नद्रष्टा—तसेंच त्यानें स्वप्नांत अवलोकन केलेल्या सर्व ठिकाणच्या दृश्य वस्तु, एकदम विलयाला जातात. पण स्वप्नांत दृश्य कायम राहून द्रष्टा नाहींसा होतो. आणि हाच स्वप्नस्थिति आणि जागृतस्थिति यांच्यामध्यें फरक आहे.

आतां वरील दृष्टांत आपण आपल्या प्रस्तुतच्या स्थितीस कसा लागू पडतो हें पाहूंया. वेदांताचा सिद्धान्त हा आहे कीं, आपल्याला प्रत्यक्ष अनुभूत होणारें हें जग–चराचर केवळ भास–स्वप्न होय. आपल्या इंद्रियांना गोचर होणारें हें अफाट जग, हें दिक्कालनिमित्त, हें सर्व विश्व यांची ' दृश्यांत' गणना केली जाते, आणि ज्याला आपण ' माझें शरीर, ' ' माझें मन ' किंवा ' माझी बुद्धि ' असें नांव देतों, तोच ' द्रष्टा ' मानला गेला आहे. एखादा सामान्य मनुष्य मेला म्हणजे काय स्थिति होते ! मायेचें किंवा अज्ञानाचें हें जें दीर्घ स्वप्न, त्याचा नाश न होतां तें जसेंच्यातसें कायम रहातें आणि फक्त द्रष्टा नाहींसा होतो. दृश्य बिलकुल न बदलतां द्रष्टा तिरोधान पावणें, याचेंच नांव मृत्यु. अर्थात् मनुष्य मरण पावला म्हणजे स्वप्नस्थितींतून तो फिरून जागृत होतो, व ही पुनर्जागृति म्हणजेच पुनर्जन्म होय. व मागल्या जन्मीं मरणकालीं जें जग त्याच्या प्रेमाचा विषय होऊन गेलेलें असतें, त्याच जगांत मनुष्य जन्माला येतो, व या नव्या जन्मांत यथाकाल ऐशीं नव्वद वर्षे तो जगतो आणि पुनः मृत्युमुखीं पडतो. मुंबईमध्यें झोंपी जाऊन पुणें किंवा सातारा या ठिकाणीं स्वप्नांत जाणें, अशा स्वरूपाची पुनर्जन्माची कल्पना आहे. अशा रीतीनें हें संसारचक्र अव्याहत फिरत राहिलें आहे. जन्मानंतर मृत्यु आणि मृत्यूनंतर फिरून जन्म, हा अनादि क्रम अविरत चालला आहे, व जोंपर्यंत द्रष्टा आणि दृश्य ह्यांचा आत्यंतिक प्रलय झाला नाहीं, तोंपर्यंत ही अनाद्यनंतपरंपरा अशीच कायम राहावी, हें अपरिहार्य आहे. हें जग जोंपर्यंत आपणाहून व्यतिरिक्त असें आपण पाहात आहों, तोंपर्यंत जगाच्या या अवाढव्य तुरुं-गांत या अल्पजीवाला कैदी म्हणून राहलेंच पाहिजे; जन्ममरणाच्या–संसा-

राच्या चक्रावर भ्रमण करीत राहण्याशिवाय त्याला गत्यंतर नाहीं.*हें पुनर्जन्माचें चक्र अव्याहत आणि अखंड फिरत रहाणार आणि तें आपल्या घबडग्याबरोबर जीवांना उन्नति आणि अवनति यांच्या फेऱ्यांत फेंकल्याशिवाय रहाणार नाहीं. हें संसारचक्र अशा रीतीनें फिरत असल्यामुळें शांतता किंवा विश्रांति यांना आपण कायमचे पारखे होऊन गेलेले आहों.

## जन्ममरणपरंपरा केव्हां चुकेल ?

वेदान्त म्हणतो कीं, जो या संसारचक्रांतून सुटला—मुक्त झाला—तो द्रष्टा आणि दृश्य अशीं दोन्हीं आपणांमध्यें पहातो. जॉन्सन् याच्याप्रमाणें जागृत होऊन आपण असें जेव्हां प्रत्यक्ष अनुभवूं कीं, स्वप्नांतील द्रष्टा आणि दृश्य आपणच बनतों, तेव्हांच आपण मुक्त होऊं. ‘ हें सर्व विश्व माझें शरीर आहे, सर्व चराचर माझें शरीर आहे, ’ असा ज्या मनुष्याचा अनुभव झाला तो जन्ममृत्युपरंपरेच्या अतीत झाला, असें समजावें. असा साक्षात्कार झाल्यानंतर तो जाणार तरी कोठें ? व येणार तरी कोठून ? तो ज्या स्थलीं नाहीं असें स्थळच नाहीं; कारण, तो अनंत आहे. मग त्याला जाणें येणें कसें असणार ? कारण, सर्व चराचर हें त्याच्यामध्यें आहे—तो सर्व देवांचा देव, मुक्तांचा मुक्त झाला. आपण मुक्त व्हावें, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटावें आणि शेवटीं ईश्वरी साक्षात्काराच्या दिव्य आणि आत्यंतिक सुखांत—आनंदांत आपण निरंतर रहावें, ही एकच आकांक्षा हिंदुस्थानांतील प्रत्येक मूल आपल्या आईच्या अंगावरील दुधाबरोबर प्राशन करीत असतें.

मिल्टन् कवीच्या चरित्रांत त्याच्या स्त्रियांपैकीं एकीची एक मोठी मजेदार गोष्ट आहे. तिनें एकदा स्वप्नांत आपल्या पतीला—प्राणेश्वराला—अवलोकन केलें. त्याला भेटण्याला ती अत्यंत उत्सुक झाली होती, व त्यामुळें झालेला आनंद तिच्या अंतःकरणांत मावेनासा झाला. शेवटीं आपल्या प्रियपतीला गाढालिंगन देऊन ती म्हणाली, “ महाराज, मी सर्वस्वीं आपली आहें ! ” इतक्यांत ती एकदम जागी झाली व भोंवतालीं पाहते तों पटकन् बिछान्यांतून आपला कुत्रा बाहेर उडी मारतांना तिला दिसला.

* जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ॥ गीता, २।२७.

तेव्हां तिची खात्री झाली कीं, आपल्या शेजारीं खेटून बसलेला कुत्राच स्वप्नांत आपला पति, असा आपल्याला भास झाला. तो कुत्रा त्या स्त्रीच्या अंगाशीं जास्त खेटून बसला तर आपल्या अंगावर हिमालय पर्वताचें प्रचंड ओझें आहे, अशी तिची भावना झाली असती. वेदान्त प्रतिपादन करतो कीं, ह्या अज्ञानस्वरूपी कुत्रा—हें मायारूपी श्वान—जोंपर्यंत आपल्यावर दडपण टाकीत आहे तोंपर्यंत आपल्याला केव्हां सुस्वप्नें पडतील, व केव्हां दुःस्वप्नें पडतील, यांत तिळमात्र शंका नाहीं; व कधीं प्रियपति तर कधीं अवाढव्य हिमालय, अशीं निरनिराळीं रूपें आपल्यासमोर उभीं राहतील. आणि घड्याळांतील लंबकाप्रमाणें कधीं आनंदाश्रु तर कधीं दुःखाश्रु यांच्यामध्यें हें मायेचें श्वान आपल्याला सदोदित फिरवीत ठेवील! व त्याच्या योगानें जग हें आपल्या छातीवर एक भयंकर दडपणच आहे, असें आपल्याला वाटावयास लावील आणि विश्रांतीचा एक क्षणहि आपल्याला मिळूं देणार नाहीं. वेदान्त म्हणतो कीं, या अज्ञानरूपी श्वानाला दूर झुगारून द्या, व आपलें ईश्वरत्व, प्रभुत्व आणि सर्वशक्तिमत्त्व अनुभूत करून त्याच्याशीं तादात्म्यवृत्ति करून घ्या म्हणजे तुम्हीं मुक्तच आहां.



३

# मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे*

(गोल्डनगेट हॉलमध्यें तारीख २४ जानेवारी
१९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान)

ॐ !



स्त्रीपुरुषरूपानें नटणाऱ्या, हे जगन्नियामका ! मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे, हा आजच्या रात्रीचा विषय आहे. खरें पाहिलें तर मनुष्य म्हणजे देव–परमेश्वरच आहे, दुसरें कांहीं नाहीं, आणि म्हणूनच तो आपल्या दैवाचेंच फक्त नियमन करतो असें नसून हें सर्व विस्तीर्ण जगहि त्याच्याच ताब्यांत असतें. पण आजच्या व्याख्यानांत आपण मनुष्य शब्दाचा अर्थ वेदान्तांतील सूक्ष्मशरीर असाच घेऊं. व अशा अर्थानें मनुष्य म्हणजे इच्छा, आकांक्षा, व सुखप्रवणता असणारी व्यक्ति होय. इतका संकुचित अर्थ घेतला तरीहि ‘ मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे, ’ असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्या प्रश्नाचा निरनिराळ्या दृष्टींनीं विचार करतां येण्यासारखा आहे. आज ह्या विषयाचा सांगोपांग विचार होणार नाहीं. मनुष्य शब्दाचा हा जो संकुचित अर्थ दिला आहे, त्याच दृष्टीनें–म्हणजे व्यष्टिदृष्ट्या–आज आपण ह्या विषयाचा विचार करूं.

## आपल्या जन्मालासुद्धां कारण आपणच !

जन्माला आल्यानंतर मनुष्याला आपली परिस्थिति बरीचशी बदलतां येते, असें वाटणें–असा समज असणें, स्वाभाविक आहे. लोकांची कल्पना अशी कीं, एखादा मनुष्य विशिष्ट परिस्थितीमध्यें जन्मला असतां ती परिस्थिति त्याला पुष्कळ अंशानें बदलतां येईल–त्या परिस्थितीचें त्याला नियं-

* स्वभावस्तु प्रवर्तते ॥ भ० गीता, अ० ५।१४.

मन करतां येईल; अत्यंत गरीब स्थितींत जन्माला आलेले पुष्कळ लोक पुढें फार श्रीमंत झालेले आपण पाहिले असाल. अत्यंत दरिद्री असे लोक आपल्या स्वतःच्या कर्तबगारीनें जगांत पुढें आलेले आहेत. अगदीं खालच्या स्थितींत जन्मलेल्या लोकांनीं स्वतःच्या श्रमांनीं आपल्याला उत्तम स्थिति प्राप्त करून घेतली आहे. नेपोलियन बोनापार्ट याचें उदाहरण घ्या; शेक्सपिअरचें चरित्र पहा; लंडनच्या स्थानिक स्वराज्याचा एके वेळीं अध्यक्ष असलेला जो व्हिटिंग्टन त्याची गोष्ट घ्या. हे सर्व अत्यंत दरिद्रावस्थेंतून थोरपणास चढले होते. चीनचा एक मुख्य प्रधान पूर्वीं शेतकरी होता. असल्या उदाहरणांवरून हें सिद्ध करणें सोपें आहे कीं, एकदा मनुष्य जन्माला आला कीं, ह्या जगांतील आपली परिस्थिति त्याला बदलतां येते. परंतु आपला जन्म व आपल्याला जन्म देणारीं मातापितरें हींसुद्धां आपल्याच इच्छेनुरूप ठरत असतात, हा जो वेदान्ताचा सिद्धांत, तो पटणें बरेंचसें कठीण आहे. मुलाच्या लहाणपणच्या एकंदर लक्षणांवरून तो मोठेपणीं कसा होईल, हें आपल्याला सहज समजतें. परंतु त्याच लक्षणांवरून त्याच्या मागील जन्मींच्या वासना काय असाव्या, याचेंहि अनुमान करतां येतें, हें गळीं उतरणें कठीण आहे. पण वेदान्ताचें तत्त्व असें आहे कीं, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी मनुष्याचें दैव त्याच्याच स्वाधीन असतें. तुम्ही जन्मतःच अंध झालां असलां तर तसें होण्याला तुमचे तुम्हीच कारण आहां. तुम्ही गरीब आईबापांच्या पोटीं जन्माला आलां असलां तरी असें होण्याला कारण तुमचे तुम्हींच. अत्यंत अनिष्ट अशा परिस्थितींत तुमचा जन्म झाला असला तरी तो तुमच्याच कृतीचा परिणाम असला पाहिजे. खुद्द जन्माला येण्यालासुद्धां आपले आपणच कारण आहों!* ह्या प्रश्नाचा फक्त ह्याच दृष्टीनें—म्हणजे कोठें जन्माला यावें, हें सुद्धां आपले आपणच कसें ठरवीत असतों, आपल्या मातापितरांची निवड आपली आपणच कशी करतों, ह्याचाच—आज आपण विचार करूं. आणि ह्या प्रश्नाचा विचार म्हणजे एका दृष्टीनें पुनर्जन्माच्या प्रश्नाचा विचार होय. परंतु पुनर्जन्माच्या विषयाचें साग्र विवेचन न करतां त्यासंबंधानें अल्प विवेचन आज आपण करूं.

* सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता । परो ददातीति कुबुद्धिरेषा ॥
अहं करोमीति वृथाभिमानः । स्वकर्मसूत्रैर्ग्रथितो हि लोकः ॥

## मृत्यूनंतरच्या स्थितीबद्दल भिन्न भिन्न कल्पना.

कांहीं लोक असें मानतात कीं, मनुष्य मेला म्हणजे तो अजिबात नाहींसा होतो. परंतु हें त्यांचें म्हणणें दुसऱ्या कांहीं लोकांना पटत नाहीं. आपले नातलग मरूं नयेत, ही आपली स्वाभाविक इच्छा असते. त्यांनीं जगांतून कायमचें नाहींसें व्हावें, हें आपल्याला आवडत नाहीं. तसेंच अमरत्वाची आपली कल्पनाहि–नैसर्गिक–स्वाभाविक अशीच असते. अशी स्थिति असल्यामुळें त्यांना–मनुष्य मेला म्हणजे तो अजिबात नाहींसा होतो हें न पटणारांना–दुसऱ्या एका जगाची कल्पना करावी लागते. परंतु ह्या काल्पनिक जगाच्या अस्तित्वाबद्दल त्यांना प्रत्यक्ष असा पुरावा कांहींच देतां येत नाहीं. या मतांतहि सत्याचा कांहीं अंश आहे, व त्याचा विचार मागील व्याख्यानांत झालेला आहे. परंतु मनुष्य मेल्यानंतर नरकांत किंवा स्वर्गांत जातो, इतकें मानल्यानेंच सर्व गोष्टींचा उलगडा होत नाहीं. ही समजूत एकदेशी आहे. फक्त एका अंगाचाच या कल्पनेनें खुलासा होऊं शकेल. भौतिक शास्त्रांच्या दृष्टीनेंहि ह्या मुद्याचा विचार व्हावयास पाहिजे. पण अध्यात्मिक नियमांना त्यांच्या मर्यादेचें उल्लंघन करून आधिभौतिक विषयांच्या मर्यादेंत प्रवेश करूं देतां कामा नये. कल्पना करा कीं, एक मनुष्य मेला. त्याला जमिनींत पुरलें व मातीला माती मिळाली. आतां असें पहा कीं, शरीर मातीला मिळालें हें खरें, पण त्याचा विनाश झाला नाहीं. त्या शरीराचें केवळ स्थित्यंतर—रूपांतर झालें. त्या शरीराचीं जीं भौतिक तत्वें तीं निराळ्या रूपानें कां होईना, पण अस्तित्वांत असतात. त्यांचा विनाश होत नाहीं. तुमच्या मित्राचें तेंच मृत शरीर कदाचित् त्याच थडग्यावर सुंदर गुलाबाच्या रूपानें परत दिसेल; क्वचित् एखादे दिवशीं तें झाडाच्या रूपानेंहि दृग्गोचर होईल. सारांश, त्या शरीराचा विनाश झालेला नाहीं हें खास.

## सूक्ष्म शरीराचा विनाश होणें शक्य नाहीं.

आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, आत्मा—'सत् तत्व–ईश्वर याचा तरी नाश होतो कीं काय? छे! छे! तो तर अविनाशी आहे. खरा देही

जो आहे, त्याचा कदापि विनाश व्हावयाचा नाहीं;* कोणीहि त्याचा विनाश करूं शकणार नाहीं. मग प्रश्न उरला तो कसला ? अर्थात् सूक्ष्म शरीराचा; आणि सूक्ष्म शरीर† हें भावना, आकांक्षा आणि वासना किंवा तुम्हीं ज्याला आत्म्याच्या इच्छा आणि कामना म्हणतां—यांचें बनलेलें आहे. तेव्हां त्याचें काय ? मनुष्याला पुरतात तेव्हां त्या इच्छाहि त्याच्याच बरोबर जमिनींत गाडल्या जातात कीं काय ? नाहीं नाहीं ! त्या जमिनींत गाडल्या जाणें शक्य नाहीं. मग त्यांचें काय होतें ? प्रश्न आहे तो या सूक्ष्म शरीराचा—मनुष्याच्या वासनांचा किंवा त्याचे मनोविकार, व इच्छा ह्यांचा; ह्या सर्वांचें होतें काय ? तुम्हीं म्हणाल कीं, तीं सर्व मरणानंतरच्या काल्पनिक जगांत जातात. व असें म्हणणें हें तुमच्या दृष्टीनें बरोबर असेल. पण या प्रश्नाला शास्त्राला पटेल आणि ह्या आपल्या भौतिक जगांत खरें ठरेल, असें उत्तर पाहिजे. शास्त्राचा अबाधित आणि सर्वव्यापी असा सिद्धांत तुम्हांला ठाऊकच आहे कीं, ह्या जगतामधील कोणत्याहि गोष्टीचा विनाश होत नाहीं. प्रेरणासातत्याचा नियम घ्या, जड पदार्थांच्या अविनाशित्वाचा नियम पहा, शक्तीच्या प्रकृतिनित्यत्वाकडे लक्ष द्या, त्यावरून हें सिद्ध आहे कीं, कशाचाच विनाश होणें शक्य नाहीं. आतां आपल्या शरिराचा नाश न होतां जर त्याचें केवळ रूपांतर होतें; व आपल्या शरीरांत वास करणारा जो शरीरि त्याचा तर नाश होतच नाहीं, कारण, तो नित्य आणि अव्यय आहे; तर मग कामनांचा व वासनांचाच तेवढा नाश कां व्हावा ? शक्तीच्या प्रकृतिनित्यत्वाचा जो अबाधित नियम, त्याप्रमाणें हें शक्यच नाहीं. वासनांचा नाश होतो, असें म्हणण्याला आपणांला अधिकार नाहीं; त्यांचें रूपांतर—स्थलांतर होईल, पण त्यांचा विनाश कदापि होणार नाहीं. एक मेणबत्ती घेऊन पेटविली तर अर्ध्या तासाच्या आंत ती सगळी जळून जाईल. मेण, वात सर्व कांहीं नाहींसें होईल. परंतु रसायनशास्त्रावरून आपल्याला असें समजतें कीं, मेणबत्तीचा नाश झाला नाहीं. एक वांकविलेली कसनळी घ्या आणि तींत दाहक सोराखार

---

* अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् । विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ गीता, अ. २।१७.

† आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः-कठोपनिषद्, अ. १, तृतीयवल्ली॥ ३.

व दुसरें एक रासायनिक द्रव्य घाला, म्हणजे तुम्हांला असें दिसेल कीं, मेणवत्ती नाहींशी झाली नाहीं, तर तिच्यांतले निरनिराळे पदार्थ त्या नळींत आहेत. एका बशींत पाणी घालून ती जर वाऱ्यावर ठेवली तर कांहीं वेळानें त्याचें बाष्प होतें. आतां साधारण मनुष्य म्हणेल कीं, तें पाणी नाहींसें झालें—त्याचा नाश झाला; परंतु पदार्थविज्ञानशास्त्र सांगतें कीं, तें पाणी हवेंत आहे. त्याचा विनाश झालेला नाहींच. व प्रयोगानें ही गोष्ट सिद्ध होते.

## वेदान्त ऊर्फ आत्म्याचें रसायनशास्त्र.

याच न्यायानें जेव्हां मनुष्य मरतो तेव्हां त्याच्या वासना, भावना ह्या सर्वांचा देहाबरोबर नाश होतो, असें वरवर पाहिलें असतां वाटतें. परंतु वेदान्त—ज्याला आत्म्याचें रसायनशास्त्र असें ह्मणतां येईल—असें सिद्ध करतो कीं, यांचा नाश होत नाहीं—होणें शक्य नाहीं. तर मग या वासनांचें होतें काय ? गणितशास्त्रांतील सिद्धान्त आपण जसा सोडवितों त्याचप्रमाणें हा प्रश्न आपण सोडवूं. एखादा सिद्धान्त आपण घेतला म्हणजे आधीं गृहीत काय आणि अनुमान काय, किंवा कल्पना काय आणि सिद्ध करावयाचें काय, हें आपण पाहतों. ह्या दोन्हींचा आपण विचार करतों. कधीं कधीं तर दिलेल्या गोष्टींचाच फक्त विचार केल्यानें आपल्याला सिद्धान्त सोडवितां येतो; कधीं कधीं जें आपल्याला सिद्ध करावयाचें असतें त्याचाच विचार करावा लागतो व दिलेल्या गोष्टी आणि जें सिद्ध करावयाचें तें, ह्यांचा एकमेकांशीं संबंध जुळवावा लागतो. आतां ह्या ठिकाणीं कोणती गोष्ट दिलेली आहे आणि कोणती गोष्ट आपल्याला सिद्ध करावयाची आहे ? जन्म व मृत्यु—किंवा मृत्यु आणि जन्म असें म्हटलें तरीहि चालेल—ह्या त्या दोन गोष्टी होत. या जगांत हजारों लोक जन्माला येतात आणि हजारों लोक मरतात; आतां हे जे लोक मरतात असें दिसतें, त्यांच्या कामना व वासना त्यांच्याबरोबर लय पावल्या अशी कल्पना आपण केली, तर ती शास्त्रसिद्ध नियमांच्या विरुद्ध होईल; आपल्या वासना नाहींशा होतात असें मानलें, तर भावाचा अभाव होतो, असें आपणास मानावें लागेल. परंतु हें शक्य नाहीं. भावाचा अभाव कधीं होत नाहीं—वस्तूचें अस्तित्व कायम नाश

पावणें शक्य नाहीं.* तेव्हां ही भ्रामक कल्पना टाळण्यासाठीं आपल्याला असें मानलेंच पाहिजे कीं, मृत्यूनंतर आपल्या इच्छा–वासना–नष्ट होत नाहींत. हें तुम्हांला गृहीत धरलेंच पाहिजे, एरवीं गत्यंतर नाहीं.

## पुनर्जन्माची कल्पना कां मानावी लागते ?

आतां यानंतर दुसरा प्रश्न असा उद्भवतो कीं, तर मग यांचें होतें काय ? ह्या प्रश्नाचा विचार म्हणजे आपण जन्माला कां व कसे येतों, ह्याचाच विचार करणें होय. जगामध्यें जीं मनुष्यें जन्माला येतात त्यांच्यामध्यें नानातऱ्हेचे भेद आपणांला आढळून येतात. धारणाशक्ति, मनोवृत्ति, मनाचे कल, चेहेऱ्याची ठेवण, मस्तकाची रचना, मेंदूचा आकार व वजन ह्या बाबतींत माणसांमाणसांत जन्मतःच आपल्याला कितीतरी फरक दिसून येतो ! कांहींचा मेंदू अत्यंत हलका तर कांहींचा फार वजनदार; एकाचें डोकें वाटोळें तर दुसऱ्याचें लांबट, असें आपण पाहतों. तसेंच ग्रहणशक्ति आणि कर्तृत्वशक्ति यांसंबंधानेंहि मनुष्यांमनुष्यांत विलक्षण तफावत दिसून येते. असें कां व्हावें ? एकाच आईबापाचे दोन मुलगे, पण दोघांच्या स्वभावांत उत्तर आणि दक्षिण ध्रुवांइतकें अंतर दिसून येतें ! एकाच घरांत ‡ केन आणि आबेल किंवा † जोसेफ आणि त्याचे भाऊ यांच्यासारखे परस्परविरोधी गुणधर्मांचे पुत्र कितीतरी दिसून येतील ! एकाच पाठशाळेंत

---

* नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ॥
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ गीता १, अ. २।१६.

‡ आदम आणि ईव्ह ह्यांचे हे दोन मुलगे. केन हा पहिला, व आबेल हा दुसरा. केन दुष्ट होता व त्यानें आबेल ह्यास ठार मारलें. आबेल हा ईश्वरभक्त होता.

† ज्यू राष्ट्राचा संस्थापक जो आब्राहाम, त्याला आयझाक नांवाचा मुलगा होता; त्याचा आवडता मुलगा जेकब. या जेकबला बारा मुलगे होते. त्यांपैकीं जोसेफ हा एक असून तो आपल्या बापाचा फार लाडका होता. याबद्दल त्याच्या भावांना वैषम्य वाटून त्यांनीं एके दिवशीं जोसेफला गुलाम म्हणून अरब व्यापाऱ्यांना विकला. जोसेफ हा परमेश्वराचा भक्त असून त्याच्या कृपेनें पुढें मोठ्या योग्यतेस चढला. तथापि पूर्वींच्या अपकारांची फेड, आपल्या भावांवर अडचणींच्या वेळीं उपकार करूनच, त्यानें केली.

जाणारे, एकाच वसतिगृहांत राहणारे, एकाच गुरूच्या हाताखालीं शिकणारे असे पुष्कळ विद्यार्थी असतात; पण त्यांच्यामध्यें किती विलक्षण प्रकारचें प्रकृतिवैचित्र्य आणि रुचिवैचित्र्य आढळून येतें. एकाला गणित आवडतें तर दुसऱ्याला इतिहास प्रिय वाटतो; एक कवि तर दुसरा बथ्थड डोक्याचा ! तेव्हां मनुष्यांच्या स्वभावामध्यें जन्मसिद्ध असे कांहीं भेद असतात, ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे; ती नाकबूल करून चालणार नाहीं. कांहीं मुलें लहानपणींच प्रौढ बुद्धीचीं असतात, म्हणजे त्यांना त्यांच्या वयाच्या मानानें कितीतरी समजतें. तेंच दुसरीं कांहीं मुलें मंद बुद्धीचीं असतात. हा असा भेद कां दिसून यावा ? तुम्हीं म्हणाल कीं, ह्याला कारण, परमेश्वराची इच्छा; ही त्याची करणी !* तर आम्हीं असें म्हणूं कीं, हें कांहीं उत्तर नव्हे, तर उत्तर टाळणें आहे. आणि प्रश्नाचें उत्तर देण्याची टाळाटाळी करणें, हें अशास्त्र व अयुक्त आहे; त्याच्या योगानें तुम्हीं आपलें अज्ञान मात्र प्रकट करतां. भौतिक शास्त्राचे जे नियम सिद्ध झालेले आहेत, त्या नियमांना धरून तुमचें उत्तर पाहिजे. तुम्ही जेव्हां असें म्हणतां कीं, परमेश्वराच्या इच्छेनेंच या जगांत निरनिराळ्या प्रकृतीचीं माणसें जन्माला येतात, तेव्हां असें म्हणण्यानें तुम्ही शास्त्रीय नियमांचें उल्लंघन करतां. कारण, अभावापासून भाव उत्पन्न होतो, असें म्हणण्यासारखेंच तुमचें म्हणणें असंबद्धपणाचें आहे; या अडचणींतून सुटण्याला एकच मार्ग आहे. व तो असा कीं, आपल्याला हें गृहीत धरून चाललेंच पाहिजे कीं, भिन्न भिन्न मुलांत जन्मतःच दिसून येणारे हे नानाविध भेद तीं मुलें कोठून तरी लोकांतराहून आपल्याबरोबर आणीत असलीं पाहिजेत. निरनिराळ्या प्रकारच्या ज्या मनोवृत्ति व कल हीं मुलें आपल्याबरोबर, घेऊन येतात, त्या शून्यांतून—अभावांतून निघणें शक्य नाहीं. तेव्हां आपल्याला असें मानलेंच पाहिजे कीं, ह्या मनोवृत्ति पूर्व-जन्मार्जित असतात. आतां जन्म आणि मृत्यु ह्या दोन गोष्टींचा विचार करून वेदान्तानें त्या दोघांचा संबंध जोडून दिला आहे, त्याचा खुलासा असाः—मनुष्य मेला म्हणजे त्याच्या ज्या इच्छा पूर्ण झाल्या नसतील त्या नाश पावत नाहींत. समजा, एक मनुष्य जन्माला येतो. त्याच्या मनावर कांहीं

* न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।। गीता, ५।१४.

विशिष्ट संस्कार स्पष्टपणानें उमटलेले दिसतात. आतां हे संस्कार अभावांतून निघणें शक्य नाहीं. मनुष्य मेल्यावर त्याच्या बरोबर त्याचे त्या जन्मींचे संस्कार मरत नसून ते पुढल्या जन्मीं जागृत होतात, असें असूं शकणार नाहीं काय ? व असें मानलें कीं, भावाचा अभावांत लय होतो आणि अभावापासून भाव उत्पन्न होतो, अशी असंभाव्य कल्पना आपल्याला करावी लागणार नाहीं. हा कर्मसिद्धांत—हें कर्मतत्व एकदां मान्य केलें कीं जन्म व मृत्यु ह्यांचा चक्रनेमिक्रम सृष्टिनियमाला धरून आहे, ( विश्वांतील नियमांत जी एकतानता दिसून येते, त्या एकतानतेला धरून आहे, ) असें आपल्याला दिसून येईल.

## कर्मतत्त्व.

तसेंच तर्कशास्त्राच्या दुसऱ्या एका नियमाप्रमाणेंहि आपल्याला हें कर्मतत्त्व कबूल करणें भाग आहे. ह्याला काटकसरीचें तत्व असें तर्कशास्त्रज्ञ ह्मणतात. हा नियम असा आहे कीं, एखाद्या गोष्टीचा उलगडा नैसर्गिक आणि नेहमींच्या नियमांनीं होत असला तर त्याकरितां ओढून ताणून तयार केलेल्या अस्वाभाविक अशा गोष्टींचें साहाय्य घेऊं नये. कर्मतत्त्वानें जर जन्ममृत्यूची यथास्थित संगति लागत आहे, तर दुसऱ्या शास्त्रबाह्य नियमांची मदत घेण्याची जरूरी काय ?

## कर्मतत्त्वाची व्यापकता.

आतां यावर शास्त्रज्ञ कदाचित् ह्मणतील कीं, जन्माला आलेल्या मुलांत जे निरनिराळे प्रकृतिभेद दिसून येतात, त्यांचा उलगडा करण्याला कर्मतत्त्वाकडे धांव घेण्याची जरूरी नाहीं. ह्या सर्वांचा उलगडा आनुवंशिकतेच्या तत्त्वानेंहि सहज करतां येईल. वेन्दाती ह्मणतात कीं, येणार नाहीं असें नाहीं; व आमचें म्हणणें असें कीं, कर्मतत्त्व हें आनुवंशिकतेच्या नियमाविरुद्ध नाहीं; एवढेंच नव्हे तर कर्मतत्त्वामध्यें आनुवंशिकतेचा अंतर्भाव होतो. कर्मतत्त्वाच्या नियमांनीं आनुवंशिकतेचे नियम स्पष्ट होतात; इतकेंच नाहीं तर आनुवंशिकतेच्या नियमांना ज्या गोष्टींचा उलगडा करतां येत नाहीं—ह्मणजे उदाहरणार्थ, मरतांना वासनांचा होणारा लोप—पात, त्या गोष्टींचा सुद्धां उलगडा कर्माच्या नियमांनीं होतो. तेव्हां ह्या कर्मतत्त्वाच्या नियमाकडे सर्व शास्त्र-

ह्यांनीं अधिक लक्ष देणें अवश्य आहे. आनुवंशिकतेच्या नियमांचें स्पष्टीकरण कर्माच्या नियमांनीं कसें होतें ? मनुष्य जेव्हां मरतो, तेव्हां त्याच्या वासना बाह्यतः तरी वाऱ्यावर फेंकून दिल्याप्रमाणें नाहींशा होतात. परंतु वेदान्त आपल्याला असें सांगतो कीं, त्या नाहींशा होत नाहींत. तर ज्याप्रमाणें मेणबत्ती जळत असतां तिच्यांतील मेण व वात हीं नाहींशी होत नाहींत, दिसण्यांत मात्र नाहींशीं होतात, परंतु खरोखर असें होतें कीं, स्नेहाकर्षणाच्या नियमाप्रमाणें कर्ब व प्राण ह्यांचा संयोग होतो व उज्ज ह्रा प्राणाला आपल्याकडे ओढून घेतो, त्याचप्रमाणें मेल्यानंतर मनुष्याच्या इच्छा, त्याच्या वासना किंवा त्याचें सूक्ष्म शरीर—हीं एक प्रकारच्या स्नेहाकर्षणानें—खरें पाहूं जातां आपण ह्याला आत्मिक आकर्षण ह्मणूं—एकत्र होतात, व त्या अशा ठिकाणीं आकर्षिल्या जातात कीं, जेथील परिस्थिति त्यांच्या वाढीला अनुकूल असते—ज्या ठिकाणीं त्याचें संवर्धन व विकास होईल, त्या फलद्रूप होतील, तुह्मांला उपभोगतां येतील अशा क्षेत्राकडेच * त्या ओढल्या जातात. सारांश, तुमच्या सर्व इच्छा किंवा वासना ह्या अशा स्थानीं आकर्षण केल्या जातात कीं, जेथें ज्या वासना पूर्वी सफल झाल्या नसतील त्या तशा होण्याला अनुकूलता सांपडेल व ज्या इच्छा पूर्ण झाल्या नसतील, त्या पूर्ण होण्याला योग्य संधि प्राप्त होईल, व त्यांचीं फळें तुह्मांला उपभोगतां येतील; आणि अशा रीतीनें प्रत्येकजण आपल्या मातापितरांची निवड करतो. मनुष्य जिवंत असतो तोंपर्यंत त्याच्या मनांत पुष्कळ इच्छा असतात. त्यांपैकीं कांहीं त्याच्या हयातींत पूर्ण होतात. पण कांहीं तशाच राहून जातात. ह्यांचें काय होतें ? त्या काय साफ नाहींशा होतात ? छे ! छे ! असें होणें शक्य नाहीं. बागेंत कळी दिसली कीं, पुढें फूल येणार, अशी आपण अपेक्षा करतों. व त्याप्रमाणें पुढें फूल आलें कीं, आपली ती अपेक्षा पूर्ण होते. आपण पाहतों कीं, मुंग्या व इतर नीच प्राणी ह्यांच्यासुद्धां इच्छा पूर्ण होतात; मग माणसांच्याच निष्फळ कां व्हाव्या ? मनुष्याचीच तेवढी निसर्गानें किंवा परमेश्वरानें चेष्टा काय ह्मणून करावी ? त्याच्या इच्छा सुद्धां परिपूर्ण झाल्या पाहिजेत. आपल्या बऱ्याचशा इच्छा आपल्या हयातींतच पूर्ण

* इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ॥ गीता, अ. १३।१.

होतात. व इच्छा ह्या आपल्या कृतीच्या प्रवर्तक होत. परंतु आपल्या पुष्कळशा इच्छा अतृप्त राहतात. त्यांचें काय होतें ? वेदान्त म्हणतो, 'हे मानवा, परमेश्वरानें तुझी विडंबना करावी अशाकरितां तूं जन्माला खास आलेला नाहींस. तुझ्या ज्या इच्छा पूर्ण झाल्या नसतील, तुझ्या ज्या वासना फलित झाल्या नसतील—त्या सर्व इच्छा, सर्व वासना ह्या जन्मीं नाहीं तर पुढल्या जन्मीं केव्हांतरी फलद्रूप झाल्याच पाहिजेत !'

## आपल्याला पूर्वजन्मांचें स्मरण कां नाहीं ?

आतां या ठिकाणीं असा प्रश्न उद्भवतो कीं, आपण पूर्वी जर कोणत्या तरी जन्मांत होतों आणि मेल्यानंतर जर आपल्याला पुनः कोणतातरी जन्म मिळणार आहे, तर मग आपल्याला आपल्या पूर्वजन्मांची आठवण कशी रहात नाहीं ? वेदान्त विचारतो कीं, स्मृति म्हणजे काय ? असें पहा, राम आतां तुमच्याशीं परक्या भाषेंत बोलत आहे. हिंदुस्थानांत असतांना रामानें इंग्रजी भाषेंत कधींहि व्याख्यान दिलेलें नाहीं. तुमच्याशीं इंग्रजींत बोलतांना मातृभाषेचा एक शब्दहि रामाच्या डोक्यांत येत नाहीं. पण म्हणून ती हिंदी भाषा नष्ट झाली काय ? नाहीं, ती आहेच आणि रामाला वाटेल तेव्हां एका क्षणांत आरबी, फारशी, किंवा दुसऱ्या पौर्वात्य भाषा त्याला आपल्या डोक्यांत आणतां येतील. तर मग स्मृति म्हणजे काय ? हें पहा, आपलें मन म्हणजे एक सरोवर आहे. ह्या वेळीं सर्व पौर्वात्य भाषा—फारशी, आरबी, संस्कृत वगैरे—रामाच्या मनःसरोवराच्या तळाशीं जाऊन बसलेल्या आहेत. ह्या सरोवराचें पाणी ढवळलें म्हणजे तळाशीं असणाऱ्या वस्तु पृष्ठभागावर येतील आणि ह्याचेंच नांव स्मृति. तुम्हांला पुष्कळ गोष्टी ठाऊक असतात. परंतु त्या सर्वांची तुम्हांला स्मृति नसते. तुमच्या मनःसरोवराला चलन दिलेंत कीं, तुम्हांला त्याचें स्मरण होईल; त्या पृष्ठभागावर आल्या कीं, त्या तुमच्या डोक्यांत आल्याच. त्याचप्रमाणें वेदान्ताचें असें म्हणणें आहे कीं, तुमचे पूर्वजन्म हे तुमच्या बुद्धिरूपी सरोवरांत आहेत. ते तेथें आहेत, परंतु सध्या ते तळाशीं आहेत. ते पृष्ठभागावर नाहींत; आतां ह्या पूर्वजन्मांची तुम्हांला माहिती करून घ्यावयाची असेल तर तें कांहीं मोठेंसें कठीण काम नाहीं. तुमच्या ज्ञानसरोवरचा जो अगदीं तळाचा भाग तो हलविलात कीं, वाटेल ती वस्तु—

संस्कार पृष्ठभागावर येईल. अशा रीतीनें तुम्हांला वाटेल तर पूर्वजन्माची स्मृति करून घेतां येईल; परंतु हा प्रयोग करून पाहण्यांत फारसा अर्थ नाहीं. कारण, उत्क्रान्तीच्या नियमाप्रमाणें आपल्याला पुढेंच जावयाचें आहे. झाल्या गोष्टी उकरून काढीत बसण्यांत फायदा काय ? गतगोष्टी विसरून जाणें हेंच चांगलें. गतगोष्टींशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. आपल्याला पुढें पुढेंच जावयाचें आहे.

तसेंच कर्माच्या तत्त्वाप्रमाणें आपण ज्या ज्या वस्तु जगांत पाहतों, ज्या गोष्टी आपल्याला आवडतात, ज्या गोष्टींकडे आपलें मन जातें, त्या गोष्टींवर आपलें एवढें प्रेम असण्याचें कारण हें आहे कीं, एकदा केव्हां-तरी आपण स्वतःच त्या वस्तु होतों. खडक होऊन जमिनीवर आपण केव्हां तरी पडलेले असूं; व नद्यांच्या प्रवाहरूपानें वहात असूं. तसेंच वृक्ष आणि वनस्पति यांच्याबरोबर आपण वाढले असलों पाहिजे, व वन्यपशूंच्या सहवासांत संचार केला असला पाहिजे. आणि म्हणूनच यांना पाहिल्या-बरोबर ते आपलेच अशी ओळख पटते. हें सिद्ध करण्याला दुसरें एक प्रमाण आहे.

हें प्रमाण म्हणजे सॉक्रेटिस किंवा खरें पाहूं गेलें तर प्लेटो याच्याच म्हणण्याचा अनुवाद आहे. स्मृति म्हणजे काय ? स्मृति शब्दानें वस्तूच्या पूर्वज्ञानाचा बोध होतो. उदाहरणार्थ असें समजा कीं, ह्या व्याख्यानांना दोन गृहस्थ नेहमीं येतात. येथें झालेल्या सातहि व्याख्यानांना ते आले, परंतु आठव्या व्याख्यानाला त्यांपैकीं एकच आला, दुसरा आला नाहीं. तेव्हां त्यांची मित्रमंडळी त्या व्याख्यानाला आलेल्या गृहस्थाला विचारूं लागतील कीं, ' कायहो ! आज तुमचा मित्र तुमच्याबरोबर नाहीं हें कसें ? तो कोठें आहे ? ' आतां असा प्रश्न ही मंडळी कां विचारते ? ह्याचें उत्तर असें कीं, स्मृतीच्या किंवा विचारसाहचर्याच्या—कारण दोन्ही एकच आहेत—नियमाप्रमाणेंच हा प्रश्न विचारला जातो. त्या दोघां मित्रांना आपण नेहमीं एकत्र पाहतों. ते दोघेजण आपल्या परिचयाचे होतात. ते दोघे म्हणजे एकच व्यक्ति, अशी आपल्या मनाची भावना होते. दोघेजण आपल्या मनांत जणूं काय एकांत मिळून जातात. इतकी स्थिति झाली म्हणजे अर्थातच एकाला पाहिल्याबरोबर आपल्याला दुसऱ्याची आठवण होते. मनांत विचारांची संगति ही अशी जुळते. आपल्याला स्मृति होते ती अशी;

आपल्याला एखाद्या गोष्टीचें स्मरण होतें असें आपण जेव्हां म्हणतों, तेव्हां असें म्हणण्यानेंच आपण ध्वनित करतों कीं, त्या गोष्टीची आपल्याला पूर्वीं माहिती असली पाहिजे.

आतां आपण तर्कशास्त्रांतील एक न्याय घेऊं:—

सर्व मनुष्यें मर्त्य आहेत.

राम हा मनुष्य आहे.

( म्हणून ) राम हा मर्त्य आहे.

सर्व तर्कशास्त्राची—सर्व प्रमाणांची—सर्व युक्तिवादाची भिस्त, या अनुमानपद्धतीवर आहे. पहिल्या दोन प्रतिज्ञा उचारल्याबरोबर 'राम' हा मर्त्य आहे हा जो सिद्धांत सांगितल्यावांचून मनांत येतो, हें कसें होतें ? प्लेटो किंवा सॉक्रेटिस यांनीं सांगितलेला जो पूर्वस्मृतीचा नियम त्याप्रमाणेंच हें होत नाहीं काय ? एका मनुष्याला पाहिल्याबरोबर त्याच्याबरोबर नेहमीं असणाऱ्या त्याच्या मित्राची जशी आपल्याला आठवण होते, तसेंच हें आहे. आतां ही विचारसंगति प्रत्येकाच्या मेंदूंत कोठून येते ? तर एकप्रकारच्या पूर्वस्मृतीनें. स्मृति म्हटली म्हणजे पूर्वानुभव आलाच. ज्या मुलाला मेंदू आहे, व ज्याला विचार करतां येतो, त्याला ही अनुमानपद्धति समजावून सांगितली असतां कळण्यासारखी आहे.

भूमितींतील सिद्धान्त सोडवितांना जें सिद्ध करावयाचें असतें, त्याचा निर्णय मनांत तावडतोब येतो; अर्थात् सिद्धान्ताचा निर्णय हा आपल्या पूर्वस्मृतीचा परिणाम आहे. ही पूर्वस्मृति सर्वांच्या मेंदूंत नैसर्गिक असते व त्यावरून असें खात्रीनें म्हणतां येईल कीं, ज्या वस्तूंचें आपणांस ज्ञान होतें, ज्यांची आपल्याला ओळख पटते, त्यांचें तें ज्ञान म्हणजे केवळ पूर्वस्मृतीची जागृति किंवा पुनरावृत्ति होय. ही स्मृति होण्याला त्यांचा पूर्वीं केव्हां तरी आपल्याला अनुभव असला पाहिजे, त्या केव्हां तरी आपण शिकलों असलों पाहिजे. आतां हें ज्ञान ह्या जन्मांत आपण मिळविलेलें नाहीं हें खास. मग तें आलें कोठून ? ह्या प्रश्नाला वेदान्त असें उत्तर देतो कीं, तें पूर्वजन्मार्जित होय.

आतां येथें दुसरा एक प्रश्न असा उद्भवतो कीं, आपलें नशीब जर आपल्या हातांत आहे तर मग आपण गरीब स्थितींत जन्माला कां येतों ?

दरिद्री जन्माला येऊं नये, अशी सर्वांचीच इच्छा असते. असें असूनहि आपण दरिद्री असतों, कपाळकरंटे जन्मास येतों; बहुतेकांच्या कपाळीं अठरा विश्वे दारिद्रय लिहिलेलें असतें. हें असें कां ? आपण गरीब व्हावें, अशी कोणाचीहि इच्छा नसते; मग असें कां होतें ? यावर वेदान्ताचें प्रत्युत्तर असें आहे कीं, आपण ह्या प्रश्नाचा सर्व बाजूंनीं पूर्णपणें विचार केला पाहिजे; त्याच्या एकाच अंगाचा विचार करून चालणार नाहीं. आधीं, आपण राजा व्हावें, लक्षाधीश व्हावें, ही सर्वांचीच इच्छा असते, हें म्हणणेंच साफ खोटें आहे. ज्या मनुष्याला महिना तीस रुपये मिळतात तो फार फार तर हा आपला पगार शंभरपर्यंत वाढावा, अशी इच्छा करील एवढेंच. राजा होण्याची कल्पना त्याच्या मनांत सुद्धां येणार नाहीं.

## आपली जन्मपरिस्थिति कशी ठरते ?

या प्रश्नाचा दुसऱ्याहि एका दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे. ती अशीः— आपण ज्या कांहीं कल्पना-संकल्प करतों त्या परस्परविरोधी व अयोग्य असतात—परिस्थितीच्या विरुद्ध असतात. त्यांना आपण आपल्या ताब्यांत न ठेवतां त्यांचे गुलाम होऊन बसतों, आणि म्हणूनच आपल्या इच्छेविरुद्ध आपणांला त्रास आणि अडचणी भोगाव्या लागतात. आतां ह्या पुढचा आपल्या आजच्या विषयाचा जो भाग आहे, तो फार मनोरंजक आहे. समजा, एक मनुष्य आहे; त्याला रात्रंदिवस विषयेच्छेशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. त्याला ज्ञान नको, धर्म नको, कीर्ति नको, कांहीं नको. त्याला फक्त पाहिजे तें हें कीं, भोग भोगावयास मिळावे, अशी इच्छा आहे. आतां कल्पना करा कीं, हा मनुष्य मेला. आतां त्याला जो पुढचा जन्म मिळेल तो कोणचा मिळेल ? त्याच्या संस्कारांचा विचार केला असतां विद्वान् किंवा श्रीमंत आईबापांच्या पोटीं त्यानें जन्माला यावें, हें शक्य नाहीं. पण वेदान्त असें म्हणतो कीं, या मनुष्याला जिवंतपणीं विषयसुखतृष्णेखेरीज जर दुसरें कांहीं दिसतच नव्हतें तर पुढील जन्म त्याला कुत्र्याचा किंवा डुकराचा प्राप्त व्हावा हेंच योग्य. कारण, कुत्र्याचा किंवा डुकराचा देह प्राप्त झाला असतां खाण्यापिण्याची आणि इंद्रियसुख भोगण्याची त्याची इच्छा त्याला तृप्त करून घेतां येईल. अर्थात् त्याच्या इच्छा पूर्ण होण्याकरितां त्याला कुत्र्याचा किंवा डुकराचाच

जन्म मिळाला पाहिजे. आतां कुत्रा झाला किंवा डुकर झाला तरी तो जन्म येण्याला तो आपला आपणच कारण झाला, हें उघड आहे.

## जशा इच्छा तशीं फळें !

या जगांतील लोक ज्या वेळीं कोणत्याहि गोष्टीची इच्छा करतात त्या वेळीं त्या इच्छेचे पुढें काय परिणाम होतील, हें पहात नाहींत आणि मग त्या इच्छेचीं फळें भोगण्याची वेळ आली कीं, ते रडूं लागतात, दैवाच्या नांवानें खडे फोडूं लागतात. म्हणून कोणतीहि इच्छा करतांना तिच्या परिणामांकडे दृष्टि पोहोंचाविली पाहिजे. कारण, आपलें दुःख आपणच उत्पन्न करतों, दुसरें कोणी नाहीं.

आतां राम तुम्हांला हिंदुस्थानांतील एका कवीची गोष्ट सांगणार आहे. हा कवि मुसलमान होता. तो फार हुषार व विनोदी असा होता. तो एका राजाच्या दरबारांत असे. त्या राजाचें त्याच्यावर फार प्रेम होतें. एका रात्रीं राजानें त्या कवीला बराच वेळ बसवून घेतलें आणि त्या कवीनेंहि अनेक प्रकारचीं कवनें, नानातऱ्हेच्या मौजेच्या गोष्टी वगैरेनीं राजाचें मनोरंजन केलें. अर्थातच, राजाला निजावयाला फार रात्र झाली. व कवीनें सांगितलेल्या मौजेच्या गोष्टी डोक्यांत घोळत असल्यामुळें त्याला झोंप येईना. राणीनें त्याला विचारलें "आज आपल्याला महालांत यावयाला इतकी रात्र कां झाली ?" राजानें उत्तर केलें " एका विनोदी व चतुर मनुष्याच्या सहवासांत वेळ कसा व केव्हां निघून गेला तें समजलें सुद्धां नाहीं." राणीनें उलट विचारलें " असा हा मनुष्य आहे तरी कोण ? " तेव्हां राजानें त्या कवीच्या गुणांची फार स्तुति केली, व त्याच्यासंबंधाची एकंदर हकीकत तिला सांगितली. इतकें होत आहे तों पहांट व्हावयाला आली होती. राजानें केलेल्या वर्णनामुळें त्या कवीला पाहण्याची राणीला फार उत्कंठा लागली. तिनें कवीला घेऊन येण्याविषयीं राजाला सांगितलें. राजानें लागलेंच दुसऱ्या दिवशीं त्याची व राणीची भेट करविली. तुम्हाला ठाऊक असेलच कीं, हिंदुस्थानांतल्या चालीरीती तुमच्या चालीरीतींहून फार निराळ्या आहेत. हिंदुस्थानांत बायकांना गोषा किंवा पडदा असतो. त्यांचा व पुरुषांचा फारसा संबंध येत नाहीं. विशेषतः मुसलमानांत बायका तोंडावरून जाड बुरखा घेतात, व आपला नवरा किंवा अत्यंत पवित्र आणि धर्मशील गृहस्थ,

ह्यांखेरीज दुसऱ्या कोणाच्याहि त्या दृष्टीस पडत नाहींत. असो. राजानें त्या कवीला झनानखान्यांत आणलें. कवीनें तेथें आपलीं कवनें गाऊन दाखविलीं; व मौजेच्या गोष्टीहि सांगितल्या. त्या योगानें तेथील स्त्रियांना फार आनंद झाला. पुढें कवीनें असें ढोंग केलें कीं, डोळ्यांना कांहीं विकार झाला असल्यामुळें आपल्याला दिसत नाहीं. आतां तो खरोखरी कांहीं आंधळा नव्हता, त्याला चांगलें दिसत होतें. परंतु आंधळेपणाचें त्यानें ढोंग केलें, व तें करण्यांत त्याचा दुष्ट हेतु होता, तो असा कीं, आपण आंधळे आहोंत, असें समजल्यावर आपल्याला झनानखान्यांत रहावयास मिळेल, व त्यांतील स्त्रिया मोकळेपणानें आपल्या देखत इकडे तिकडे फिरतील आणि आपल्याला पडदा ठेवणार नाहींत. कवि आंधळा आहे, असें समजून राजानें त्याला झनानखान्यांत राहूं दिलें. परंतु सत्य लपून रहावयाचें नाहीं, तें बाहेर यावयाचें !

( चालः— चंद्रकांतराजाची कन्या० )

सत्यरवीचें बिंब मिळविलें घरणिधूलिकेस ।
पुनरपि उदया तेजोमय ये उणें न हो रेस ॥१॥
शाश्वत वर्षे परमेशाचीं सत्य असे साच ।
सत्यमणीतें व्यसनघणाचा मुळीं न हो जाच ॥ २ ॥

एके दिवशीं ह्या कवीनें एका दासीला कांहीं वस्तु आणावयास सांगितलें. हिंदुस्थानांत मनुष्याला थोडा पैसा मिळूं लागला कीं, तो भयंकर आळशी बनलाच म्हणून समजावें. आळशीपणा—ऐदीपणा हें श्रीमंतीचें लक्षण आहे, असें हिंदुस्थानांत मानतात. जो आपण स्वतः कांहींएक करीत नाहीं, तो बडा मनुष्य ! गाडींत बसावयाससुद्धां ज्याला दुसऱ्याची मदत लागते तो त्याहून बडा मनुष्य ! ज्याचा पोषाख दुसऱ्यानें चढवावा लागतो, चालतांना सुद्धां ज्याला दुसऱ्याचा आधार घ्यावा लागतो, तो तर त्याच्याहूनहि बडा असें मानतात ! सारांश, पराधीनता हें मोठेपणाचें लक्षण मानतात व स्वावलंबन हें कमीपणाचें समजलें जातें. असो. राजाच्या दरबारांत त्या कवीला मोठी जागा प्राप्त झाली; तेव्हां इकडची काडी तिकडे न करण्यांतच मोठेपणा आहे, असें त्याला वाटूं लागलें. एकदा त्याला खुर्ची पाहिजे होती. ती आपली आपण आणणें ह्यांत त्याला कमी-

पणा वाटला, व त्यानें ती आणण्याला एका दासीला सांगितलें. परंतु तिनें खाडकन् उत्तर दिलें कीं, "मी ह्या वेळीं कामांत आहें. खुर्ची आणण्याला मला वेळ नाहीं." मग त्यानें दुसऱ्या एका दासीला खूण करून खुर्ची आणण्यास सांगितलें. परंतु ती म्हणाली कीं, "या खोलींत खुर्चीच नाहीं." मग तो म्हणाला, "तें पाण्याचें भांडें इकडे घेऊन ये." तेव्हां ती दासी म्हणाली "या खोलींत भांडें नाहीं, मी तुम्हांला दुसऱ्या खोलींतून आणून देतें." यावर कवीनें उत्तर केलें कीं, "तें पहा, भांडें खोलींतच आहे, तुला दिसत नाहीं ?" रागामध्यें आपण आंधळेपणाचें सोंग केल्याचें तो विसरला. लबाड लोकांच्या लबाड्या अशाच बाहेर पडतात ! मॅकवेथ नाटकांत मॅकवेथच्या बायकोनें राजाचा खून केला खरा, पण पुढें तो तिच्याच तोंडून बाहेर पडला. तिला कांहीं तो लपवितां आला नाहीं. त्या खुनानें तिला वेडें करून सोडलें, व तिनें आपणच आपल्या राजवैद्यापुढें त्या खुनाची कबुली दिली. हा सृष्टीचा नियमच आहे. असो. त्या कवीनें जेव्हां त्या दासीला विचारलें कीं, "तें भांडें तुला दिसत नाहीं काय ?" तेव्हां तें भांडें आणण्याऐवजीं ती धांवत राणीकडे गेली व राणीला तिनें सर्व हकीकत सांगितली. ती म्हणाली "बाईसाहेब, तो कवि आंधळा नाहीं, तो मनुष्य दुष्ट आहे. त्याला हांकूनच दिला पाहिजे!" पुढें राजानें त्याला राजवाड्याबाहेर हांकून दिलें, आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यानंतर तीन दिवसांनीं तो कवि खरोखरच आंधळा झाला ! हें कसें झालें ? याचें उत्तर असें कीं, हें कर्माच्या नियमानुसारच झालें. त्या कवीनें आपलें आपल्याला आंधळें करून घेतलें. त्याच्या स्वतःच्या इच्छा—वासना—यांनींच त्याला आंधळें केलें, दुसऱ्या कोणीहि नाहीं. आंधळा झाल्यावर मग तो पुष्कळ रडला, ओरडला; त्यानें दांत ओंठ खाल्ले, आपली छाती बडवून घेतली, पण मग त्याच्या त्या त्राग्याचा उपयोग काय ?

हिंदुस्थानांत एकदा एक म्हातारा अशक्त मनुष्य जड ओझें डोक्यावरून वाहून नेत होता. शेवटीं थकून जाऊन तो एका झाडाच्या सावलींत बसला. त्यानें तें ओझें खालीं टाकलें आणि तो म्हणाला "हे मृत्यो ! लवकर ये आणि मला या दुःखांतून सोडव." तो इतकें म्हणत आहे तों,

लागलाच यम त्या ठिकाणीं त्याला दिसूं लागला. यमाला पाहतांच त्याला फार आश्चर्य वाटलें, आणि त्याची ती भयंकर आकृति पाहून तो भीतीनें कांपूं लागला. त्यानें यमाला विचारलें " आपण कोण आहांत ? यमानें उत्तर केलें " ज्याला तूं हांक मारलीस तोच मी, तुझी इच्छा तृप्त करण्याकरितां आलों आहें. " हें ऐकून तो म्हातारा फारच घाबरला आणि म्हणाला कीं, " मला घेऊन जाण्याला मीं आपल्याला बोलाविलें नाहीं; तर माझ्या ओझ्याला हात लावावयाला बोलाविलें. "

## मरणाला सुद्धां आपली इच्छाच कारण !

आपल्या सर्व इच्छा, अडचणी, आपलीं सर्व दुःखें हीं आपलीं आपण अशाच रीतीनें उत्पन्न करतों, पण अशा अडचणी आल्या कीं, आपण रडावयास लागतों. आपण मृत्यूला बोलावतों पण तो आला म्हणजे रडूं लागतों. पण हें कांहीं चालावयाचें नाहीं. एकदा लिलावांत सर्वांत जास्त रक्कम तुम्हीं बोलून गेलां म्हणजे मग तुम्हांला तो माल घेतलाच पाहिजे ! घोड्याला चालविलेंत, कीं गाडी त्याच्या मागून गेलीच पाहिजे; तसेंच कोणतीहि इच्छा केली कीं, तिचे परिणाम भोगलेच पाहिजेत ! साधारणपणें मनुष्यें म्हातारीं होऊन मरतात. तरुण असतांना थोडीं मरतात. असें कां होतें ? यावर वेदान्ताचें उत्तर असें आहे कीं, मनुष्य म्हातारा झाला कीं, त्याचें शरीर व्याधींनीं ग्रस्त होतें. व यामुळें तो जीविताला कंटाळून जातो, आणि केव्हां एकदा मरण येईल असें त्याला होतें. अशा रीतीनें आपल्या मरणालाहि आपली इच्छाच कारणीभूत होते. वेदान्त म्हणतो, प्रत्येक मनुष्य आत्मघातकी आहे.* इच्छा केली कीं, मृत्यु आलाच. आतां भर तारुण्यांत कांहीं माणसें मरतात हें कसें ? आतां रामाचें या प्रश्नाला जें उत्तर आहे तें कदाचित् तुम्हांला पटणार नाहीं. परंतु वस्तुस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां रामाचें म्हणणें रास्त आहे, असें तुम्हीं कबूल कराल. तारुण्याच्या ऐन भरांत मृत्युमुखीं पडलेले असे पुष्कळ लोक रामानें पाहिले आहेत. त्यांच्या एकंदर गृहस्थितीचा बारकाईनें शोध केला; त्यावरून रामाला असें आढळून आलें कीं, त्या तरुणांना आपल्या परिस्थितीचा अगदीं वीट येऊन

---

* य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ गीता, अ. २।१९.

गेलेला होता. व आपल्याला मरण यावें, व आपली परिस्थिति बदलावी, अशीच त्यांची अगदीं मनापासून इच्छा होती. यासंबंधीं उदाहरणें देण्याला आतां वेळ नाहीं; पण ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे.

हिंदुस्थानांत एका विशिष्ट पंथाच्या महाविद्यालयांत एक हुशार तरतरीत तरुण मनुष्य अध्यापकाचें काम करीत असे. त्यानें एका सभेंत असें सांगितलें होतें कीं, आपण आपलें सर्व आयुष्य त्या विद्यालयाला वाहिलें आहे. त्याप्रमाणें त्यानें त्या विद्यालयांत कांहीं दिवस मोठ्या उत्साहानें काम केलें. पण पुढें त्याचीं मतें बदललीं. त्याचे विचार अधिक उन्नत झाले, त्याचें मन अधिक उदार झालें, त्याच्या दृष्टीचा पूर्वींचा संकुचितपणा जाऊन ती अधिक व्यापक झाली. तेव्हां अर्थांत्च त्या विद्यालयांतील मंडळीशीं त्याचें पटेनासें झालें व त्या मंडळीलाहि त्यांच्याविषयीं मनांतून सहानुभूति वाटेनाशी झाली. तरी पण एकदा वचन गेलें असल्यामुळें त्याला तेथें राहणें भाग होतें व म्हणून तो तेथें राहून तेथील काम कसेंबसें रेटीत असे. परंतु त्याची स्थिति फारच चमत्कारिक झाली; कारण, शरीर एकीकडे आणि मन भलतीकडेच ! अर्थांत्च हें असें फार दिवस चालणें शक्य नव्हतें. पुढें थोड्याच दिवसांत त्याचा अंत झाला. परिस्थिति बदलण्याला त्याला मृत्यूखेरीज दुसरा मार्ग नव्हता. एवंच, मृत्यूसुद्धां दिसावयाला जितका भयंकर दिसतो तितका कांहीं वास्तविक तो पुष्कळ वेळां नसतो.

## आपण दुःखी कां ?

आपण जर आपल्या दैवाचे मालक आहोंत तर मग आपल्याला दुःखें कां भोगावीं लागत असतात? याचें कारण हें आहे कीं, आपल्या इच्छा परस्परविरोधी असंबद्ध असतात. आपण ग्रंथकार व्हावें, वक्ता व्हावें, अध्यापक व्हावें, धर्मोपदेशक व्हावें, अशी आपली इच्छा असते. परंतु त्याबरोबरच विषयेच्छा तृप्त व्हावी, असेंहि आपल्याला वाटत असतें. आतां ह्या दोन प्रकारच्या इच्छा एकमेकांच्या विरुद्ध आहेत. पण दोन्हींहि पूर्ण झाल्याच पाहिजेत. तेव्हां होतें काय कीं, एक इच्छा अपुरी रहाते आणि म्हणून आपल्याला दुःख होतें. आपणच आपल्यावर दुःख ओढून घेतों तें असें ! आपणाला भोगाव्या लागणाऱ्या दुःखांवरून सुद्धां असें दिसतें कीं, आपलें

दैव आपल्या हातांत आहे. याचें उदाहरण म्हणून राम आतां एक मोठी मौजेची गोष्ट सांगणार आहे.

हिंदुस्थानांत एका मुसलमानाला दोन बायका होत्या. तुम्हांला ठाऊक असेल कीं, अनेक बायका करण्याचा प्रघात मुसलमानांतच आहे; हिंदु लोकांत नाहीं, असो. या दोन बायकांपैकीं एक माडीवर निजत असे, व दुसरी खालच्या खोलींत निजत असे. एके रात्रीं एक चोर त्याच्या घरांत शिरला. ह्या चोराच्या मनांतून घरांतील सर्व ऐवज लांबवावयाचा होता. परंतु घरांतील सगळी मंडळी जागी असल्यामुळें त्याचा हेतु साधेना. पुढें पहांट झाली तेव्हां तो चोर त्या घरांतल्या मंडळीच्या दृष्टीस पडला. त्यांनीं त्याला लागलेंच पकडून काजीकडे नेलें. त्या चोरानें कांहीं चोरलें नव्हतें हें खरें. तरी पण तो घरांत शिरला होता. आणि हाच त्याचा गुन्हा. काजीनें त्या चोराला उलट सुलट कांहीं सवाल केले. चोरानें तावडतोब कबूल केलें कीं, चोरी करण्याच्या उद्देशानें आपण घरांत शिरलों होतों खरें. काजीनें तें ऐकून घेतलें व आतां शिक्षा सांगणार तों तो चोर ह्मणाला, "मेहेरबान ! मला दुसरी वाटेल ती शिक्षा द्या. तुरुंगांत टाका; कुत्र्यांकडून फाडवा; पण एक शिक्षा मात्र देऊं नका." हें ऐकून काजीला फार आश्चर्य वाटलें, व त्यानें विचारलें कीं, "ती शिक्षा कोणती ?" तेव्हां त्या मनुष्यानें उत्तर केलें, "दोन बायकांचा नवरा होण्याची शिक्षा मला करूं नका !" असें कां म्हणून विचारतां त्यानें आपल्याला कसें पकडलें, त्याची सर्व हकीकत सांगितली. तो म्हणाला कीं, "सर्व रात्रभर त्या घराच्या मालकाला जिन्यावर बसून रहावें लागलें. कारण, एक बायको त्याला वर ओढीत होती व दुसरी खालीं ओढीत होती. त्याच्या डोक्याचे केंस उपटले होते, पायमोजे फाटले होते, व सर्व रात्रभर तो बिचारा थंडीनें कुडकुडत होता. अशा रीतीनें चोरी करण्याला मला अवकाश न मिळाल्यामुळें मी सांपडलों, पण मला लाभ मात्र कांहींच झाला नाहीं !"

अशा रीतीनें आपलें सर्व दुःख हें आपल्या परस्परविरोधी वासनांमुळेंच उत्पन्न होतें. आपल्या इच्छा एकमेकांच्या विरुद्ध असतात आणि अंतरस्थ विरोध हा नाशाला कारण होतो, हें तुम्हांला माहीत असेलच. म्हणून आपल्या अंतःकरणाचें नीट परीक्षण करा आणि तेथें शांति आहे किंवा

नाहीं हें पहा. आपलें ध्येय—आपला हेतु यांच्यामध्यें एकात्मता व एकाग्रता असेल तर दुःखाचें कारणच नाहीं. परंतु आपणामध्यें परस्परविरोधी असे अनेक हेतु—इच्छा असतील, तर दुःख मागें लागलेंच म्हणून समजा !

## कामनांचे दोन प्रकार.

मनुष्यांच्या कामनांचे दोन प्रकार आहेत. उच्च आणि नीच. या दोहों-मध्यें विरोध असतो व त्याच्या भांडणामध्यें, उत्क्रांतीच्या सार्वत्रिक नियमाप्रमाणें, जें उच्चतम असेल त्याचाच अखेरीस जय व्हावयाचा. सृष्टीची रचनाच अशी आहे कीं, तिच्यामध्यें श्रेष्ठतम जें असेल तेंच शेवटपर्यंत टिकाव धरून रहातें. या सर्वसाधारण नियमाला अनुसरून वासनावासनांच्या लढ्यामध्यें सर्वांत बलिष्ठ वासनांचाच जय झाला पाहिजे, हें उघड आहे. आतां या वासनांत हें बल येतें कोठून ? अर्थात् सत्यापासून.—फक्त सत्यापासून बल किंवा सामर्थ्य उत्पन्न होतें. ज्या वासनांमध्यें सत्याचा, न्यायाचा, पावित्र्याचा—दैवी संपत्तीचा अंश अधिक असतो त्यांचाच अखेरीस जय होतो. संकटांशीं झगडून स्वतःची प्रगति व उन्नति करून घेणें तुम्हांस भाग आहे. लोभ आणि तृष्णा यांच्या कर्दमांत लोळून विषयसुखोपभोगांत दंग होऊन चालणार नाहीं. हळुहळू कां होईना, पण त्यांतून तुम्हांला बाहेर आलेंच पाहिजे. स्वतःची उन्नति सावकाश पण निश्चयानें तुम्हांला करून घेतलीच पाहिजे. अशा रीतीनें कर्मतत्व आपणा सर्वांपुढें आत्यंतिक सुखाचें ध्येय ठेवीत आहे.

## वासना फलद्रुप कां व्हाव्या ?

वासना पूर्ण कां झाल्या पाहिजेत, या प्रश्नाला वेदान्ताचें उत्तर असें आहे कीं, आपलें खरें स्वरूप—आपला आत्मा अविनाशी आहे. राम परमेश्वरच आहे. आतां आपल्या वासना, आपलें मन व आपलें शरीर या अनंतत्त्वाच्या उदधीवरील लहरीच असल्यामुळें ज्या वस्तूच्या त्या बनलेल्या असतात त्याचे गुणधर्म त्यांत उतरावे, हें नैसर्गिक होय. हें जग परमेश्वराचा निश्वास होय. हें जग माझा निश्वास होय. डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या अवधींत मीं हें जग निर्माण केलें आहे. तुमचाहि आत्मा मीच आहें. आपल्या सर्व इच्छांमध्यें ईश्वरत्वाचा व क्षुद्र अहंकाराचा, असे दोन्ही तऱ्हेचे अंश असतात; व त्यांमध्यें मायेचा—अहंकाराचा

भाग ज्या प्रमाणानें असेल त्या प्रमाणानें त्यांच्या पूर्णतेला विलंब लागणार. इच्छा पूर्ण होण्याला जो विलंब लागतो तो त्याच्यामधील मायेच्या अंशामुळें आणि त्या निश्चयानें पूर्ण होतात त्या त्यांच्यांतील तत्त्वतः दैवी भागामुळें. तुह्मी ह्मणाल, इच्छा दैवी * कशा ? तर याचें समाधान असें आहे कीं, इच्छा ह्मणजे प्रेम आणि परमेश्वर हाहि प्रेमस्वरूपच आहे×. सर्व वासनांना गुरुत्वाकर्षणाचा नियम लागू पडतो. पृथ्वी चंद्राला आपल्याकडे ओढते, सूर्य पृथ्वीला आकर्षित करतो; ग्रह एकमेकांना आकर्षित करतात. सारांश, अशा रीतीनें जगांत सर्वत्र प्रेमच आढळून येतें. पदार्थांच्या परमाणूंमध्यें आकर्षण धर्म असतो; पण वास्तविक पाहतां हें आकर्षण, ही प्रेरणा, हें संसक्त्याकर्षण, हें गुरुत्वाकर्षण, हीं सर्व एक प्रकारच्या इच्छाच होत. इच्छा परमेश्वरस्वरूपी असल्यामुळें त्या पूर्ण झाल्याच पाहिजेत. परंतु त्या जेव्हां स्वार्थी किंवा व्यक्तिविषयक होतात तेव्हां त्यांना मायेचें—अविद्येचें स्वरूप येतें. व ह्मणून त्या पूर्ण होण्याला विलंब लागतो.

आपल्या सर्व कामना सहज तृप्त व्हाव्या असें जर आपल्याला वाटत असेल तर त्यामधील मायेचा अंश कमी करून दैवी भाग वाढविला पाहिजे. निःस्वार्थता अंगीं बाणली पाहिजे. आतां प्रार्थनेचें रहस्य काय ? परमेश्वराची प्रार्थना केली ह्मणजे तो ती ऐकतो असें आपण ह्मणतों, याचा अर्थ काय ? या विषयाचा विचार पुढें केव्हां तरी करूं.

ॐ

## इच्छांमधील मायेचा अंश कमी करा.

कांहीं कविता वाचून दाखवून आजचा विषय समाप्त करूं. आपलें दैव आपल्या हातांत आहे, याचा आपल्याला एकदा अनुभव आला कीं, आपण कितीतरी सुखी होऊं. ॐ या मंत्राचा जप करूं लागलां व आपल्या दैवाचे आपणच नियंते आहोंत, याचा तुम्हाला प्रत्यय आला म्हणजे मग

* दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । गीता, अ. ७। १४.

× स ईश्वरोऽनिर्वचनीयप्रेमस्वरूपः ॥

दुःखाचें—शोक करण्याचें—कारणच नाहीं. कारण, आपली परिस्थिति आपण उत्पन्न केली आहे. आपण परिस्थितीचे गुलाम नाहीं, ती आपण फिरवूं तशी फिरेल, हेंहि लक्ष्यांत ठेवा. परिस्थिति कांहींहि असो; हें शरीर तुरुंगांत असो, पाण्याच्या ओघाबरोबर वहात जात असो, किंवा एखाद्याच्या लाथांखालीं तें चिरडलें जात असो; तरी "अहं ब्रह्मास्मि" हें तत्व विसरूं नका. मी देह नाहीं; परिस्थिति माझ्या स्वाधीन आहे. शत्रुमित्र आपले आपणच केलेले आहेत. शत्रूंनों, तुम्हीं केवळ माझ्या कल्पनेचे खेळ आहांत. मित्रांनो, तुम्हांलाहि मीच कल्पनेनें निर्माण केलें आहे. हें तत्त्व अनुभूत करून घ्या म्हणजे मग तुम्हीं आनंदाच्या पराकोटीप्रत पोहोंचाल.

## जिकडे तिकडे मी !

( चालः—भाव धरा रे आपुलासा देव करा रे. )

सदा भरलेला । मम आनंदाचा पेला ॥ धृ ॥

आशा तृष्णा पूर्ण सकला । माया झाली केवळ अबला ॥
अहंकार तर सकल निमाला । जीव हा घाला ॥
जाहला फुलांचा झेला ॥ १ ॥

प्रातःकाळीं मंद मधुरशा । लहरी वायूच्या सुंदरशा ॥
प्रेषुनि हसवीं मीच दशादिशा । चुंबनें लाली ।
येतसे त्यांचिया गालीं ॥ २ ॥

विद्युज्ज्वाला संदेशगती । गुलाबपुष्पें मधुहास्यें तीं ॥
सुवर्णसूत्रें रविकरपंक्ति । दवबिंदूंची ।
नवमौक्तिकमाला साची ॥ ३ ॥

शीतसुधांशु पदक रजताचें । निधान गमतें सौंदर्याचें ॥
वीचिवलय जलधींमधिं नाचे । तरू डुलताती ॥
आलिंगिति लतिका हातीं ॥ ४ ॥

इंद्रचापरंगीं मम वेष । जननमरण हे श्वासोच्छ्वास ॥
जाणें येणें मजसि न लेश । भरुनि आकाश ॥
राहतों दशांगुल शेष ॥ ५ ॥

स्थिरचर व्यापुनियां मी राहीं। स्थल मजवांचुनि एकहि नाहीं ॥
संशय दुःख मला नच पाहीं। हृदयग्रंथी ॥
छेदिली, न उरली भीति ॥ ६ ॥

अमंगलहि मी मंगल मीच। कटुमधु ऐसा भावहि मीच ॥
प्रियाप्रिया रिपुसुहृदहि मीच। द्वंद्वें मीच ॥
द्वंद्वांतिल तत्त्वहि मीच ॥ ७ ॥

निराकार निर्गुण निःसंग। द्वंद्वातीत असे अव्यंग ॥
सगुण ईश हा ऐश्वर्ययोग। कार्यमूलाला ॥
कारण मी या विश्वाला ॥ ८ ॥



# मी केवळ प्रकाशरूप आहें*

( कोलंबिया प्रांतांतील डेन्व्हर मुक्कामीं ता. १२ जानेवारी १९०४ रोजीं दिलेलें व्याख्यान )

## अवस्थात्रय



आपणांमधील खरा आत्मा कोणता? शरीर हा खरा आत्मा खास नव्हे; मनहि आत्मा नव्हे; तसेंच आपलें हें सध्यांचें जीवित म्हणजे आत्मा असेंहि म्हणतां येत नाहीं. आपल्याला दृग्गोचर होणारें हें जग खरें आहे, असें तरी कशावरून म्हणावयाचें? याचें उत्तर आपला तसा अनुभव आहे म्हणून; हेंच होय. परंतु या आपल्या अनुभवाचा—ज्ञानाचा विचार केला तर तोहि तीन तऱ्हेचा आहे; आपल्याला आयुष्यांत तीन अवस्था अनुभूत होतात, असें दिसून येतें. एक जागृत स्थिति, दुसरी स्वप्नस्थिति व तिसरी गाढ निद्रेची स्थिति. या तिन्ही स्थितींचा अनुभव आपल्याला नेहमींचा आहे. सदरहू ज्ञान किंवा अनुभव हें एक वायुभारमापक किंवा उष्णमानमापक यंत्र असून त्याच्या योगानें जगाचा दाब किंवा उष्णमान ह्यांची आपणाला कल्पना करतां येते.

आपला जागृत स्थितीचा अनुभव पाहिला तर आपणांभोंवतालचें हें जग जड असून येथून तेथून नियमांनीं जखडलेलें—बद्ध आहे, असें म्हणावें लागतें. आपल्या स्वप्नस्थितीकडे पहावें तर तिकडे याहून अगदीं विपरीत प्रकार दिसून येतो. बरें, जागृतावस्थेंतील अनुभवाची कांहीं किंमत नाहीं, असें म्हणावें तर तसेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, स्वप्न व सुषुप्ति यांचें महत्व जागृतस्थितीपेक्षां बिलकुल कमी नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं,

---

* प्रकाशो मे निजं रूपं नातिरिक्तोऽस्म्यहं ततः॥ अष्टावक्रगीता, अ. २.

एकट्या सुषुप्त्यवस्थेचें महत्व जाग्रतावस्थेइतकें खास आहे. आपण जितका काल जाग्रत असतों तितकाच जवळ जवळ काल आपण झोंपेंत असतों. लहानपणीं तर मुलांचा बहुतेक काल झोंपेंतच जातो. हा सर्व जगाचा अनुभव आहे. अर्थात् आपला जाग्रतीमधील अनुभव म्हणजेच कायतें सर्वस्व, असें धरून चालतां येत नाहीं. तर स्वप्न व सुषुप्ति या स्थितींतील अनुभव जमेस धरून जाग्रतीमधील अनुभवावरून काय सिद्धान्त ठरवितां येईल तें आपण पाहिलें पाहिजे. आतां स्वप्न व सुषुप्ति या स्थितींकडे पाहिलें तर, त्यांतील अनुभव जाग्रतस्थितींतील अनुभवाशीं निखालस विरोधी दिसतो.

## तिन्ही अवस्थांची तुलना.

आतां जें नित्य असतें—त्रिकालबाधित असतें, त्यालाच सत्य म्हणतां येईल. सत्याची हीच सर्वमान्य ठरलेली कसोटी आहे. जें नित्य—शाश्वत टिकेल, त्यालाच सत्य म्हणावें. आतां आपला तिन्ही अवस्थांतील द्रष्ट्या-संबंधाचा अनुभव पाहूं लागलें तर तो भिन्न भिन्न प्रकारचा आहे. जाग्रतींत आपलें शरीराशीं तादात्म्य झालेलें असतें व ' मी ' असा शब्द उच्चारल्या-बरोबर हें शरीर, असें ज्ञान आपल्याला होतें. पुढें स्वप्नाकडे पाहिलें तर हा ' मी ' बदलतांना दिसतो. आपण खरोखर श्रीमंत असूनहि स्वप्नांत आपण निर्धन आहों, असें पाहतों. आपल्याला शत्रूंनीं वेढा दिलेला आहे, आपल्या घराला आग लागली आहे व त्यांतून आपण मोठ्या कष्टानें बचावलों आहों, असेंहि आपल्याला दिसतें. कधीं कधीं स्वप्नांत आपण पाणी प्यालों असें दिसूनहि जागें झाल्यावर पहावें तर आपल्याला तहान लागली आहे, असा अनुभव येतो. यावरून स्वप्नांतील द्रष्टा जाग्रतींतील द्रष्ट्याहून निराळा असला पाहिजे, हें ठरतें. अशा रीतीनें आपला स्वप्नांतलि अनुभव एका तऱ्हेचा असतो, आणि जाग्रतींतलि अनुभव त्याहून निराळ्या तऱ्हेचा असतो. बरें सुषुप्तीकडे पहावें तर तिकडे तिसराच प्रकार दिसून येतो ! झोंपेंत ' मी 'पणा शून्यत्वाशीं, अज्ञानतमाशीं तादात्म्य पावतो. आपला झोंपेचा अनुभव म्हटला म्हणजे ' मीं सुखानें निजलों होतों; आणि स्वप्न वगैरे कांहीं पडलें नाहीं. ' हा होय. परंतु इतकी गोष्ट निश्चित आहे कीं, गाढ निद्रेच्या स्थितींतसुद्धां जें कधीं निजत नाहीं, त्या वेळींहि निजलेलें नसतें, असें कांहींतरी तत्त्व आहे. व तेच आपला

खरा आत्मा होय*आपल्याला दृग्गोचर होणाऱ्या दृश्यजातीच्या ज्ञानाहून निराळें—विलक्षण असणारें हें जें शुद्ध ज्ञान तेंच आत्म्याचें वास्तविक स्वरूप होय.

समजा, एक मनुष्य आपल्याजवळ येऊन म्हणाला कीं, "गेल्या रात्रीं बारा वाजतां मीं अमुक अमुक ठिकाणीं गेलों होतों; व त्या ठिकाणीं मला कोणीहि मनुष्य दिसला नाहीं. आतां 'अमुक अमुक ठिकाणीं अमुक वेळीं एकहि मनुष्य नव्हता' असें जें तूं विधान करतोस तें एका कागदावर लिहून काढ असें त्यावर आपण सदरहू मनुष्याला सांगितलें. तेव्हां तो जबाब देतो कीं, 'हें काय ? लिहून काढण्याचें काय कारण ? मीं काय खोटें सांगतों ? अहो, त्या ठिकाणीं कोणी नव्हतें, हें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे.' त्यानंतर त्याला पुनः प्रश्न केला कीं, 'तूं तर त्या जागीं हजर होतास कीं नाहीं ? मग कोणी नव्हतें, असें असंबद्ध विधान कसें करतोस ? तूं कोणीच नाहींच कीं काय ? तूं म्हणतोस तें खरें असें मानावयाचें तर तुझें अस्तित्व तरी मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं."

गाढ निद्रेंतून मनुष्य जागा झाला म्हणजे म्हणतो कीं, 'मला कांहीं स्वप्नबिप्न पडलें नाहीं.' आतां यावर त्या मनुष्याला असें विचारलें कीं, 'बाबारे ! तूं असें विधान करतोस खरें, पण तें खरें मानावयाचें तर तूं साक्षिरूपानें त्या ठिकाणीं असलाच पाहिजेस. तूं जर त्या वेळीं गैरहजर असतास तर तुझ्या या म्हणण्यांत तथ्य आहे असें कशावरून मानावयाचें ? आपल्याला गाढ झोंप लागलेली असते त्या वेळींहि आंत कोणी तरी खास जागें असलें पाहिंजे. हाच आत्मा—स्वतःसिद्ध केवल ज्ञानरूपी—परमात्मा होय.

## विश्वांतील स्थित्यंतरें.

त्या परमात्म्यापासून सकल विश्वाचा कसा विस्तार झाला आहे हें पहा. नद्यांच्या स्थितीकडे पाहूं जातां आपल्याला तीन स्थित्यंतरें दिसतात. पहिली स्थिति बर्फाच्या पर्वताची—हिमगिरीची; त्यानंतरची स्थिति म्हणजे लहान-लहान निर्झरांची; जेव्हां बर्फ वितळतें आणि तें हळुहळू शांत व मंद गतीनें वाहूं लागतें, तेव्हांची ही स्थिति होय. तिसरी स्थिति म्हटली म्हणजे पर्वतांमधून

* जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु स्फुटतरा या संविदुज्जृंभते ॥ श्रीशंकराचार्यकृत मनीषापंचक.

प्रवाहरूपानें वहात वहात नदी जेव्हां सपाट अशा भूभागांत प्रवेश करते आणि तिचें पाणी चिखलानें गढूळ होतें तेव्हांची होय. या तिन्ही स्थित्यंतरांचा विचार केला तर असें दिसून येईल कीं, पहिल्या स्थितींत म्हणजे बर्फाच्या पर्वतांमध्यें सूर्याचें प्रतिबिंब दृग्गोचार होत नाहीं. पण दुसऱ्या व तिसऱ्या स्थितींत तें दृष्टीस पडतें. दुसरी म्हणजे ओढ्याची स्थिति. ओढा दिसण्यांत सुंदर दिसतो, पण त्यांतून जलपर्यटन करतां येणें शक्य नाहीं. पण तिसऱ्या स्थितींत म्हणजे प्रचंड नद्यांत नौकाप्रवासहि करतां येतो आणि शिवाय त्यांच्या मार्गांत जे जे प्रदेश असतात त्यांना सुपीक करण्याला त्यांचें पाणी कारणीभूत होतें. वरील स्थितींत दोन गोष्टी दिसून येतात. एक सूर्य व दुसरी नदी.

## ईश्वर व माया.

सर्व सूर्यांचा सूर्य असा जो आत्मा तोच गाढ निद्रेच्या अवस्थेंतील ईश्वर होय. निद्राकालीं आपली स्थिति घन बर्फाप्रमाणें असते व त्यावर सर्व सूर्यांचा हा सूर्य प्रकाश पाडीत असतो. तो अचल, अव्यक्त आणि साक्षिरूप आहे. आपल्याला जेव्हां गाढ निद्रा लागते तेव्हां त्या वेळच्या शून्यत्वाच्या स्थितीवर कांहीं वेळ आत्म्याचा प्रकाश पडतो, व त्याचा असा परिणाम होतो कीं, आपणांमधील कारणशरीररूपी बर्फ जणूं वितळूं लागतें; आणि त्याचा प्रवाह त्या शून्यत्वाच्या स्थितींतून बाहेर पडूं लागतो, व यालाच आपण स्वप्नस्थिति असें नांव देतों. 'ईश्वरानें शून्यत्वांतून जगत् निर्माण केलें' असें जें बायबलमध्यें वाक्य आहे, त्याचा हाच अर्थ होय. सृष्टीच्या पूर्वीं ईश्वर होता आणि ज्याला शून्यत्वाची स्थिति म्हणतात तीहि आरंभीं होती. सूर्य ज्याप्रमाणें बर्फांतून नदी उत्पन्न करतो त्याप्रमाणें सर्व सूर्यांचा सूर्य असा आपणांमधील आत्मा—हा परमेश्वर—शून्यत्वाला प्रकाशित करतो. या शून्यत्वालाच हिंदु लोक 'माया' असा पर्याय शब्द लावतात. व या शून्यावस्थेंतून—या मायेंतून—ज्याला आपण द्रष्टा म्हणतों तो व ज्याला दृश्य असें म्हणतों तें हें विश्व, यांची उत्पत्ति होते.

एखाद्या लहानशा ओढ्याचा महानदीशीं जो संबंध असतो तोच स्वप्नस्थितीचा जाग्रत स्थितीशीं संबंध असतो. मनुष्य हा ईश्वराची मूर्त प्रतिमा आहे, असें नेहमीं म्हणण्यांत येतें. गाढ निद्रावस्थेंत अहंकाराचा सर्वस्वी

अभाव असतो, पण स्वप्न व जाग्रति या दोन्ही अवस्थांत अहंकाराचें अस्तित्व असतें- या दोन्ही स्थितींत आपणांमध्यें ईश्वराचें प्रतिबिंब पडलेलें असतें. परंतु हें प्रतिबिंब म्हणजे आत्मा नसून खरा आत्मा म्हणजे ईश्वर-बिंबरूपी सूर्य होय. * स्वप्नांत सर्व प्रकारच्या गोष्टी आपण पाहतों. आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, स्वप्नसृष्टि प्रकाशित करण्याला आणि तिचें ज्ञान आपल्याला करून देण्याला कोणता प्रकाश कारणीभूत होतो? स्वप्नांत जे प्रकार आपल्याला दृग्गोचर होतात ते कोणत्या प्रकाशानें? चंद्राच्या प्रकाशानें, ताऱ्यांच्या तेजानें, किंवा सूर्यमंडळाच्या दीप्तीनें? अर्थात् नव्हे. तर मग स्वप्नस्थितीचें ज्ञान आपणांस कोणच्या तेजानें होतें? तर आपणांमध्यें वसत असलेल्या ज्योतीच्या—आत्म्याच्या—योगानें होतें, हेंच याचें उत्तर होय. स्वप्नांतील सर्व वस्तु दाखविणारी ही अंतर्ज्योति—हा आत्मसूर्य गाढ झोंपेच्या स्थितींत अप्रतिहत--अकुंठित—असा प्रकाशमान होत होता. या दोन्ही स्थितींत आत्मसूर्य जशाचा तसा कायम असतो. स्वप्नांत आपण जरी चंद्र अवलोकन केला तरी तो चंद्र व त्याचें चांदणें अशा दोहोंचें अधिष्ठान आत्मसूर्यच होय.†

## अवस्थात्रयाचें साक्षित्व.

येथपर्यंतच्या विवेचनावरून ही गोष्ट सिद्ध झाली आहे कीं, आपण केवळ प्रकाशरूप आहों—सर्व प्रकाशांना प्रकाशित करणारे आपण आहों. नदीच्या उगमस्थानीं आणि मध्यस्थानीं प्रतिबिंबित होणारा सूर्य ज्याप्रमाणें एकच आहे त्याचप्रमाणें जाग्रति, स्वप्न, सुषुप्ति अशा तिन्ही अवस्थांच्या मागें एकच आत्मा वास करीत आहे; 'तोच तूं आहेस.' (तत्त्वमसि) त्याच्याशीं तादात्म्य करून घ्या म्हणजे सर्वशक्ति आणि सामर्थ्य यांचें

---

* द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥
उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ गीता, अ. १५।१६।१७.

† यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ गीता, अ. १३।३३.

आगर तुम्हीं बनून जाल.* तत्वतः नसून केवळ भासमान होणाऱ्या आणि चंचल अशा ज्या वस्तु त्यांच्याशीं तद्रूप झाल्यानें आपलें कल्याण कधींहि होणार नाहीं. सूर्य ज्याप्रमाणें एकाच नदीचें उगमस्थान, मध्यभाग आणि मुख अशा सर्व ठिकाणीं सारखा प्रकाश देत असतो, इतकेंच नव्हे तर जगांतील सर्व सरितांमध्येंहि तो सदोदित सारखा प्रकाशमान होतो, त्याचप्रमाणें हा आत्मसूर्य सर्वव्यापी आणि सर्वत्र सारखा प्रकाश करणारा आहे.

जो आत्मा आपल्या ठिकाणीं आहे तोच जगांतील सर्व मनुष्यांच्या अवस्थात्रयाचा साक्षी आहे. आपल्याला दृश्य चराचर भासतें, त्यांतहि आत्मप्रकाशाशिवाय दुसरें कांहीं नाहीं. आपण केवळ चित्प्रकाशरूप आहों, या कल्पनेचा सारखा निदिध्यास करा. ' मी तेंच आहे ' (अहं ब्रह्मास्मि) ' सर्व प्रकाशांमध्यें प्रकाशमान होणारा मीच आहें ' या विचाराशीं एकतानता पावा. याचें सर्वदा मनन करून भीति, संशय, धाक, चिंता यांना पार झुगारून मोकळे व्हा. विश्वांतील अचल, अविनाशी, अव्यय, कालत्रयीं अबाधित असलेलें तत्त्व तेंच आपण आहों;† हें अखिल जग म्हणजे आत्मसिंधूवरील केवळ लहरी, भोंवरेच होत. त्या सर्वांत ओतप्रोत व्यापून राहणारें जल आपणच आहों. मी केवळ प्रकाशरूप आहें. मी शुद्ध चित्प्रकाश आहें. प्रकाशांचा प्रकाश मी आहें.

आपल्या आत्म्याच्या वास्तविक स्वरूपावरील आवरण—भ्रमपटल—दूर होण्याला पुढील संवयीचा पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे.

पुष्कळ लोकांना असें वाटतें कीं, आपण फिरावयास जाऊं लागलों म्हणजे बरोबर एखादादुसरा स्नेही असावा. पण हें म्हणणें पुढील कारणास्तव भ्रामक आहे.

कारण पहिलें:—आपण जेव्हां एकटेच सहल करीत असतों तेव्हां आपला श्वासोच्छ्वास नैसर्गिक, तालबद्ध आणि आरोग्यावह अशा रीतीनें चाललेला असतो. व या कारणासाठीं जर्मन तत्त्वेत्ता क्यांट हा आपल्या

---

* तूंचि निजानंद ब्रह्म सकलांतर्यामी । नारायण महाराज.

† तुम्हीं अचलपदीं राहोन सदोदित, अद्वय सुख का [illegible] सोहिरोबा.

उतार वयांत एकटा फिरावयास जात असे; व त्यामुळें तो पुष्कळ वर्षें जगला. आपण एकटे फिरावयास गेलों म्हणजे श्वासोच्छ्वास नाकपुड्यांतून चालत असतो. पण तेंच आपण एखाद्या स्नेह्यावरोबर बोलत चाललों म्हणजे श्वासोच्छ्वासाची क्रिया साहजिकच तोंडानें होऊं लागते. नेहमीं नाकपुड्यांतून श्वासोच्छ्वास करण्याची संवय उत्साहवर्धक असून आपल्या फुप्फुसांना सशक्त करते. ईश्वरानेंहि मनुष्याच्या नाकपुड्यांत श्वास सोडला, तोंडांत नव्हे, असें वायवलमध्यें वर्णन आहे. आपण बाहेर श्वास सोडण्याचें काम तोंडानें केलें तरी चालेल, पण श्वास आंत घेण्याची क्रिया फक्त नाकपुड्यांनींच झाली पाहिजे, कारण, श्वास नाकानें आंत घेत असतां नाकपुड्यांतील केसांनीं हवेंतील केर वगैरे फुफ्फुसांत जाण्याला प्रतिबंध केला जातो, व त्यामुळें शुद्ध हवाच फुप्फुसांत जाते.

कारण दुसरें:—विचार करण्याला एकटें फिरणें फार उपयोगी पडतें, व उदात्त कल्पना तशा स्थितींत आपल्या मेंदूंत सहज प्रवेश करतात. हें ग्लाड्स्टनच्या एकदा सहज चुकून डोक्यांत आलें; व पुढें हिंदुस्थानांतील राजकारणविषयक गूढ बावींचा विचार करण्याचे जेव्हां जेव्हां प्रसंग उद्भवले तेव्हां तेव्हां तो स्वतःच्या महालांत इकडून तिकडे फेऱ्या घालीत एकांतपणें त्यांचा विचार करीत असे. यावरून बुद्धीच्या विकासास एकटें फिरण्याची संवय अत्यंत उपयोगी आहे, असें ठरतें. कांहीं मित्रमंडळीबरोबर किंवा जे लोक आपल्या कल्पना दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न करतात अशांच्या सहवासांत फिरण्याची संवय आपल्याला लागली तर त्यामुळें एकटे फिरतांना ज्या नवीन नवीन उच्च कल्पना आपल्या डोक्यांत येण्याचा संभव असतो, त्यांना आपण होऊन मुकल्यासारखें होतें.

कारण तिसरें:—अध्यात्मिक दृष्टीनें विचार केला तरीहि एकटें सहल करणें फार हितावह आहे. कारण एकटें फिरण्यानें एकमेकांना विरोधी आणि मनाला व्यग्रता उत्पन्न करणाऱ्या ज्या कल्पना असतात त्या पार नाहींशा होतात, व मन स्थिर होऊं लागून वृत्ति आनंदमय बनूं लागते. तसेंच आत्म्याची विश्रांतिरूप अशी जी कल्पनाशक्ति तिला यथेच्छ विहार करण्यास तशा स्थितींत अवसर सांपडतो; व त्यामुळें एकंदर शरीरांत उत्साह भरून राहातो.

आपण मूर्तिमंत आनंद आहों, या कल्पनेचा सारखा निदिध्यास करा. 'मी सर्व प्रकाशांचा प्रकाश आहें ' या उदात्त व पोषक कल्पनेचें आपणांमधील उच्च मनोवृत्ति जागृत करण्याच्या कामीं पुष्कळ महत्व आहे. चांदण्या रात्रीं किंवा पहांटेस फिरावयास जाणें अत्यंत हितकारक आहे. सूर्य पश्चिम क्षितिजाखालीं जात असेल किंवा उदयाचलावर येत असेल अशा वेळीं सूर्याभिमुख फिरत राहावें. तसेंच नदीतीरावर, वायूच्या थंड झुळका ज्या ठिकाणीं येत असतील अशा जागीं फिरणें फार हितावह आहे. कारण, अशामुळें मन सृष्टीशीं एकतानता पावतें, चराचराशीं एकरूप होतें.

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !





# जगाचा प्रारंभकाल कोणता ?

( ता. ६ एप्रिल १९०४ रोजीं दिलेलें व्याख्यान )



स्त्रीपुरुषरूपांत प्रकाशित होणाऱ्या, हे प्रेमस्वरूप परमेश्वरा ! पुष्कळ वेळां असा प्रश्न विचारण्यांत येतो कीं, 'जगाला आरंभ केव्हां झाला ?' आतां या प्रश्नामधील 'केव्हां' या शब्दाचा अर्थ 'कोणत्या वेळेपासून' असा आहे. अर्थात् 'कालाला प्रारंभ कोणत्या वेळेपासून झाला ?' असा या प्रश्नाचा स्पष्टार्थ आहे. पण जरा बारीक विचार केला तर हा प्रश्नच मुळांत हास्यास्पद आणि निरर्थक ठरतो. 'जगाचा आरंभ केव्हांपासून झाला ? आकाशाला सुरवात कोठपासून झाली ?' कांहीं शहाणे म्हणविणारे गृहस्थ या प्रश्नांना उत्तरें देण्याचा प्रयत्न करतील, तसेंच 'जग कसें निर्माण झालें ?' याहि प्रश्नाला ते कांहींतरी प्रत्युत्तर देतील; पण मला त्यांच्या त्या उत्तरांशीं कांहीं कर्तव्य नाहीं, त्याचा विचार करण्याची उठाठेव करीत मी बसत नाहीं. कांहींजण या प्रश्नांवर दिवसच्या दिवस डोकें घांशीत बसतील, पण त्यांतून काय निष्पन्न होणार ? विचाराची मजल थोडी पोहोंचते न पोहोंचते तों एखादा दुर्भेद्य कोट पुढें दिसून कंबर खचून जावी, त्याप्रमाणें असल्या प्रश्नांच्या बाबतींत उत्तरें देऊं पाहणारांची अवस्था झाल्यावांचून कदापि रहाणार नाहीं.

अशी कल्पना करा कीं, माझ्या हातांत एक चिमटा आहे. त्या चिमट्यानें पाहिजे ती वस्तु उचलतां येईल; पण ज्या हातांत तो चिमटा धरला आहे त्या हाताला, मागें वळून पकडण्याचें सामर्थ्य त्या चिमट्यांत असणें शक्य नाहीं. याच न्यायानें काल, दिक्, आणि निमित्त हीं नामरूपात्मक जगाचें अधिष्ठान होय. पण त्यांना अतिक्रमून असलेल्या आत्म्याला-परमात्म्याला ताब्यांत ठेवण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें नाहीं. *



* "निर्विकल्पमनन्तं च हेतुदृष्टान्तवर्जितम्" ॥ श्रुति.

## अतींद्रियज्ञान इंद्रियांनीं कसें होईल ?

एकदा एका रुग्णालयांत चार मनुष्य होते. त्यांच्या डोळ्यांत वडस वाढला होता. त्यांच्यावर शस्त्रप्रयोग करून घेण्यासाठीं ते तेथें येऊन राहिले होते. ते मनुष्य पार आंधळे झाले होते. पंचज्ञानेंद्रियांपैकीं चार इंद्रियांनींच आपला सर्व कारभार करण्याचें त्यांच्या नशिबीं आलें होतें. एक दिवशीं खोलींतील खिडकीच्या तावदानाचा रंग कोणता, यासंबंधानें त्यांच्यांत तंटा सुरू झाला ! एक जण म्हणाला, 'माझा मुलगा विश्व-विद्यालयांत अभ्यास करीत असतो. तो येथें आला होता, व त्यानें मला सांगितलें कीं, या कांचेचा रंग पिंवळा आहे व तो तसाच असला पाहिजे असें मी म्हणतों.' दुसरा म्हणाला, 'माझा चुलता आमच्या शहरच्या आरोग्यरक्षक संस्थेचा प्रमुख सभासद आहे तो परवां येथें आला होता. त्याचें म्हणणें असें होतें कीं, तावदानाचा रंग तांबडा आहे. व त्याची माहिती बरोबर असलीच पाहिजे.' अशा रीतीनें वादाविवाद रंगांत येत चालला ! तिसरा म्हणाला; 'माझा चुलतभाऊ विश्वविद्यालयांत अध्यापकाचें काम करीत आहे. तो मला भेटावयास आला होता, तेव्हां बोलला कीं, तावदानाचा रंग हिरवा आहे. एवढा मोठा मनुष्य कधीं खोटें बोलेल ?' इतकें झाल्यावर ते कांचेच्या तावदानाचा रंग कोणता असावा तें स्वतः पाहूं लागले. त्यांनीं प्रथम तावदानाला जिभा लावून पाहिल्या, पण कांचेचा रंग जिभेनें थोडाच समजणार ! नंतर तावदानाला ठोकून कानावर कांहीं शब्द येतो का म्हणून ते पाहूं लागले, पण कानांना रंग कसा ओळखणार ? पुढें घ्राणेंद्रियाचा त्यांनीं उपयोग करून पाहिला; हातानें स्पर्श करून पाहिला, पण स्पर्शानेंहि तावदानाचा रंग समजेना. अखेरीस त्यांची पूर्ण निराशा झाली. उघडच आहे. डोळ्यांशिवाय रसना, कर्ण, घ्राण, आणि त्वक् ह्या ज्ञानेंद्रियांनीं त्यांना तावदानाचा रंग कसा कळणार ? इंद्रियांच्या योगानें ब्रम्ह जाणण्याचा प्रयत्न करणारे जे आपण त्यांची स्थितिहि वरील प्रकारचीच होते. संकुचित इंद्रियाच्या योगानें व्यापक आणि अनंत ब्रम्हाचें ज्ञान करून घेणें, ही केवढी अशक्य गोष्ट आहे ! तसें होणें, म्हणजे ब्रम्हानें आपलें अनंतत्व टाकून ज्ञानेंद्रियांपेक्षांहि मर्यादित बनलें पाहिजे. पण हें सर्वथा असंभवनीय आहे. विचारज्ञान, ईश्वरी साक्षात्कार घडल्याशिवाय

ब्रम्हाचें अनंतत्व जाणलें, असें होत नाहीं. असें पहा, मीं आपल्या हातांत एक आगकाडी घेतली तर ती माझ्या हातापेक्षां लहान असलीच पाहिजे. जें अल्प आहे, संकुचित आहे त्यानें अनंताचें ज्ञान करून घेणें कसें शक्य होईल ? जें अतींद्रिय आहे, तें इंद्रियगोचर होणें कधींहि शक्य नाहीं. आत्म्याचें ज्ञान दुसऱ्या कशानेंहि होणार नाहीं. इंद्रियादिकांनीं तें करून घेणें म्हणजे आतां सांगितलेल्या गोष्टींतील आंधळ्यांनीं तावदानाचा रंग ओळखण्यासारखें आहे. त्यांना तो रंग समजण्याचें साधन जे डोळे ते घड नव्हते. एवढेंच नव्हे तर प्रत्येकजण सोम्याचा किंवा गोम्याचा हवाला देऊन आपलें मत सिद्ध करण्याचा यत्न करीत होता ! कल्पना करा कीं, प्राणवायु व उज्जवायु यांच्या संयोगापासून पाणी तयार होतें, असें मीं ऐकलें. पण इतक्यावरूनच मला याचें खरें ज्ञान झालें, असें म्हणतां येईल काय ? सर्व रसायनशास्त्रवेत्त्यांनीं जरी मला सांगितलें, तरी जोंपर्यंत मीं स्वतः प्रयोगशाळेंत जाऊन प्रत्यक्ष प्रयोग करून पाहिला नाहीं, तोंपर्यंत मला तो सिद्धांत गृहीत म्हणून धरतां कामा नये. आपला जातीचा अनुभव हेंच कोणत्याहि बाबतींत खरें प्रमाण होय. कृष्ण, येशुख्रिस्त, बुद्ध, यांच्या आप्तवाक्यावर केवळ अंधश्रद्धा ठेवून माझें काम भागणार नाहीं. अमका मोठा मनुष्य अमुक अमुक म्हणतो, असलें 'बाबावाक्यं प्रमाणम्' आपल्या अंतःकरणाच्या समाधानाला 'फारसें उपयोगी पडत नाहीं. स्वानुभव, स्वप्रत्यय, हीच सत्याची टिकाऊ कसोटी होय. एखादा मनुष्य म्हणाला कीं, 'माझ्या बाबांची पचनशक्ति फार दांडगी आहे, तेव्हां माझें अन्नहि तेच पचवतील,' पण असें होईल काय ? छे ! मुलाचें अन्न मुलानेंच पचविलें पाहिजे. जगांत अवतीर्ण झालेल्या श्रेष्ठ विभूतींपुढें मीं आपलें मस्तक नम्र करतों; पण माझें अन्न पचविण्याचें काम ते करूं शकणार नाहींत; तें माझें मलाच केलें पाहिजे. ईश्वराशीं माझी एकात्मता त्यांनीं मला नुसती सांगून पटली जाणें शक्य नाहीं, तें कार्य मीं स्वतः केलें पाहिजे. फक्त विश्वात्मज्ञानानुभवच सत्य माझ्या गळीं उतरविण्याला समर्थ आहे. यासंबंधाचें विवेचन मागाहून करूं.

एखादा अज्ञेयवादी किंवा प्रत्यक्षवादी मनुष्य म्हणतो कीं, सृष्टींतील गूढें मीं उकलून काढीन ! पण तो किती मर्यादेपर्यंत जाऊं शकतो, हें

आपल्याला दिसतच आहे. एखादी आगकाडी त्याला दाखविली तर तो म्हणणार की, आगकाडींत अग्नि आहे. आतां काडींत तर तो प्रत्यक्ष दिसत नाहीं. तेव्हां काडीचे लहान लहान तुकडे करून तो पाहातो, पण प्रकाशाचा बिलकुल पत्ता नाहीं! काडीचे शतशः तुकडे केले—चूर्ण केलें तरी तेंच; प्रकाश म्हणून त्याला सांपडत नाहीं. तो एखादें शरीर घेऊन त्याचे भाग निरनिराळे करतो; पण चैतन्याचा त्याला कोठें मागमूसहि लागत नाहीं. हाडांचें चूर्ण केलें, पण चित्कलेचें नांव नाहीं! इतकें झाल्यावर शेवटीं त्याचे असे उद्गार येतात कीं, सद्वस्तु म्हणून कांहीं असली तर ती मीच असलों पाहिजे. पण ती वस्तु मात्र अज्ञेय आहे! हें अज्ञेयवादी मनुष्याचें म्हणणें त्याच्या दृष्टीनें बरोबर आहे. त्याच्या ठिकाणीं व्यष्टिज्ञान—संकुचित, वैयक्तिक उर्फ स्थानिक संवित्—उत्पन्न झालेली असते, पण समष्टिज्ञान—व्यापकसंवित् त्याच्या ठिकाणीं विकसित झालेली नसते. यामुळें आपल्या व्यष्टिज्ञानाच्या—अहं-वृत्तींच्या योगानें जगाच्या बुडाशीं असलेलें अविनाशी तत्व कोणतें आहे, तें हुडकून काढण्याचा तो प्रयत्न करतो, पण त्यांत त्याला हात टेंकावें लागतात. पण अशा रीतीनें तें तत्व समजणें शक्य नाहीं, हें उघड आहे. सारासारविचारशक्तीसंबंधाची हीच स्थिति आहे. विचारशक्तीची मजल जगाच्या बुडाशीं अव्यय आणि अविनाशी असें कांहीं तरी तत्त्व आहे, इतकें शब्दज्ञान होण्यापर्यंतच जाते; पण तें काय आहे, हें विचारशक्तीच्या टापूंत येऊं शकत नाहीं. एखादा मनुष्य आपल्या मागून येऊन आपले डोळे झांकतो. अशा वेळीं कोणा मनुष्यानें आपले डोळे झांकले आहेत, इतकें ज्ञान आपल्याला होतें; तो आपला कोणी स्नेही असावा, कारण, एखादा अनोळखी—परका मनुष्य तसें करण्याला धजणार नाहीं, इतकें अनुमान आपल्याला करतां येतें. पण तो अमूकच मनुष्य असावा, असें निश्चयानें आपल्याला सांगतां येत नाहीं. एखादा चेंडू भिंतीवर फेंकला असतां तो भिंतीकडून उलट फेंकला जातो. अशीच हुबेहुब स्थिति विचार-शक्तीची आहे. आपली मर्यादित विचारशक्ति अनंतामध्यें—ब्रह्मामध्यें प्रवेश करण्यास असमर्थ आहे, व तें यथायोग्यच आहे. कारण, ब्रह्माचें ज्ञान आपल्याला होणें शक्य असेल तर ब्रह्माच्या 'एकमेवाद्वितीयम्' या वर्ण-

नाला बाघ येऊं लागेल व ब्रह्म व त्याचे ज्ञाते आपण असे दोघेहि ब्रह्म नाहीं असेंच ठरेल. परंतु, एका विश्वात्मज्ञानाच्या योगानें मात्र व्यापक ब्रह्माची खरी सिद्धि होते.

## सत्संगाचा महिमा.

आतां ईश्वरी साक्षात्कार–आत्मानुभव–कसा होतो, इकडे आपण वळूं. पण तें सांगण्यापूर्वी लहान मुलाची स्थिति कशी असते, हें आपण प्रथम पाहूं. लहान मुलाच्या ठिकाणीं 'मी' किंवा 'जगत्' यापैकीं कसलीहि वृत्ति नसते. त्याला स्वतःसंबंधाचें–व्यष्टिज्ञानाहि नसतें. मग समष्टिज्ञानाची गोष्टच कशाला ? समजा, आपल्यासमोर एक लहान मूल आहे. त्या मुलाला कोणत्याच तऱ्हेचें ज्ञान नाहीं. पण त्याला आपल्या स्वतःसंबंधाचें कांहीं ज्ञान उत्पन्न होईल व नंतर आपण त्याच्याशीं बोलूं, असा आपण कधींतरी विचार करतों काय ? नव्हे. त्याला आपल्या भोंवतालच्या वस्तूंचें ज्ञान होईल व मग आपण त्याला शिकवूं, अशी कल्पना आपण करतों काय ? नाहीं. मूल पाळण्यांत असतांच आपण त्याचा नामकरणविधि करतों. त्याला 'गोविंदा' 'गोविंदा' अशा तऱ्हेच्या नांवानें हांक मारतों. घरांतील वडील माणसें त्याला त्याच्या नांवानें हांक मारतात, त्याच्याशीं बोलतात व त्याला निरनिराळ्या माणसांबद्दल आणि वस्तूंबद्दल माहिती करून देतात. 'आमचा बाबा कसा छान, कसा हुषार आहे, आम्हांला फार आवडतो !" असें म्हणून त्याच्या आईबापाला हांक मारण्याला त्याला शिकवतात. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर मुलगा जरा मोठा झाला, रांगूं लागला म्हणजे तो कांहीं अव्यक्त, अस्पष्ट वर्ण उच्चारूं लागतो. पुढें 'आई' 'बाबा' हे शब्द पुष्कळ वेळां त्याच्या कानांवरून गेल्यामुळें तो त्या शब्दांचें अनुकरण करूं लागतो. मुलगा 'बाबा' म्हणाला म्हणजे बाप मुलाला 'इकडे ये' असें म्हणतो. आतां बाप काय म्हणतो आहे, हें मुलाला थोडेंच समजतें ! पण बापानें आपले हात पुढें केले असून तो हास्यमुद्रेनें आपल्याकडे पाहात आहे असें पाहून बाप आपल्याला बोलावीत आहे, असें त्याला वाटूं लागतें. असल्या सामान्य व्यवहारांतल्या गोष्टींबद्दलचें ज्ञानहि वडील मनुष्यांच्या–ज्यांच्यामध्यें व्यष्टिज्ञान जागृत झालें आहे अशांच्या सहवासानें प्राप्त होतें, हें यावरून दिसून येतें.

याच न्यायानें ज्यांना साक्षात्कार झाला आहे, विश्वांतील सर्व भूतें जे आत्म्यामध्यें पहातात, अशा सत्पुरुषांच्या सहवासानें आत्म्याच्या सत्य आणि व्यापक स्वरूपाचा साक्षात्कार—अनुभव होऊं शकतो.* सहवासाचा केवढा जबर परिणाम होतो, ही आपल्या नेहमींच्या अनुभवांतली गोष्ट आहे. एखाद्या दुःखी कष्टी मनुष्याच्या संगतींत आपण कांहीं वेळ घालविला तर आपलें मनहि तावडतोब उद्विग्न होतें. तेंच कांहीं गमती, आनंदीवृत्तीच्या मनुष्यांच्या बरोबर थोडा वेळ घालविल्यानें आपली वृत्तिहि उल्लसित होते. सत्संगाचाहि परिणाम असाच होतो; मग तो तत्त्वदर्शी महानुभावांनीं केलेल्या ग्रंथांच्या रूपानें असो, प्रत्यक्ष त्यांच्या संभाषणाच्या रूपानें असो, किंवा निसर्गनिरीक्षणानें आणि सहवासानें असो. बाप मुलाला ‘गोविंदा’ ‘गोविंदा’ म्हणतो आणि शेवटीं मुलगाहि ‘गोविंदा’ होतो. त्याला ‘रामा’ म्हणून म्हटलें असतें तर तो ‘रामा’ झाला असता. त्यांत त्याचें काय! तसेंच एखाद्या खोलींत कांहीं लहान मुलें निजलीं असलीं व त्या खोलींत जाऊन ‘गोविंदा’ ह्मणून हांक मारली तर ‘गोविंदा’ हांक देतो; ‘रामा’ हांक देत नाहीं. ही हांक मोठ्यानें मारली असली तरी आपल्याला हांक मारली नाहीं, असें जाणून ‘रामा’ निजलेला असतो तो तसाच झोंप घेत राहतो.

## चमत्कारांत काय आहे!

आत्मज्ञान झालेल्या—सम्यग्ज्ञान झालेल्या मनुष्याला कित्येक वेळां असें विचारण्यांत येतें कीं ‘अहो राजश्री! आपल्याला ईश्वरी साक्षात्कार झाला

---

* तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्।
समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ मुण्डकोपनिषद्, खं. २।३२
तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ गीता, अ० ४।३४.
जरी तुज व्हावा देव। तरी हा सुलभ उपाव ॥ १ ॥
करी मस्तक ठेंगणा। लागे संतांच्या चरणा ॥ २ ॥ तुकाराम.
संतसमागमें आत्मत्वाचा सुंदर उगवे मोड ॥
दे हरि संतपदाची जोड ॥ १ ॥ अमृतराय.

असें म्हणतां, तर आपण आम्हांला काय करून दाखवितां ? ईश्वरानें हें विश्व निर्माण केलें. पण आपण एक गवताची काडी तरी उत्पन्न करा असें म्हटलें तर तेंसुद्धां आपल्याला करतां येत नाहीं. तरी आपण ईश्वर आहों, अशी आपल्याला घमेंड आहे ! तुम्हांला कांहीं करतां येत असलें तर तें मला प्रत्यक्ष करून दाखवा ?' पण हें म्हणणें मूर्खपणाचें आहे. येशू ख्रिस्तालासुद्धां असाच अडविण्याचा, मोहांत घालण्याचा प्रयत्न करण्यांत आला नव्हता काय ? सैतानानें त्याला चीत करण्याच्या उद्देशानें पर्वतावरून उडी मारण्याला सांगितलें नाहीं काय ? पण जीझसनें त्याच्या टोमण्याला न जुमानतां त्याला फक्त इतकेंच सांगितलें कीं, 'तूं माझ्या मागोमाग उडी मारण्याला तयार हो !' जीझसच्या अंगांत सर्व सामर्थ्य होतें, पण एखाद्या अश्रद्ध मनुष्यासाठीं त्यानें तें सामर्थ्य खर्चीं घालण्यास कां तयार व्हावें ? नास्तिकाला–पाखंडी मनुष्याला हजारोंहजार चमत्कार करून दाखविले म्हणून तो थोडाच वळणावर येणार आहे ? त्यानें स्वतः आत्मसाक्षात्कार करून घेतल्याशिवाय सर्व फुकट आहे. आतां आपण म्हटलें कीं, 'मी ईश्वर आहें' तर त्याचा अर्थ काय ? हें जड शरीर ? अर्थात् नव्हे. हें मन ? छे ! तें ईश्वर कसें होणार ? तर या विधानाचा आशय पुढीलप्रमाणें आहे. कल्पना करा, एखादा मनुष्य एम्. ए. च्या परीक्षेंत उत्तीर्ण झाला व त्याला एम्. ए. ची पदवी मिळाली. एखादा राजा आहे व राजा ही त्याची पदवी आहे. या दोन उदाहरणांत मनुष्यावर एम्. ए. व राजा या पदव्या एका दृष्टीनें आरोपित केलेल्या आहेत, असें म्हटलें तरी चालेल. तसेंच आपण म्हणतों कीं, हा साप काळा आहे. या ठिकाणीं काळेपणा हा सर्पाचा गुण असून तो त्याच्यावर आरोपित केल्यासारखा आहे. पण तेंच आपण असें म्हटलें कीं, 'हा साप दोर होय.' आतां या वाक्यांतील 'साप' व 'दोर' यांचा संबंध 'काळा' व 'साप' यांच्या संबंधाहून निराळया तऱ्हेचा आहे. 'मी राजा आहें' या वाक्यांत 'राजा' ही 'मी'ची पदवी झाली. पण 'मी ईश्वर आहें.' याचा अर्थ हा माझा क्षुद्र अहंकार म्हणजे ईश्वर असा नाहीं. 'हा साप दोरी आहे' याचा अर्थ हा साप केवळ भास असून फक्त दोरी खरी असा आहे, त्याचप्रमाणें हा आपला 'मी' हें मृगजल असून फक्त ईश्वर

सत्य आहे. "मी ईश्वर आहें, फक्त ईश्वर, अनंत, सच्चिदानंदस्वरूपी 'एकमेवाद्वितीयम्' ब्रह्म आहें."

हा सिद्धान्त अधिक स्पष्ट करण्यासाठीं आपण समुद्राच्या लाटांचा दृष्टान्त घेऊं. एका लाटेंतील पाणी दुसऱ्या लाटेंतील पाण्याहून भिन्न आहे काय ? अर्थात् नाहीं. पाणी हें येथून तेथून एकच आहे. व लाटांना जो निरनिराळेपणा आलेला दिसतो तो केवळ त्यांच्या आकारांमुळें होय. तसेंच या शरीरांत आत्मा निराळा व त्या शरीरांत निराळा असें कसें होईल ! सर्व शरीरांत आत्मा अभिन्नत्वानें एकच आहे. आत्मा 'एकमेवाद्वितीयम्' आहे. सर्व शरीरें हीं आत्म्याचीं आहेत, तीं सर्व माझीं आहेत. निरनिराळ्या भाषांमध्यें 'प्रकाशाला' निरनिराळीं नांवें दिलीं जातात. इंग्रजींत 'प्रकाशाला' 'लाइट' म्हणतात. जर्मन भाषेंत 'लिख्ट' म्हणतात. पण नांवें कांहीं दिलीं तरी प्रकाश येथून तेथून सर्व एकच नाहीं काय ? तद्वत्च नांवें भिन्न असलीं तरी आत्म्यांत फरक नाहीं. कारण, आत्मा हा सर्वव्यापी आहे, तसा नित्य कायम आहे.

## आपला 'मी' सर्वव्यापी करा.

आपल्या या शरीरांतील सर्व अवयव परस्परावलंबी आहेत, व त्या सर्वांचें बनलेलें शरीर हें एक अविच्छिन्न यंत्र आहे. अर्थात् हातानें म्हटलें कीं, 'मी सर्व शरारीचा पोशिंदा असतां या इतर अवयवांनीं फुकट कां खावें ?' तर तें चालेल काय ? अशा विचारानें अन्न तोंडांत घालावयाचें नाहीं, पोटाला अन्नाचें पचन करूं द्यावयाचें नाहीं व त्याचीं बनणारीं पोषक द्रव्यें इतर अवयवांना वांटून द्यावयाचीं नाहींत असें केलें, व हातांत तेवढें अन्न शस्त्रक्रियेनें कोंबले तर हा प्रकार एकंदरींत हास्यास्पद होणार नाहीं काय ? हात पैसे मिळवतो असें म्हणून हातावर रुपये बांधून ठेविले, अशी कल्पना करा; इतक्यांत एक गांधीलमाशी हाताला डसली व त्यामुळें दुःसह व तीव्र वेदना होऊं लागल्या. तो कापल्याशिवाय काम भागेना, पण शरीराच्या इतर अवयवांना बिलकुल त्रास न पोचतां तो कापतांसुद्धां येणें शक्य नाहीं. कारण, शरीर हें सर्व अवयव मिळून एक यंत्र आहे. या दृष्टीनें पहातां असें म्हणावें लागतें कीं, व्यष्टीनें–व्यष्टीनें समष्टीपासून

अलग होऊन राहाणें अशक्य आहे. आपला संकुचितपणा टाकून व्यापकपणा अनुभवल्यावांचून आपलीं दुःखें नष्ट होणार नाहींत. असें झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आपल्या व्यापकस्वरूपाचा—परमात्म-स्वरूपाचा—विकास झाला म्हणजे आपण सर्व परस्परावलंबी आहों, त्यांत विभक्तपणा—अलगपणा नाहीं, असें आपल्या प्रत्ययाला येईल.

एके वेळीं एक संन्यासी एका सोनाराकडे येऊन त्याला म्हणाला कीं, 'तुझ्याजवळ जी उत्तमोत्तम आंगठी असेल ती काढ व ईश्वराच्या बोटांत ती घाल.' नंतर एका चांभाराकडे जाऊन तो त्याला बोलला कीं, 'तुझ्याजवळ जो उंचीत उंची जोडा असेल तो आण व ईश्वराच्या पायांत घालण्यास दे.' पुढें एका शिंप्याच्या दुकानांत जाऊन तो त्याला म्हणाला कीं, 'तुझ्या दुकानीं छानदार कपडे शिवलेले असतील ते ईश्वराच्या अंगावर घाल.' 'ईश्वराच्या अंगावर हे शब्द उच्चारण्यांत त्या स्वामीचा आशय 'माझ्या शरीरावर' असाच होता. हा सर्व प्रकार लोकांनीं पाहिला व तो स्वामी निवळ ढोंगी—पाखंडी आहे, असें त्यांच्या मनानें पक्कें घेतलें व त्याला बिनभाड्याच्या घरांत अडकविण्याचा त्यांनीं विचार ठरविला ! 'मला तुरुंगांत बेलाशक टाका, पण तसें करण्यापूर्वीं मीं काय म्हणतों तें एकदा ऐकून तर घ्या.' अशी स्वामीनें लोकांची विनंति केली, व ती लोकांनीं मान्य केली. तेव्हां तो लोकांना उद्देशून म्हणाला, 'हें जग कोणी निर्माण केलें ?' लोक म्हणाले, 'ईश्वरानें. अर्थात् ईश्वरानें.' 'आकाशांतील सूर्य आणि तारे कोणी उत्पन्न केले ? हीं शेते व त्यांतील धान्य हीं कोणीं निर्माण केलीं ?' याहि प्रश्नांना 'ईश्वरानें' असेंच उत्तर त्यांनीं दिलें. 'पण अशी तुमची श्रद्धा खरोखर आहे का ?' लोक म्हणाले, 'होय. यांत काय संशय ?' त्यानंतर स्वामीनें विचारलें कीं, 'हें माझें शरीर कोणाचें आहे ?' त्यांनीं उत्तर दिलें कीं, 'ईश्वराचें.' 'हे पाय कोणाचे, हे हात कोणाचे ?' ह्या सर्व प्रश्नांना 'ईश्वराचे' हेंच उत्तर आलें. अशा रीतीनें त्यांच्याच तोंडानें निकाल झाल्यामुळें स्वामीला शासन करण्याच्या त्यांच्या कल्पना जागच्या जागींच जिरल्या, कारण, स्वामींचें ज्ञान त्यांच्या डोक्यांत नव्हतें !

हिंदुस्थानांत एखादा मनुष्य मेला म्हणजे त्यानें आपला देह ठेवला, असें म्हणण्याचा प्रघात आहे. तुमच्या इकडे त्यानें आपला आत्मा दिला, असें म्हणण्याची वहिवाट आहे. मरण्याची कल्पना व्यक्त करण्याच्या तुमच्या या पद्धतीपेक्षां हिंदुस्थानांतील पद्धति खास जास्त सयुक्तिक आहे. कारण, आत्मा हा शरीरापेक्षां भिन्न आहे, हें तत्त्व हिंदुस्थानांतील पद्धतीनें जास्त स्पष्ट रीतीनें दर्शित केलें जातें. मरण्याची कल्पना 'त्याच्या शरीरांतून प्राण गेला' अशा तऱ्हेनेंहि व्यक्त करण्याचा हिंदुस्थानांत सांप्रदाय आहे. एकदा असें झालें कीं, तीन मनुष्य एका ठिकाणीं बसून मनमुराद दारू पीत होते. तिघांच्याहि अंगावर खूप अंमल आला. त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला कीं, 'हें पहा, आपण आतां जरा फराळ करूंया.' असें म्हणून त्या तिघांपैकीं एक इसम फराळाचे जिन्नस आणण्याकरितां गेला. पुढें जरा वेळानें त्या दोघांपैकीं एकजण दुसऱ्याला म्हणाला कीं, 'गड्या! माझा जीव इतका कासावीस झाला आहे कीं, आतां प्राण जाणार, असें मला वाटूं लागलें आहे!' ते त्याचे शब्द ऐकून त्या दुसऱ्या इसमानें त्याचें नाक दाबून धरलें, व तो म्हणाला कीं, 'छे! छे! प्राण जाऊन चालेल कसें!' अशा रीतीनें नाक तोंड दाबण्याचा परिणाम काय होणार, तें उघडच आहे. आपण नाक तोंड दाबून काय मूर्खपणा करीत आहों याची त्या इसमाला कल्पनाहि झाली नाहीं.

एका मोठ्या समारंभाच्या वेळीं श्रीकृष्णानें मेजवानीस सर्व बड्या बड्या मंडळीस निमंत्रण केलें; पण आपली प्रिया जी राधा हिला बोलवणें केलें नव्हतें. दरबारांतील मुख्य प्रधानानें श्रीकृष्णाला पुष्कळ आग्रह करून राधेला निमंत्रण करण्याविषयीं सांगितलें. पण त्याच्या बोलण्याकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. परंतु प्रधानाला झाली गोष्ट बरी झाली नाहीं असें वाटून त्यानें राधेकडे जाऊन तिला सर्व हकीकत निवेदन केली. पण त्यावर ती इतकेंच म्हणाली कीं, 'आपल्या घरीं एखादी मेजवानी असली म्हणजे आपण आपल्या सर्व आप्तेष्टांना, स्नेह्यासोबत्यांना बोलावणें करतों; पण आपल्या स्वतःला आमंत्रण करण्याचा आपला प्रघात असतो काय? कृष्णाच्या येथें मेजवानी आहे, हें मला पूर्वींच समजलें. कारण आम्हीं एकच आहों.'

एकदा मजनून* याच्या प्रियेला कांहीं कारणानें बरें वाटेना. तिचें चित्त अस्वस्थ झालें, व कांहीं केलें तरी तिला स्वस्थता म्हणून वाटेना. शेवटीं हकीमाला निरोप पाठवून बोलविण्यात आलें. त्यानें तुंबडी लावून रक्त काढण्याचें ठरविलें व त्याच्यामुळें लैली हिला आराम वाटेल असें समजून लैलीच्या हाताचें रक्त काढण्याचा प्रयत्न केला. पण चमत्काराची गोष्ट कीं, लैलीच्या हातांतून रक्ताचा थेंबहि आला नाहीं, पण मजनून याच्या हातांतून रक्ताची धार लागली ! त्या दोघांचें प्रेम इतक्या एकात्मतेचें होतें.

## विश्व.

( चालः—पांडुनृपति जनक जया० )

पुस्तक हें पाहियलें ।
वाचियलें, मज कळलें ।
वर्णन मम गोवियलें ।
जें यदंतरीं ॥ १ ॥

---

* 'फरहंग असाफिया' नामक फारसी ग्रंथावरून असें समजतें कीं, मजनून आणि लैली हीं दोघेंहि अरबस्थानांतील नेज्जी शहरच्या बनी अमिर ह्या कुळांत होऊन गेलीं. त्यांचीं घरें अगदीं जवळ जवळ होतीं. अगदीं लहानपणींच त्यांचें एकमेकांवर प्रेम जडलें. परंतु लैलीच्या बापाला हें न आवडून त्यानें दुसऱ्याच तरुणाशीं लग्न लावलें. हें कळतांच मजनून अगदीं वेडा होऊन गेला. लैलीलाहि हें आवडलें नाहीं. तिचें मजनूवर तसेंच निष्कपट प्रेम होतें. त्यामुळें झालेल्या प्रकारानें निराश होऊन थोड्याच दिवसांनीं ती मरण पावली. लैलीच्या निधानाची वार्ता ऐकतांच प्रेमातिशयामुळें मजनूला एकदम मूर्छा आली व फिरून तो वर उठला नाहीं. मजनून आणि लैली ह्यांच्या निस्सीम प्रेमाच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. मजनूनचें मूळ नांव कैस असें होतें. पण लैलीच्या प्रेमानें तो वेडा झाल्यामुळें पुढें मजनून म्हणजे प्रेमवेडा असें त्याचें नांव पडलें. जनून हा शब्द जिनून (वेडेपणा) ह्या शब्दापासून निघाला आहे.

दृश्य—वस्तु-चिन्हांची ।
खेळणिं जणुं गमतीचीं ।
अक्षरमाला जीची ।
अंकलिपि खरी ॥ २ ॥
मूलाक्षरपंक्ति कठिण ।
गमली गूढार्थ—पूर्ण ।
होतें अज्ञान पूर्ण ।
लव न माधुरी ॥ ३ ॥
वाचुनियां पाहियली ।
केरामधिं फेंकियली ।
रद्दिमधें राहियली ।
चोपडी परी ॥ ४ ॥
एक एक पान तिचें ।
जाळितसे चोपडिचें ।
चित्स्वरूपि गुडगुडिचे ।
ठेवि मन शिरीं ॥ ५ ॥
गुडगुडि मी ओढितसें ।
धूम्र उदरिं घेत वसें ।
वदन पथें फुंकितसें ।
पुनरपी वरी ॥ ६ ॥
वलयाकृति धूम्र जात ।
राहे हर्षें पहात ।
चर्या गंभीर शांत ।
मौज ही खरी ॥ ७ ॥*

* सोहिरोबा;—महाराष्ट्र कविचरित्र ( भाग १ ला ) पान ३८६.

# आत्मकेंद्रांत स्थिर व्हा

( कॅसल स्प्रिंग येथें ता. ९ जून १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान )

—:०:—

## चित्तशुद्धीचें साधन



भोजन चाललें असतां गप्पागोष्टी सांगण्याची इकडच्या लोकांची चाल आहे, पण हिंदुस्थानांतील रीत याहून भिन्न आहे. तेथें जेवण चाललें असतां कधीं बोलावयाचें नाहीं, असा नियम असतो. जेवण ही जणूं काय एक धार्मिक बाब ह्मणून मानली पाहिजे. अन्नाच्या प्रत्येक घांसाबरोबर असा विचार मनांत आणला पाहिजे कीं, हा अन्नाचा घांस आपल्या भोंवतालच्या विश्वाचा द्योतक असून तो घांस आपण तोंडांत घेतों म्हणजे सर्व चराचराला आपण आपल्यामध्यें मिळवून घेत आहों. ही कल्पना भोजन चाललें असतां हिंदुस्थानांतील लोक आपल्या मनांत आणतात; आणि 'ॐ' या शब्दब्रम्हाचा जप करतात. व तें करीत असतां सर्व विश्व आपण आपणाशीं एकरूप करीत आहों, अशी भावना करतात. 'ॐ, ॐ' सर्व चराचर माझ्यामध्यें आहे, जग हें माझें शरीर आहे' अशा रीतीनें अन्नाच्या प्रत्येक घांसाबरोबर ते आपली अध्यात्मिक उन्नति करून घेत असतात.* म्हणजे अन्ना-

---

* राम ह्मणे ग्रासोग्रासीं । तोचि जेविला उपवासी ॥ १ ॥
धन्य धन्य तें शरीर । तीर्थव्रतांचें माहेर ॥ २ ॥
राम ह्मणे करितां धंदा । सुख समाधि त्या सदा ॥ ३ ॥
राम ह्मणे वाट चाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥ ४ ॥
राम ह्मणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥ ५ ॥
ऐसा राम जपे नित्य । तुका ह्मणे तो जीवन्मुक्त ॥ ६ ॥ तुकाराम.

बरोबर त्यांना अध्यात्मिक अन्नहि मिळत असतें. ' सर्व जग हें माझें शरीर आहे. अन्न हें सर्व विश्वाचें दर्शक असून त्याच्यायोगानें माझें रक्तमांसादि तयार झालें आहे. जें सर्व आहे तें ब्रम्हच आहे,' ही कल्पना हिंदु लोकांना परिचित असल्यामुळें अशा भावना व अशी श्रद्धा त्यांच्यामध्यें उत्पन्न होते. व याच्या योगानें अखेरीस अंतःकरणवृत्ति आणि भावना इतक्या उत्कट स्थितीप्रत जाऊन पोहोंचतात कीं, त्याचा परिणाम आत्मसाक्षात्कार होण्यांत होतो; व अशा दृष्टीनें विचार केला तर * खाणेंपिणें—जिला पशु-वृत्ति असें म्हटलें जातें—तें सुद्धां आत्मानुभवाचें एक साधन होऊन बसतें.

स्नानविधीच्या वेळीं ॐ असें म्हटलें पाहिजे. ॐ म्हणजे पाणी—जड सृष्टींतील सर्व पाणी काढून आपण आंग धुवूं लागलों म्हणजे शरीराच्या प्रत्येक रोमरंध्रांत तें पाणी आपण ग्रहण करीत असतों, व अशा रीतीनें जलाशीं, त्या जलांतील माशांशीं, व जलाच्या रूपानें निमित्तानें सर्व चरा-चराशीं आपण एकात्मतेचा अनुभव घेत असतों. ज्याप्रमाणें पाणी हें आपल्या शरीरावरील माती व इतर मलिनता नाहींसें करतें, त्याप्रमाणें आत्म्यावरील माती—विकारमालिन्य तें ज्या भावनेनें—दृढ अभ्यासानें नष्ट करूं शकतें ती ही कीं, सर्व चराचर हें माझें अन्न होय. मी हवाहि खात असतों. अशा रीतीनें आपल्या जीवितक्रमांतील प्रत्येक विधि, क्रिया, किंवा गोष्ट आपल्या चित्तशुद्धीचें साधन होऊं शकतें, असें वेदान्त प्रतिपादन करतो. एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानांत प्रत्यक्ष रोगांनांहि देवता म्हणून मानलें जातें.

हिंदुस्थानांत एखाद्या ठिकाणीं देवीची सांथ सुरू झाली म्हणजे तेथील लोक घाबरून जात नाहींत, तर तो त्यांना मोठा उत्सव वाटतो; हें आश्चर्यकारक नाहीं काय ? घरांत कोणाला देवी आल्या म्हणजे वाद्यें वाजवून तो एक प्रकारचा धर्मविधि म्हणून पाळला जातो. अशा तऱ्हेनें देवांच्या रूपानें

---

जनीं भोजनीं नाम वाचे वदावें ।
अती आदरें गद्यघोषें म्हणावें ॥
हरीचिंतनें अन्न जेवीत जावें ।
तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावें ॥

श्रीसमर्थकृत मनाचे श्लोक.

* अन्नं ब्रह्मेति व्यजानात् ॥ तैत्तिरीयोपनिषद्, भृगुवल्ली. २.

देवाची आराधना करण्याचा प्रघात पडून गेलेला आहे. या बाबतींत शोक-चिंता करणें हिंदुस्थानांतील लोकांना माहित नाहीं. एखाद्या मुलाच्या देवी मावळून तें चांगलें बरें झालें म्हणजे तासे वाजंत्रें वाजवून देवीचा उत्सव करतात आणि पुष्कळ दानधर्म करतात. तो आनंदोत्सव साजरा करून ईश्वराबद्दलचें आपलें प्रेम व श्रद्धा प्रदर्शित केली जाते........आतां अलिकडे बहुजनसमाजाला असल्या धर्मविधींतील रहस्य समजेनासें झाल्यामुळें त्यांचें महत्व वाटेनासें झालें आहे. पण लोकांना तें समजो ! रामाला त्यांतील हृद्गत माहित आहे व असल्या गोष्टींचा तो योग्य उपयोग करून घेतो.

## अखंडस्वरूपानुसंधान.

तुम्हांपैकीं प्रत्येकाला राम एक गोष्ट सुचवीत आहे. ती ही कीं, पहांटेस तुम्हीं जागे झालां म्हणजे किंवा हवा खाण्यासाठीं जात असतां किंवा दुसरें कोणतेंहि काम करीत असतां आपलें चित्त–अनुसंधान मूळाकडे–स्वरूपाकडे असूं द्या; नेहमीं आत्मकेंद्रांत–आत्मस्वरूपांत स्थिर व्हा.* बाह्य जगांतील कोणतीहि वस्तु तुमच्या प्रेमाचा विषय होऊन बसतां कामा नये. सदोदित प्रत्यग्वृत्ति असा. मासा ज्याप्रमाणें समुद्रांत राहतो किंवा पक्ष्यांना आकाश हें ज्याप्रमाणें आपलें घर वाटतें, त्याप्रमाणें आपण चैतन्यरूप–प्रकाशमय–आहों, अशा दृढ भावनेच्या स्थितींत राहण्यास शिका. आपण प्रकाशांत राहतों, आपल्या सर्व हालचाली प्रकाशांत होतात, व आपलें सर्व अस्तित्व प्रकाशांतच आहे. रात्रीं सर्वत्र अंधार पसरला असला तरी शास्त्रदृष्टीनें विचार केला तर त्या वेळींहि हा प्रकाश असतोच.† आपल्या

---

* ब्रह्माहमिति वै जपः ॥

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा । पुढें वैखरी राम आधीं वदावा ॥

श्रीसमर्थकृत मनाचे श्लोक.

माझे कृपेचें लक्षण । प्राप्तविषय भोगितां जाण ।
न तुटे माझें अनन्यभजन । पूर्ण कृपा जाण या नांव ॥

एकनाथी भागवत.

× सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसःपरस्तात् ॥

गीता, अ. ८।९

हृदयांतली ज्योति नित्य प्रकाशमान असतें. आपल्याला गाढ निद्रा लागलेली असते तेव्हांहि आत्म्याचें प्रकाशकत्व कायम असतें.* जिज्ञासूनें आपल्या मनापुढें ही कल्पना नेहमीं राखावी कीं, आपण केवळ चैतन्यस्वरूप-प्रकाशमय आहों. कारण, एकाग्रता साधण्याला-तत्त्वानुभवाच्या उच्च शिखरावर आरूढ होण्याची आकांक्षा बाळगणाऱ्या साधकाला याच्यापासून अत्यंत उपयोग होणार आहे.

रोमन क्याथोलिक पंथाचे लोक आपल्या मूर्तींना लेखतात त्याप्रमाणें आम्हीं अप्रकाशाला एक जड वस्तु या नात्यानें लेखीत नाहीं. या जगांतील सर्व तेज आपण आहों, ही भावना दृढ करणें, हें साक्षात्काराचें एक खात्रीचें साधन अशा दृष्टीनें हिंदूंच्या धर्मग्रंथांत या कल्पनेचें वारंवार विवेचन केलेलें आहे.† 'ॐ' ह्या मंत्राचा जप करतांना आपण तेजोरूप, प्रकाशमय आहों, हा ध्यास चालूं द्या. आपण केवळ चित्प्रकाशरूपी आहों, या तत्वाचें हिंदूंच्या धर्मग्रंथांत सशास्त्र आणि सोपपत्तिक विवरण केलेलें आहे. पण जगांतील धर्मप्रवर्तक सत्पुरुषांच्या हें तत्व चुकून लक्ष्यांत आलें आहे. 'जगांतील सर्व प्रकाश मी,' असें येशू ख्रिस्तानें म्हटलें आहे. महंमदप्रभृति अन्यधर्मीय संतांनींहि असेंच लिहून ठेविलें आहे. विश्वांतील वस्तुमात्राला प्रकाशित करणारे आपण आहों, या कल्पनेचें निरंतर चिंतन केल्यानें आपणामध्यें परमात्मभावना वास करूं लागेल. हिंदूंचा सर्व व्यवहार अशा तऱ्हेनें धर्मदृष्ट्या केला जातो, आत्म्याशीं एकतानवृत्तीनें सर्व व्यवहार करण्याची त्यांची वहिवाट असते.

---

*जें जागृतीतें जागवित । स्वप्नीं स्वप्नातें नांदवित ।
सुषुप्तातें निजवित । त्यांतें तुर्या म्हणत उद्धवा ॥

एकनाथी भागवत.

निद्रादौ जागरस्यान्ते यो भाव उपजायते ।
तं भावं भावयन्साक्षादद्वयानंदमश्नुते ॥

योगवासिष्ठ. अ. १०

† यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ गीता, अ. १५।१२.

मनुष्याची इच्छा असो किंवा नसो, सृष्टिरचनाच अशी आहे कीं, ती मनुष्याला आत्मज्ञानाच्या स्थितीकडे प्रवण करीत असते. अनुकूल किंवा प्रतिकूल परास्थितीमुळें या प्रवृत्तींत यत्किंचित्‌हि फरक होऊं शकत नाहीं. चालतांना आपण एक पाऊल प्रथम टाकतों, व नंतर दुसरें टाकतों. ह्याच क्रम सुखदुःखाच्या बाबतींत दिसून येतो. सुखानंतर दुःख आणि दुःखानंतर सुख. हा चक्रनेमिक्रम अव्याहत चाललेला आहे. सर्व विश्वांत हा नियम दिसून येतो. परंतु खरा सुखी मनुष्य तोच कीं, जो जगांतील सुखदुःखाचें अतिक्रमण करून पलीकडे जातो. दुःखाप्रमाणें सुख हाहि कांटा आहे; व या द्वंद्वाच्या अतीत होण्यांतच शाश्वत सुख आहे.० सुखामध्यें आपल्याला जितका आनंद वाटतो तितक्याच आनंदानें दुःखाचें स्वागत करण्याला आपण तयार असलें पाहिजे. ज्ञान्याला दोहींची किंमत सारखी वाटते. जो द्वंद्वातीत झाला त्याला दोन्हींची योग्यता एकच वाटते. ज्याला ऐहिक सुख पाहिजे असेल त्यानें दुःखहि घेण्याला तयार झालें पाहिजे. सुख हें दुःखगर्भित असतें व दुःख हें सुखगर्भित असतें. तीं दोन्हीं एकमेकाला चिकटून असतात; तीं विभक्त करतां येणें शक्य नाहीं. या दोहींच्या अतीत असणें हाच खरा सुखाचा मार्ग होय. ज्याला सुखदुःखांमध्यें समत्व राखतां येतें तोच स्थितप्रज्ञ—मुक्त होय*आत्मानंदांत स्थिर व्हा, म्हणजे त्या तुमच्या आनंदाचा भंग करण्याचें सामर्थ्य जगांतील कोणत्याहि वस्तूला नाहीं. जो मुक्त झाला त्याच्यापुढें सर्व सृष्टि नमून

---

० स्तुति होतां आनंदला । तो निंदा होतां रडला ।
या दोहींमध्यें न सांपडला । तोचि धन्य ॥ दासबोध.
सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ॥ गीता, अ. २।३८.
* चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती ।
व्याघ्रही न खाती सर्प तया ॥ तुकाराम.
समत्वं योग उच्यते ॥ गीता, अ. २।४८.
दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधस्थितधीर्मुनिरुच्यते ॥
यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम्
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ गीता, अ. २।५६,५७.

असतें, सर्व चराचर त्याला नम्र होऊन साष्टांग प्रणिपात करतें. 'मी ब्रम्ह आहें' याचा अनुभव म्हणजेच मुक्तता. हें तत्त्व लोकांना आज रुचो, किंवा न रुचो, पण हा सत्य सिद्धान्त त्रिकालाबाधित आहे आणि प्रत्येक मनुष्याला आज ना उद्यां केव्हां तरी याचा अनुभव निःसंशय आलाच पाहिजे. हें तत्त्व आपल्या डोळ्यांपुढें ठेवणें, हा 'सोऽहम्' 'ॐ' या मंत्राचा जप करण्यांतील हेतु होय. जगाच्या कार्यकारणमालिकेंत गुरफटणें हा भयंकर अधःपात होय. हा जगाचा देखावा कां दिसतो, या प्रश्नाच्या गुंतागुंतींत पडणें म्हणजे अधोगतीच्या मार्गास लागणें आहे. लहान मूल कार्यकारणपरंपरेच्या अतीत असतें, प्रत्येक वस्तूंत त्याला आनंद दिसतो, व हें असें कां, असला प्रश्न त्याच्या मनाला शिवत नाहीं. व तें सर्वदा आनंदांत असतें, सुख भोगतें. ही बालवृत्ति आपल्याला प्राप्त झाली पाहिजे. 'अमुक असें कां,' या कार्यकारणजालांत न अडकतां परमात्म-भावनेच्या उच्चपदावर आपण आरूढ झालें पाहिजे. या जगाच्या पलीकडे चराचराचे साक्षी, आपण आहों. विश्वाचें हें रूप—देखावा हीं सुसंबद्ध आंदोलनें आहेत; मायेच्या चक्राचें वर खालीं असें हें भ्रमण आहे इतकेंच. कार्यकारणपरंपरेला ओलांडून तिच्या पलीकडे जाणें, हें आपलें ध्येय आहे; खालीं येणें हें नव्हे. ही स्थिति संपादन करण्यासाठीं आपल्याला एकसारखें झगडलें पाहिजे, अविरत प्रयत्न केले पाहिजेत. आपल्या ईश्वर स्वरूपांत राहा म्हणजे तुह्मी भवितव्यतेचे नियंते, चराचराचे शास्ते व्हाल—मुक्त—व्हाल.*

ॐ! ॐ!! ॐ!!!

* तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ गीता, अ. ८।२७.



# सोऽहम्

( ता. १० जून १९०३ रोजीं दिलेलें व्याख्यान )

—— : o : ——

## या मंत्राचें रहस्य



सोऽहम् हा मंत्र अत्यंत उपयुक्त असून त्याचा प्रत्येकाला परिचय झाला पाहिजे. इंग्रजी भाषेंत 'सो' या शब्दाचा अर्थ 'असा' आहे, पण संस्कृत भाषेंत त्याचा अर्थ 'तो' असा होतो. 'तो' या शब्दानें ईश्वर किंवा परमात्मा असा अर्थ घ्याव-याचा. हिंदुस्थानांत पत्नीनें पतीला नांवानें हांक मारण्याची चाल नाहीं. जगांत तिला एकच पुरुष दिसत असतो व तो म्हटला म्हणजे तिचा पति. पतिसंबंधानें बोलावयाचें असलें म्हणजे 'ते' या शब्दाचा ती उपयोग करते; जणूं काय तिच्या दृष्टीनें जगांत त्याच्यावांचून दुसरें कोणीहि नाहीं. आपला पति म्हणजे साक्षात् ईश्वर, अशी तिची भावना असते. याच न्यायानें वेन्दांती मनुष्य 'सो' या शब्दानें ईश्वर किंवा परमात्मा असा अर्थ घेतो. 'सद्वस्तु एकच आहे व ती माझा आत्मा' हा विचार सदोदित मनांत वागविला पाहिजे.

फारशी भाषेंत 'हम्' याचा अर्थ 'मी' असा आहे. 'सोऽहम्' म्हणजे 'मी तो आहें, ईश्वर मी आहें, परमात्मा म्हणतात तो मीच. माझ्या मुखानें ईश्वरच बोलतो, कारण, त्याच्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं.' 'सोऽहम्' 'सोऽहम्' यांतून 'स्' 'ह्' हीं अक्षरें काढून टाकलीं म्हणजे 'ॐ' हा शब्द तयार होतो. आपल्या श्वासोच्छ्वासाचा 'सोऽहम्' हा सहज ध्वनि आहे. व या शब्दाचें महत्त्व आपण नेहमीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. आपल्या श्वासो-च्छ्वासाकडे नीट बारकाईनें लक्ष द्या, व त्याची गति 'सोऽहम्' मंत्राला धरून चालेल, अशा रीतीनें अभ्यास करा. हा अभ्यास शारीरिक, मानसिक

व अध्यात्मिक, अशा तिन्ही तऱ्हेचा आहे. श्वासोच्छ्वासामध्यें दोन भाग आहेत. एक श्वास—वायु आंत घेणें आणि दुसरा उच्छ्वास—वायु बाहेर सोडणें. श्वास आंत घेतांना 'सो' व श्वास सोडतांना 'हम्' म्हटलें जातें. जिज्ञासूंना 'ॐ' ऐवजीं 'सोऽहम्' चा जप करणें जास्त सोईचें वाटतें. 'सोऽहम्' मध्यें 'ॐ' चा अंतर्भाव होतोच. हा जप आपण मोठ्यानें करीत नसतों. त्या वेळीं मनानें त्याचें मनन करावें, ध्यास करावा व श्वासोच्छ्वास नैसर्गिक रीतीनें चालूं द्यावा. हा जप म्हणजे आपले आपण मनावर करून घेतले जाणारे संस्कार असून हे संस्कार इंद्रियांनीं आपणावर आणलेली कृत्रिम मूर्च्छना ऊर्फ भ्रान्ति हिचें पटल दूर सारतात, आणि आपलें ईश्वरत्व आपणास परत मिळवून देतात. कारण, मी परमेश्वरच आहें.' 'ॐ' या शब्दाचा सूर्य हा एक दुसरा अर्थ आहे. 'मी तो सूर्य आहें, मी सर्वांना प्रकाशित करणारा आहें, मी सर्व देतों; पण कशाचीहि मला अपेक्षा नाहीं, मी कांहींहि घेत नाहीं.' कल्पना करा कीं, दुसरे लोक आपला मत्सर करीत आहेत, आपणांवर निंदेचा वर्षाव करीत आहेत व आपणांस पत्रें पाठवून टीकेचा भडिमार करीत आहेत. अशा स्थितींत आपण दुःखी कष्टी किंवा उद्विग्न होऊन आपल्या मनाला त्रास करून घ्यावा हें रास्त आहे काय ? नाहीं; तर असें असूनहि तुह्मीं आपल्या ईश्वरत्वभावनेंत अचल राहण्यास शिका, व आपल्या नुकसानीकरितां टपलेले जे इसम असतील त्यांची कींव करा व त्यांच्यावर प्रेम करीत राहा. त्यांच्यामध्यें आपणच आहों असें पाहा; व असें झालें ह्मणजे त्यांच्यासंबंधानें चांगलेच विचार तुमच्या मनांत आल्याशिवाय राहणार नाहींत. ० मीं सर्व सूर्यांचा सूर्य, प्रकाशाचाहि प्रकाश आहें, सर्व ऐश्वर्य, यश 'मीच आहें. मला त्रास देण्याला कोण समर्थ आहे ? सर्व मीच असल्यामुळें दुसऱ्याला इजा करणें म्हणजे मी स्वतःलाच इजा करण्यासारखें आहें.' दुसऱ्यांच्या क्षुद्र व खोट्या मतांचा आपणांवर परिणाम होऊं देऊं नका. आपल्या भाषणांत, विचारांत व कृतींत नेहमीं ईश्वरभाव राखा. ईश्वरभावनेंत स्थिर राहा. 'मी सूर्य आहें, सर्व विश्वाला प्रकाश देणारा आहें,' ही भावना दृढ करा.

---

० निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥ गीता.
कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥ तुकाराम.

## जुनें ठेवणें मीपणें आकळेना !

मनानें खंबीर राहण्यास शिका. खरें पाहिलें तर आपलीं सर्व संकटें, देशकालनिमित्तांनीं बद्ध असलेला आपला संकुचित मीपणा, अहंकार याच्या योगानें उत्पन्न होतात.* ही कल्पना आपल्याला दुर्बल करते, मृत्युमुखीं घालते व आत्मघाताच्या पातकांत टाकते. हा आपणास जडलेला रोग नाहींसा व्हावा असें आपल्याला वाटत असेल तर एकांतांत स्वस्थपणें बसून आपल्या स्थितीबद्दल खेद व पश्चात्ताप वाटूं द्या, व विचारपूर्वक या अहंकाररूपीं राक्षसाला अंतःकरणांतून हांकून द्या. आपलें हें शरीर जणूं कधीं उत्पन्नच झालेलें नाहीं; 'मी शरीर नव्हे तर मी परमात्मस्वरूपी आहें,' असा अभ्यास करा. आपण देशकालादिकांनीं बद्ध आहों, असें जोंपर्यंत आपण मानीत आहों, तोंपर्यंत दुसऱ्यांचे आपणासंबंधाचे सर्व असद्धेतु आणि कारस्थानें यांचा त्रास आपल्याला भोगणें प्राप्त आहे. ज्या शरीराला उद्देशून तुम्हीं बोलतां तें शरीर मृगजलवत् आहे.÷ मी परमात्मा—ईश्वर आहें, हें तुमच्या लक्ष्यांत आहे काय ? दुसऱ्यांनीं आपणाबद्दल उच्चारलेल्या खोट्या मतांकडे आपण जितकें लक्ष देतों त्याच्यापेक्षां जास्त लक्ष आपल्या परमात्मस्वरूपासंबंधानें पुरविलें पाहिजे. दुष्ट विचार व मोह यांना आपल्या समोर येऊं देऊं नका. आपण पवित्र आहोंत, अर्थात् आपल्यासमोर येण्याचा त्यांना काय हक्क आहे ? मी पवित्र, शुद्ध आहें अशी भावना करा. मग मी शरीर आहें हा अहंकाररूपी रोग राहणार कसा ? कोण-तीचि स्पृहा—कामना धरूं नका,१ कशालाहि भिऊं नका, आपण कर्तव्य करण्याला बांधले गेलों आहों, अशा कल्पनेनें आपलें कर्तव्य करूं नका. कर्तव्य कर्तव्य म्हणजे काय ? ही केवळ आपली कल्पनासृष्टि आहे; धनी या नात्यानें—एखाद्या राजाप्रमाणें आपल्या क्रिया करा. प्रत्येक गोष्ट करम-णूक म्हणून लीलेनें करा. आनंदानें, स्वतंत्रपणानें सर्व क्रिया चालूं द्या ०,

---

* अहंकारविमूढात्मा कर्ताहमितिमन्यते ॥ गीता, अ. ३।२७.

÷ अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ॥ गीता. अ. २।१८.

१ यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ गीता, अ. ६।१८.

० यथेच्छसि तथा कुरु ॥ गीता, अ. १८।६३.

## अध्यात्मिक व आधिभौतिक व्याधि.

व्याधि दोन तऱ्हेच्या असतात, अध्यात्मिक (आंतर) व्याधि व आधिभौतिक (बाह्य) व्याधि. यांना आसुरी व दैविक, राक्षसी व स्त्रीव्याधि असेंहि म्हणतां येईल. आपणांमध्यें असलेली विषयासक्ति, आपल्या कामना, वासना ह्या दैवी किंवा स्त्रीव्याधि होत, व दुसऱ्यांच्या कृत्यांमुळें किंवा त्यांच्या संसर्गामुळें ज्या आपत्ति आपणांला भोगाव्या लागतात त्या राक्षसी व्याधि होत. आतां व्याधींच्या तडाक्यांतून सुटावयाचें कसें, हें आपण पाहूं. शान्यांचें म्हणणें असें आहे कीं, आधिभौतिक, पौरुषी, राक्षसी, व्याधींबद्दल चिंता करण्याचें आपणाला मुळींच कारण नाहीं. आपणांमधील आंतरव्याधि म्हणजे आपल्याला दुर्बल करणाऱ्या ज्या वासना त्यांना आपल्या मनांतून फांटा मिळाला पाहिजे; मग बाह्य व्याधि दूर निघून गेल्याच म्हणून समजा. पण जगांतील लोक मोठी चूक करतात, ती ही कीं, ते आपल्या हातीं असलेल्या गोष्टींकडे लक्ष देत नाहींतः आपल्या वासनांनीं जो घोटाळा उत्पन्न केला आहे त्याच्याकडे काणा डोळा करतात. ते बाह्य गोष्टींची उठाठेव करूं लागतात, व आपल्या परिस्थितींशी झगडण्याचा प्रयत्न करतात. पण पायाच्यापूर्वीं कळसाला हात घालण्यासारखा हा यत्न आहे. दुसऱ्यांच्या संसर्गानें उत्पन्न होणाऱ्या व्याधि—पुरुषव्याधि—नाहींशा करण्याची लोक इच्छा करतात. परंतु वेदान्ताचें असें म्हणणें आहे कीं, आपल्या वासना हाच आपला दुबळेपणा होय, व त्यामुळें आपल्या बाकीच्या सर्व व्याधि उत्पन्न होतात. ही दुर्बलता हा आपणांमधील स्त्रीत्वाचा भाग असून तो बाह्य उपाधींचें आकर्षण करतो. ज्याप्रमाणें एखाद्या कुत्र्याच्या तोंडांत मांसाचा तुकडा असला म्हणजे त्याच्या लोभानें दुसरे अनेक कुत्रे त्याच्याभोंवतीं गोळा होतात त्याचप्रमाणें ही स्थिति आहे. अर्थात् ही दुर्बलता--ही स्त्रीउपाधि आपण दूर सारली, कीं पुरुषउपाधि तावडतोब नाहींशी होईल, हें खास. या स्त्री किंवा दैवी उपाधीचें स्वरूप जास्त स्पष्टपणें सांगणें जरूर आहे. समजा, एक मनुष्य आहे. आतां त्याचें आचरण जर अत्यंत पवित्र असेल, कोणत्याहि प्रकारच्या मोहजालापलीकडे तो गेला असेल व ईश्वरी साक्षात्काराच्या स्थितीप्रत तो पोंचला असेल, 'तूं माझ्यापासून चालता हो'

असें सैतानाला ह्मणण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं असेल तर 'राम' सांगतो कीं, या जगांतील कोणत्याहि मनुष्याच्या इच्छा कोणाच्याहि कुकल्पना, पाप किंवा मोह त्याला यत्किंचित् बाधा करूं शकणार नाहींत. जगांतील कोणतीहि शक्ति त्याला त्रास देऊं शकणार नाहीं—त्याला आपल्या उच्च स्थानावरून खालीं ओढूं शकणार नाहीं कारण, सर्व राक्षसी उपाधींना त्यानें स्वतःच वाटेला लावलें आहे. ज्या वेळीं आपणच आपल्याला दुर्बल करून घेतों आणि विषयसुखांच्या जाळ्यांत अडकवून घेतों तेव्हां स्थिति अशी होते कीं, आपल्या शत्रूचे दुष्ट विचार निरनिराळ्या मोहांच्या रूपानें आपल्यापुढें येतात, व आपल्याला खाऊन टाकतात. तुह्मांला जर पराशांति आणि आत्यंतिक सुख यांचा उपभोग घ्यावा असें वाटत असेल, व आपलें परमात्मस्वरूप अनुभूत करून घ्यावयाचें असेल तर आपणांमधील नीच मनोवृत्ति मेल्या पाहिजेत. हें मरण म्हणजेच खरें जीवित होय*. आतां व या ठिकाणींच आपलें ईश्वरत्व अनुभवास आणून घ्या. हिंदुस्थानांत ( जन्माला ) जाईतों तें लांबणीवर टाकूं नका. आपली मुक्तता करून घ्या, व तें काम स्थिरचित्तानें, धैर्यानें आणि दृढ निश्चयानें करण्याच्या उद्योगास लागा.




बाजूस दिलेल्या आकृतींत ग हा एक कप्पा असून त्यावरून एक रेशमाचा तयार केलेला दोर लोंबत आहे. क आणि ख हीं त्याचीं दोन टोंकें आहेत, व त्यांना वजनें बांधलीं आहेत. कल्पना करा कीं, क येथें दहा शेर व ख येथें सहा शेर अशीं वजनें आहेत. आतां ख येथें आणखी चार शेर वजन घातलें तर दोन्हीं बाजूंचीं वजनें सारखीं होऊन दोरी स्थिर राहील. आतां समजा कीं, ख येथील चार शेर वजन काढून घेतलें तर एकीकडे

*आपुलें मरण पाहिलें म्यां डोळा । तो जाहला सोहळा अनुपम्य ।
आनंदें दाटलीं तिन्हीं त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥ तुकाराम.
ह्याचि जन्में येणेंचि काळें । संसारीं होइजे निराळें ।
मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥ दासबोध.

दहा, व दुसरीकडे सहा शेर वजन अशी स्थिति होईल. दोन्ही बाजूंचीं वजनें विषम झाल्यामुळें ककडील दोरी खालीं येऊं लागेल व खकडील बाजू वर जाऊ लागेल. क्षणभरानें खच्या बाजूला पुनः चार शेर वजन टाका. आतां फिरून दोन्हीकडील वजनें सारखें झालीं. पण यामुळें दोरी॰ वर परिणाम काय होईल? पुष्कळ लोक याचें उत्तर असें देतील कीं, दोरीची गति बंद होईल, पण तसें नव्हे. दोरीची गति वर खालीं अशा रीतीनें चालूच राहील. ही गोष्ट प्रथमदर्शनीं पटत नाहीं, तर दोन्हीकडचीं वजनें सारखीं झालीं म्हणजे दोरी स्थिर राहील अशी कल्पना होते, व विश्वविद्यालयांत अध्यापकाचें काम करीत असतां हा मुद्दा राम विद्यार्थ्यांना समजावून सांगत होता त्यावेळींहि त्यांनीं असेंच उत्तर दिलें होतें. पण रामानें जेव्हां प्रत्यक्ष प्रयोग करून दाखविला तेव्हां त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडला. दोन्हीकडचीं वजनें जरी सारखीं केलीं तरी त्यामुळें आरंभीं दोरीला मिळालेली गति बंद पडत नाहीं. प्रथम क व ख या दोन्ही बाजूंकडे प्रत्येकीं दहा शेर वजन होतें तेव्हां दोरी स्थिर राहिली. पण दोहींकडच्या वजनांत विषमता उत्पन्न झाल्याबरोबर एकदां गति सुरू झाली म्हणजे पुनः जरी दोन्ही बाजू वजनानें सारख्या केल्या तरी गतींत खळ पडत नाहीं. आतां एकीकडे दहा व दुसरीकडे सहा अशीं वजनें एक क्षणाऐवजीं दोन क्षण आपण राहूं दिलीं व मागून दोन्ही बाजू समतोल वजनाच्या केल्या, तरीहि दोरी वर खालीं होत राहील. दोन क्षणांच्या ठिकाणीं तीन क्षण वजनें विषम राहूं दिलीं तरीहि दोरी फिरत राहील. आतां दोन्ही तिन्ही ठिकाणीं एक फरक दिसून येईल, तो असा कीं, जितके क्षण वजनाची विषमता आपण राखूं त्या मानानें दोरीची गति जास्त वाढत जाईल. एका बाजूकडे दहा व दुसरीकडे सहा अशी विषमता एक क्षण राहूं दिली तर दोन्हीकडचीं वजनें समतोल झाल्यावर दर क्षणास चार विती अशी गति वजनांना उत्पन्न होईल. तीच वजनांची विषमता दोन क्षण राहूं दिली तर दर क्षणास आठ विती इतकी गति दोरीला आलेली दिसेल. अशा रीतीनें वजनांची विषमता जितकी जास्त वेळ ठेवावी तशी तशी दर क्षणास चार विती या मानानें दोरीला गति येते, असें आपल्याला दिसून येईल. ही जी गति वाढतांना दिसते तिला गतिवृद्धि असें म्हणतात. दुसरीहि एक गोष्ट वरील उदाहरणावरून दिसते

ती अशी कीं, दोन्ही बाजूंचीं वजनें समतोल केलीं म्हणजे कोणत्याहि एका बाजूकडे जास्त आकर्षण आहे, असें म्हणतां येत नाहीं; व अशी स्थिति असल्यामुळें पूर्वीची गति किंवा स्थिरता यांत फरक पडूं शकत नाहीं. दोन्ही बाजूंचीं वजनें दहा दहा करण्यापूर्वी दोरी वर खालीं अशी फिरत असली तर तिला मिळालेली गति, मागाहून वजनें सारखीं केलीं तरी, तशीच व तितकीच कायम राहाते, असा हा नियम आहे.

## प्रारब्ध आणि क्रियमाण.

आतां हें उदाहरण आत्मसाक्षात्कार झालेल्या मनुष्याला कसें लागू पडतें, हें आपण पाहूं. आत्मसाक्षात्कार ह्मणजे फक्त समतोलपणा—समत्व—आपणांमधील विषमत्व काढून टाकून सर्वत्र समदृष्टि राखणें. अशी स्थिति झाली म्हणजे मग बाह्य उपाधींवर अवलंबून राहण्याचें मनुष्याला कारण राहात नाहीं. निसर्गाचे वारे, वादळें अर्थात् संकटें आणि विपत्ति यांच्या तडाक्यांतून तो अलिप्त राहतो. आत्मानुभव हा बाह्य उपाधींपासून—विकारांपासून जीवाला मुक्त करतो. आपणाला स्वाधीन राखण्याला तो कारणीभूत होतो. आत्मज्ञान प्राप्त झालें म्हणजे ज्याला आपण यंत्रशास्त्रांत गतिवृद्धि ह्मणतों वेदान्तांत ज्याला क्रियमाण म्हणतात—ती बंद होते; पण पूर्वी मिळालेली गति म्हणजे यंत्रशास्त्रांतील स्थितिसातत्य, व त्यालाच वेदांतांत पूर्व अध्यास—प्रारब्ध—असें म्हणतात. ही गति कायम राहाते व हें प्रारब्ध मात्र भोगल्यावांचून गत्यंतर नाहीं.* आतां या ठिकाणीं एक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे, ती ही कीं, कांहीं ज्ञानी असे असतात कीं, त्यांच्या ठिकाणीं ही पूर्वगति हा पूर्वाध्यास (प्रारब्ध) फारच थोडा असतो, व त्याचा परिणाम असा होतो कीं, त्यांच्या हातून मोठालीं कृत्यें पुढें होऊं शकत नाहींत. पण कांहीं ज्ञान्यांमध्यें ही गति—हें प्रारब्ध—फारच दांडगें असतें व त्यांच्या हातून जगाला आश्चर्य वाटण्यासारखीं अद्भुत कृत्यें होतात. हे ज्ञानी निःसंशय मुक्त असतात, पण त्यांच्या शरीरांची गति सारखी कायम असते. त्यांच्याकडून अलौकिक आणि उदात्त कृत्यें होत

---

* तदधिगमं उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ।
प्रारब्ध कर्मणां भोगादेव क्षयः ॥ ब्रह्मसूत्र.
स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥ गीता, १८।६०.

राहतात. अशांचें तें कर्म म्हणजेहि ज्ञानच होय. "आपलीं सुखें कर्तव्याच्या पोषाखांत आपल्यापुढें येत असतात" असें पंडित ॲन्थनी याचें एक वाक्य आहे. आपलें परमात्मस्वरूप ओळखा ह्मणजे त्यांत सर्व कांहीं आलें.

ॐ! ॐ!! ॐ!!!

# मूर्च्छनाशास्त्र आणि वेदान्त

## प्रवर्तन व वहनपद्धति



अमेरिकेंतील तत्ववेत्ता इमर्सन हा ह्मणतो कीं, "एखाद्याला चोर ह्मणा, म्हणजे तो चोरी करायला लागलाच ह्मणून समजा." याचा अर्थ हा कीं, मनुष्याच्या मनावर ज्या तऱ्हेचे संस्कार उत्पन्न केले जातात, त्यांस अनुसरून त्याची कृति होते.

मूर्च्छनाशास्त्रांतील ह्या विधानांत सत्याचा कांहीं अंश आहे, हें कबूल; पण हा नियम सर्व ठिकाणीं सारखा लागू पडत नाहीं. तर कांहीं ठिकाणीं याच्या अगदीं उलट स्थिति घडलेली दृष्टीस पडते. जे लोक असें निश्चयानें प्रतिपादन करतात कीं, एखाद्याला मूर्च्छित करून त्याच्यावर संस्कारांचा परिणाम घडलाच पाहिजे, त्यांना सत्याचा फक्त अर्धा भाग कळला, असेंच ह्मटलें पाहिजे. वेदान्तशास्त्राचें म्हणणें असें कीं, संस्कारांचा परिणाम विद्युच्छक्तीच्या परिणामासारखा दुहेरी होतो. या दोन पद्धति म्हणजे एक प्रवर्तन आणि दुसरी वहनपद्धति. जेव्हां अशी स्थिति होते कीं, मूर्च्छनाप्रयोगांतील सूचना किंवा संस्कार प्रयोज्य मनुष्यावर प्रत्यक्ष जाऊन पोहोंचतात. तेव्हां त्याचा साक्षात् आणि सजातीय परिणाम घडून येतो. अशा स्थितींत मूर्च्छनाप्रयोग प्रवर्तनपद्धतीनें झाला असें ह्मटलें जातें. परंतु ज्या ठिकाणीं प्रयोगांमधील सूचना ज्याच्यावर प्रयोग करा-

वयाचा त्याला प्रत्यक्ष पोहोचूं शकत नाहींत, म्हणजे त्याची मनःस्थिति प्रयोग करणाराला प्रतिकूल किंवा विरोधी असते, व यामुळें प्रयोगकर्त्याच्या सूचना प्रयोग केल्या जाणाऱ्या मनुष्याच्या कारणशरीरावर यत्किंतुहि परिणाम घडवूं शकत नाहींत, अशा ठिकाणीं प्रयोजकाचा हेतु विफल होऊन त्याला पाहिजे त्याच्याहून विपरीत परिणाम प्रयोज्यावर झालेला दृग्गोचर होतो. याला मूर्च्छनाप्रयोगांतील वहनपद्धति असें नांव दिलें जातें.

## स्थूल, सूक्ष्म व कारणशरीर.

कारणशरीर हें मनुष्याच्या असंवेद्य आणि गूढ अशा संस्कारांचा व शक्तीचा एक खजिनाच आहे, असें ह्मणण्याला प्रत्यवाय नाहीं. या खाजिन्यांत अव्यक्तस्वरूपानें जे गुप्त संस्कार असतील त्यांवर मनुष्यांचीं कर्मे, त्याच्या हालचाली, त्याची वर्तनपद्धति आणि भोंवतालची परिस्थिति वगैरे सर्व गोष्टी अवलंबून असतात. व ते संस्कार केव्हां तरी प्रत्यक्ष कृतींत उतरले पाहिजेत; असा नियम आहे. कारणशरीर हें मनुष्याचें खरें हृद्गत आहे; खरा केंद्र तोच, मनुष्याच्या हृदयांतील सिंहासनावर विराजमान झालेला राजा तोच, त्यालाच द्रष्टा—अहंकारयुक्त मन ह्मणतात.

स्थूल, सूक्ष्म व कारण अशीं तीन शरीरें दाखविण्यासाठीं पुढील आकृति दिली आहे.




क=स्थूल शरीर.

ख=सूक्ष्म किंवा लिंगशरीर.

ग=कारणशरीर.

वरील आकृति सर्पिल आहे. त्यांतील क, ख व ग हीं अनुक्रमें स्थूल, सूक्ष्म व कारणशरीरें होत. स्थूल शरीराकडून कोणतीहि क्रिया झाली म्हणजे त्याबरोबर त्या क्रियेचें रूपांतर विचारांत होऊन मनोभूमिकेमध्यें ते

संस्कार कांहीं कालपर्यंत राहतात. वरील ख अक्षरानें ही मनोभूमिका--सूक्ष्म शरीर--दर्शित केली आहे. पुढें तें संस्कार कारणशरीरांत प्रविष्ट होतात. वरील आकृतींत केंद्रस्थानीं असलेला जो ग बिंदू त्यानें कारण-शरीराची कल्पना दर्शविली आहे. आपल्या मनःसरोवरावर ज्या विचा-रांच्या लाटा नैसर्गिक रीत्या उठतात आणि ज्या आधिभौतिक जगाशीं कांहीं संबंध न येतां उत्पन्न होतात, त्या कारणशरीरांत पूर्वापार संचित झालेल्या गूढ संस्कारांचा परिणाम होत. अशा रीतीनें विचार केला तर असें दिसतें कीं, क, ख व ग या अक्षरांनीं चिन्हित केलेलीं जीं तीन शरीरें त्यांचा एक-मेकांशीं अगदीं निकट संबंध आहे. हवा, पाणी व बाष्प अथवा बर्फ, पर्वतांतून वाहणारा झरा व खुल्या मैदानांत वाहणारी नदी यांच्यांमध्यें पहिल्याचें दुसरें जास्त व्यक्तस्वरूप व दुसऱ्याचें तिसरें त्याहून स्पष्टतर झालेलें स्वरूप असतें, असाच परंपरेचा संबंध कारण. सूक्ष्म व स्थूल या शरीरत्रयीचा आहे.

## शरीरत्रयाची वेदान्तदृष्ट्या मांडणी.

कल्पना करा कीं, एखादा आजारी मनुष्य रस्त्यांत कुंथत पडलेला आहे, व तें आपल्या नजरेस पडलें. एकदम आपल्या मनांत त्याला मदत करावी, अशी सहजस्फूर्ति होते व त्याप्रमाणें त्याच्या औषधपाण्याची आपण व्यवस्था करूं लागतों. आपण हें मोठें परोपकाराचें कृत्य करीत आहों, असा विचार मनांत न येतां केवळ त्या रोग्याचें दुःख अंशतः तरी हलकें व्हावें, अशा निरपेक्षबुद्धीनें आपण झटत आहों. अशा स्थितींत झटत असतां आपण थकून जातों. पण त्या वेळीं त्याचें आपल्याला कांहीं भान रहात नाहीं. पुढें कांहीं वेळानें त्या मनुष्याला शक्य ती मदत केल्यानंतर विश्रांति घेण्यासाठीं आपण स्वस्थ बसतों. आतां आपल्याला सहज कळून येतें कीं, तितका वेळपर्यंत आपल्या शरीराच्या ज्या हालचाली झाल्या व त्या चालतांना जी शक्ति आपण उपयोगांत आणली तिचें रूपांतर होऊन विचारांच्या रूपानें ते संस्कार वरच्या म्हणजे मनोभूमिकेंत जाऊन बसले. आतां हें कशावरून, असा प्रश्न सहज उद्भवतो. यांचें उत्तर हें कीं, वर सांगितल्याप्रमाणें स्वस्थ बसलें म्हणजे सत्कृत्य केल्याचें जें समाधान आपल्या मनाला वाटतें, आपण मोठा पुरुषार्थ केला अशा विचारानें

आनंदाच्या ज्यां लहरी मनांत उठतात, त्यावरून हें सिद्ध होतें कीं, आपल्या शक्तीचा दुरुपयोग झाला नसून तितक्या शक्तीचा आपण संचय केला, असा आपल्या कृतीचा अर्थ आहे. पुढें अशा विचारसुखांत थोडा काळ गेल्यावर त्या लाटाहि नाहींशा झाल्या, असा आपल्याला अनुभव येतो. आतां ती शक्ति दिसेनाशी झाली म्हणजे कायमची नाश पावली कीं काय? तर तसें नव्हे. या सृष्टींतील कोणत्याहि वस्तूचा कायमचा नाश होणें शक्य नाहीं. वेदान्तशास्त्र म्हणतें कीं, ती शक्ति अदृश्य झाली खरी, पण तिचा विनाश झाला नसून कारणशरीरांत ती शक्ति सांठविली गेल्यामुळें तिचें ज्ञान आपल्याला होत नाहीं. आपल्या संवेदन-शक्तीच्या पलीकडे ते संस्कार गेले, व स्वप्नरूपानें मनोभूमिकेच्या खालच्या पायरीवर ते संस्कार दृग्गोचर होतील, किंवा आपल्या अंतःकरणाचे धर्म, आपली प्रवृत्ति, आपले, कल, भाव किंवा श्रद्धा बनविण्याला ते संस्कार कारणीभूत होतील. आणली अंतःकरणप्रवृत्ति, आपल्या भावना कशा बनत जातात, याची वेदान्तानें अशा प्रकारची सयुक्तिक मांडणी केली आहे.

## कारणशरीरांतील संस्कारांचें महत्व.

प्रत्यक्ष प्रयोगानें ही गोष्ट अशी सिद्ध होतेः—एखादा मनुष्य जागा असतां किंवा त्याला मूर्च्छनाशास्त्रांतील प्रयोगानें भारून टाकलें असतां त्याच्या कारणशरीरावर परोक्ष किंवा अपरोक्ष तऱ्हेनें संस्कार उत्पन्न करा. या संस्कारानुरूप ठराविक कालांत तो चांगला कृति करूं लागेल हें खास. तसेंच एखाद्याला मूर्च्छित करून त्याच्यावर असा प्रयोग केला कीं, अमुक एक गोष्ट त्यानें जागें झाल्यानंतर कांहीं वेळानें करावी; तर तदनुरूप जागें झा-ल्यावर त्या मनुष्याची प्रवृत्ति ती गोष्ट करण्याकडे होईल. आतां सदर कृत्य जसें कारणशरीरावर केलेल्या संस्काराचा किंवा सूचनेचा परिणाम आहे, त्याच न्यायानें वेदान्त सांगतो कीं, मनुष्य जीं जीं कर्में करतो त्यांचे संस्कार पूर्वी केव्हां तरी त्याच्या कारणशरीरावर होऊन राहिले असले पाहिजेत, व मनुष्याचीं कृत्यें हें त्या संस्कारांचें व्यक्तस्वरूप होय. मग असले संस्कार कारणशरीरावर होण्यास ज्या सूचना ऊर्फ संस्कार अगोदर व्हावे लागतात त्या आपल्या इंद्रियांनीं, बुद्धीच्या विपरीत भावनांनीं, किंवा

बाह्य जगांतील कोणत्याहि वस्तूंनीं उत्पन्न केलेल्या असोत. वेदान्तमताप्रमाणें हें जग असली मूर्च्छना किंवा भ्रम उत्पन्न करणाऱ्या संस्कारांनीं–सूचनांनीं भरलेलें आहे. तस्मात् आरोग्यासंबंधाच्या कल्पनांचे संस्कार कारणशरीरांत भरले गेले असले तर आपलें स्थूल शरीर उत्तम आरोग्यसंपन्न झालेंच पाहिजे. कारणशरीरांत ईश्वरत्वाचे विचार ओतले गेले असले तर मनुष्य अवतारी पुरुष–जगदुद्धारक झाला पाहिजे. दुर्बलता आणि गुलामगिरी यांच्या सूचनांचें प्रतिबिंब त्या शरीरांत उमटलें गेलें तर आपलें स्थूल शरीरहि अशक्त व गुलामगिरीला योग्य बनलेंच म्हणून समजावें. एकंदरींत तात्पर्य हेंच कीं, मनुष्याच्या संस्कारांचें रसायन जें बनलें जातें तें त्याचें त्यानें आपण होऊन बनविलें आहे. मनुष्याच्या सर्व परिस्थितीचें बीज त्याच्या कारणशरीरावरील संस्कारांत असून त्यावरच मनुष्याची परिस्थिति सर्वस्वी अवलंबून असते.

## जगाचा आभास कसा नाहींसा होईल ?

झोंपेंत चालत जाण्याची कांहीं लोकांना संवय असते. अशा तऱ्हेच्या किंवा मूर्च्छनाप्रयोगाप्रमाणें गुंगींत चालत जाणाऱ्या मनुष्याला कित्येक वेळां सरोवराचा भास होतो, पण इतरांना तसा भास होत नाहीं. ज्या ठिकाणीं अशा भ्रान्त स्थितींतील मनुष्याला एखादा तलाव दिसतो, त्या ठिकाणीं खरोखर तसा कांहीं प्रकार इतरांना दिसत नाहीं. तात्पर्य इतरांच्या दृष्टीला कधीं न दिसणाऱ्या गोष्टी अशा स्थितीमधील मनुष्याला दिसतात. अशा तऱ्हेचे जे सर्व प्रकार भ्रान्त मनुष्याला दिसतात ते भास त्याचे त्यानेंच उत्पन्न केलेले असतात. वेदान्ताची कल्पना सुद्धां अशीच आहे कीं, आपणा सर्वांना जगाचा जो आभास दिसतो, तोहि अशाच भासल्याचा असूनहि भ्रान्ति आत्म्याच्या सत्तेंत उत्पन्न झाली आहे; व त्याच्या आधारामुळें जगाचा हा आभास टिकला आहे. आतां या दोन्ही अवस्थांमध्यें–दोन जातीच्या भ्रान्तीमध्यें–जर कांहीं फरक असला तर तो एवढाच कीं, झोपेंत चालणाऱ्या किंवा मूर्च्छना स्थितींत असणाऱ्या मनुष्याची ती आभासस्थिति फार अल्पकाळ टिकते, व आपली मनुष्यमात्राची ही जगरूप आभासाची स्थिति पुष्कळ काळ टिकते. एखाद्या मनुष्याला मूर्च्छा आणून त्याची गुंगी उलट प्रयोग करून काढून टाकण्यास विसरलें तर

जी स्थिति होईल तीच आपली सर्वांची स्थिति आहे, असें म्हटलें तरी चालेल. या जगांतील आपणां सर्व मनुष्यांवर एका चमत्कारिक भ्रमाचें पटल किंवा आवरण पसरलें आहे. आणि ईश्वरी साक्षात्कार झालेला—या भ्रान्तीच्या अवस्थेला ओलांडून पलीकडे गेलेला—असा एखादा महात्मा ज्ञानी आपणांला भेटून तो आपली गुंगी दूर करून खऱ्या जागृतीच्या स्थितींत आपल्याला आणीपर्यंत ही भ्रान्ति अशीच राहणार. पण एकदा का आपण जागे झालों कीं, हें अभ्रपटल दूर झालेंच म्हणून समजा. आपल्या भोंवतीं नामरूपात्मक दृश्य विश्वाचा हा जो देखावा पसरलेला दिसतो त्याच्या मुळाशीं—त्याला आधारभूत—जें तत्व आहे तें सत्तत्व असलेंच पाहिजे व त्यावर जो आभास दृग्गोचर होत आहे तो केवळ मूर्च्छनेचा—भ्रान्तीचा—प्रकार होय. आतां कारणशरीराच्या पोटांत विशिष्ट-गुणयुक्त असें जें तत्त्व (कूटस्थ चैतन्य) * व्यापून राहिलें आहे, तें जागृति, स्वप्न, सुषुप्ति या अवस्थात्रयामध्यें अबाधित—कायम असून तीच चित्कला संवित् ऊर्फ सद्वस्तु होय, व तद्व्यतिरिक्त सर्व भ्रम असें म्हणणें प्राप्त होतें. व आत्मसाक्षात्कार याचा अर्थ ही भ्रान्ति—ही मूर्च्छना—नाहींशी होऊन हा सर्व नामरूपात्मक पसारा सत्तत्त्वांत बुडून जाणें—नामशेष होणें—असा आहे. ही जी मूर्च्छनारूपी सुषुप्ति आपल्यावर पगडा बसवूं शकली, नामरूपात्मक जग मायिक असतां तें खरें आहे, अशी आपली भावना झाली, याचें कारण लहानपणापासून आईबापांनीं आपणावर केलेले संस्कार किंवा सूचना व आपल्या इंद्रियांनीं उत्पन्न केलेला भ्रम हें आहे, अर्थात् याच्याविरुद्ध सूचना किंवा संस्कार यांच्यामुळें ही आमची गुंगीची—मूर्च्छेची स्थिति बदलेल, यांत शंका नाहीं.

## आत्मानुभव हा एकच उपाय !

आतां यावर असा प्रश्न ओघानेंच येतो कीं, आत्म्यावर ही भ्रान्ति मुळीं आरंभीं उत्पन्नच कां झाली ? याचें उत्तर हेंच आहे कीं, अशी स्थिति कशी व कां उत्पन्न झाली, अशा प्रकारचे सर्व प्रश्न हे त्या मूर्च्छनेंतील होत. आत्म्याच्या अज्ञानामुळेंच हे प्रश्न उद्भवले आहेत. असला प्रश्न विचारणें म्हणजे मायेच्या कार्यानें तिच्या कारणावर—सत्तत्त्वावर ताबा चाल-

* कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ गीता, अ. १५।१६.

विण्याची आशा करणें, बापाच्या पूर्वीं मुलाच्या अस्तित्वाची कल्पना मानणें किंवा घोड्याच्या पुढें गाडी जोडणें, यांच्यासारखा आहे ! असले ' कां ' व ' कसें ' हे प्रश्न विचारणें, हा प्रवर्तकमूर्च्छनेच्या—भ्रान्तीच्या नाटकापैकींच एक प्रवेश होय. भ्रान्ति संपल्यानंतर असले वेडगळ प्रश्न संभवणार नाहींत. तत्त्वतः आत्म्याच्या दृष्टीनें असल्या कोणत्याहि प्रश्नांना वाव नाहीं. आत्मा—सद्वस्तु—आहे तशी नित्य, सनातन आहे. तिच्यांत वस्तुतः कधीं विकार संभवतच नाहीं. जगांतील सर्व कार्यकारण—परंपरा ही एखाद्या कागदाच्या तुकड्यावर काढलेल्या सर्पिलाकृतीप्रमाणें आहे. तिला अंत असा मुळींच नाहीं. परंतु ज्याप्रमाणें तें सर्पिल कागदाच्या आधारावर अवलंबून आहे—त्याचे सर्व वेढे कागदाला सोडून नाहींत, त्याचप्रमाणें सद्वस्तु—ब्रम्ह—हें जगांतील सर्व कार्यकारणपरंपरेचें मूळ अधिष्ठान आहे; तें या परंपरेच्या बाहेर आहे आणि " आत्म्यावर अनात्म विश्वाचा भास कां व कसा होतो ? " हा प्रश्नच करणें बरोबर ठरत नाहीं, याचें कारण हेंच आहे. कागद हा सर्पिलाकृतीचें हें टोंक आहे कीं तें टोंक आहे, हें म्हणणें जसें असमंजसपणाचें आहे—कारण; तो त्या आकृतीला आधारभूत आहे, तसेंच ब्रम्हावर भास कसे व कां होतात, हा प्रश्न विचारणें वेडगळपणाचें द्योतक आहे. म्हणून राम सर्व जगाला हुकूम करीत आहे कीं, आपण या कार्यकारणपरंपरेच्या शृंखलेच्या, किंवा कागदावरील सर्पाच्या वेटाळ्यांत गुरफटून गेलों आहों, बद्ध झालों आहों, असल्या भ्रमांत पडूं नका. आपल्या आत्म्याचें खरें स्वरूप ओळखा, व या सर्पाचे आपण धनी, त्यावर सत्ता चालविणारे त्याचे नियंते आहों, हा मंत्र सदोदित जपा म्हणजे जगांतील कार्यकारणपरंपरेच्या पलीकडे तुम्हीं गेलांच म्हणून समजा. हें सत्य आहे, हें निश्चित आहे.



# आरण्यक संवाद

## लोभांत गुंतूं नको

—:०:—



एक मनुष्य आपल्या स्त्रीसह एका लहानशा झोंपडींत आपला काल मोठ्या आनंदानें कंठीत असे. त्याच्या घरीं अठरा विश्वे दारिद्य नांदत होतें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत काबाडकष्ट करूनाहि मीठभाकर मिळण्याला त्याला पंचाईत पडे. केवळ निढळाच्या घामानें जें अल्पस्वल्प मिळेल त्यावर उदरनिर्वाह करावा एवढेंच तो आपलें इतिकर्तव्य समजे. ऐहिक ऐश्वर्य संपादन करण्याची महत्वाकांक्षा, सुखोपभोगलालसा, आपणांहून वरिष्ठ स्थितींत नांदणाऱ्या लोकांबद्दल मत्सर, द्वेष वगैरे दुष्ट विकारांचा वाराहि त्याच्या निर्मल अंतःकरणाला कधीं शिवला नाहीं. या मनुष्याच्या शेजारीं एक श्रीमान् गृहस्थ राहात असे. तो द्रव्यार्जन आणि द्रव्यरक्षण यांच्या चिंतेंत नेहमीं चूर असल्यामुळें सुखाचे मुखहि त्याच्या दृष्टीस पडत नसे. एके दिवशीं एक संन्यासी त्या ठिकाणीं आला. त्या गरीब मनुष्याची आणि त्या श्रीमंत मनुष्याची अशी दोघांची स्थिति पाहून तो श्रीमान् गृहस्थाला म्हणाला कीं, ' तुझ्या दुःखाचें आणि चिंतेचें कारण तुझी संपत्तिच होय ! " असें म्हणून त्या गरीब मनुष्याकडे बोट करून तो बोलला, ' पहा, तुझ्या त्या शेजाऱ्याकडे पाहा. त्याच्यापाशीं जमिनजुमला, मालमत्ता वगैरे कांहींएक नसून तो किती तरी सुखी आहे ! त्याच्या चेहऱ्यावर आनंदाचा तजेला कसा झळकत आहे आणि त्याचे स्नायू आणि हात कसे घट्टेकट्टे आणि मजबूत आहेत; तो आपला काल मोठ्या सुखानें, आनंदानें, निष्काळजीपणानें एखाद्या पक्ष्याप्रमाणें, आनंदाच्या लकेऱ्या मारीत घालवित आहे तें पहा ! ' आपल्या गरीब शेजाऱ्याचें सुख त्या श्रीमान् गृहस्थाच्या स्वप्नांतहि कधीं येत नसे. तरी त्या संन्याशाचें वरील भाषण त्या श्रीमान् मनु-

ष्याला पटलें आणि त्याचा अनुभव घेऊन पाहाण्याविषयीं तो अत्यंत उत्सुक झाला. संन्याशाच्या सांगण्यावरून त्या श्रीमंत मनुष्यानें आपल्या शेजाऱ्याच्या न कळत त्याच्या झोंपडींत नव्याण्णव रुपयांची एक थैली टाकली. दुसऱ्या दिवशीं रात्रीं त्या गरीब मनुष्याच्या झोंपडींत रोजच्याप्रमाणें विस्तव पेटलेला नव्हता. नित्य नियमाप्रमाणें अन्न न शिजवितां उपास करून त्या स्त्रीपुरुषांनीं ती रात्र घालविली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो संन्यासी श्रीमान् गृहस्थाला आपल्या बरोबर घेऊन त्या गरीब मनुष्याच्या झोंपडींत आला आणि आदल्या दिवशीं त्याच्या घरांत दिवा न दिसण्याचें कारण काय, असा प्रश्न संन्याशानें त्या गरीब मनुष्याला केला. संन्याशासमोर खोटें बोलण्याचें धाडस त्याला न झाल्यामुळें झालेली खरी हकीकत त्यानें संन्याशाला निवेदन केली. तो म्हणाला, " माझा नेहमींचा नियम असा असतो कीं, रोज मजुरी करून जे आठ बारा आण्यांचे पैसे मला मिळतात त्यांतून भाजी, आटा वगैरे जिन्नस मी विकत घेतों आणि त्यावर कुटुंबाची गुजराण करतों. पण रोजचा क्रम काल बदलला. गेल्या रात्रीं नव्याण्णव रुपयांची थैली अचानक मला मिळाली, व ती पाहतांच मनांत कल्पना आली कीं, या पिशवींत एक रुपयाची भर टाकली म्हणजे बरोबर शंभर रुपये होतील. हा एक रुपया आतां कसा शिल्लक टाकावा, या गोष्टीचा विचार करतां करतां माझ्या मनानें असें घेतलें कीं, एक दिवसाआड उपास करण्याचा क्रम सुरू केला तर कांहीं दिवसांनीं एक रुपयाची भर होईल. या उद्देशानें काल रात्रीं अन्न शिजविण्याचा बेत आम्हीं रहित केला ! " श्रीमान् म्हणविणारे मनुष्य कंजूषवृत्तीच्या मार्गांत हळूहळू पावलें टाकीत जातात, त्याचें वरील गोष्ट म्हणजे उत्तम निदर्शक होय. जसजशी त्यांची पैदास वाढूं लागते तसतसें त्यांच्या दारिद्र्याचें प्रमाणहि उत्तरोत्तर वाढीस लागतें ! नव्याण्णव रुपये जमले म्हणजे शंभर कसे जमतील, नऊशें नव्याण्णव झाले म्हणजे हजार कसे होतील, नऊहजार नऊशें नव्याण्णव झाले म्हणजे दहा हजार कसे होतील, हा द्रव्यचिंतेचा हृद्रोग त्यांच्या अंतःकरणाच्या उदारपणाला खग्रास ग्रहण लावतो ! ' तृष्णावधिं को गतः ' असें जें भर्तृहरीनें म्हटलें आहे, तें अक्षरशः खरें आहे.



मुसलमानी अंमलाच्या दिवसांत एका वेळीं एक काजी त्या काळच्या बादशहाच्या भेटीस गेला. आपण मोठे धार्मिक आहों असें काजी म्हणवीत असल्यामुळें बादशहानें मोठ्या थाटानें त्याचा आदरसत्कार केला; पण त्याच्या मनांत काजीच्या अंगांत खरोखर योग्यता किती आहे, याची परीक्षा पाहण्याचें आलें. बादशहा म्हणजे मोठा विद्वान् होता, अशांतला अर्थ नव्हता. परंतु जे प्रश्न बादशहानें काजीला विचारण्याचें ठरविलें होतें, ते त्या काजीची जागा आपण पटकवावी, या हेतूनें एका मनुष्यानें बादशहाला सुचविलें होते; व ते प्रश्न काजीपुढें मांडून त्याला अडविण्याचें व फजीत करण्याचें बादशहानें योजलें. बादशहापुढें येतांच काजीला त्यानें विचारलें, "ईश्वराचें तोंड कोणत्या दिशेला असतें, तो बसतो कोठें, खातो काय आणि करतो काय ?" हे प्रश्न विचारून बादशहानें काजीला सांगितलें कीं, या प्रश्नाचीं आपण समाधानकारक उत्तरें द्याल तर मी आपणांस बढती करीन. काजीनें तेव्हांच ताडलें कीं, या प्रश्नांचीं उडवाउडवीचीं उत्तरें देऊन काम भागणार नाहीं, यांत कांहीं तरी गूढार्थ खास असला पाहिजे. काजी मोठा चतुर व समयज्ञ होता आणि बादशहा स्तुतिप्रिय आहे हें जाणून त्यानें बादशहाचीं स्तुतिस्तोत्रें गाऊन त्याला खूष केला व शेवटीं त्यानें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यासाठीं एक आठवड्याची मुदत मांगून घेऊन ती वेळ त्यानें कशीवशी मारून नेली !

घरीं गेल्यावर काजीनें आपली शिकस्त केली, परंतु बादशहानें विचारलेल्या प्रश्नांचीं बिनतोड उत्तरें त्याला सुचत ना. त्यानें पुष्कळ विचार करून पाहिला. विचार करतां करतां आठवड्याची मुदत संपली पण त्याचा विचार कांहीं संपला नाहीं ! बादशहाचें समाधान कसें करावें, हा हृद्रोग त्याला लागला. ठरलेल्या मुदतीचा शेवटचा दिवस उजाडला, तेव्हां काजीनें विचार केला कीं, एवीतेवीं मरणार, तर आजचें मरण उद्यांवर तरी ढकलावें; मग जें होणें असेल तें होईल. असा विचार करून त्यानें आजारी असल्याचा बहाणा केला. इतक्यांत काजीचा नोकर त्याच्याजवळ येऊन आपल्या चिंतेचें कारण काय, असा त्यानें काजीस प्रश्न केला. काजी म्हणाला, 'माझ्याबद्दल चौकशी करून तूं आपल्याला व्यर्थ त्रास कां करून घेतोस ? माझें मरण अगदीं जवळ येऊन ठेपलें आहे;

आणि तें कशानेंहि टळणें शक्य नाहीं !' नोकर म्हणाला, 'तें कसेंहि असो, आपल्या दुःखाचें बीज मला सांगाच. आपल्याला दुःख होण्यापेक्षां मी मरण्याला तयार आहें !' काजीनें त्याचा फारच आग्रह आहे असें पाहून झालेला सर्व वृत्तांत त्याला सांगितला. काजीचा हा नोकर धंद्याच्या दृष्टीनें अगदीं हलक्या दर्जाचा मनुष्य होता. कारण, चुना तयार करण्याचें काम करून तो आपला उदरनिर्वाह करीत असे. पण योग्यतेनें तो कमी नव्हता. तो काजीचा शिष्य असून मोठा पंडित होता. बादशहाच्या प्रश्नांचीं उत्तरें त्याच्या डोक्यांत आलीं, व त्यानें काजीस सांगितलें कीं, 'बादशहापुढें जाऊन आपल्यासाठीं त्याच्या प्रश्नांचीं सम्यक् उत्तरें देण्यास मी तयार आहें, व तसा आपण मला लेखी हुकूम द्या. बादशहाचें समाधान जर मला करतां आलें नाहीं तर आपल्या ऐवजीं मी आपल्या देहाची आहुति देण्यास सज्ज आहें !' परंतु अशा संकटांत त्याला टाकण्याला काजीचें मन धजेना. इतक्यांत बादशहाचा दूत काजीला बोलावण्याकरितां आला. त्याला पाहातांच काजीच्या छातींत धडकी भरली ! पण आतां दुसरा इलाज नाहीं. असें जाणून आपल्या नोकराला काजीनें बादशहाकडे जाण्याची अनुज्ञा दिली. नोकरानें आपल्याजवळचा उंची पोषाख—फाटक्या चिंध्या—अंगावर घातला. तो पक्का वेदान्ती होता. हिंदुस्थानांत राजे लोक स्वामींकडे जाऊन त्यांच्यापासून तत्त्वज्ञान संपादन करतात, अशी पूर्वापार वहिवाट आहे. हा पंडित—काजीचा नोकर आणि शिष्य—बादशहापुढें जाऊन त्याला निर्भीडपणानें म्हणाला, 'महाराज, आपल्याला काय पाहिजे आहे ? कोणत्या प्रश्नांचीं उत्तरें आपल्याला पाहिजे आहेत ?' बादशहा म्हणाला, 'तुझ्या धन्याला विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं आहे काय ?' पंडित म्हणाला, 'आपल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास मी तयार आहें. परंतु आपल्या मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें गुरूला योग्य असलेला मान आपण मला देण्यास तयार असाल आणि शिष्य या नात्यानें माझ्या पायांशीं बसण्यास आपण तयार असाल तर मी आपल्या प्रश्नांचीं उत्तरें देतों. पंडितांचें हें भाषण ऐकून बादशहानें मोठी उंची पोषाख आणवून त्याला अंगावर घालण्यास सांगितलें आणि त्याला सिंहासनावर बसवून आपण त्याच्या खालच्या बाजूस बसला. इतकें झाल्यावर बादशहा म्हणाला, 'हें सर्व

ठीक आहे, पण एक गोष्ट आपणांस सांगावयाची राहिली; ती ही कीं, आपल्या उत्तरांनीं माझें समाधान झालें नाहीं तर मी आपला शिरच्छेद करवीन!' पंडित म्हणाला, 'हे तर ठरलेंच आहे, व त्याला माझी बिलकूल ना नाहीं!'

इतकें झाल्यावर बादशहानें पंडिताला पहिला प्रश्न विचारला कीं, 'ईश्वर बसतो कोठें?' पंडितानें पाहिलें कीं, या प्रश्नाचें सरळ उत्तर द्यावें तर तें बादशहाला पटणार नाहीं, सबब आपल्यापुढें एक गाय आणण्याविषयीं त्यानें बादशहाला सांगितलें व त्याप्रमाणें एक गाय तेथें आणण्यांत आली. पंडित म्हणाला, 'ही गाय दूध देते कीं नाहीं?' बादशहा म्हणाला, 'अलबत–अलबत् देते.' 'तर मग तें दूध असतें तरी कोठें?' बादशहा म्हणाला, 'अर्थात् गाईच्या कांसेंत.' यावर पंडित म्हणाला, 'महाराज! आपलें म्हणणें साफ चुकीचें आहे. दूध हें गाईच्या सर्वांगांत भरलेलें आहे. आतां आपण गाईला घेऊन जा.' त्यानंतर पंडितानें दूध आणण्यास सांगितलें. दूध आणल्यावर तो म्हणाला, 'महाराज! दुधांत लोणी आहे कीं नाहीं व असल्यास तें कोठें आहे?' दुधांत लोणी आहे. हें बादशहाला कबूल करणें भाग पडलें, परंतु तें कोठें आहे, हें त्याला सांगतां येईना. पंडित म्हणाला 'दुधामध्यें लोणी कोठें आहे, हें जरी तुम्हांला सांगतां येत नाहीं तरी तें सर्वत्र भरलेलें आहे, ही गोष्ट कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. त्याप्रमाणें ईश्वर हाहि सर्व चराचराला व्यापून राहिला आहे. जसें दुधामध्यें लोणी आणि गाईमध्यें दूध सर्व ठिकाणीं भरलेलें आहे, तसें ईश्वराचें अस्तित्व सर्वत्र आहे. आपल्यास दूध पाहिजे असल्यास तें गाईच्या कांसेंतून काढावें लागतें, त्याचप्रमाणें ईश्वराचें अस्तित्व आपणांस अनुभवावयाचें असल्यास त्याचा शोध अंतःकरणामध्येंच केला पाहिजे!' यानंतर पंडित म्हणाला, 'महाराज! आपल्या प्रश्नाचें उत्तर मिळालें का?' बादशहा म्हणाला, 'होय, अगदीं यथायोग्य मिळालें.' पंडिताच्या जबाबानें बादशहाचें खरोखरच समाधान झालें. आजपर्यंत इतर पंडितांना सदरहू प्रश्न विचारला असतां ईश्वर हा अस्मानांत सातव्या किंवा आठव्या मजल्यावर राहतो, असें उत्तर अनेकांनीं दिलें होतें. परंतु हें त्यांचें म्हणणें बादशहास पटलें नसे; व अशा पंडितांस खरें रहस्य बिल-

कूळ समजलें नाहीं, असें त्याचें ठाम मत झालें होतें; व ते पंडित बादशहाच्या मनांतून साफ उतरले होते.

बादशहानें नंतर दुसरा प्रश्न विचारला. तो असा कीं, 'ईश्वर पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या दिशांपैकीं कोणत्या दिशेस पहातो?' हा प्रश्नहि मोठा चमत्कारिक होता. कारण, ईश्वर हा मनुष्याप्रमाणेंच एक व्यक्तिविशेष आहे, असें गृहीत धरून वरील प्रश्न केलेला होता. यावर पंडितानें एक दिवा आणण्यास सांगितलें आणि त्याप्रमाणें एक दिवा आणण्यांत आला. पंडित ह्मणाला, 'दिव्याची ज्योत एका दिशेकडे अभिमुख आहे असें नसून, ती सर्वत्र सारखी प्रकाश देणारी आहे. या न्यायानें आपल्या अंतःकरणांत ईश्वररूपी ज्योत निरंतर प्रकाशणारी असून ती सर्वत्र सम आहे.' पंडिताचें हेंहि उत्तर ऐकून बादशहाचें समाधान झालें.

यानंतर बादशहानें तिसरा आणि शेवटचा प्रश्न विचारला. तो हा कीं, 'ईश्वर करतो काय?' हा प्रश्न ऐकून पंडितानें बादशहास काजीला बोलावून आणण्यास सांगितलें, व त्याप्रमाणें काजी राजाच्या दरबारांत आला. दरबारांत पाऊल ठेवतांच आपला नोकर सिंहासनावर बसलेला आणि बादशहा सिंहासनाच्या खालीं बसलेला पाहून काजीला अत्यंत आश्चर्य वाटलें. काजी आल्यानंतर पंडितानें काजीला बादशहानें पूर्वीं ज्या जागेवर आपणांस बसावयास सांगितलें होतें तीवर आणि बादशहाला काजीच्या जागेवर बसण्यास सांगितलें. यानंतर बादशहाकडे वळून तो म्हणाला, 'महाराज! आपल्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं, ईश्वर हा जगांतील सर्व पदार्थांना—वस्तूंना एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं अशा रीतीनें नाचवीत असतो; काजीला बादशहा, बादशहाला काजी, आणि काजीला पंडित, अशा रीतीनें जागांची अदलाबदल करण्यांत ईश्वर गुंतलेला आहे!' या जगाचें अनादिचक्र सारखें फिरत असून एक कुटुंब खालावत जाणें आणि दुसरें उन्नतीस जाणें, खालावत चाललेलें कुटुंब अखेरीस नामशेष होणें आणि दुसऱ्यानें त्याची जागा पटकावणें, ही जगताची रहाटी सतत चालू आहे. एक मनुष्य उदय पावणें आणि कांहीं कालानें त्याच्या जागेवर दुसऱ्यानें येणें, ही अहोरात्र चाललेली परंपरा ह्मणजेच आज किंवा

संसार होय.' पंडितांचीं मार्मिक उत्तरें बादशहाला इतकीं समाधानकारक वाटलीं कीं, त्यानें त्याला काजीच्या हुद्यावर नेऊन बसविलें !

## वैवाहिक स्थितीचें ध्येय.

—:०:—

आपल्याला चष्म्यांतून सर्व वस्तु दिसतात. परंतु चष्मा हा डोळ्यांना ओझें होत नाहीं, चष्मा हा दृष्टीला प्रधिबंध करीत नाहीं. इतकेंच नव्हे तर पाहण्याला मदत करतो. आपली दृष्टि आणि दृश्य वस्तु यांच्या दरम्यान आडपडदा बनण्या ऐवजीं दृश्य वस्तूंना प्रकाशित करण्याला तो सहाय्यकारक होतो. पति आणि पत्नी यांच्यामधील संबंध अशाच प्रकारचा असला पाहिजे. त्या दोघांपैकीं एकानें दुसऱ्याच्या प्रगतीला अडथळा करावा असें न होतां प्रत्येकानें दुसऱ्यामध्यें सर्व जग पाहण्यास शिकावें. पति आणि पत्नी यांना आत्मदृष्टि–वेदान्तदृष्टि असल्याशिवाय अशी स्थिति होणार नाहीं. एकमेकांचा व्यक्तिविशेष, भोंवतालची परिस्थिति, एकमेकांची वागण्याची पद्धति, मनोविकार आणि संवयी या सर्वांना अतिक्रमून असणारा जो आत्मा त्याचा अनुभव स्त्रीपुरुषांना असेल तरच पतिपत्नीमधील संबंध वरील प्रकारचा होणें शक्य आहे.

श्वासोच्छ्वास हा आपल्याला अत्यंत निकट असतांहि त्याचें संवेदन आपल्याला होत नाहीं. याच न्यायानें विवाहित स्त्रीपुरुषांची स्थिति पूर्णपणें एकात्मतेची असली पाहिजे. पतीसंबंधाचा विचार पत्नीच्या मनांत व पत्नीसंबंधाचा विचार पतीच्या मनांत आला असतां तिच्या किंवा त्याच्या मनाला चिंतेच्या लगामानें ओढल्यासारखें वाटूं नये. हल्लींच्या स्थितींत आपल्या वैवाहिक स्थितीचा विचार करतां पत्नीसंबंधाचा विचार पतीच्या अध्यात्मिक प्रगतीला मागें खेंचतो आणि पतीसंबंधाचा विचार पत्नीच्या अंतःकरणावर दडपणाप्रमाणें वाटतो असेंच दिसून येतें.

हिंदुस्थानांत स्त्रीपुरुष आपल्या डोळ्यांत सुर्मा घालीत असतात. सुर्म्याचा उपयोग दृष्टि साफ करणें हा आहे. सुर्मा डोळ्यांत असतो खरा, पण तो दृष्टीला प्रतिबंध करीत नाहीं. त्याच्यापासून त्रास होऊं लागला म्हणजे दृष्टींत कांहीं उणेपणा आहे, असें समजावें. यालप्रमाणें मोठाची गोष्ट.

याची संवेदना आपल्याला होऊं लागली—त्याचा भार वाटूं लागला म्हणजे पोटांत कांहीं तरी गडबड आहे, असें खास समजावें. हा नियम सर्वत्र लागू आहे.

रामाच्या पत्नीनें त्याला एकदा असा प्रश्न केला कीं, 'आपल्याला माझें कधीं स्मरण होतें का ?' रामानें उत्तर दिलें, 'छे ! राम कधींहि स्मरण करीत नाहीं.' आपणापेक्षां निराळा कोणी मनुष्य असेल तरच त्याचें स्मरण होऊं शकतें. आपले डोळे, आपलें नाक, आपले हात, यांचें स्मरण आपण कधीं तरी करतों का ? कधीं नाहीं. कारण, ते व आपण वेगळे नाहीं. त्याचप्रमाणें एक मनुष्य दुसऱ्याशीं तादात्म्य पावला म्हणजे त्याला दुसऱ्याचें स्मरण होणेंच शक्य नाहीं. पण हें तत्त्व विशद रीतीनें मांडल्याशिवाय बरोबर ध्यानांत उतरणार नाहीं.

असें पहा कीं, आपल्या जिवलग स्नेह्याकडून आपल्याला एखादें पत्र आलें म्हणजे तें पाहून आपणांला आनंद वाटतो, त्याबद्दल केवढी तरी धन्यता वाटते. मित्रावरील आपल्या प्रेमामुळें त्याच्या पत्राबद्दल आपल्याला हा हर्ष होतो. या न्यायानें पति आणि पत्नी यांनीं एकमेकाला ईश्वराकडील पत्राप्रमाणें मानलें पाहिजे. पतीचा देह हें ईश्वराकडील एक पत्र किंवा एक चित्र आहे, असें पत्नीला वाटलें पाहिजे. पतीवर पत्नीनें प्रेम करावें, त्याला पूज्य मानावें; परंतु त्याचें तें बाह्यशरीर म्हणजेच आपला पति, अशी कल्पना न करतां तें एक ईश्वराकडून आलेलें पत्र आहे, ईश्वराची ती एक प्रतिमा आहे असें मनांत वागवावें. पतीमध्यें ईश्वर पहाणें, याचा खरा अर्थ हा आहे. परमात्म्याची मूर्ति—ईश्वराची प्रतिमा या दृष्टीनें पत्नीनें पतीकडे व पतीनें पत्नीकडे पाहावें. रात्रीच्या वेळीं दोघांचीं शरीरें संयोग पावत असतील तर पावोत; पण दिवसा स्त्रीनें परमात्म्याशीं तादात्म्य पावण्यांत—ईश्वरचिंतन, नामस्मरण करण्यांत आपला काळ घालविला पाहिजे. रतिसुखाच्या वेळीं नामाचें स्मरण होत नसल्यास ईश्वराचें नामस्मरण दिवसा करण्याचा अभ्यास ठेवावा. पतिपत्नींनीं एकमेकांना आलिंगन देण्याच्या प्रत्येक वेळीं आपण परमात्म्याला भेटत आहों, अशी कल्पना प्रत्येकाच्या मनापुढें उभी राहिली पाहिजे. 'हे चैतन्यसूर्या ! तूं माझ्याकडे ये. मी तुला आलिंगन देत आहें.' सर्व

चराचराशीं या भावनेंत तादात्म्य पावणें, यालाच परमपावनता असें म्हणतात ' हे परमात्मन् सर्वज्ञा ! तूं माझ्याकडे ये. मी तुझ्याशीं तद्रूप होतों.' अशा रीतीनें चराचरांतील सर्व वस्तु या परमात्म्याच्या प्रतिमा, ही दृष्टि आपल्याला जडली पाहिजे. परमात्म्याशीं तादात्म्य हेंच आपलें ध्येय, हाच अखंड जप झाला पाहिजे. 'सर्व चराचर हें आपलें शरीर आहे. जें जें सर्व दृग्गोचर आहे तें झाडून सर्व आपलें रूप आहे,' ही कल्पना आपल्या हृदयांत पूर्णपण भिंबली पाहिजे. एका बाजूनें वेदान्त आपणांस विनवून असें सांगतो कीं, जड शरीराच्या संयोगाच्या विचाराला आपल्या मनांतून आपण अजिबात फांटा दिला पाहिजे. त्याबरोबर तो हेंहि प्रतिपादन करतो कीं, परमात्म्याशीं सतत एकतानवृत्तीनें रहाण्याचा आपण अभ्यास केला पाहिजे. 'आपण परमात्मा आहों, सर्व शक्ति, प्रेम, पूर्ण ईश्वरी प्रेम, सर्वव्यापी प्रेम आपणामध्यें आहे, याचा निदिध्यास केला पाहिजे.' 'मी ब्रम्ह आहें, मी ब्रम्ह आहें, मी ईश्वर आहें, मीच ईश्वर आहें,' हा ध्यास केला पाहिजें. ज्या स्त्रीशीं आपण विवाह केला तीमध्यें आपला आत्मा पाहाण्यास शिकलें पाहिजे. तसेंच जगतांतील सर्व वनस्पति, झाडें, नद्या इतकेंच नव्हे तर सर्व अनंत वस्तु आपणच आहों,* ही भावना दृढ केली पाहिजे.

---

* खं वायुमग्निं सलिलं महीं च ज्योतींषि सत्वानि दिशो द्रुमादीन् ।
सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं यत्किंच भूतं प्रणमेदनन्यः ॥ श्रीमद्भागवत.

# वेदान्त आणि समाजसत्तावाद.

## व्यक्तिस्वातंत्र्यवाद.

रामाच्या मतें समाजसत्तावाद हा शब्द थोडा गौण—अपुरा आहे. समाजसत्तावाद ह्याच्याऐवजीं व्यक्तिस्वातंत्र्यवाद हा शब्द रामाला अधिक यथार्थ व समर्पक वाटतो. कारण, पहिल्या शब्दांत समाजसत्तेच्या कल्पनेला प्राधान्य दिलें आहे. परंतु व्यक्तीचें—व्यक्तिमात्राचें सर्व जगावर—अखिल विश्वावर वर्चस्व प्रस्थापित करणें, हा सत्स्वरूपाचा प्रभाव आहे, असें राम सांगतो. समाजसत्ता स्थापना करण्याला जी खटपट, भानगड व दगदग पडते, तशी व्यक्तिस्वातंत्र्यासंबंधानें—सत्स्वरूपाच्या संबंधानें नाहीं. सर्व चराचराचे आपण स्वामी आहों, हें सत्यज्ञान व्यक्तिमात्राला होणें, ह्यालाच राम व्यक्तिस्वातंत्र्यवाद असें म्हणतो. मग पाहिजे तर त्याला तुम्ही समाजसत्तावाद म्हणा किंवा दुसरें नांव द्या. व्यक्तीच्या दृष्टीनें वेदान्ताचें प्रतिपादन अशा तऱ्हेचें आहे.

दुसरी गोष्ट अशी कीं, भांडवलवाल्यांची ( त्यांच्या संपत्तीवरील ) सत्ता नियमित करणें, त्यांची सत्ता हिरावून घेऊन समाजांत तिची सारखी

---

* श्रीमंत आणि गरीब ह्या विषमतेमुळें सोशिॲलिझमचा किंवा समाजसत्तावादाचा यूरोपांत दोन हजार वर्षांपूर्वी प्रादुर्भाव झाला. अलीकडे म्हणजे एकोणिसाव्या शतकांत व विशेषेंकरून गेल्या तीस चाळीस वर्षांत यांत्रिक कलांची विलक्षण प्रगति झाल्यामुळें समाजात कांहीं कोट्यधीश तर पुष्कळसे भिक्षाधीश अशी तीव्र विषमस्थिति उत्पन्न झाल्यामुळें ह्या वादाला पाश्चात्य राष्ट्रांत विशेष स्वरूप आलें आहे. संपत्तीचें उत्पादन व विभागणी यांच्या बाबतींत फार अन्याय होतो, करितां उत्पादनावर व विभागणीवर केंद्रवर्ती लोकसत्तेचा ताबा असावा, व त्या सत्तेनें ह्यांचें योग्य व न्याय्य नियमन करावें

विभागणी करणें, हें ज्याला समाजसत्तावाद म्हणून म्हणतात त्याचें तत्त्व असून तें वेदान्ताशीं जुळतेंच आहे. कारण 'हें माझें, तें माझें,' अशी संपत्तीची, मालकीची, स्वार्थाची ( संकुचित ) जी कल्पना ती नाहींशी होणें, धनसंग्रहाची बुद्धि मोडून चित्त निरासक्त होणें, हेंच वेदान्ताचें अन्तिम आहे. अशा रीतीनें समाजसत्तावाद काय किंवा वेदान्त काय दोघांचेंहि समता हेंच अन्तिम आहे.

## त्यागाचें महत्व.

वेदान्त समत्व प्रतिपादन करतो आणि खऱ्या समाजसत्तावादाचेंहि हेंच प्राप्तव्य असलें पाहिजे. हा श्रीमंत, हा गरीब अशा प्रकारचे बाह्य धनामुळें उत्पन्न झालेले भेद अजिबात नाहींसे करून टाकले पाहिजेत—निर्मूल केले पाहिजेत. हे भेद पूर्णपणें मोडून टाकणें, ही कल्पना ऐकण्याला मोठी भयंकर वाटते व प्रत्यक्ष अंमलांत आणण्याला तर फारच दुःखदायक वाटते. परंतु हेंहि तितकेंच सत्य आहे कीं, हें माझें, तें माझें, हा भाव नाहींसा झाल्याशिवाय, ममत्व आणि आसक्ति हीं मोडल्याशिवाय, संपत्तीची—संचयाची कल्पनाच अजिबात मेल्याशिवाय मनुष्याला ह्या जगांत

---

व्यक्तिविषयक भांडवलवाल्यांच्या हातीं ही सत्ता न राहतां ती लोकप्रतिनिधींच्या—समाजाच्या हातीं राहावी, व त्यांनीं सर्व समाजांत संपत्तीची सारखी विभागणी करावी, सर्वांना तिचा सारखा फायदा मिळावा; सारांश, समाजांतील वैषम्य मोडून समता उत्पन्न करावी, हें समाजसत्तावादाचें आद्य तत्व आहे. इंडिव्हिजुॲलिझम किंवा व्यक्तिस्वातंत्र्यवाद हा समाजसत्तावादाच्या उलट आहे. या वादाचें मुख्य धोरण हें कीं, प्रत्येक मनुष्याला आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याची मोकळीक असणें, त्याच्या न्याय्य व रास्त इच्छांच्या पूर्णतेला अडथळा नसणें, ह्यांतच राष्ट्राचें कल्याण आहे. राष्ट्रांतील घटकव्यक्तीचें हित म्हणजेच राष्ट्राचें हित, ह्या तत्त्वावर राज्यपद्धति ठरविली जावी, असें व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांचें म्हणणें आहे. समाजसत्तावादांत व्यक्तीच्या इच्छेला फारसें महत्व नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्यवादांत व्यक्तीच्या इच्छेलाच प्राधान्य आहे. दोन्हीं वादांचा हेतु समाजांतील अस्वाभाविक विषमता मोडून समाजाचे घटक ज्या व्यक्ति त्यांचें कल्याण व्हावें हाच आहे. परंतु प्रतिपाद्य साधनांत मात्र

खरें सुख प्राप्त होणार नाहीं. समाजसत्तावाद संपत्तीचा त्याग करावयास सांगतो; परंतु वेदान्त हा त्याग कां करावा—संचयाची आसक्ति, धनादिकांचा लोभ मनुष्यानें कां सोडावा, ह्याची यथास्थित उपपत्ति लावून देतो. ज्याला समाजसत्तावाद म्हणतात तो समाजांतील विषमतेच्या फक्त वरवर दिसणाऱ्या कारणांचा विचार करतो. आणि तेवढ्यावरून सर्व मनुष्यांनीं समतेनें, बंधुत्वानें व प्रेमानें रहावें, असा निष्कर्ष काढतो. परंतु वेदान्त मनुष्यांमनुष्यांतील विषमतेचा—संपत्तीच्या विषम विभागणीचा अगदीं सांगोपांग व सर्व दृष्टींनीं विचार करतो व ह्या विषमतेला अगदीं स्वाभाविक अशीं कारणें काय आहेत, ह्याचें निरीक्षण करतो. संपत्तीचा संचय करणें, 'हें घर माझें,' 'हा घोडा माझा,' असें वाटणें म्हणजे आत्म्याला संकुचित करणें——त्याची हत्या करणें होय; व शिवस्वाचा अपहार करण्याइतकें हें भयंकर पातक आहे. वेदान्त प्रतिपादन करतो कीं, दुसऱ्याला देणें, दान करणें, त्याग करणें हाच पुरुषार्थ होय. मागण्याचा—याचना करण्याचा मनुष्याला अधिकार नाहीं. लोकांना देण्याला जर तुमच्याजवळ दुसरें कांहीं नसेल तर आपलें शरीर तरी लोकोपकारार्थ अर्पण करा. तें किड्यामुंग्यांना द्या. त्यामुळें निदान किड्यामुंग्यांची तरी कांहीं दिवस सोय होईल ! जें तुम्हीं देत नाहीं, ज्याचें तुम्हीं दान करीत नाहीं तें असून नसल्यासारखेंच आहे. * तुमची श्रीमंती मोहरांच्या थैल्यांवर नसून तुमच्या त्यागावर अवलंबून आहे. मनुष्य घडपड करीत असतो, सर्व क्रिया करीत असतो, त्या

---

महत्वाचा फरक आहे समाजसत्तावाद व्यक्तीच्या स्वातंत्र्याला हिरावून घेऊन तें लोकप्रतिनिधींच्या स्वाधीन करण्यास सांगतो, तर व्यक्तिस्वातंत्र्यवाद हा व्यक्तीला आचरणाच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य ठेवण्याचा आग्रह धरतो. पूर्ण स्वातंत्र्याची कल्पना—सर्व प्राणिमात्र सारखे आहेत, ही कल्पना—समत्वाची कल्पना ही वेदान्ताच्या कल्पनेला जुळती असल्यामुळें समाजसत्तावादापेक्षां व्यक्तिस्वातंत्र्यवाद स्वामींना अधिक पसंत आहे. सोशिॲलिझममध्यें समाजसत्ता व समता ह्या दोन कल्पना प्रधान आहेत, व त्यांना अनुसरून सोशिॲलिझम शब्दाचे भाषांतर प्रसंगानुरूप समाजसत्तावाद, समता, समत्व, ह्या शब्दांनीं करण्यांत आलें आहे.

* तन्नष्टं यन्न दीयते ।

स्वतःकरितां नसून वास्तविक दुसऱ्याकरितां असतात. मनुष्याचा हेतु कांहीं असो, पण वस्तुस्थिति मात्र अशी होते खरी. जगांतील लोकांची मोठी चूक होते ती ही कीं, सुख हें त्यागांत नसून संग्रहांत आहे, अशी त्यांची समजूत असते. खरें सुख प्रतिग्रहांत किंवा याचना करण्यांत नसून दानांत— त्यागांत आहे; * ह्या तत्त्वाचा अनुभव करून घेण्यास वेदान्त तुम्हांला आग्रहानें सांगतो. याचनेचा—संचयाचा विचार आपल्या डोक्यांत शिरला म्हणजे आपल्या वृत्तींचा तत्काळ संकोच होतो व सुखाला आपण पारखे होत जातों. यासाठीं तुम्ही कोठेंहि असा, तुमची परिस्थिति कशीहि असो, तुम्हीं सदा दातेच राहा, भिक्षेकरी बनूं नका; म्हणजे तुमच्या प्रत्येक कृतींतील व्यक्तिविषयक भाव—संकुचितपणा नाहींसा होऊन तुमची कृति व्यापक स्वरूपाची होऊं लागेल.

## वेदान्ताचा प्रभाव.

अशा तऱ्हेचे वेदान्तनिष्ठ महात्मे आजमितीस हिंदुस्थानांत विद्यमान आहेत. एवढेंच नव्हे तर इतिहासाला अज्ञात असलेल्या काळापासून ते हिमालयावर बसून वेदान्त कृतींत उतरवीत आहेत. वेदान्ती मनुष्य ह्मणजे ऐदी, खुशालचंद, फुकट बसून खाणारे लोक खास नव्हत; तर त्यांचे परिश्रम फार दांडगे असतात. हिंदुस्थानांतील सर्व उत्कृष्ट वाङ्मय त्यांच्याच व्यासंगाचें फळ होय. ह्याच महात्म्यांतून मोठमोठे कवी, नाट्यकार, शास्त्रज्ञ, तत्त्ववेत्ते, बुद्धिवैभवानें जगाला थक्क करून सोडणारे वैय्याकरणी, गणिताताचार्य, ज्योतिषि, रसायनशास्त्रज्ञ, व भिषग्वर्य निर्माण झाले आहेत, आणि लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, ह्यानीं कधीं द्रव्याला स्पर्शहि केला नाहीं; अत्यंत कडकडीत तापसी वृत्तीनें राहाणारे हे लोक असतात. ह्या महात्म्यांच्या उदाहरणावरून समाजसत्तावाद लोकांना भित्रे, आळशी व परावलंबी बनवील, ह्या आक्षेपाला जागाच उरत नाहीं. जो स्वतंत्र असतो तोच खरा कर्मयोगी.

## मालकीची कल्पना सोडा.

'ही मुलें माझीं,' 'ही बायको माझी,' 'हें घर माझें' असें मानण्याला—असल्या सर्व वस्तूंवर ममत्व ठेवण्याला तुम्हांला बिलकूल अधिकार

---

* न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः। श्रुति.

पोहोंचत नाहीं, असें वेदान्त प्रतिपादन करतो. समाजसत्तावादहि ह्याचाच अनुवाद करतो.

स्त्री ही एक व्यापाराचा पदार्थ मानली जावी, घरेंदारें, जमीनजुमला, मैसा वगैरे जड वस्तूंप्रमाणेंच स्त्रीहि लेखली जावी, 'ही अमक्याची बायको,' अशा शद्वांनीं तिचा उल्लेख केला जावा, पुरुषाच्या मालकीची ती एक वस्तु समजली जावी, हा आधुनिक सुधारणेवर मोठा कलंक आहे. विद्याचार-संपन्न म्हणविणाऱ्या समाजांत पुरुषांना मात्र स्वछंदानें वागण्याची पूर्ण मोकळीक, पण स्त्रियांचे मात्र हातपाय बांधलेले ! त्यांना स्वातंत्र्य असें नाहींच. जणूं काय त्या निर्जीव वस्तुच होत ! आज एकाची, उद्यां दुसऱ्याची, अशी त्यांची तुमच्याकडे स्थिति असते. वेदान्ताच्या तसेंच समाज-सत्तावादाच्या दृष्टीनें स्त्रियांची ही परवशता फारच भयंकर आहे. परंतु स्त्रियांनीं आपली वास्तविक स्थितिस्वतंत्रता ओळखली पाहिजे. पुरुषांप्रमाणें त्याहि स्वाधीन असल्या पाहिजेत. पुरुषाचा जर कशावर ताबा असतां कामा नये तर तोच नियम स्त्रियांनाहि लागू केला पाहिजे. स्वतःचें खरें करण्या-करितां त्यांनींहि मालकीची—ताब्याची कल्पना सोडून दिली पाहिजे. 'हा माझा नवरा' असला मालकीचा विचार त्यांच्याहि मनांत येतां कामा नये. पण अशा रीतीनें कोणाचाच कोणावर ताबा राहिला नाहीं, स्त्रिया व पुरुष पूर्णपणें स्वतंत्रतेनें वागूं लागेल तर समाजांत अनाचार व अनीति ह्यांचें प्राबल्य होईल, व मग माणसांत आणि पशूंत फरक राहाणार नाहीं, असा समाजसत्तावादाच्या उपदेशावर मोठा आक्षेप घेण्यांत येतो. परंतु वैषयिक नीतिमत्तेच्या दृष्टीनें सुद्धां पूर्ण स्वातंत्र्याची स्थिति हीच स्पृहणीय आहे, असें ह्या आक्षेपावर रामाचें उत्तर आहे. विषयसुखाच्या बाबतींत पशूचें वर्तन नियमित व विचारयुक्त असतें. व माणसेंहि जर निसर्गाचें अनुकरण करतील तर विद्याचारसंपन्न समाजांत सध्यां आढळून येणारी विषयसुख-लालसा व विकारातिरेक हीं नाहींशीं होतील !

विषयांध मनुष्याला पशु असें आपण म्हणतों; पण त्याला पशूची उपमा देण्यांत आपल्या हातून भयंकर चूक होत नाहीं काय ? फंदी मनुष्याला पशुवृत्तीचा समजणें हें महदाश्चर्य नाहीं काय ? कारण, मनुष्यांच्या मानानें पशूंत विषयलालसा फारच कमी प्रमाणांत आढळते. प्रमाणाबाहेर विषया-

सक्तीचा लेशहि त्यांच्यांत आढळून येत नाहीं. केवळ प्रजोत्पादनार्थच त्यांच्यांत संभोग होतो. पण मनुष्यांत मात्र अशा प्रकारचा नियम दिसून येत नाहीं.

आहारनिद्रादिकांत सदोदित नेमस्तपणा व नियमितपणा राखणारा मनुष्यच पशूंच्या वृत्तींचें–निसर्गाच्या नियमांचें–अधिक अवलंबन करतो, फंदी मनुष्य खास नव्हे. विषयासक्त मनुष्याला पशु म्हणणें रास्त होणार नाहीं. त्याला विद्याचारसंपन्न–सुसंस्कृत मनुष्य, असेंच म्हटलें पाहिजे ! कारण, विषयांधपणा हा समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत–रानटी स्थितींत उदय पावत नसून समाजाच्या संस्कृत स्थितींतच त्याचा उदय होत असतो. विषयांधत्व हा विद्याचारसंपन्नतेचा–सुधारणेचा एक विशेष आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. समाज रानटी अवस्थेंत असतांना व्यभिचाराचा त्यांत मागमूसहि नसतो. लोकांचे विषयोपभोग अगदीं स्वाभाविक व नियमित असेच असतात. प्रत्येक गोष्ट योग्य काळीं व योग्य वेळींच होत असते. समाजसत्तावादाचा किंवा वेदान्ताचा सर्वत्र प्रसार होईल तर समाजांतील बराच उच्छृंखलपणा नाहींसा होईल, अधिक नेमस्तपणा व शांतता सर्वत्र नांदूं लागेल, व विषयविलासांचें बंड बरेंच कमी होईल; परंतु त्या बरोबरच 'हें माझें,' 'तें माझें,' 'हें माझ्या मालकीचें,' 'तें माझ्या मालकीचें,' 'हा माझा नवरा,' 'ही माझी बायको', अशा शद्बांनीं व्यक्त होणारा सत्तेचा–मालकीचा भावहि राहणार नाहीं.

'मला माझ्या बायकामुलांची व्यवस्था करावयाची आहे,' 'मला माझ्या बहिणीची सोय लावावयाची आहे,' अशा प्रकारची मनुष्याला सारखी विवंचना असते; ह्या काळजीच्या दडपणामुळें मनुष्याला आपला अभ्यास-व्यासंग चालू ठेवतां येत नाहीं; ह्या काळजीमुळेंच त्याला आत्मोन्नति करून घेतां येत नाहीं, आत्मानुभवाचा आनंद अनुभवतां येत नाहीं. हें दडपण दूर व्हावें, आपल्या स्वतंत्रतेच्या मार्गांत कोणतीहि उपाधि राहूं नये, हेंच समाजसत्तावादाचें किंवा खरें पाहूं गेलें तर वेदान्ताचें ध्येय आहे. बायकामुलांचें कसें होईल, ही विवंचना तुम्हांला नसली म्हणजे नवीन शास्त्रीय शोध लावण्याचें काम तुम्हीं अंगिकारिलेंत किंवा शास्त्रांच्या संशोधनाच्या कार्यार्थ तुम्ही उद्युक्त झालांत तर त्यामध्यें तुम्हीं यशस्वीच व्हाल. जें

जें कार्य तुम्हीं मनांत आणाल तें तें खात्रीनें सिद्धीस जाईल, कारण, कार्य करतांना मनाला व्यग्रता नसली, अनिरुद्ध व प्रत्यवायरहित अशी मनःस्थिति उत्पन्न झाली म्हणजे स्वतंत्रतेनें आपल्या तंत्रानें व कलानें काम करतां येतें. आपण स्वतंत्र आहों, निरुपाधिक आहों, असेंच तुम्हांला वाटत राहील. हें अफाट जग मग तुमचें घर बनून जाईल.

## वेदान्त–समतावादाचें सत्ययुग,

संग्रहाची–मालकीची कल्पना झुगारून देणें, 'हें माझें, तें माझें,' हा भाव नाहींसा करणें, हाच सर्व रोगांवर व दुःखांवर एकच रामबाण उपाय आहे. हें तत्व लोकांना समजावून दिलें पाहिजे, त्यांच्या मनावर ठसविलें पाहिजे. हा उपाय लोकांना पटला, त्यांनीं याचा अनुभव घेतला म्हणजे हां हां म्हणतां सर्व जगभर समाजसत्तावादाचा प्रसार होईल. वेदान्तानें सांगितलेला हा समाजसत्तावाद किंवा व्यक्तिस्वातंत्र्यवाद हा जगांतील सर्व रोगांवर एकच खात्रीचा उपाय आहे. ह्या वेदान्तप्रतिपादित समाजसत्तावादाचा सर्वत्र जयघोष होऊं लागला म्हणजे सत्ययुग आलेंच म्हणून समजा. आणि मग विपरीत दृष्टीमुळें किंवा वरवर दिसणाऱ्या गोष्टींच्या निरीक्षणानें उत्पन्न होणारे समाजसत्तावादावरील आक्षेप आपोआप नाहींसे होतील. ह्या वेदान्तसमतावादाच्या युगांत राजा नको, (लोकसत्ताक राज्यासारखा) अध्यक्षहि नको, धर्मोपदेशकाची जरूरी नाहीं किंवा सैन्याचीहि आवश्यकता नाहीं. इतकेंच नव्हे तर विश्वविद्यालयाचेंहि प्रयोजन नाहीं. कारण प्रत्येक मनुष्य स्वतःपुरता एक विश्वविद्यालयच होईल ! ग्रंथसंग्रहालयें मात्र पाहिजेत. व हवें त्यानें तेथें येऊन अध्ययन करावे. फक्त लहान मुलांकरितांच काय ते अध्यापक. मोठ्यांनां अध्यापकांची आवश्यकता नाहीं. वैद्यशास्त्री किंवा शस्त्रवैद्य यांची गरज नाहीं. कारण, वेदान्तांत सांगितल्याप्रमाणें—निसर्गाच्या नियमांप्रमाणें मनुष्य वागूं लागेल तर तो कधीं आजारी पडणें शक्यच नाहीं. अर्थात् चिकित्सकांचें कांहीं काम नाहीं. सर्व सृष्टीभर वाटेल तिकडे स्वच्छंदानें सर्व मनुष्यांना फिरतां येईल. 'हें माझें,' 'तें माझें' हा भेदभाव कोठेंहि न राहिल्यामुळें सध्यांप्रमाणें त्यांना एकमेकांची भीति वाटणार नाहीं. सत्कृत्यें करणें, तत्वज्ञान, भौतिकेतर शास्त्रें यांचें संशोधन, अशा खरोखर कल्याणकारण विषयांचें अध्ययन करण्यांत आपण

प्रत्यक्ष ईश्वर आहोंत, ह्याचा पूर्ण अनुभव करून घेण्यांत, त्यांना आपला वेळ घालवितां येईल. व पूर्वीं एका काळीं हिंदुस्थानांत अशीच स्पृहणीय स्थिति होती !

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# आत्मसाक्षात्कारासंबंधानें कांहीं सूचना

## शेषशायी भगवान्



ईश्वराच्या स्वरूपासंबंधानें आज कांहीं निराळ्या दृष्टींनीं विचार करावयाचा आहे. सर्व चराचराला व्यापून राहिलेल्या एका अनंत उदधीमध्यें—क्षीरसमुद्रामध्यें, दिव्य गर्जना करणाऱ्या समुद्रामध्यें शेष नामक अद्‌भुत सर्प असून त्याला हजार फडा आहेत. त्या शेषाचें मऊ आणि विस्तीर्ण शरीर हा जणूं एक मंचक असून त्याच्या हजार फडा ही जणू कांहीं प्रचंड छत्री होय. अशा त्या अद्‌भुत मंचकावर देदीप्यमान भगवान् श्रीविष्णु विराजमान झाले असून लक्ष्मी ही भगवंताच्या पायांपाशीं बसून पादसंवाहनाचें काम करण्यांत गढून गेलेली आहे. लक्ष्मीचें शरीर अत्यंत दिव्य, तेजस्वी व लावण्यसंपन्न असून नेत्र अर्धोन्मीलित आहेत आणि तिच्या मुखावर स्मित विलसत आहे. तसेंच एकमेकांची दृष्टि एकमेकांवर लागून राहिली आहे. अशा तऱ्हेचें वर्णन पुराणांतरीं केलेलें आढळून येतें. लक्ष्मी म्हणजे शुद्ध माया, विद्या, ज्ञान, ब्रह्मानंद होय. भगवंताचें ऐश्वर्य—शक्ति म्हणजे श्री—लक्ष्मी होय. याचा अर्थ हा कीं, मुक्त आत्मा—जीवन्मुक्त हा आपलें ऐश्वर्य सदासर्वदा सर्वत्र पाहात असतो; आणि सर्व चराचर हें आपलें—भगवंताचें ऐश्वर्य म्हणून पहातो तोच मुक्त झाला, असें म्हणावयाचें. ज्याचें अहंममत्व पार नाहींसें झालें, जगांतील कोणत्याहि विषयांबद्दल ज्याला आसक्ति वाटेनाशी झाली, ज्यांची

वासनांचीं पाळेंमुळेंहि अजिबात खणलीं गेलीं, तो जन्मबंधनापासून सुटला, मुक्त झाला असें म्हणतां येईल.

समुद्र या शब्दानें अनंतत्व असा अर्थ दर्शित केला जातो. आतां क्षीर-समुद्र असें कां म्हटलें आहे ? तर याचें कारण असें कीं, क्षीर म्हणजे दूध व दुधाच्या ठिकाणीं तेज, पांढरेपणा--आनंद व उत्साहवर्धकता--शक्ति असे तीन धर्म आहेत. अर्थात् क्षीरसमुद्र हा अनंत प्रकाश, अनंत सुख व अनंत सामर्थ्य--सच्चिदानंद याचा दर्शक होय; व अशा त्या क्षीरसमुद्रामध्यें भगवान् व भगवंताचें ऐश्वर्य--लक्ष्मी हीं वास करीत आहेत.

आतां शेषाच्या कल्पनेचा काय अर्थ घ्यावयाचा ? शेष म्हणजे अव-शेष राहणारें तत्त्व. प्रलयानंतर फक्त सत्तत्त्वच शिल्लक राहातें. शेष हा सर्प आहे, असें सांगण्याचें कारण असें कीं, सर्पिण ही व्याल्यानंतर आपल्या शेंकडों अंड्यांपैकीं क्रमानें एकेक खाण्यास सुरवात करते. याच न्यायानें सर्वांचा प्रलय होतो. पण ' एकमेवाद्वितीयम् ' ब्रह्म मात्र अखंड कायम राहातें. क्षीरसमुद्रामध्यें परमात्मा राहतो. भगवान् व लक्ष्मी अखंडानंदामध्यें निमग्न आहेत.

## दोन महत्वाचे मुद्दे.

राम तुमच्यापुढें दोन महत्वाचे मुद्दे मांडीत आहे, त्याकडे तुम्हीं विशेष लक्ष पोहोंचवा.

१ अहंकारत्याग.

२ सर्वत्र परमात्मभाव पाहणें.

## वैराग्य--अहंकाराचा त्याग.

पहिला मुद्दा:--अहंकाराचा त्याग करणें, यालाच वेदान्तांत वैराग्य म्हणतात. खरी विश्रान्ति--शांति ती हीच होय. जेव्हां जेव्हां तुम्हांला रिकामपणा--फुरसत मिळेल तेव्हां तेव्हां एखाद्या खुर्चीवर किंवा पलंगावर स्वस्थपणें पडा व निश्चिंतपणें असें चिंतन चालू द्या कीं, हें शरीर आपण नसून त्याच्याबद्दलची कोणत्याच प्रकारची जबाबदारी आपणांवर नाहीं. आपण त्या शरीरापासून भिन्न आहों व आपल्याला शरीर म्हणून कांहीं वस्तु नाहींच आहे किंवा असलीच तर ती एक परकी वस्तु आहे, असा विचार

करून शरीरासंबंधाच्या सर्व कल्पना दूर झुगारून द्या व शरीरावरील अहंकाराचा बोजा–जडाची आसक्ति काढून टाका व एखाद्या प्रेताप्रमाणें शरीर स्वस्थपणें तशाच स्थितींत पडूं द्या. शरीरावरील आसक्ति फेंकून द्या; मनांतून शरीरविषयक कल्पनांचें उच्चाटन करून टाका. चिंतेला हांकलून लावा; कोणतीहि इच्छा किंवा महत्वाकांक्षा यांना हृदयांत थारा देऊं नका. यालाच अहंकाराचा त्याग म्हणतात.

## सर्वत्र परमात्मभाव.

दुसरा मुद्दाः—ईश्वरत्व हा दुसरा मुद्दा. ईश्वराची इच्छा तीच आपली इच्छा, अशी भावना करा. त्याचा हेतु म्हणजे आपलाच हेतु असें मानून त्याचें समर्थन करा. असें करतांना आपल्या सुखदुःखाचा यत्किंचित्हि विचार मनांत येऊं देऊं नका; शरीर, मन, मनांतील विषयांबद्दलची प्रीति यांना पार झुगारून द्या; परिस्थितीचा विचार मनाला शिवूं देऊं नका; यशापयश, लाभालाभ, भीति वगैरे विकारांना रजा द्या, व आपण सर्वव्यापी अनंत सत्ताधिश आहों, सर्व सूर्यांचा सूर्य आहों, चराचर व त्याची कार्यकारण-परंपरा यांच्या पलीकडे आपण आहों, अनंतकोटिब्रह्मांडाचे साक्षी, सच्चिदानंदस्वरूपी–साक्षात् नित्यमुक्त राम आहों, असें अहर्निश चिंतन चालूं द्या. ॐ चा दिव्य नाद तुम्हांला पाहिजे त्या किंवा सहज म्हणतां येईल अशा सुरांत अखंड चालवा. आपण केवळ आनंदस्वरूपी आहों, अशी दृढ भावना करा; हा अभ्यास सदोदित चालू ठेवलात म्हणजे दुःख, चिंता, रोग, दैन्य, यांचें बिलकुल कारण उरणार नाहीं. जग किंवा आपल्या भोंवतालची परिस्थिति यांच्यापासून सुख किंवा दुःख होणें, हें केवळ आपल्या कल्पनेवर अवलंबून आहे. प्रत्यक्ष जगापेक्षां आपलें मनःकल्पित जगच आपल्याला बंधकारक होतें. आपण जशी कल्पना करूं तसें जग आहे. सबब जगाच्या विचारांचें ओझें–दडपण आपल्या अंतःकरणावर उत्पन्न करून घेऊं नका. अहोरात्र असा निदिध्यास चालूं द्या कीं, जग आणि जगांतील लोकमत ही केवळ आपली कल्पना आहे; तो कल्पनेचा खेळ अर्थात् भास आहे, व हा जगद्रूपी कल्पनेचा मिथ्या भास उत्पन्न करणारे आपण सत्स्वरूपी आहों, त्याचे साक्षी आहों. चराचर हा केवळ आपला श्वासोच्छ्वास आहे–आपली सावली आहे. आपल्या वास्तविक

स्वरूपाचा—परमात्मस्वरूपाचा आपणांस साक्षात्कार होत नाहीं, आपल्या हृदयांत ईश्वर असून त्याचें आपणांस दर्शन होत नाहीं—भेट होत नाहीं, याचें कारण आपली दिशाभूल झाली आहे, हेंच होय.* आपण आपल्या हृदयांतील नित्य आणि शाश्वत स्वरूपाचा शोध करण्याऐवजीं—त्याच्यावर सर्वस्वी अवलंबून राहण्याऐवजीं लोकमताच्या चंचल, अशाश्वत आणि अंधुक टेंक्यावर आपण अवलंबून राहतों. परंतु राम म्हणतो कीं, लोकांच्या मतांपेक्षां आत्महिताच्या विचारालाच प्राधान्य द्या. लोकमताच्या भोंवऱ्यांत गिरक्या खाऊं नका; स्वतंत्र—मुक्त व्हा. आपणांमधील 'एकमेवाद्वितीयम्' असा जो परमात्मा—ईश्वर त्याला संतुष्ट राखण्याचा प्रयत्न करा. आपला माता, पिता, धनी, पति वगैरे तोच आहे. तुम्ही कितीहि आटोकाट प्रयत्न केला तरी बहुजनसमाजाला संतुष्ट राखणें अशक्य आहे. जन त्रिविध असल्यामुळें तुम्हांला सर्वांची मर्जी राखणें शक्य नाहीं, व तसें करण्याची तुमच्यावर कोणत्याच प्रकारची जबाबदारी नाहीं. लोकांचें काय आपण कर्ज घेतलें आहे ? छे ! छे !! आपले आपण मालक आहों. आपण जणुं काय जगांत एकटेच आहोंत व आपल्या भोंवतीं दुसरें कोणीच नाहीं, अशी कल्पना करून आनंदानें भगवन्नामाचा घोष करा—आपल्या स्वरूपाचा निदिध्यास चालूं द्या. तुम्ही आपल्यामधील परमात्म्याला खुष करा म्हणजे जनसमाज संतुष्ट झालाच म्हणून समजा. हा सिद्धान्त आहे. दुसऱ्यांची खुषामत करण्यासाठीं निजहिताला पारखें होण्यांत काय फायदा आहे ? *

## क्षुद्र सिद्धि म्हणजे मायाच होय !

एक राजपुत्र लहानपणीं सरदारांचे समवयस्क मुलगे जमवून लपंडावाचा खेळ नेहमीं खेळत असे. हा खेळ चालला असतां आपल्या संवग...

---

* देव जवळी अंतरीं । भेटी नाहीं जन्मवरी ॥ १ ॥
मूर्ति त्रैलोकीं संचली । दृष्टि विश्वाची चूकली ॥ २ ॥
भाग्यें आले संतजन । झालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥
रामदासीं योग झाला । देहीं देव प्रकटला ॥ ४ ॥ रामदास.

* सेवकू मानवीयांचे कष्टती बहुतांपरी ।
सेविला देव देवांचा तेणें मी धन्य जाहलों ॥ रामदास.

ज्यांना शोधून काढण्याला त्याला फार त्रास पडत असे. तें पाहून तो खेळ पाहण्यास जमलेल्या इसमांपैकीं एक इसम एकदा म्हणाला "हें काय ? हा स्वतः राजपुत्र असून या मुलांना आपल्या पुढें येऊन उभें राहण्याचा हुकूम करण्याचें सोडून त्यांना हुडकून काढण्याची व्यर्थ यातायात कां करतो ? " अशा तऱ्हेचा प्रश्न कोणालाहि उत्पन्न होणें साहजिक आहे. पण त्याचें उत्तर हें आहे कीं, राजपुत्र खेळांत आपला हुकूम चालवूं लागला तर मग खेळांत रहस्य तें काय राहणार ? तसें झालें तर मग खेळांतील सर्व मौज नाहींशी होईल. याच न्यायानें रामाचें म्हणणें असें आहे कीं, तुम्हीं सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् असा परमात्मा आहां; पण ज्याअर्थी करमणुकीखातर सर्व तऱ्हेच्या कल्पना—ज्ञान यांचा शोध करण्याचा–जगरूपी मायेचा हा लपंडावाचा—खेळ तुम्हीं मांडला आहे, त्याअर्थीं हा खेळ चालला असतां त्यांत खेळाची दृष्टि सोडून आपली सत्ता आविष्कृत करणें–सत्ता गाजविणें केव्हांहि न्याय्य होणार नाहीं; तसें करणें म्हणजे खेळाचा बेरंग करण्यासारखें आहे. परंतु तुमच्या परमात्मस्वरूपाच्या दृष्टीनें पाहिलें असतां जगांतील सर्व प्रकारचे शोध, शास्त्रीयज्ञान हा केवळ खेळ–ही केवळ करमणूक आहे; तुमचें वास्तविक स्वरूप मायेच्या अतीत आहे. भूत, भविष्य, वर्तमान हे काल, तसेंच आकाशांतील हजारों सूर्य आणि तारे यांमध्यें तुम्हींच व्यापून राहिलां आहां; तुमच्या ज्ञानस्वरूपी अफाट महासागरांत सर्व चराचर हें केवळ लहरी किंवा भोंवरे यांच्याप्रमाणें भासमान होतें; अशी खरी वस्तुस्थिति असतां कायद्याच्या परीक्षा देत आपण बसावें, ऐहिक क्षुद्र वैभवाच्या आणि पैशाच्या मागें आपण लागावें हें रास्त आहे काय ? तुम्हांला जर अतींद्रिय असें ईश्वरी ज्ञान संपादन करावें असें वाटत असेल, तर तुम्ही या मायेच्या खेळानें फसून जातां कामा नये; क्षुद्र सिद्धि मिरविण्याची हौस तुम्हांला वाटतां कामा नये. आपल्याला जगांतील अदृश्य वस्तूंचें ज्ञान आहे, अशी कित्येकजण प्रौढी मिरवतात. पण हा सर्व घोंटाळा मायेंतीलच आहे ! ईश्वरी साक्षात्कार हें अतींद्रिय ज्ञान असल्यामुळें तें असल्या लटक्या प्रकारांनीं प्राप्त होणें शक्य नाहीं; म्हणून अशा भलत्याच फंदांत पडूं नका.

## ज्ञान कसें होतें ?

माशांना पकडण्याकरितां एक जाळें पसरण्यांत आलें होतें.त्या जाळ्यांत मासे अडकले जाण्याऐवजीं त्यांनीं तें जाळें आपल्या सामर्थ्यानें ओढून नेलें. जगरूपी मायेच्या जाळ्यासंबंधानेंहि पारमार्थिकज्ञान संपादन केल्या-नंतर तुमची अशीच स्थिति होईल. हें ज्ञान प्राप्त व्हावें अशी जर तुमची इच्छा असेल तर ईश्वरानें अमुक तऱ्हेनें वागावें, 'माझ्याकरितां त्यानें अमुक करावें,' असा पोक्त सल्ला त्याला देण्याच्या व्यर्थ खटाटोपांत पडूं नका ! आमच्या इच्छेप्रमाणें त्यानें वागावें, असला भलताच आग्रह धरूं नका. आपलें सर्वस्व त्याच्या चरणीं अर्पण करा; देहाभिमानाला झुगारून द्या, सिद्धींच्या जाळ्यांत गुरफटूं नका; विषयोपभोगेच्छेला अजिबात फांटा द्या; म्हणजे शुद्धसत्त्वाचें तेज तुमच्या तोंडावर झळकूं लागेल आणि आत्म-ज्ञानाचा सूर्य तुमच्या ठिकाणीं प्रकाशमान होण्याला तुम्ही पात्र व्हाल. खरें ज्ञान म्हणून जें आहे, खरें शिक्षण म्हणून ज्याला म्हण-तात, तें सर्व मनुष्यांच्या हृदयांतून उगम पावतें; बाह्य ग्रंथां-तून किंवा वस्तूंमधून नव्हे, हें लक्ष्यांत ठेवा.

जगांत प्रतिभासंपन्न आणि स्वतंत्र बुद्धीच्या ज्या ज्या मनुष्यांनीं मोठ-मोठाले नवीन शोध लावले व जुन्यांचें संशोधन केलें त्यांचें त्यांचें चित्त ज्या वेळीं पूर्णपणें एकाग्र झालेलें होतें, आपल्या मननाच्या विषयाशीं ते तद्रूप झाले होते, जगाचें किंवा जगांतील विषयांचें त्यांना भानहि उरलेलें नव्हतें, आपल्या व्यक्तित्वासंबंधाच्या विचारांचा किंवा दुसऱ्या कोणत्याहि स्वार्थी कल्पनांचा मागमूसहि त्यांच्या चित्तांत उरला नव्हता, अशा वेळींच जगाला थक्क करून सोडणाऱ्या अद्भुत कल्पना त्यांच्या मेंदूत उदय पावल्या आहेत. ते जणुं एखाद्या पारदर्शक भिंगांतून पहात होते, व ज्ञानाचा प्रकाश त्यांच्या हृदयांत पडला आणि त्याच्या योगानें त्यांनीं ग्रंथावर नवा प्रकाश पाडला व ग्रंथसंग्रहालयें व पुस्तकालयें यांना विलक्षण शोभा आणली. ग्रंथसंग्रहा-लयांनीं त्यांना तो ज्ञानाचा प्रकाश दिला, असें म्हणतां येत नाहीं. यालाच खरें कर्म म्हणतात. कर्म याचा अर्थ मोठ्या प्रयासानें रखडपट्टी करीत राहाणें, असा राम समजत नाहीं. वेदान्तामध्यें कर्म याचा अर्थ पर-मात्मसंवेदना होणें, चराचरातील चैतन्याशीं—ब्रह्माशीं तद्रूपता पावणें,

असा होतो. ज्याला वेदान्त खरें कर्म असें म्हणतो असा जो निष्काम योग-चित्त स्वरूपाकार होणें, तो म्हणजे अक्रियता ऊर्फ ऐदूपणा आहे, असें मूर्ख व अज्ञानी लोक म्हणतात. दुसरी लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, वेदान्तरहस्य अंगांत मुरल्यानंतर मनुष्यानें केवढेहि जबर उद्योग केले तरी ते तो सहज लीलेनें करूं शकतो, तो केवळ त्याचा खेळ होतो; त्याच्या क्रिया त्याला कधींहि कष्टप्रद होत नाहींत, कर्मकटकट—ओझें म्हणून वाटत नाहींत. सारांश, एका दृष्टीनें—लोकदृष्टीनें ज्याला अत्युच्च कर्म असें नांव देण्यांत येतें ती कर्त्याच्या दृष्टीनें—ज्ञान्याच्या स्वतःच्या स्वरूप दृष्टीनें अकर्तृतेची स्थिति असते. * 'मी कांहीं करीत नाहीं,' या प्रत्यक्ष अनुभवामुळें ज्ञान्याच्या स्वरूपानंदाचा भंग कधींच होत नाहीं. परंतु वेदान्तदृष्टि प्राप्त झाल्याशिवाय मात्र ही गोष्ट होऊं शकणार नाहीं.

## धर्माचीं तीन अंगें.

प्रत्येक धर्माला तीन अंगें असतात. पहिलें तत्त्वज्ञान, दुसरें धर्मविधि—कर्मकांड व तिसरें पुराणें. तत्त्वज्ञान हें उच्च दर्जाच्या विद्वान् लोकांसाठीं असतें, कर्मकांड हें शरीरशुद्ध्यर्थ असून अध्यात्मविषयांत ज्यांची फारशी प्रगति झालेली नसते अशांच्या--मुलांच्या उपयोगासाठीं असतें. व पुराणें हीं अत्यंत विचारी--ज्ञानी यांच्यासाठीं असतात. या तिन्ही अंगांचा उपयोग आहे, व तिहींच्या मालिकेंतून प्रत्येकाला गेलें पाहिजे. ज्या धर्मात या तिहींपैकीं एखादें अंग कमी असेल तो धर्म मागसलाच पाहिजे. हिंदु-धर्मग्रंथांत या तिन्हीं अंगांचा योग्य व सुसंबद्ध मिलाफ झालेला असल्या-मुळें आजमितीसहि या धर्माचे जवळ जवळ तीस कोटि अनुयायी आहेत. ज्या धर्मात यांतील एखादें अंग लंगडें असेल तो खरा धर्म होऊं शकणार नाहीं. हीं तिन्ही अंगें पूर्णत्वानें हिंदु धर्मात आहेत, हा त्याचा विशेष होय.

## शिव आणि शक्ति.

अशा त्या हिंदूंच्या पुराणांतील एक चित्र राम आतां तुमच्यापुढें मांडणार आहे. परमात्म्यासंबंधाची ही कल्पना हिंदु लोकांच्या चित्तांत नेहमीं वागत असते. हिंदुधर्मग्रंथांत ईश्वरत्वाचा--परमात्म्याचा दोन बाजूंनीं विचार

* कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणिच कर्म यः।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ गीता, अ. ४।१४.

केलेला असतो. सदरहू चित्रांतील एका बाजूला एक तरुण मनुष्य बसलेला आहे, अशी कल्पना करा. त्याचें शरीर शुभ्र, दिव्य व भव्य असून हिमालयाच्या शिखरावर तो बसलेला आहे. तो ध्यानधारणेंत निमग्न झालेला असून त्याचे नेत्र निमीलित आहेत, व दृष्टि अंतर्मुख आहे. हें चित्र म्हणजे ब्रह्मानंदाची साक्षात् प्रतिमा होय. दुःख, चिंता, काळजी, गडबड यांच्या पलीकडे गेल्याची दर्शक ही स्थिति आहे; प्रत्यक्ष मुक्तीचें हें स्वरूप होय. जगाच्या अस्तित्वाची ज्यांत कल्पनाहि शिवत नाहीं, असें हें एक चित्र असून यांतील शुभ्रता ही हिमालयाचें दर्शक होय. यावरून मनाची शांति—पूर्ण शांति—हिचा बोध होतो.

याच्याबरोबर दुसऱ्या बाजूला परमात्म्याच्या अर्धांगीचें चित्र आहे. ती परमात्म्याच्या वामांकीं आरूढ झालेली आहे. तिची अंगकांति गुलाबी रंगाची आहे. ती आपल्या पतीकरितां एका वल्लीचा रस काढून ठेवण्यांत गुंतली आहे, व भगवान् जेव्हां आपले नेत्र उघडतात तेव्हां उन्मादकारक अशा त्या रसाचा पेला ती त्यांच्या तोंडाला लावते; हेतु हा कीं, भगवंताची पुनः तावडतोब समाधि लागावी. तशी स्थिती झाली म्हणजे ती जगासंबंधानें त्यांना प्रश्न करते व भगवान् त्या प्रश्नांचीं सम्यक् उत्तरें देतात. ही एका राजाची कन्या असून तिनें भगवंताच्या प्राप्तीसाठीं जगांतील सर्व सुखांवर लाथ मारली. हिला गिरिजा म्हणतात व ती भगवान् शंकर यांची अर्धांगी होय.

ॐ ! ॐ ! ॐ !



जीवनकलहांत तुमच्या शारीरिक आणि मानसिक शक्तीचा जो व्यय होत असतो त्यामुळें तुमच्या अंगच्या जीवशक्तीवर दिवसेंदिवस जास्त ताण बसतो व तिचा ऱ्हास होत जातो. ही स्थिति अशीच चालू राहिली आणि सभोंवतालच्या परिस्थितीमुळें तुमच्या शक्तीवर दिवसानुदिवस पडत चाललेला ताण--शीण तुम्ही तसाच चालू दिलात, कांहीं उपाय योजून तो घालविण्याचा प्रयत्न केला नाहींत तर तुम्ही आपल्या हातानें आपल्याला अकालीं मरणाच्या आधीन करीत आहां, असा याचा अर्थ होईल.

हा शीण कसा घालवावा आणि विश्रान्ति कशी घ्यावी ? असा प्रश्न आहे. आपलें कर्तव्यकर्म टाळावें, त्यापासून पराङ्मुख व्हावें, असा रामाच्या सांगण्यांतील हेतु नाहीं. आपल्या कर्तव्याची टाळाटाळी करावी, असा उपदेश राम कधींहि करीत नाहीं. परंतु त्याचें सांगणें हें आहे कीं, अशी एक उपयुक्त संवय आपल्या अंगीं जडवून घ्या, तिचा अभ्यास करा कीं, ज्यामुळें केवढ्याहि मोठाल्या जबाबदारीच्या क्रिया तुमच्या हातून होत असल्या, महत्प्रयासाचीं कोणतींहि कामें तुम्हीं अंगावर घेतलीं असलीं तरी तीं करीत असतांना तुम्हांला शीण म्हणून बिलकूल वाटणार नाहीं. ही संवय म्हणजे वेदान्तानें प्रतिपादन केलेली वैराग्याची संवय होय. वैराग्याच्या मजबूत पायावर तुम्ही उभें राहण्यास शिका, या अधिष्ठानाचा योग्य उपयोग करून घ्या; व असें झालें म्हणजे प्रसंगप्राप्त व ओघाओघानें जीं जीं कर्तव्यकर्में तुम्हांला करावीं लागतील तीं तीं तुम्ही बेलाशक करा. मग सर्व क्रिया तुम्हीं लीलेनें करूं लागाल व कर्मांपासून उत्पन्न होणारा शीण तुमच्या स्वप्नांतहि येणार नाहीं.

## वैराग्याची संवय.

या मुद्याचें ज्यास्त स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे. काम करीत असतांना मधून मधून जो थोडा फुरसतीचा काल तुम्हांला मिळेल--मग तो अगदीं अल्प, एकदोन क्षणहि कां असेना--तेवढ्या अवकाशांत असें चिंतन चालू द्या कीं, हें शरीर मृगजलवत् मिथ्या आहे, वास्तविक तें अस्तित्वांतच नाहीं व त्याच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. आपण निरुपाधिक—सर्व चराचराचे केवळ साक्षी आहों, कार्य करून त्याच्या परिणामांशीं—फळाशीं आपल्याला कांहींएक कर्तव्य नाहीं. अशा रीतीनें चिंतन चालू असतां आपले डोळे मिटून आपले सर्व अवयव शिथिल करीत जा व शरीरासंबंधाच्या झाडून सर्व विचारांना अजिबात फांटा देऊन शरीर स्वस्थपणें पडूं द्या. अशा रीतीनें कर्तव्यकर्मांच्या जबाबदारीचें ओझें आपल्या शिरावरून फेंकून देण्याचा-असल्या विचारांचें मनांतून उच्चाटन करून चित्त शांत व निस्तरंग राखण्याचा—तुम्ही जितका अभ्यास कराल तितकें आपलें सामर्थ्य वाढत चाललें आहे, असा तुम्हांला प्रत्यय येईल.

## चिंतेचें ओझें फेंकून द्या.

आपल्या शरीरांतील जीवनशक्ति मज्जातंतूंवर अवलंबून असते. एवढेंच नव्हे तर आपल्या विचारशक्तीला सुद्धां आधार मज्जातंतुजालाचाच आहे. शरीरांतील अन्नपचन, रक्ताचें अभिसरण, केंसांची वाढ वगैरे सर्व क्रिया अप्रत्यक्ष रीतीनें मज्जातंतूच्या सामर्थ्यावरच अवलंबून असतात. आपल्या चित्ताला व्यग्रता उत्पन्न झाली, नानातऱ्हेच्या काळजीमुळें मन अस्वस्थ झालें म्हणजे त्यामुळें आपल्या मज्जातंतूंवर अतिशय ताण पडतो. गहन विचारांत मन निमग्न असणें, ही गोष्ट एका दृष्टीनें—कार्याच्या दृष्टीनें फायदेशीर आहे, पण त्यामुळें मज्जातंतूंवर अतिशय ताण पडतो व त्याची शक्ति निश्चयानें क्षीण होऊं लागते. एखाद्या घोड्यावर दोन जबर ओझीं लादण्यासारखी ही स्थिति आहे. घोड्यावरील एक ओझें वाढवलें तर एकंदर ओझ्याचें प्रमाण कायम राखण्याकरितां दुसरें कोणतें तरी ओझें काढून ठेवलें पाहिजे. परंतु घोड्यावरील ओझें अजिबात काढून ठेवून त्याला मधून मधून विश्रांति दिली म्हणजे फिरून त्याला त्या ओझ्याचें कांहीं वाटणार नाहीं, व तो भरधांव पळूं लागेल. या न्यायानें आपल्या अंगांतील जीवशक्ति पुष्कळ काळ टिकावी, असें जर तुह्मांला वाटत असेल आपली प्रकृति सुस्थितींत राहावी, अशी जर तुमची इच्छा असेल, मज्जातंतुरूपी घोड्यानें जीविताचें ओझें सहज वाहून न्यावें, अशी तुमची मनीषा असेल, तर चिंतेचें ओझें शक्य तितकें हलकें करा. मनाला उद्विग्नता व चिंता उत्पन्न करणाऱ्या विचारांना यथेच्छ वावरूं देऊन आपल्या जीविताच्या झऱ्याला आटवूं देऊं नका. शरीर सुस्थितींत नांदण्याला आणि मन नेहमीं उत्साहपूर्व, कार्यक्षम राहण्याला चित्त सदोदित प्रसन्न, आनंदी, समाधानी असावें लागतें. उद्वेग, खेद, चिंता, भीति वगैरे विकारांनीं तें खचून जातां कामा नये.

वेदान्तप्रतिपादित वैराग्य म्हणजे आपण प्रत्यक्ष परमेश्वर आहों, असा अहर्निश निदिध्यास करून सर्व ऐहिक चिंता, मनाला खचविणारी काळजी, कर्तव्यकर्में वगैरे सर्व क्षुद्र गोष्टींना पार झुगारून देणें होय. आपल्या स्वरूपाच्या दृष्टीनें विचार केला असतां आपल्याला कोणतींच कर्में करावयाचीं नाहींत, कोणतींच कर्तव्यकर्में करण्याला आपण बांधले गेलेलों नाहीं,

आपण कोणाचेच नोकर नाहीं. आपण कोणापासून कर्ज घेतलें आहे आणि तें फेडावयाचें आहे, अशी वास्तविक स्थिति नाहीं. आपलें स्वातंत्र्य व्यक्त करा. जगांतील सर्व समाज, सर्व स्वराष्ट्रें यांच्या पलीकडे तुमचें स्वरूप आहे. हें जग हा केवळ भास असून आपण त्याचे साक्षी आहों. यालाच वेदान्त म्हणतात. समाज, रीतरिवाज, वर्तनपद्धति, कायदेकानू, नियम, लोकाचार, वर्तमानपत्रांतील विरुद्ध टीका, समाजाचीं मतें ह्या सर्वांचा स्पर्शहि तुमच्या आत्म्याला—परमात्म्याला होणें शक्य नाहीं. अर्थात् ह्या सर्व कल्पनांचा त्याग करा, त्यांना अजिबात झुगारून द्या. असल्या भ्रामक विचारांच्या पलीकडे जाऊन पोहोंचा. ॐ या शब्दाच्या उच्चाराबरोबर असले उदात्त विचार मनांत आणण्याचा अभ्यास करा आणि जेव्हां जेव्हां मनाला त्रास—क्षीण येईल, तेव्हां तेव्हां या मंत्राचा जप करीत जा.

ॐ! ॐ!! ॐ!!!



# वेदान्तावरील कांहीं शंकांचें समाधान

( शास्त्रीय शोधसदनांत ता. २३ दिसेंबर १९०२ रोजीं दिलेलें व्याख्यान )

आज अमुक विषयावर पद्धतशीर व्याख्यान व्हावयाचें आहे, असें नसून वेदान्तावरील कांहीं प्रश्नांबद्दल विवेचन करण्याचें योजिलें आहे. निरनिराळे लोक रामापुढें निरनिराळे प्रश्न आणून ठेवतात. बरेच वेळां हे प्रश्न मोठे चमत्कारिक असतात. अशा प्रश्नांपैकीं कांहींचीं उत्तरें आज संक्षेपतः दिलीं जाणार आहेत. तुमच्यापैकीं कोणाला किंवा अमेरिकेंतील कोणत्याहि मनुष्याला वेदान्तासंबंधानें प्रश्न विचारावयाचा असला तर त्यानें तो एखाद्या कागदावर लिहून रामाकडे पाठवावा. म्हणजे या मंदिरांत किंवा दुसऱ्या कोणत्याहि जागीं अशा प्रश्नांचा सविस्तर विचार करतां येईल.

या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देण्यापूर्वीं ह्या व अशासारख्या लोकांच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांना सारखीच लागू पडणारी अशी एक गोष्ट सांगणें जरूर आहे. ती ही कीं, हिंदुस्थानांतील तत्त्ववेत्त्यांची एखादा विषय प्रतिपादन करण्याची तऱ्हा युरोपांतील किंवा अमेरिकेंतील तत्त्ववेत्त्यांपेक्षां भिन्न आहे, हें लक्ष्यांत बाळगलें पाहिजे. हिंदुस्थांतील तत्ववेत्ते एखाद्या विषयाचें विवेचन प्रथम करतात आणि नंतर त्यासंबंधानें जितक्या म्हणून शंका, उपशंका घेणें शक्य असतील तितक्या घेऊन त्याचें समाधान करण्याची त्यांची पद्धति असते. रामाला याच मार्गानें जावें लागलें; रामाच्या पुढें सर्व तऱ्हेच्या शंका उपस्थित झाल्या होत्या. असल्या शंका–कुशंका व कोडीं वेदान्तांत शेंकडों आहेत. ज्या शंकांबद्दल आतां विवेचन केलें जाणार, त्यांतील कांहीं शंका राम पांच वर्षांचा असतां त्याच्या मनांत घोळत होत्या. कांहीं शंका पंधरा वर्षांच्या वयांत रामाच्या चित्ताला

व्यग्र करून टाकीत होत्या व कांहीं शंका पंचविसाव्या वर्षी रामाच्या मन-नाचा विषय होऊन बसल्या होत्या.

दुसरी एक गोष्ट सदरहू शंकांसंबंधानें सांगण्यासारखी आहे. ती अशी कीं, यांपैकीं कांहीं शंका तत्त्वजिज्ञासेचा विकास होण्याच्या प्राथमिक अवस्थेंत उदय पावणाऱ्या आहेत. दुसऱ्या कांहीं अध्यात्मिक प्रगतीच्या दुय्यम स्थितींत उत्पन्न होणाऱ्या आहेत व इतर कांहीं दुसऱ्या कोणत्या तरी भूमिकेंत येणाऱ्या आहेत. कल्पना करा कीं, एखादा मनुष्य भूमितीच्या पहिल्या पुस्तकाचा सत्तेचाळीसावा सिद्धान्त शिकण्यासाठीं आपल्यापाशीं आला. आतां तो सिद्धान्त त्याला एकदम शिकविण्याला आपण आरंभ केला तर तो त्याला कसा समजणार? त्याला सेचाळिसावा, पंचेचाळिसावा, किंवा पहिला सिद्धान्तहि ठाऊक नाहीं; भूमितींतील गृहीतप्रमाणें, सिद्धगोष्टी वगैरे बाबतींत तो अगदीं कोरा आहे. अशा स्थितींत एकदम सत्तेचाळिसावा सिद्धान्त त्याला पटणें अशक्य आहे. सत्तेचाळिसावा सिद्धान्त समजावून द्यावयाचा म्हणजे सेचाळिसाव्या सिद्धान्ताचा आधार द्यावा लागणार; समभुजचतुष्कोण काढावा लागणार, नंतर बत्तिसाव्या सिद्धान्ताचा आधार द्यावा लागणार; यांपैकीं कशाचीच त्याला ओळख नसल्यामुळें सेचाळिस व बत्तीस हे सिद्धान्त त्याला शिकवावे लागणार; ते समजावून द्यावयाचे म्हणजे सोळावा, बारावा वगैरे सिद्धान्त सोडवावे लागणार. अशा रीतीनें मागें येतां येतां पहिला सिद्धान्त सांगावा लागणार व तो सांगण्यापूर्वीं प्रथम भूमितींतील गृहीतप्रमाणें व सिद्धगोष्टी यांची फोड करावी लागणार. एकंदरींत काय, सर्व घोंटाळा उडून कांहींच सिद्ध केलें जाणार नाहीं.

## वेदान्ताची महती.

कोणतेंहि शास्त्र झालें तरी त्याचें खंडन करावयाचें असल्यास तेंहि पद्धतशीर, सयुक्तिक व सशास्त्र केलें पाहिजे. वेदान्त हें शास्त्र असून तो धर्महि आहे. युरोपांत भौतिक शास्त्रें व धर्म यांच्यामध्यें परस्पर विरोधीपणा मानला जातो. पण राम जीं तत्वें सांगत आहे, तीं भौतिक शास्त्रें न धर्म यांची सांगड घालणारीं आहेत. वेदान्त हें तत्त्वज्ञान असून तें भौतिक शास्त्रें व धर्म यांचा मेळ घालणारें शास्त्र आहे.

## सर्व शास्त्रांचें शास्त्र.

अशा रीतीनें वेदान्त हें सर्व शास्त्रांचें शास्त्र असल्यामुळें त्याचा विचार पद्धतशीर, सांगोपांग व क्रमशः असा झाला पाहिजे. आजपर्यंत जीं थोडींबहुत भाषणें तुम्हीं ऐकलींत त्यांत या विषयाचा मुळींच विचार झालेला नाहीं. वेदान्ततत्त्वज्ञानाचा या दृष्टीनें विचार करणारें एकहि प्रवचन यापूर्वी झालेलें नाहीं. या विषयाचा बाजूबाजूनें ऊहापोह होऊन गेला. तीं भाषणें प्रस्तावनारूपाचीं, मुख्य मुद्याच्या विवेचनाचीं पूर्व तयारी करणारीं, अशा दृष्टीनें होतीं. या अद्‌भुत शास्त्राचें, वेदान्तधर्माचें विशेष स्पष्टीकरण करण्याचा रामाला पुढें मागें प्रसंग आला तर त्यावेळीं तुमचे सर्व संशय, तुमच्या सर्व शंका आपोआप विलय पावतील.

कांहीं लोक फार अधीर असतात. विषयाचें सोपपत्तिक विवेचन ऐकून घेण्यापूर्वीं 'आमच्या प्रश्नांचीं उत्तरें अगोदर द्या,' असा त्यांचा आग्रह असतो. ठीक आहे; वास्तविक पाहिलें तर या शंका मोठ्या चमत्कारिक आहेत. परंतु त्यांपैकीं कांहींचा आज आपण विचार करूंया.

## तुम्हांला आत्मा आहे का ?

काल किंवा परवां रात्रीं एका मनुष्यानें रामाला असा प्रश्न केला कीं, "महाराज, आपण उपदेश तरी कसला करतां ? तुम्हांला स्वतःला आत्मा आहे का ? आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल का आपण विवेचन करतां ? आत्मा म्हणून कांहीं वस्तु आहे, असें आपण मानतां का ?" राम म्हणाला, "छे ! मला आत्मा नाहीं !" हें उत्तर ऐकून त्या गृहस्थाला अत्यंत आश्चर्य वाटलें. तो अगदीं चकित होऊन गेला. त्याच्या मनांत विचार आला, "हा कसला राक्षसी धर्म ! हा मनुष्य म्हणतो 'मला आत्मा नाहीं !'" 'मला आत्मा नाहीं,' असें जें रामानें उत्तर दिलें त्याचा अर्थ काय ? असें पहा, युरोप आणि अमेरिका या देशांत धर्माची कल्पना काय आहे, म्हणून विचार करूं लागलें तर असें दिसून येतें कीं, धर्म हा एक जणूं काय आपल्या दिवाणखान्यांत शोभेकरितां ठेवलेली एक चीजच, अशी त्यांची कल्पना आहे. ह्या बुद्धीनें अमेरिकेंतील मनुष्य आपल्या मनाशीं असा विचार करतो, 'ही माझी स्त्री, हीं माझीं मुलेंबाळें, हा माझा भव्य आणि शोभिवंत वाडा आहे, ही माझी

मालमत्ता आणि हे माझे पेढींत ठेवलेले लक्षावधि डॉलर आहेत. पण यांच्याचबरोबर आणखी एक धर्माची चीज मला पैदा केली पाहिजे! कारण, ही चीज पैदा झाल्याशिवाय ह्या माझ्या वैभवांत व्यंग दिसतें. नातलगांच्या तसबिरांशिवाय माझा दिवाणखाना जसा शोभिवंत दिसत नाहीं, तशीच धर्म ही एक चीज माझ्याजवळ असल्याशिवाय माझें हें एवढें ऐश्वर्य खुलून दिसणार नाहीं; पण इतर सर्व ऐश्वर्य अगोदर आणि मग सर्वांच्या शेवटीं धर्म!" अशा रीतीनें केवळ संचयाचा हव्यास हा त्यांच्या धर्मसंपादनाच्याहि मूळाशीं असतो. अमेरिकेंतील लोकांच्या संचयाची हांव इतक्या थराला जाऊन पोहोंचली आहे!

रामाच्या तोंडून कांहीं लोकांना न रुचण्यासारखे उद्गार येत असले तर त्याच्याबद्दल तुम्हीं रागावणार नाहीं, अशी आशा आहे. राम हा मनुष्यांपेक्षां सत्याला जास्त महत्त्व देतो आणि सत्याला महत्त्व देण्यांत तो तुम्हांला योग्य मान देतो. कारण, त्याच्या दृष्टीनें तुम्ही तें सत्स्वरूप आहां; हें शरीर किंवा हा अहंकार तुम्ही खास नव्हे. सत्य हें रामाला अशा तऱ्हेचीं विधानें करण्याला भाग पाडीत आहे. या देशांतील लोक नेहमीं प्रार्थना करीत असतांना ईश्वराकडे कोणत्या दृष्टीनें पाहतात? ईश्वराकडे कोणत्या हेतूनें प्रेरित होऊन ते जातात? आपलें मूल आजारी पडलें, आपल्या मालमत्तेचें जबर नुकसान होण्याचा प्रसंग आला, आपल्या शरीराला रोगादिकांनीं ग्रस्त केलें, म्हणजे लोक ईश्वराकडे धांव घेतात; व डोळे आकाशाकडे व हात वर करून ते ईश्वराची प्रार्थना करूं लागतात, "हे आकाशस्थ प्रभो! हे आकाशांत अधिष्ठित झालेल्या," अशा वाक्यांनीं त्याला संबोधितात. परंतु त्यांच्या मनांत असें येत नाहीं कीं, ईश्वर हा जर मेघांवर आरूढ झालेला असला तर त्याला थंडी झाल्याचांचून कशी राहील! नंतर ते ईश्वराला विनवूं लागतात कीं, 'हे ईश्वरा, आकाशस्थ बापा! माझ्यावर दया कर, माझ्या मालमत्तेचं रक्षण कर, माझा रोग नाहींसा करून मला पूर्वस्थितीवर आण, व माझ्या मुलाची प्रकृति सुधारूं दे!" हा धर्म, कीं याला म्हणावें तरी काय? या लोकांचा हेतु फक्त इतकाच असतो कीं, आपल्या घरच्या स्थितींत कांहीं बिघाड झाला, घरांत केरकचरा जमला, घर नादुरुस्त झालें म्हणजे ईश्वरानें खालीं

येऊन यांचें घर झाडण्याचें काम करावें! ईश्वराचा उपयोग हे लोक अशा रीतीनेंच करून घेत नाहींत काय? हा धर्माचा खरोखर दुरुपयोग नव्हे काय? या लोकांचा मुख्य कटाक्ष, आपलें शरीर, आपलें मन, आपली स्त्री, आणि आपलीं मुलेंबाळें यांचें कल्याण एवढाच असतो. आपल्या घरांची झाडसारव करण्याकरितां हे लोक ईश्वराला आकाशांतून खालीं आणूं पाहतात! वास्तविक स्थिति अशीच नाहीं काय?

पण वेदान्तदृष्टि याच्याहून अगदीं भिन्न आहे. हिंदुस्थानांतील सर्व लोकांची दृष्टि अशी आहे, असा याचा अर्थ नव्हे; तर खरे धार्मिक जे लोक आहेत त्यांची दृष्टि अशा प्रकारची असते. "आत्यंतिक सुखाचा मार्ग आक्रमण करण्याचा प्रयत्न करा ह्मणजे बाकीच्या सर्व गोष्टी आपोआप तुमच्या पायांपाशीं चालत येतील." हें जें येशू ख्रिस्ताचें वचन आहे तें तुम्हां ख्रिस्ती लोकांना बरोबर समजलें नाहीं. पण हें तत्त्व हिंदुस्थानांत फार जोरदारपणानें व अत्यंत स्पष्ट रीतीनें ठसविण्यांत आलें आहे. येशू ख्रिस्ताच्या वाक्याचा अर्थ असा कीं, आपलें तन, मन, धन, आपली सर्व मालमत्ता व हें सर्व जग हीं ईश्वरार्पण करा—यांचा यज्ञ करा. अशी स्थिति झाल्यानंतर हें विस्तीर्ण जग मनुष्याला आपलें घर असें वाटूं लागतें व परोपकार करणें हेंच खरें कर्तव्य, अशी त्याची बुद्धि होते.

इकडच्या देशांत व्यवहारांत अत्यंत जरूरीची अशी जी गोष्ट ( पैसा ) तेंच काय तें इतिकर्तव्य मानलें जातें व बाकीच्या सर्व गोष्टी त्या मुख्य अर्थाच्या प्राप्त्यर्थ, साहाय्यभूत म्हणून मानण्याची वहिवाट आहे. धर्म, ईश्वर या जणुं कांहीं परकीय वस्तु अशा दृष्टीनें पहाण्याची इकडच्या लोकांना संवय लागली आहे. परंतु तिकडे हिंदुस्थानाकडे पाहावें तर ईश्वर म्हणजे आपलें माहेरघर असें मानलें जातें. सभोंवतीं दृग्गोचर होणारीं घरें हीं आपलीं खरीं घरें नाहींत, तर केवळ खाणावळीवजा आहेत, अशी त्यांची दृढ समजूत असते. यावरून हिंदुस्थानांतील लोक आपल्या बायकामुलांची वास्तपुस्त घेत नाहींत, असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. तर यांतील रहस्य हें कीं, ते या बाबतींत अवश्य त्या सर्व गोष्टी करतात, पण या गोष्टींना ते वाजवीपेक्षां फाजील महत्व देत नाहींत. आतां आपल्या मूळ प्रश्नाकडे वळूं. 'तुम्हांला आत्मा आहे काय?'

हा प्रश्नच मुळीं असंबद्ध आहे. मला शरीर आहे, हें म्हणणें ठीक आहे. पण 'तुम्हांला आत्मा आहे काय ?' हा कसला विलक्षण प्रश्न! राम म्हणतो 'मीच तो आत्मा आहें, 'मी आत्माच आहें.' तुम्हांला आत्मा आहे का?' केवढा मूर्खपणाचा हा प्रश्न! जणुं काय मी शरीर आहें आणि आत्मा ही माझी एखादी जिनगी आहे! मी परमात्मा आहें, व हें शरीर तसेंच हें जग माझ्यामध्यें ( आभासरूपानें ) आहे.

## तुम्ही ईश्वरास मानतां का ?

दुसऱ्या एका मनुष्यानें रामाला असा प्रश्न केला कीं, "ईश्वराच्या अस्तित्वासंबंधानें तुमची श्रद्धा आहे का?" यावर राम म्हणतो, 'मी ईश्वराला प्रत्यक्ष जाणतों. जी गोष्ट आपल्याला साक्षात् माहीत नाहीं, जी दुसऱ्यांनीं आपल्यावर केवळ लादलेली असते, तिच्यावर आपला विश्वास आहे, हें म्हणणें चालेल. पण मी ईश्वराला जाणतों, असें म्हटल्यावर मग ईश्वरावर विश्वास ठेवण्याचा प्रश्न तो काय राहिला ? यावर पुनः असा प्रश्न उत्पन्न होऊं शकेल कीं, 'तुम्हीं ईश्वराला जाणतां म्हणजे काय ?' याचें समाधान असें कीं, 'मी ईश्वराला जाणतों याचा अर्थ मी ईश्वरच आहें.' यावर कोणी म्हणेल कीं, 'ईश्वर तुमच्यामध्यें आहे. व शरीरामध्यें वसत आहे, असेंच तुमचें म्हणणें ना ?' राम म्हणतो, 'तसें नव्हे. शरीर आणि हें अखिल विश्व ईश्वरामध्यें आहे.* व मीच ईश्वर आहें.' 'माझ्यामध्यें ईश्वर आहे' व 'मीच ईश्वर आहें' या दोन कल्पनांत जमीन-अस्मानाचें अंतर आहे. एखादा मनुष्य मेला म्हणजे त्यानें चैतन्याचा त्याग केला-तो तें सोडून गेला, असें म्हणण्याची या देशांत चाल आहे. पण हिंदुस्थानांत 'त्यानें देह ठेवला' असा शब्दप्रयोग करण्याची वहिवाट आहे. पूर्वेकडील व पश्चिमेकडील दृष्टींत केवढी तफावत आहे, ही गोष्ट यावरून सिद्ध होते. 'त्यानें चैतन्याचा त्याग केला' असें विधान करणें म्हणजे त्याचा खरा आत्मा म्हणजे त्याचें शरीर आणि चैतन्य हें त्याच्यावर बांधलेली-जोडलेली एखादी उपरि वस्तु आहे, असें मानण्यासारखें आहे. हिंदुस्थानांतील लोक म्हणतात, आत्मा-परमात्मा तो मीच आहें, व जीर्ण झालेला एक नवा कपडा टाकून ज्याप्रमाणें



*मत्स्थानि सर्व भूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ गीता, अ. ९।४.

दुसरा नवा धारण करावा, त्याप्रमाणें मी एक शरीर फेंकून दुसरें धारण करतों. ०

## जगांत दुःख कां ?

आणखी एक शंका अशी आहे कीं, ' सर्वत्र जर ईश्वरच आहे, तर मग जगांत एवढें दुःख व क्लेश कां ?' तुम्हांला माहित असेल कीं, वेदान्तदृष्ट्या सर्वत्र ईश्वर भरून राहिला आहे. विश्वांतील सर्व वस्तूंमध्यें ईश्वराचें अस्तित्व आहे. तुम्ही ईश्वरच आहां व मीहि ईश्वर आहें. यावर लोक म्हणतील कीं, ' सर्वत्र जर ईश्वर आहे तर मग आपण प्रत्येकजण ईश्वराचे अंश आहों कीं काय ?' छे ! छे ? ईश्वराचे विभाग होऊं शकत नाहींत. त्याचे तुकडे करतां येणें शक्य नाहीं, एखाद्या कापडाप्रमाणें फाडून किंवा कातरीनें कापून त्याचे भिन्न भिन्न भाग करतां येतील, अशा तऱ्हेची ईश्वर ही एखादी वस्तु खास नव्हे ! आपण ईश्वराचे अंश नाहीं. ईश्वर जर भूमि—अनंत आहे तर मग आपणहि अनंतच असलों पाहिजे, अशं असूं शकणार नाहीं. कारण, ईश्वर अनंत असल्यामुळें त्याचे भिन्न भिन्न विभाग—अंश पडणें अशक्य आहे.*

अशी स्थिति असल्यामुळें प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, जें जें कांहीं आहे तें तें सर्व जर ईश्वरच आहे, तर ईश्वरानें एका देहांत दुःख भोगावें, दुसऱ्या एखाद्या देहांत दारिद्र्यांत खिचपत पडावें, असें कां व्हावें ? हिंदुस्थानांत त्यानें रोगराई, ग्रंथिक ताप, दारिद्र्य हीं कां पाठवावीं आणि अमेरिकेंत राजकीय स्वातंत्र्य उत्पन्न कां करावें ? एखाद्या मनुष्याला लक्षाधीश तर दुसऱ्याला भिक्षाधीश, अशी परस्परविरोधी स्थिति ईश्वरानें कां निर्माण करावी ? व असली विषमता उत्पन्न करणारा ईश्वर अन्यायी ठरत नाहीं का ? या प्रश्नाला सोपपत्तिक व समाधानकारक उत्तर देण्याचे प्रयत्न हिंदुस्थानांत तसेंच या देशांतहि झालेले आहेत.

---

० वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृण्हाति नरोपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णा—
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ गीता, अ. २।२२.

* अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् । गीता, अ. १३।१६.

या प्रश्नांचें उत्तर देणारांपैकीं बहुतेकजण कर्मतत्त्वाचा, कार्यकारणपरंपरेच्या तत्त्वाचा, किंवा दैवाचें नियंतृत्व प्रत्येकाकडे आहे, या सिद्धांताचा आधार घेतात व आपलें मत स्थापित करण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या म्हणण्याचा निष्कर्ष हा कीं, मनुष्य हा जर आपल्या भोंवतालची परिस्थिति उत्पन्न करण्याला स्वतंत्र आहे व आपल्या इच्छेनुरूप ती तो निर्माण करतो, तर ईश्वरावर विषमता लादून त्याच्या नांवानें खडे फोडण्यांत काय अर्थ आहे? ईश्वर न्यायी आहे, व आपलें प्रारब्धदैव निर्माण करण्याची मुभा आपल्याला असल्यामुळें त्याच्यावर खोटे आरोप करणें गैर आहे. कर्मतत्त्वाच्या सिद्धांतासंबंधानें जास्त खोल विचार करण्याची रामाला मुळींच जरूर वाटत नाहीं. कार्यकारणपरंपरेचें हें तत्त्व हिंदुस्थानांतून इकडे आलें असून त्याला वेदान्ताचा आधार आहे; पण इंद्रियगोचर विश्वापुरताच या तत्त्वाचा संबध पोहोंचतो—या नामरूपात्मक जगापलीकडे—या प्रश्नाच्या मूळाशीं ते जाऊं शकत नाहीं. या तत्त्वाप्रमाणें—कर्मतत्त्वाप्रमाणें पुनर्जन्मासारख्या मुद्यांचें स्पष्टीकरण यथास्थित होतें; कारण, आपली एकंदर परिस्थिति आपण आपल्या अनेकजन्मार्जित कर्मांनीं व वासनांनीं निर्माण केलेली आहे, म्हणून आपल्या हल्लींच्या परिस्थितीची जबाबदारी आपणावरच येऊन पडते; ही गोष्ट कर्मतत्व सिद्ध करते, यांत शंका नाहीं. पण सूक्ष्म विचारांतीं आपल्याला असें दिसून येईल कीं, यामुळें मुख्य अडचण थोडी मागें गेली इतकेंच; पण यामुळें मूळ कल्पनेचें बिनतोड समाधान होऊं शकत नाहीं. असें असलें तरी कर्मतत्त्वाचा सिद्धांत खोडून टाकण्याचा—त्याचें निराकरण करण्याचा रामाचा बिलकूल विचार नव्हता. रामाला कर्मतत्त्व मान्य आहे, त्या तत्त्वाला रामाचा दुजोरा आहे. परंतु या प्रश्नाचा दुसऱ्या एका बाजूनें—दृष्टीनें विचार करण्याचा रामाचा हेतु आहे. या बाजूकडे अमेरिकेंतील लोकांचें पूर्णपणें दुर्लक्ष्य झालेलें आहे; निदान पूर्णपणें दुर्लक्ष्य नसलें तरी या बाजूचें वास्तावक महत्व येथील लोकांच्या निदर्शनास अद्याप आलेलें नाहीं.

कर्मतत्व प्रतिपादन करतें कीं, हल्लींच्या आपल्या परिस्थितीमधील विषमता आपल्या पूर्वकर्मांनीं उत्पन्न केली आहे. यावरून ओघानें असें अनुमान निघतें कीं, आपल्या पूर्वीच्या जन्मांमध्येंहि हल्लींच्यासारखें व्यक्ति-

मात्रामध्यें स्वभाववैचित्र्य, व वासनावैचित्र्य असलें पाहिजे. कांहीं जण रोगी तर कांहीं निरोगी, कित्येक जण दरिद्री तर कित्येक जण श्रीमान्, असा फरक आजच्याप्रमाणें तेव्हांहि असला पाहिजे. आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, ही मागल्या जन्मींची विषमता कोणत्या कारणानें झाली ? अर्थात् याचें उत्तर उघडच आहे. ती विषमता त्याच्या पूर्वींच्या जन्मांतील संस्कारभेदानें निर्माण केली. या तिसऱ्या जन्मांतील विषमता कशाचा परिणाम आहे. तर त्याच्या मागील म्हणजे चवथ्या जन्मांतील संस्कारांचा तो परिणाम आहे. अशा रीतीनें मागें जातां जातां हजारों जन्मांची जंत्री आपण तपासून पाहूं लागलों तरी मनुष्यांमनुष्यांमध्यें विषमता कां उत्पन्न होते, या प्रश्नाच्या निर्विवाद उत्तराचा पत्ता त्यांतून लागूं शकत नाहीं. कालाच्या आरंभकालपर्यंत—कालाला आरंभ आहे असें मानलें तर—जरी अशा तऱ्हेनें आपण मजल गांठली तरी तेथेंहि विषमता—विरोध आहेच ! तात्पर्य, हा प्रश्न सुटण्याचें बाजूस राहून तो अधिकाधिक गुंतागुंतीचा व बिकट मात्र होतो. कालाच्या आदिकाळींहि जर जगांत हल्लींच्याप्रमाणें सर्वत्र विषमता असेल तर मग प्रश्न असा उभा राहतो कीं, ईश्वरानें अनंत-कालपर्यंत ही अशी विषमस्थिति काय म्हणून राखली ? ईश्वरानें एका ठिकाणीं धनसंपन्न व दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं धनरहित असें कां राहावें ? एका जागीं रोगांत आणि दुसऱ्या जागीं पूर्ण आरोग्यांत राह-ण्याची बुद्धि त्याला कां व्हावी ? अशा या भेदभावांची वाट काय लावा-वयाची ? यावर वेदान्त सांगतो कीं, याचें उत्तर तुम्ही दिलें पाहिजे, तें उत्तर देण्याची जबाबदारी वेदान्तावर टाकतां कामा नये. वेदान्तानें तुम्हांला विचारावयाचा हा प्रश्न आहे. त्याचें उत्तर तुह्मीच दिलें पाहिजे. वेदान्तावर हा बोजा येऊं शकत नाहीं. कारण, सद्वस्तु फक्त एकच आहे, असा वेदान्ताचा ठाम सिद्धांत आहे. परंतु जगांत बाह्यतः दिसून येणारी नानाविधता कशी भासमान होते, याचाहि खुलासा वेदान्त करतो.

कल्पना करा कीं, एखादा मनुष्य—जुलुमी मनुष्य आहे आणि त्याच्या-पुढें पांच निरनिराळे इसम आणून उभे केलेले आहेत. समजा कीं, सदरहू जुलमी मनुष्य ईश्वराच्या ठिकाणीं आहे आणि त्याच्या समोर

आणलेले इसम त्याचे नोकर—बंदेगुलाम आहेत व सदर मनुष्यानें त्या इसमांना निरनिराळ्या ठिकाणीं ठेवलें. एकाला अंधारकोठडींत टाकलें, दुसऱ्याला एका सुंदर बगीचांत ठेवलें. तिसऱ्या नोकराला मोठ्या भव्य राजवाड्यांत—विलासमंदिरांत ठेवून दिलें, तर चवथ्याला आपला नोकर म्हणून ठेवलें. व पांचव्या इसमाच्या छातीवर हिमालय पर्वतासारखें एक प्रचंड ओझें ठेवून देण्यांत आलें. आतां असल्या धन्याबद्दल तुमचें काय मत होईल ? अर्थात् तो धनी अत्यंत निष्ठुर आहे, अन्याय्य बुद्धीचा आहे, असें म्हटल्याशिवाय तुम्ही राहाणार नाहीं, हें खास. याच न्यायानें ईश्वर हा जीवमात्राहून भिन्न आहे आणि तो एका राष्ट्राला सुखी व दुसऱ्या राष्ट्राला दुःखी करतो, एका मनुष्याला धनसंपन्न व दुसऱ्या मनुष्याला धनहीन करतो; अशी कल्पना केली तर ईश्वर हाहि विषम आणि निर्दय असा एक धनीच आहे, त्याला दयामाया नाहीं, एवढेंच नव्हे तर तो खास अन्यायी आहे, असेंच तुम्हांला वाटणार नाहीं काय ? अर्थात् वाटेल. सारांश, ईश्वर हा मनुष्यमात्रापेक्षां भिन्न आहे, असें मानणारांनीं या प्रश्नाचा उलगडा केला पाहिजे.

ईश्वर आपणांहून दूर कोठें तर आहे, असें वेदान्ताचें म्हणणेंच नाहीं; तो आपल्या हृदयामध्यें *अधिष्ठित असून आपण आपली बाह्यदृष्टि अंतर्मुख करून—प्रत्यग्वृत्ति होऊन त्याला पाहण्याचा—साक्षात्कार करून घेण्याचा अभ्यास केला पाहिजे, असें वेदान्त प्रतिपादन करतो.

आतां असें पहा कीं, आतां सांगितलेल्या दृष्टांतांतील धनी हाच जर एकदा बागेंत तर एकदा राजमंदिरांत, एखाद्या वेळीं अंधारकोठडींत, तर दुसऱ्या एखाद्या वेळीं स्नानगृहांत, कधीं स्वयंपाकगृहांत तर कधीं ओझ्याखालीं दडपला गेलेला असा बनत असेल, तर मग तो अन्यायी किंवा निर्घृण आहे, असा त्याच्यावर तुम्हांला आरोप करतां येईल काय ? खास नाहीं. तो दुसऱ्यांना सुखदुःख देण्याला कारणीभूत होत असेल तर तो विषम ठरेल. पण तो स्वतःच अंधारकोठडींत किंवा उपवनांत अशा

* ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ गीता. अ. १८।६१.

भिन्न भिन्न ठिकाणीं स्वेच्छेनें जात असला तर विषमत्वाच्या आरोपाला तो पात्र होऊं शकत नाहीं, हें निर्विवाद ठरतें. याच न्यायानें वेदान्त म्हणतो कीं, जगामध्यें जो भेद, जो विरोध, बाह्यतः दृश्यमान् होतो त्याचा दोष—कलंक ईश्वराला लावतां आला असता; पण तो केव्हां? तर ईश्वर हा सुख भोगणाऱ्या, दुःख भोगणाऱ्या, श्रीमंत आणि गरीब अशा यच्चयावत् मनुष्यांहून भिन्न असता तर त्याच्यावरील दोष—आरोप सयुक्तिक ठरला असता. पण सर्व ईश्वर आहे—सर्वत्र रामच आहे. मीच सर्व नटलेला आहें. एका ठिकाणीं धनसपन्न बनलेला तो मी. अंधार कोठडींत असलेला तोहि मीच. सुरूप तो मी, कुरूप तोहि मीच; बागेंत असलेला तो मी, निर्जन अरण्यांत फिरणारा तोहि मीच; अशा स्थितींत तुम्ही दोष तरी देणार कोणाला? माझ्यावर दोषारोप करणारा मनुष्यसुद्धां मीच आहें!

या देशांत वेदान्त प्रतिपादन करणें अतिशय कठीण आहे. कारण 'मी' शब्दानें 'शरीर' किंवा 'मन' असा इकडे बोध घेतला जातो. 'मला आत्मा आहे' असा शब्दप्रयोग करण्याची या देशांतील लोकांची वहिवाट असून 'मी' ह्मणजे शरीर, मन, बुद्धि, जीव असा अर्थ तुम्ही घेतां. पण वेदान्तज्ञान झालेला मनुष्य असा अर्थ बिल्कूल घेत नाहीं. 'शरीर, मन, बुद्ध्यादि मी खास नव्हें; मी फक्त ईश्वर आहें,' हा त्याचा अनुभव असतो.

## 'मी ईश्वर आहें' म्हणजे काय?

आतां प्रश्न असा उद्भवतो कीं, 'मी ईश्वर आहें,' या विषयाचा अर्थ काय? याचें उत्तर असें आहे कीं, मी राजा आहें,' 'मी अधिकारी आहें' 'मी स्वामी आहें,' 'मी अमेरिकन आहें, 'मी हिंदु आहें,' वगैरे विधिवाक्यांपेक्षां 'मी ईश्वर आहें,' हें वाक्य भिन्नार्थक आहे. हा फरक लक्ष्यांत बाळगणें अवश्य आहे. 'मी राजा आहें,' या वाक्यांत 'राजा' ही एक पदवी आहे. 'मी अधिकारी आहें,' या वाक्यांतील 'अधिकारी' ही एक पदवी अंगांत घातलेल्या अंगरख्याप्रमाणें आहे; 'मी दरिद्री आहें,' या वाक्यांतील 'मी' व 'दारिद्र्य' हीं भिन्नभिन्न आहेत. दारिद्र्य हा जणु काय एक पोषाख मी आपल्या अंगावर चढविला आहे, असा याचा अर्थ आहे. आतां असें पहा कीं, 'मी ईश्वर

आहें,' असे हिंदु लोक म्हणतात; या वाक्यांतील 'ईश्वर' ही कांहीं एखादी पदवी नाहीं; ईश्वर हा एखादा गुणधर्म नव्हे; तसेंच ईश्वरत्व हा कांहीं एखादा अंगरखा नव्हे, कीं जो अंगांत घालून आपली ही क्षुद्र अहंकारवृत्ति--मीपणा आपल्याला कायम राखतां येईल ! हे पूर्णपणें लक्ष्यांत ठेवा. 'मी ईश्वर आहें' हें वाक्य 'हा सर्प रज्जु आहे,' या वाक्यासारखें आहे. समजा कीं, एका मनुष्याला अंधारांत दोरी सापासारखी भासली. तो साप आहे असें वाटल्याबरोबर मनावर भीतीचा पगडा बसून तो जमिनीवर पडला. इतक्यांत दुसरा एक मनुष्य त्या ठिकाणीं येऊन त्या भीतीनें पछाडलेल्या मनुष्याला सावध करून ह्मणाला, 'मित्रा, अरे भितोस काय ? तुझा तो साप केवळ एक दोरी आहे.' याचा अर्थ काय ? याचा अर्थ असा कीं, जो भ्रमानें साप वाटला होता, तो खरोखरी साप नसून फक्त दोरीच आहे. अर्थात् यावरून तुमच्या ध्यानांत हें आलें असेल कीं, 'तो सर्प रज्जु आहे,' हें वाक्य 'मी राजा आहें,' इत्यादि वाक्यांहून भिन्नजातीय आहे. 'तो सर्प रज्जु आहे,' या वाक्यांतील सर्प हा कांहीं रज्जूचा एखादा गुणधर्म नव्हे. 'तो सर्प काळा आहे,' या वाक्यांत 'काळा' हा सर्पाचा गुण आहे. परंतु 'तो सर्प रज्जु आहे,' या वाक्यांत 'सर्प' हा कांहीं 'रज्जू'चा गुण होऊं शकत नाहीं. हा फरक विसरतां कामा नये. हा फरक आकलन होण्याला अंमळ कठीण आहे; पण एकदा का तो समजला म्हणजे शंका घेण्याचें कारण उरणार नाहीं. म्हणून हा फरक बारकाईनें लक्ष्यांत ठेवा कीं, 'सर्प काळा आहे' व 'सर्प दोर आहे,' हीं दोन्हीं भिन्न जातीचीं विधानें आहेत.

याच न्यायानें इकडील लोकांचीं 'मी पवित्र आहें,' 'मी देवदूत आहें,' हीं विधानें आणि 'मी ईश्वर आहें,' हें हिंदु लोकांचें विधान अशा दोन्ही विधानांमध्यें महदंतर आहे. हिंदु मनुष्य जेव्हां ह्मणतो कीं, 'मी ईश्वर आहें,' तेव्हां त्याचा अर्थ मी ह्मणजे पंचभौतिक शरीर नव्हे, असा अर्थ तो ग्रहण करतो. हीं हाडें, हे स्नायु, हा साडेतीन हाताची पंचमहाभूतांची खोळ मी नव्हे; मन मी नव्हे बुद्धिहि मी नाहीं; तर या सर्वांचें उगमस्थान—अधिष्ठान अशी जी शक्ति, सामर्थ्य, ती सद्वस्तु—तो ईश्वर मी आहें, तद्व्यतिरिक्त मी नाहीं. तोच मी ईश्वर.



तसेंच दुसरी गोष्ट अशी कीं, 'ईश्वरा, अमुक कर, तमुक कर,' असें म्हणणें म्हणजे ईश्वर हा एखाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें आहे, असें समजून त्याला न्यायमंदिरांत खेंचून एखाद्या आरोपीप्रमाणें आपल्या कृत्याबद्दल जाब देण्याविषयीं हुकूम करण्यासारखें आहे! या लोकांच्या दृष्टीनें ईश्वर म्हणजे जणुं काय कोणी यःकश्चित् मनुष्य आहे!

ईश्वराबद्दल अशा प्रकारच्या शंका आणि प्रश्न उत्पन्न कां होतात, याचें स्पष्टीकरण एका गोष्टीनें होण्यासारखें आहे.

एका गांवीं एक तेली होता. त्यानें आपल्या घरीं पिंजऱ्यांत एक सुंदर पोपट बाळगला होता. एके दिवशीं तेली कांहीं कामानिमित्त परगांवीं गेला. त्याचा नोकरहि बाहेरगांवीं गेलेला होता. तेल्याच्या घरांत पिंजऱ्यामधील त्या पोपटाशिवाय दुसरें कोणी नव्हतें. एकदा एक मांजर तेल्याच्या दुकानांत शिरलें. त्याला पाहतांच पोपट जरी पिंजऱ्यांत होता तरी तो अगदीं घाबरून गेला; व पिंजऱ्यांत इकडे तिकडें उड्या मारीत पंख फडफडविण्यास त्यानें सुरवात केली. त्याच्या त्या फडफडीचा असा परिणाम झाला कीं, तो पिंजरा ज्या दोरीनें भिंतीला टांगला होता ती दोरी तुटून तो पिंजरा खालीं पडला व तो तेलाच्या एका गाडग्यावर आदळून त्या गाडग्याचा चुराडा होऊन त्यांतील सर्व तेल जमिनीवर सांडलें. पुढें कांहीं वेळानें तेली घरीं आला, व दुकानांत पाहतो तों हा प्रकार! आपल्या भारी किंमतीच्या तेलाची अशी नासाडी झालेली पाहून तेल्याला अतिशय राग आला. व त्या रागाच्या सपाट्यांत त्याचें डोकें फिरून गेलें. आपल्या पोपटानें खोडी करण्याच्या इराद्यानें पिंजरा खालीं पाडला असला पाहिजे, व त्यामुळें कांहीं शेंकड्यांच्या गोत्यांत आपल्याला आणलें, असा विचार करून त्यानें रागाच्या झटक्यांत पिंजऱ्याचें दार उघडून पोपटाच्या डोक्यावरचे सर्व केंस उपटून टाकले. यामुळें तो पोपट टकल्या दिसूं लागला; त्याचा तो तुऱ्यासारखा उंच केंसांचा झुबका आतां नाहींसा झाला व त्याचें डोकें रक्तबंबाळ झालें. पुढें दोन आठवडेपर्यंत पोपटानें तोंडांतून शब्दही बाहेर काढला नाहीं. त्याच्या मंजुळ आवाजानें घऱ्याचें मन रिझलें जात असे, पण त्याची ती करमणूक बंद झाली. तेव्हां त्याला आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप झाला. पुढें एके दिवशीं त्या तेल्याच्या दुकानीं एक

मनुष्य आला. तो बोडका असून त्याच्याहि डोक्याला टक्कल पडलेलें होतें. तें पाहून पोपट मोठ्यानें हंसूं लागला; आपल्यासारखा समदुःखी प्राणी पाहून त्याला आनंद झाला. पण पोपटाच्या हंसण्याचें कारण त्या तेल्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं. त्यानें पोपटाला त्याचें कारण विचारलें. तेव्हां पोपट ह्मणाला, 'धनीसाहेब, तेल्याच्या अंकित राहण्याचा मान ईश्वरानें माझ्या एकट्याच्याच वांट्याला दिला नाहीं, हे त्याचे मोठे उपकार आहेत. हा मनुष्यहि कोणा तरी तेल्याचाच नोकर असला पाहिजे! कारण, तसें नसतें तर हा टकल्या कसा झाला असता?'

कांहीं लोकांची विचारसरणी हुबेहुब अशाच मासल्याची असते. ते जीं जीं कृत्यें करतात त्यांत त्यांचा कांहींना कांहीं स्वार्थी हेतु असतो; अमुक गोष्ट केली असतां आपल्याला अमुक लाभ होईल, अशा कोणत्या तरी भावनेनें प्रेरित होऊन ते एखाद्या कार्यास हात घालतात. तसेंच त्यांच्या इच्छा आणि कृति यांच्यामध्यें नेहमीं अंतर असतें. याच न्यायानें ईश्वरानें हें जगत् निर्माण केलें, त्यांत त्याचाहि कांहीं हेतु, स्वार्थी—आपमतलबी हेतु असलाच पाहिजे, त्यालाहि कांहीं पूर्व तयारी करावी लागली असली पाहिजे, असा त्यांचा ठाम सिद्धांत होऊन बसतो. पण ही विचारसरणी निःसंशय सदोष आणि चुकीची आहे. ईश्वरानें असलें विषम विश्व कां निर्माण केलें, असा प्रश्न करणें म्हणजे त्याच्या व्यापकत्वाला मर्यादित करण्यासारखें आहे. ईश्वर अनंत आहे, असें एकदा म्हणावयाचें आणि लगेच त्याला एखाद्या सामान्य मनुष्याच्या दर्जापर्यंत खेंचून आणावयाचें, असा याचा अर्थ होतो! पण हें अप्रशस्त आणि अशास्त्र आहे.

## मला दुःखभोग कां असावे?

'ईश्वरानें जगांत विषमस्थिति कां उत्पन्न केली?' हाच प्रश्न दुसऱ्या एका माणसानें जरा निराळ्या भाषेनें रामाला एकदा विचारला होता. तो म्हणाला, 'सर्व जर मीच आहें, तर मला दुःखभोग कां असावे? क्लेश आणि यातना भोगण्याचा प्रसंग मजवर कां यावा? या शंकेवर रामाचें उत्तर हें आहे कीं, स्वप्नांतील सर्व वस्तु आपणच बनत नाहीं का? स्वप्नामध्यें पर्वत, नद्या, अरण्यें, वाळवंटें, वगैरे जे जे नानातऱ्हेचे देखावे आपण पाहतो ते ते सर्व आपणच उत्पन्न करतों; आपल्या मनः-

कल्पनेचा तो सर्व खेळ असतो. पण अशा स्थितींतहि एखादा सिंह आपल्याला दिसला व तो आपल्याला खाऊन टाकूं लागला, एखादा साप येऊन आपल्याला चावला किंवा एखादें भूत पिशाच आपल्यासमोर उभें राहिलें म्हणजे आपण घाबरून जात नाहीं का ? पण वस्तुस्थिति पाहिली तर तो सिंह, तो साप, तें भूत किंवा पिशाच आपणच उत्पन्न केलेलें असतें, तें सर्व आपणच बनलेले असतों.

## मला सर्वांचें ज्ञान कां नाहीं ?

दुसऱ्या एका मनुष्यानें असा प्रश्न केला कीं 'मी जर ईश्वर आहें, तर सर्वांचें ज्ञान मला कां नाहीं ?' रामाचें नेहमींचें निक्षून सांगणें हेंच असतें कीं, 'तुम्ही ईश्वर आहां, दुसरे कोणी नाहीं.' व यामुळें सदरहू प्रश्न रामाला विचारण्यांत आला होता. पण यावर रामानें त्या मनुष्याला विचारलें कीं, 'मित्रा, तूं ईश्वर नाहींस तर कोण आहेस ?' यावर तो उत्तर देतो कीं, 'मी देह आहें.' 'ठीक आहे. तूं जर देह आहेस, तर तुझ्या डोकीवर केस किती आहेत तें सांग पाहूं ? हें डोकें तर तुझेंच आहे ना ?' यावर 'होय' म्हणून त्यानें उत्तर दिलें. 'तर मग तुझ्या डोक्यावर केंस किती आहेत, तें तुला सांगतां आलेंच पाहिजे. तुझ्या शरीरांत हाडें किती आहेत ? स्नायु किती आहेत ! तूं जें अन्न खातोस तें जातें कोठें ? आंतड्यांत, मूत्रपिंडांत कीं फुप्फुसांत ? तें जातें तरी कोठें ?' या मनुष्याला शरीररचनाशास्त्राचा गंधहि नसल्यामुळें त्याला या प्रश्नांना समर्पक उत्तर देतां आलें नाहीं. तेव्हां राम त्या मनुष्याला म्हणाला, 'तुझ्या डोक्यावर केंस किती आहेत, हें जरी तुला सांगतां आलें नाहीं, तरी ते तुझे आहेत हें खास. तुझ्या शरीरांत हाडें व स्नायु किती आहेत हें जरी तुला समजत नसलें तरी ते तुझे आहेत, यांत संशय नाहीं. आपण खाल्लेलें अन्न जातें कोठें आणि त्याची पुढें वाट लागते कशी, याचें तुला ज्ञान नसलें तरी तें अन्न तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणी खाल्लें नाहीं, यांत शंका नाहीं.' याच न्यायानें आकाशांत तारे किती आहेत, याची गणती तुमच्या बुद्धीला जरी करतां आली नाहीं, तरी ते तुमचे आहेत. इंग्लंडांत या वेळीं काय चाललें आहे, हें तुम्हांला कळलें नाहीं, तरी इंग्लंड तुमचें आहे. बुधग्रहावर काय स्थिति आहे,

याचें तुम्हांला ज्ञान नसलें तरीहि तो तुमचाच आहे. या सर्व गोष्टी तुम्हांला सांगतां आल्या नाहींत, एवढ्यानें त्या तुमच्या नाहींत असें ठरूं शकत नाहीं. सांगावयाचें कोणी ? जो मर्यादित असेल त्यानें हें सांगण्याचें काम करावें. या समोरच्या भिंतीवरील चित्र कोणाचें आहे, हें तुम्हांला सांगतां येईल. कारण, तें चित्र आपण नाहीं, तें चित्र व आपण भिन्न आहों, त्या चित्राचे आपण द्रष्टे आहों व तें चित्र ही दृश्यवस्तु आहे, हें तुम्ही जाणत आहां. या ठिकाणीं 'तुम्ही' याचा अर्थ 'भासमान होणारे तुम्हीं'-देह असा आहे. पण तें चित्र जर तुम्ही असाल, सर्व विश्व जर तुम्ही आहां, अनंत ब्रह्म जर तुम्ही आहां आणि तुमच्याशिवाय–तुह्मांला मर्यादित करणारी दुसरी वस्तुच जर या जगांत अस्तित्वांत नाहीं, तर तुमच्या संबंधानें कोण सांगणार ? तुमचें वर्णन कोण करणार ? अशा दृष्टीनें विचार केला म्हणजे पहाणें आणि सांगणें या गोष्टी अशक्य आहेत. तत्त्वतः तुमचें जें ब्रह्मस्वरूप त्या ठिकाणीं पहाणें आणि सांगणें या क्रिया जाऊन पोहोंचू शकत नाहींत. कोणतेहि शब्द आत्म्याचें वर्णन करतांना लंगडेच पडतात.*

## तुमचा धर्म कोणता ?

दुसऱ्या एका मनुष्यानें रामाला प्रश्न केला 'तुह्मी कोणत्यां धर्मांतील किंवा पंथांतील मनुष्य आहां ?' 'तुम्ही हिंदुधर्मांचे–ब्राह्मण आहां काय?' रामानें उत्तर दिलें 'नाहीं.' तुम्ही खिस्तीधर्मांचे किंवा यहुदी धर्मांचे आहां काय ?' यावरहि रामानें 'नाहीं' असा जबाब दिला. आणि याचें कारण असें आहे कीं, एखादी वस्तु 'माझी आहे' असें म्हणण्याला ती त्याच्या ताब्यांतील–मिळकतीसारखी असली पाहिजे. एखादी निर्जीव वस्तु एखाद्याची आहे, हें म्हणणें सयुक्तिक आहे. पण राम हा एखादी निर्जीव वस्तु खास नव्हे, कीं जी कोणाची तरी जिनगी होऊन वसावी ! तो एखादा पशु आहे, असेंहि ह्मणतां येणार नाहीं; तर मग तो अमक्याचा असें कसें म्हणतां येईल ? हें सर्व अफाट विश्व त्याचें आहे. अमेरिका रामाची आहे, राम तुमचा

*यतो वाचो निवर्तन्ते। अप्राप्य मनसा सह॥ तैत्तिरीय उपनिषद्, अनुवाक४.

आत्मा आहे. अमेरिका माझी आहे. एडवर्ड राजे माझे आहेत; *तुम्ही सर्व माझे आहां आणि भरतखंडहि माझेंच आहे. ख्रिस्तीधर्म, महंमदीधर्म, यहुदीधर्म, हिंदुधर्म, वेदान्त हे सर्व माझे आहेत.÷

क्षुद्र लोकांनीं पाहिजे तर आपलें स्वातंत्र्य विकावें; पण तुम्ही असा आत्मविक्रय करतां कामा नये. या देशांतील लोक मोठ्या प्रौढीनें सांगतात कीं, 'आम्ही स्वतंत्र आहों.' असतील! स्वतंत्र असतील. राजकीय दृष्ट्या अमेरिकेंतील लोक स्वतंत्र असतील; पण सामाजिक दृष्ट्या, आत्मदृष्ट्या ते गुलामगिरींत आहेत. ही केवढी शोचनीय स्थिति! राम तुम्हांला स्वातंत्र्य—स्वाधीनता देत आहे—कर्मस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य तुमच्यापुढें मांडीत आहे. राम जो स्वधर्म तुम्हांला सांगत आहे, त्या धर्माची वेदान्त म्हणून कांहीं लोक थट्टा करू पाहतात. 'हा काय पौर्वात्य धर्म! अर्थात्, यांत एवढें विशेष तें काय असणार!' अशी तुमची भावना असेल. पण वेदान्त ही केवळ वेदांमध्यें सांठवून ठेविलेली चीज आहे, असा गैरसमज करून घेऊं नका; तर वेदान्त तुमच्या अंतःकरणांत आहे. तसेंच राम एकट्या भरतखंडांतील आहे, असें समजूं नका, तर राम अमेरिकेंतीलहि आहे. राम हा अमुक एका धर्माचा किंवा पंथाचा गुलाम आहे, ही कल्पना डोक्यांतून काढून टाका. राम तुमचा आत्मा आहे—केवळ स्वातंत्र्य आहे.

## कांहीं चमत्कार करून दाखवा.

दुसरा एक मनुष्य रामाला म्हणाला, "अहो राजश्री! तुम्ही जर ईश्वर आहां, येशू ख्रिस्तासारखे आहां तर येशूनें शेंकडों चमत्कार करून दाखविले त्यांपैकीं एक तरी चमत्कार तुम्ही करून दाखवा पाहूं! असें कांहीं करून दाखवीत असाल तर आम्ही तुमच्यावर विश्वास ठेवूं." यावर रामानें उत्तर दिलें, "येशूनें चमत्कार दाखविले हें कबूल! असें असूनहि

* हल्लीं इंग्लंडच्या गादीवर पंचम जार्ज राजे आहेत.

÷ मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ।
नच मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् । गीता, अ. ९।४,५.

त्याच्या उपदेशाकडे कोणी लक्ष दिलें नाहीं; एवढेंच केवळ नव्हे तर त्याचे हालहाल होऊन, अंगाला खिळे टोंचले जाऊन देहान्त प्रायश्चित्त भोगण्याची त्याला पाळी आली! अशा स्थितींत कोणी चमत्कार करून दाखवल्यानें लोकांची त्याच्यावर श्रद्धा बसते, असें मानण्याला अगोदर काय आधार आहे?"

दुसरी गोष्ट अशी कीं, चमत्कारांत एवढें विशेष तें काय आहे? या शरीराकडून कांहीं अद्‌भुत कृत्यें घडलीं एवढ्यानें माझ्या ईश्वरत्वांत यत्किंचित् तरी भर कशी पडणार? हें शरीर मी नसून तुम्हां सर्वांचा आत्मा म्हणजे मी आहें; अशी स्थिति असल्यामुळें या शरीराकडून घडलेल्या चमत्कारांची ती किंमत काय? वास्तविक येशूनेंहि जे चमत्कार केले तेहि माझेच होत. परंतु या शरीराकडून तसल्या गोष्टी होऊं लागल्या तर या शरीराचें फाजील स्तोम तुह्मी माजवूं लागाल. परंतु तसें होणें तुमच्या खऱ्या हितास विघातक आहे. तुह्मी आपल्या हृदयस्थ आत्म्याचें—देवाचें परमात्मभावनेनें भजन करावें—त्याची उपासना करावी, हीच रामाची इच्छा आहे. आपल्या शरीरालाच देव मानूं नका. तुमच्यापुढें चमत्कारांची करामत दाखवून या शरीराचें महत्व तुमच्या मनावर स्थापित करावें—तुमच्यावर लादावें व तेणेंकरून तुमच्या अध्यात्मिक स्वातंत्र्यापासून तुह्मांला पराङ्मुख करावें, हा रामाचा हेतु नाहीं. तुमची स्वतंत्रता हिरावून पूर्वीच्या महात्म्यांनीं—साधूंनीं केलें त्याप्रमाणें या शरीराचे तुह्मांला गुलाम बनवावें, हें रामाला आपलें कर्तव्य वाटतां कामा नये. हें जगद्रूपी आश्चर्य—हा विलक्षण चमत्कार ज्या ईश्वरानें घडवून आणला तोच मी आहें. हें शरीर मी नव्हे. हें अखिल विश्व हाच माझा चमत्कार! हें चराचर हें ज्याचें कौशल्य किंवा ऐश्वर्य तोच मी आहें.

हिंदुस्थानांत हें शरीर ज्या घरांत राहात होतें त्या घरांत एक मुलगा राहात असे. रामाच्या नित्य सहवासांत राहणारा हा मुलगा एकदा त्या घराच्या उंच छपरावर चढून 'मी ईश्वर आहें, मी ईश्वर आहें,' असे शब्द उच्च स्वरानें उच्चारूं लागला. शेजारच्या घरांतील एक गृहस्थ त्याचें तें ओरडणें ऐकून त्याला म्हणाला, "कायरे पोरा! ही एवढी वटवट काय चालविली आहेस! काय म्हणतोस 'मी ईश्वर आहें'? तूं जर ईश्वर

असलास तर त्या छपरावर उभा राहून खालीं उडी मार पाहूं! तुझ्या तंगड्या दुखावल्या नाहींत, तर तूं ईश्वर आहेस असें आम्ही समजूं! पण जर का तुझा पाय मोडला तर याद राखून राहा, आम्ही तुला यथेच्छ चोप देऊं! ईश्वरासंबंधानें असें चटोरपणानें बोलतांना तुला कांहीं वाटत नाहीं?"

ईश्वरी प्रेमानें वेडा झालेला तो मुलगा यावर प्रत्युत्तरादाखल म्हणाला "हे माझ्या आत्म्या! उडी मारण्याला मी एका पायावर तयार आहें. सांगशील त्या खोल खड्डयांत उडी मारण्याला माझी तयारी आहे. मला बोट दाखव म्हणजे पाहिजे त्या समुद्रांत मी उडी मारतों. पण मेहेरबानी करून अगोदर मी नाहीं अशी जागा मला दाखव. कारण, ज्या जागेवर उडी मारावयाची, अर्थात् ज्या जागीं मी हल्लींच नाहीं, अशी जागा दाखवीपर्यंत मला उडी मारण्याला सांगण्याची तुझी कल्पना व्यर्थ आहे! माझें अस्तित्व–सत्ता ज्या ठिकाणीं नाहीं, अशी जागाच मुळीं नाहीं. मी सर्व देवांचा देव आहें. जो सर्वत्र व्यापून राहिला आहे, त्याला 'या ठिकाणीं उडी मार,' असें कसें सांगतां येणार? जो या ठिकाणीं आहे व त्या ठिकाणीं नाहीं, असला परिच्छिन्न–मर्यादित मनुष्य असेल त्यालाच एका ठिकाणाहून दुसरीकडे उडी मारतां येणें शक्य आहे."

हें त्या मुलाचें उत्तर ऐकून ज्या गृहस्थानें त्याला छपरावरून उडी मारण्याला सांगितलें होतें तो फिरून बोलला, "काय? तूं आपल्याला ईश्वर म्हणवितोस? तूं तर हें शरीर आहेत!" मुलगा म्हणाला, "हें शरीर म्हणजे मी नसून ती केवळ तुझ्या अज्ञानाची कल्पना आहे. तुझे सर्व प्रश्न आणि आक्षेप माझ्यापर्यंत–आत्म्यापर्यंत येऊन पोहोंचूं शकत नाहींत; तेहि सर्व तुझ्या कल्पनेचेच खेळ आहेत. तूं मला उडी मारण्याला सांगितलेंस, तें तुझ्या दृष्टीनें बरोबर असेल; परंतु सर्वव्यापी असें जें सत्तत्व तेंच मी, हा ज्याचा अनुभव त्यानें उडी मारणें शक्य आहे काय? मी सर्वत्र आहें; मी ज्या ठिकाणीं नाहीं; अशी जागाच मुळीं नाहीं." हाच न्याय सदर प्रश्नाला लागू पडतो. मी आत्मा एका शरीरांत असतों व दुसऱ्यांत नसतों तर या शरीरानें हवे ते चमत्कार करून दाखवून आपलें ईश्वरत्व स्थापित करणें बरोबर झालें असतें. परंतु वास्तविक

स्थिति अशी आहे कीं, यच्चयावत् शरीरें हीं माझींच आहेत, तीं अगोदरच मीं केलीं आहेत, मला त्यांत कांहीं करावयाचें नाहीं. तीं फक्त माझ्या सत्तेंत उत्पन्न झालेलीं आहेत, तीं मीं उत्पन्न केलीं आहेत, हें तत्त्व ओळखून त्यांचा सत्ताधीश व्हावयाचें आहे.

## वेदांसंबंधानें तुमचें काय ह्मणणें ?

दुसऱ्या एका मनुष्यानें रामाला असा प्रश्न केला कीं, 'वेदांसंबंधानें तुमचें काय ह्मणणें आहे ?' राम ह्मणाला, 'रसायनशास्त्राचा आपण ज्या दृष्टीनें विचार करतों त्याच दृष्टीनें आह्मी वेदांकडे पहातों.' वेदांवर आपला विश्वास आहे काय ?' असा त्या मनुष्यानें प्रश्न केला, तेव्हां राम ह्मणाला, मी वेद जाणतों, व तुह्मी त्यांचें अध्ययन करावें, अशी मी शिफारस करतों.' 'तर मग आह्मी ज्या बुद्धीनें बायबलचा विचार करतों त्याच बुद्धीनें वेदांचा विचार करावा, असेंच तुमचें ह्मणणें कीं नाहीं ?' राम ह्मणाला, 'नाहीं, तुह्मी बायबलची केवळ थट्टा चालविली आहे-तुम्ही त्याची धुळधाण मांडली आहे. अशा तऱ्हेनें वेदांची किंमत न करतां ग्रहज्योतिष किंवा रसायन या शास्त्रांच्या बाबतींत जी दृष्टि तुम्ही स्वीकारतां त्याच दृष्टीनें वेदांकडे पाहा. कांहीं हिंदुलोक केवळ अंधश्रद्धेनें प्रत्येक गोष्टीवर विश्वास ठेवतात; पण तसें न करतां प्रयोगानें-स्वानुभवानें पारखून त्यांतील सिद्धांत ग्रहण करा. रसायनशास्त्रांतील अमुक सिद्धांत लाव्हॉयसर* किंवा लीबिग+ यानीं स्थापित केला आहे, सबब तो खरा असला पाहिजे, असें तुह्मी कधीं मानीत नाहीं; तर स्वतः

*लाव्हॉयसरः—फ्रेंच रसायनशास्त्रवेत्ता (१७४३-१७९४) फ्रान्समधील 'शास्त्रीय शोधसदन' नामक संस्थेचा हा सभासद होता. फ्रान्समधील राज्यक्रान्तीच्या धामधुमींत यास फांशीं देण्यांत आलें.

+ लीबिगः—प्रख्यात जर्मन रसायनशास्त्रवेत्ता (१८०३-१८७३) यानें रसायनशास्त्राचा अभ्यास फ्रान्सची राजधानी पारिस येथें केला. तेथून परत आल्यानंतर गिसन येथील विश्वविद्यालयांत त्यानें अठ्ठावीस वर्षें रसायनशास्त्राच्या अध्यापकाचें काम केलें. त्यानें गिसन येथें एक मोठी रसायनप्रयोगशाला स्थापन केली.

प्रयोगानें त्याचा खरेखोटेपणा तपासून पाहतां; तीच पद्धति वेदांसंबंधानें स्वीकारा. केवळ अंधश्रद्धेनें कोणत्याहि गोष्टीवर विश्वास ठेवणें ही कांहीं खरी श्रद्धा नाहीं. असली श्रद्धा म्हणजे श्रद्धाच नव्हे. स्वतः प्रयोगानें—स्वानुभवानें—शास्त्रीय पद्धतीनें वेदांचे सिद्धान्त अनुभवाला पटवून घ्या. वेदांचें अध्ययन अशा दृष्टीनें करा म्हणजे त्यांतील मर्म तुमच्या लक्ष्यांत येईल, एरवीं येणार नाहीं. वेदांचे सिद्धान्त अशा मजबूत पायावर उभारले गेले आहेत कीं, तुह्मी कितीहि चिकित्सकबुद्धीनें त्यांच्याकडे पहा, ज्या ज्या शंका किंवा प्रश्न तुमच्या मनांत येतील ते ते सर्व घ्या; पाश्चात्य शास्त्रांच्या दृष्टीनें त्यांतील सिद्धान्तांचें निरीक्षण करा व तुमचा पाश्चात्य ( ज्ञानाचा ) प्रकाश ( प्रकाश नेहमीं पूर्वेकडून येतो हें लक्ष्यांत असूं द्या, पण पाश्चात्य प्रकाश आहे अशी कल्पना केली तर ) श्रुतिदेवीच्या दिव्य चेहऱ्यावर पडूं द्या, ह्मणजे या देवीच्या चेहऱ्यांत एकहि दोष किंवा खोड नाहीं, असेंच तुम्हाला दिसून येईल; वेद हे भौतिक शास्त्रांना बिलकुल विरोधी नाहींत. हल्लींचे तुमचे सर्व शास्त्रीय शोध आणि सुधारणा श्रुतिदेवीचें केवळ पादप्रक्षालन करीत आहेत—वेदान्ताच्या दिग्विजयाला अधिक मदत करीत आहेत.

आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं वेदांचा निर्विकारबुद्धीनें अभ्यास केला त्यांनीं त्यांनीं वेदांचीं स्तुतिस्तोत्रेंच गाइलीं आहेत. शोपेनहॉर * हा तत्त्ववेत्ता वास्तविक असा होता कीं, त्यानें आपल्या स्वतःच्या सिद्धांतांशिवाय इतर सिद्धान्तांना कधीं मानच देऊं नये; एवढेंच नव्हे तर एकंदर सर्व तत्त्वज्ञानावर ताशेरा झाडावा, असा ज्याचा नेहमींचा स्वभाव असला शोपेनहॉर वेदांसंबंधानें काय म्हणतो पहा:—" सर्व जगांतील वाङ्मयामध्यें उपनिषदांचें अध्ययन न करणें याच्याइतका हितावह आणि बुद्धीला

* शोपेनहॉरः-जर्मन तत्त्ववेत्ता. ( १७८८—१८६० ) जर्मनींतील प्रसिद्ध तत्त्ववेत्ता गटे व प्राच्यभाषाशास्त्रज्ञ फ्रेडरिक मेयर याच्या सहवासामुळें शोपेनहार याला पौर्वात्य तत्त्वज्ञानाची गोडी लागली. त्यानें उपनिषदांचें चांगलें अध्ययन केलें होतें.

उदात्तता देणारा दुसरा कोणताहि व्यासंग नाहीं. माझ्या जीवितक्रमांत मला समाधानी राखण्याला तोच कारण झाला आणि मृत्यूच्या वेळींहि मला शांति देण्याचें काम तोच करील." या उद्गारांसंबंधानें लिहितांना पंडित मॅक्समुल्लर * यांनीं असें लिहिलें आहेः–शोपेनहॉरसारख्या स्वतंत्र बुद्धीच्या तत्त्ववेत्त्याच्या शब्दांना कोणी पुष्टि देण्याची आवश्यकताच असेल तर ती देण्याचें काम करण्यास मी तयार आहें. जगांतील सर्व धर्मांचें जन्मभर परिशीलन केल्यानंतर माझेंहि मत शोपेनहॉर याच्याप्रमाणेंच झालें आहे; व मृत्यु सुखानें यावा, हेंच जर तत्वज्ञानाचें अंतिम साध्य असेल तर वेदान्त तत्वज्ञानाइतकें दुसरें कोणतेंहि तत्वज्ञान या कामीं उपयोगी नाहीं, हें मी प्रांजलपणें कबूल करतों.

## वेदान्त हिंदुस्थानापुरताच आहे.

दुसरा एक मनुष्य असें म्हणाला कीं, ' हें पहा, तुमचा वेदान्त हा फक्त हिंदुस्थानापुरताच आहे. जगांत सध्यां ज्या प्रश्नांचा विचार व्हावयाचा आहे ते फार महत्वाचे आणि मनोरंजक आहेत. आमचा ख्रिस्ती धर्म सर्व जगभर पसरला आहे व वेदान्त हा फक्त हिंदुस्थानापुरता संकुचित आहे; विद्वानांना तो मान्य असेल, पण सामान्य जनतेला त्याचा गंधहि नाहीं. यावर राम म्हणतो कीं, ख्रिस्ती धर्माचा पगडा खरोखर युरोपांतील सर्व राष्ट्रांतील जनतेच्या मनावर बसलेला असता तर गोष्ट निराळी होती, पण वस्तुस्थिति मात्र अगदीं भिन्न आहे. युरोप व अमेरिका या खंडांतील लोक ख्रिस्ताचे उपासक आहेत, असें म्हणतां येत नाहीं. देवापेक्षां ते देवळांचे उपासक आहेत, असें म्हणणें रास्त आहे. दुसरी गोष्ट अशी कीं,

* मॅक्समुल्लरः–प्राच्यभाषाकोविद व तुलनात्मक भाषाशास्त्रज्ञ ( १८२३-१९०० ) मॅक्समुल्लर यांचा जन्म जर्मनींत झाला. पण त्यांचा बहुतेक काल इंग्लंडमध्यें गेला. महाविद्यालयांत शिकत असतां बाप्प, शीलिंग वगैरे विद्वान् गुरूंच्या सहवासांत संस्कृत, तुलनात्मक भाषाशास्त्र वगैरे विषयांची त्यांच्या ठिकाणीं आवड उत्पन्न झाली. प्राच्य भाषा व धर्म या विषयांचें अध्ययन करून त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले. पूर्वेकडील धर्मग्रंथांच्या भाषांतराची जी प्रचंड माला 'सेक्रेड बुक्स ऑफ धि ईस्ट' या नांवानें प्रसिद्ध आहे, तिचें संपादकत्व मॅक्समुल्लर यांजकडेच होतें.

बहुजनसमाज खिस्ती धर्माप्रमाणें वागत आहे अशी तुमची समजूत असली तर तीहि चुकीची आहे. खरें पाहूं गेलें तर येशू खिस्ताच्या धर्मापेक्षां सैतानाच्या धर्माचा पगडा असणारे लोकच जास्त. व्यसनें, अनीति, पापाच्या वासना, द्वेष, मत्सर, कामक्रोधादि रिपूंचें प्राबल्य हा सैतानाचा धर्म होय व याच्याच अनुयायांची संख्या खऱ्या खिस्तानुयायांपेक्षां जास्त आहे.

आतां बहुमतासंबंधानें म्हणाल तर त्याचाहि विचार निराळा आहे. एकदा विलायतेंतील न्यायसभेंतील एका वक्त्याची भरसभेंत रेवडी उडविण्यांत आली. पण तेवढ्यानें कचरून जाण्याऐवजीं तो म्हणाला, 'तुमचें बहुमत असेल; पण नुसत्या मताधिक्यांत काय आहे ? मताधिक्याचा टेंभा मिरविण्यांत अर्थ नाहीं. त्या मतांच्या सत्यासत्यतेचा विचार केला पाहिजे. मताधिक्य हें कांहीं सत्याचें प्रमाण नव्हे !' कोपर्निकस * नांवाच्या ज्योतिषशास्त्रवेत्याचें मत 'पृथ्वी फिरते, सूर्य फिरत नाहीं!' असें होतें व ग्यालिलियो + हाहि याच मताचा अनुयायी होता. परंतु

---

* कोपर्निकसः—प्रशियन ज्योतिषशास्त्रवेत्ता. ( १४७३–१५४३ ) कोपर्निकस यानें खगोलज्योतिषाचें अध्ययन इटलीमध्यें केलें. व रोम येथील विश्वविद्यालयांत त्यानें गणित विषयाच्या अध्यापकाचें काम बरेच दिवस केलें.

× ग्यालिलियोः—ज्योतिषशास्त्रवेत्ता ( १५६४–१६४२ ) पिसा व पॅडुआ येथील विद्यालयांत ग्यालिलियो यानें गणिताच्यां अध्यापकाचें काम केलें. मेटियस नामक यंत्रशास्त्रज्ञानें दुर्बिणीचा शोध लावल्याचें ऐकून ग्यालिलियो यानें तींत आपल्या कल्पकतेनें सुधारणा केली व त्या दुर्बिणीच्या योगानें खगोलज्योतिषासंबंधानें नवे शोध लावले. चंद्रावर पर्वत आहेत, गुरुग्रहाच्या भोंवतीं चार उपग्रह आहेत, शुक्राला चंद्राप्रमाणें कला आहेत वगैरे गोष्टी त्यानें सिद्ध केल्या. सूर्य हा पृथ्वी भोंवती फिरत नाहीं, तर पृथ्वी ही सूर्याभोंवतीं फिरते, असें कोपर्निकसप्रमाणेंच त्याचें मत होतें. हें मत बायबलमधील सिद्धान्ताच्या विरुद्ध असल्यामुळें रोमच्या इन्क्विझिशन नामक संस्थेकडून त्याला अतिशय छळ सोसावा लागला. त्याला तुरुंगांत टाकण्यांत आलें व आपलें पृथ्वीच्या गतीसंबंधाचें मत साफ चुकीचें असल्याचा कबुलीजबाब द्यावा लागला, त्यानें त्याप्रमाणें कबुलीजबाब दिला, पण तसें केल्यानंतर लगेच आपल्या स्नेह्याकडे वळून तो हळूच बोलला 'कांहीं झालें तरी पृथ्वी फिरतेच !'

मताधिक्य त्याच्या विरुद्ध होतें व त्याचें एकट्याचें मत काय तें पृथ्वी फिरते असें होतें; सर्व जग त्याच्या विरुद्ध होतें. अशा स्थितींत त्या बापड्याच्या एका मताला कोण मानणार! परंतु त्या वेळीं लोकांचें कांहींहि मत असलें तरी दोन्ही मतांपैकीं खरें मत कोणतें, हें तुम्हांला आतां माहीतच आहे. मताची सत्यता ही मतसंख्येच्या न्यूनाधिक्यावर अवलंबून आहे, असें म्हणतां येईल काय! अर्थात् नाहीं. पूर्वीं एका काळीं रोमन क्याथोलिक पंथ सर्वत्र बहुमान्य होता; परंतु कांहीं दिवसांनीं लोकमत प्रॉटेस्टंट पंथाकडे झुकूं लागलें. एका काळीं खिस्ती धर्माचे फक्त अकराच अनुयायी होते. पुढें कालांतरानें ती स्थिति पालटून खिस्ती धर्मानुयायांची संख्या अतोनात वाढली. तात्पर्य, मतांचें न्यूनाधिक्य ही कांहीं महत्वाची बाब नव्हे. आमची वेदान्ताची उभारणी मजबूत पायावर झालेली आहे, सत्याचें अधिष्ठान हा आमचा जोरदार पाया आहे; व सत्याचा विजय झालाच पाहिजे!

## ख्रिस्ती राष्ट्रांची तेवढी उन्नति कां?

दुसरा एक मनुष्य म्हणाला, 'आमच्या उन्नतीचें बीज आमच्या खिस्ती धर्मांतच आहे. कारण, आजमितीस जगांतील सुधारणा आणि प्रगति यांच्या अग्रस्थानीं खिस्ती राष्ट्रेंच तेवढीं आहेत.' यावर राम त्या मनुष्याला उत्तर करतो, 'मित्रा, युरोप व अमेरिका हीं खंडें राजकीय आणि सामाजिक प्रगतींत हिंदुस्थान व चीन यांच्यापुढें आहेत, ही गोष्ट खरी; पण याचें कारण खिस्ती धर्म हें खास नव्हे. भलताच कार्यकारण संबंध जोडून अनुमान बांधणें हें रास्त नाहीं. जगांतील सर्व प्रगति आणि भौतिक सुधारणा यांचें श्रेय खिस्ती धर्माकडे आहे, अशी कल्पना केली तर ग्यालिलियो यानें पृथ्वी फिरते, सूर्य फिरत नाहीं, असा आपला शोध जेव्हां जगापुढें मांडला, तेव्हां खिस्तानुयायांकडून त्याचे कसे धिंडवडे निघाले, याचा विचार करा. ब्रूनो* याला तर प्रत्यक्ष

* ब्रूनो:—( १५६०--१६०० ) नेपल्सच्या राज्यांतील नोला नामक गांवीं ब्रूनो याचा जन्म झाला. तो डॉमिनिकन नामक ख्रिस्तीपंथाचा अनुयायी होता. रोमन कॅथोलिक पंथाचीं मतें त्याला न आवडल्यामुळें तो जीनिव्हा व नंतर फ्रान्समध्यें गेला. ॲरिस्टॉटल नामक तत्त्ववेत्त्याच्या मतांचें

जाळण्यांत आलें. त्याला कोणीं जाळलें ! अर्थात् ख्रिस्ती ह्मणविणारांनीं ! याचप्रमाणें हक्स्ले* स्पेन्सर + डार्विन ० यांनाहि ख्रिस्ती धर्माचा विरोध सहन करावा लागला. त्यांचे शोध, प्रगति आणि त्यांच्या ठिकाणचा करारीपणा यांचा उगम ख्रिस्ती धर्मापासून आहे किंवा निदान ख्रिस्ती धर्मानें त्यांना उत्तेजन दिलें असेंहि ह्मणतां येत नाहीं. एवढेंच केवळ नव्हे तर जे शास्त्रीय शोध आजपर्यंत टिकाव धरून राहिले आहेत ते ख्रिस्ती धर्माच्या विरोधाला न जुमानतां राहिले आहेत. शोपेनहॉर-सारख्या तत्त्ववेत्याची काय स्थिति झाली, हें तुम्हांला माहीत आहे. ख्रिस्तासारखीच जवळजवळ त्याची स्थिति झाली. येशु ख्रिस्ताला आपल्या मतांकरितां देहान्त प्रायश्चित भोगावें लागलें, तर शोपेनहार

---

खंडण करण्याचें काम त्यानें आरंभिल्यामुळें तो लोकांच्या डोळ्यांवर आला. व स्वसंरक्षणासाठीं त्याला इंग्लंडांत पळ काढावा लागला. तेथें कांहीं दिवस राहिल्यानंतर तो इटलीमध्यें आला. पॅड्युआ येथें त्याला पकडण्यांत येऊन रोम येथील पाद्री मंडळाकडून त्याला जाळण्यांत आलें !

* हक्स्लेः–इंग्रजी प्राणिशास्त्रवेत्ता (१८२५–१८९५) तत्वज्ञान व धर्मशास्त्र यांची आवड त्याला लहानपणापासून लागली होती व या विषयांवर त्याचा व्यासंग शेवटपर्यंत होता. ख्रिस्ती धर्मातील अंधश्रद्धेचें मत त्याला बिलकुल मान्य नव्हतें. ईश्वराच्या अस्तित्वासंबंधानें त्याचीं मतें नास्तिकवाद व अज्ञेयवाद यांच्यामध्यें हेलकावे खात होतीं.

+ हर्बर्ट स्पेन्सरः–प्रख्यात इंग्रजी तत्त्ववेत्ता ( १८२०-१९०३ ) स्पेन्सर हा जाडा ग्रंथकार असून समाजशास्त्र, नीतिशास्त्र वगैरे अनेक विषयांवर त्यानें ग्रंथ लिहिले आहेत. जगाच्या बुडाशीं–त्याला अधिष्ठानभूत असें कांहीं तरी सत्तत्त्व असलें पाहिजे; परंतु त्याचें स्वरूप काय आहे, हें जाणणें मनुष्याच्या शक्तीच्या पलीकडे आहे असें त्याचें म्हणणें आहे. यालाच अज्ञेयवाद म्हणतात.

० डार्विनः–प्रख्यात इंग्रजी सृष्टिशास्त्रवेत्ता ( १८०९–१८८२ ) डार्विन यानें अनेक ग्रंथ लिहिले; त्यांत 'प्राण्यांच्या उत्पत्तीसंबंधाचें तत्त्व' या नांवाचा त्याचा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. उत्क्रान्तिवादाचें तत्त्व डार्विन यानें या ग्रंथांत सिद्ध केलें आहे.

त्याला लोकविरोधाच्या कैचींत राहून कसेबसे दिवस काढावे लागले; व अशा रीतीनें जगणें हें आपल्या मतांकरितां देह समर्पण करण्याचें दुःख सोसण्यापेक्षां कितीतरी पटीनें कठीण आहे. खिस्ती धर्मांच्या विरोधामुळें शोपेनहॉर याचा बाणेदारपणा खचून गेला व ग्रंथकर्तृत्वाच्या आरंभींच्या काळीं त्याच्या लेखांत दिसून येणारें तेज आणि जोरदारपणा हीं त्याच्या पुढील ग्रंथांत दृष्टीस पडत नाहींत. हेगेल१ व कॅन्ट× यांच्या तत्त्वज्ञानांत जो दुबळेपणा दिसून येतो त्याचेंहि कारण झालें तरी खिस्ती धर्मांचा विरोध हेंच होय. फिस्टे० नामक तत्त्ववेत्त्याला आपल्या अध्यापकाच्या जागेवर पाणी सोडावें लागलें, इतकेंच नव्हे तर त्याला देशांतून हद्दपार करण्यांत आलें; हा सर्व कशाचा परिणाम ? अर्थात् खिस्ती धर्मांचा. सारांश, पहिल्यापासून जी जी सुधारणा आणि प्रगति झालेली आहे ती ती सर्व खिस्तीधर्मांच्या हल्ल्यांना न जुमानतां झालेली आहे. हें लक्ष्यांत ठेवा; व भलत्याच कल्पनेचा अंगिकार करूं नका.

एकदा एक आंग्ल–आर्य गृहस्थ पुष्कळ दिवस हिंदुस्थानांत राहून नंतर स्वदेशीं परत गेला. विलायतेंत गेल्यावर हिंदुस्थानांत आपण केलेली

---

१ हेगेल:—जर्मन तत्त्ववेत्ता ( १७७०-१८३१ ) कॅन्ट याच्या मतांचें समर्थन हेगेल यानें आपल्या ग्रंथांत फार जोरदारपणानें केलें. त्यानें ' तत्त्वज्ञानाचा इतिहास, ' ' इतिहासाचें तत्त्वज्ञान, ' ' धर्मांचें तत्त्वाज्ञान, ' वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

×कॅन्ट:—जर्मन तत्त्ववेत्ता ( १७२४–१८०४ ) कॉनिंग्सबर्ग येथील विद्यालयांतील अध्यापकाच्या जागेवर त्याची १७७० मध्यें नेमणूक झाली व १७८६ मध्यें त्याला त्या विश्वविद्यालयाचा मुख्य अधिकारी करण्यांत आलें.

० फिख्टे:—जर्मन तत्त्ववेत्ता ( १७६२–१८१४ ) विटेंबर्ग व लिप्झिक येथें अध्ययन करून कॉनिंग्सबर्ग येथील एका गृहस्थाच्या घरीं शिक्षक या नात्यानें तो राहिला होता. त्या ठिकाणीं राहात असतां कॅन्ट नामक प्रख्यात तत्त्ववेत्त्याची व त्याची गांठ पडली व त्या दोघांमध्यें स्नेहभाव उत्पन्न झाला. कॅन्टच्या तत्त्वज्ञानाचा तो पक्का अनुयायी बनला. पुढें जेन्ना येथील विद्यालयांत फिख्टे हा अध्यापक म्हणून काम करीत असतां त्याचीं मतें नास्तिकवादाकडे झुकूं लागलीं. यामुळें तेथील जागा सोडून त्याला बर्लिन येथें जावें लागलें.

जाळण्यांत आलें. त्याला कोणीं जाळलें ? अर्थात् ख्रिस्ती ह्मणविणारांनीं ! याचप्रमाणें हक्स्ले* स्पेन्सर + डार्विन ० यांनाहि ख्रिस्ती धर्माचा विरोध सहन करावा लागला. त्यांचे शोध, प्रगति आणि त्यांच्या ठिकाणचा करारीपणा यांचा उगम ख्रिस्ती धर्मापासून आहे किंवा निदान ख्रिस्ती धर्मानें त्यांना उत्तेजन दिलें असेंहि ह्मणतां येत नाहीं. एवढेंच केवळ नव्हे तर जे शास्त्रीय शोध आजपर्यंत टिकाव धरून राहिले आहेत ते ख्रिस्ती धर्माच्या विरोधाला न जुमानतां राहिले आहेत. शोपेनहॉर-सारख्या तत्त्ववेत्त्याची काय स्थिति झाली, हें तुम्हांला माहीत आहे. ख्रिस्तासारखीच जवळजवळ त्याची स्थिति झाली. येशु ख्रिस्ताला आपल्या मतांकरितां देहान्त प्रायश्चित भोगावें लागलें, तर शोपेनहार

---

खंडण करण्याचें काम त्यानें आरंभिल्यामुळें तो लोकांच्या डोळ्यांवर आला. व स्वसंरक्षणासाठीं त्याला इंग्लंडांत पळ काढावा लागला. तेथें कांहीं दिवस राहिल्यानंतर तो इटलीमध्यें आला. पॅडयुआ येथें त्याला पकडण्यांत येऊन रोम येथील पाद्री मंडळाकडून त्याला जाळण्यांत आलें !

* हक्स्लेः-इंग्रजी प्राणिशास्त्रवेत्ता (१८२५-१८९५) तत्वज्ञान व धर्मशास्त्र यांची आवड त्याला लहानपणापासून लागली होती व या विषयांवर त्याचा व्यासंग शेवटपर्यंत होता. ख्रिस्ती धर्मांतील अंधश्रद्धेचें मत त्याला बिलकुल मान्य नव्हतें. ईश्वराच्या अस्तित्वासंबंधानें त्याचीं मतें नास्तिकवाद व अज्ञेयवाद यांच्यामध्यें हेलकावे खात होतीं.

\+ हर्बर्ट स्पेन्सरः-प्रख्यात इंग्रजी तत्त्ववेत्ता ( १८२०-१९०३ ) स्पेन्सर हा जाडा ग्रंथकार असून समाजशास्त्र, नीतिशास्त्र वगैरे अनेक विषयांवर त्यानें ग्रंथ लिहिले आहेत. जगाच्या बुडाशीं-त्याला अधिष्ठानभूत असें कांहीं तरी सत्तत्त्व असलें पाहिजे; परंतु त्याचें स्वरूप काय आहे, हें जाणणें मनुष्याच्या शक्तीच्या पलीकडे आहे असें त्याचें म्हणणें आहे. यालाच अज्ञेयवाद म्हणतात.

० डार्विनः-प्रख्यात इंग्रजी सृष्टिशास्त्रवेत्ता ( १८०९-१८८२ ) डार्विन यानें अनेक ग्रंथ लिहिले; त्यांत 'प्राण्यांच्या उत्पत्तीसंबंधाचें तत्त्व' या नांवाचा त्याचा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. उत्क्रान्तिवादाचें तत्त्व डार्विन यानें या ग्रंथांत सिद्ध केलें आहे.

याला लोकविरोधाच्या कैचींत राहून कसेबसे दिवस काढावे लागले; व अशा रीतीनें जगणें हें आपल्या मतांकरितां देह समर्पण करण्याचें दुःख सोसण्यापेक्षां कितीतरी पटीनें कठीण आहे. ख्रिस्ती धर्माच्या विरोधामुळें शोपेनहॉर याचा याणेदारपणा खचून गेला व ग्रंथकर्तृत्वाच्या आरंभींच्या काळीं त्याच्या लेखांत दिसून येणारें तेज आणि जोरदारपणा हीं त्याच्या पुढील ग्रंथांत दृष्टीस पडत नाहींत. हेगल१ व कॅन्ट× यांच्या तत्त्वज्ञानांत जो दुबळेपणा दिसून येतो त्याचेंहि कारण झालें तरी ख्रिस्ती धर्माचा विरोध हेंच होय. फिख्टे० नामक तत्त्ववेत्त्याला आपल्या अध्यापकाच्या जागेवर पाणी सोडावें लागलें, इतकेंच नव्हे तर त्याला देशांतून हद्दपार करण्यांत आलें; हा सर्व कशाचा परिणाम ? अर्थात् ख्रिस्ती धर्माचा. सारांश, पहिल्यापासून जी जी सुधारणा आणि प्रगति झालेली आहे ती ती सर्व ख्रिस्तीधर्माच्या हल्ल्यांना न जुमानतां झालेली आहे. हें लक्ष्यांत ठेवा; व भलत्याच कल्पनेचा संगिकार करूं नका.

एकदा एक आंग्ल–आर्य गृहस्थ पुष्कळ दिवस हिंदुस्थानांत राहून नंतर स्वदेशीं परत गेला. विलायतेंत गेल्यावर हिंदुस्थानांत आपण केलेली

---

१ हेगेल:—जर्मन तत्त्ववेत्ता ( १७७०-१८३१ ) कॅन्ट याच्या मतांचें समर्थन हेगेल यानें आपल्या ग्रंथांत फार जोरदारपणानें केलें. त्यानें ' तत्त्वज्ञानाचा इतिहास, ' ' इतिहासाचें तत्त्वज्ञान, ' ' धर्माचें तत्त्वाज्ञान, ' वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

×कॅन्ट:—जर्मन तत्त्ववेत्ता ( १७२४–१८०४ ) कॉनिंग्सबर्ग येथील विद्यालयांतील अध्यापकाच्या जागेवर त्याची १७७० मध्यें नेमणूक झाली व १७८६ मध्यें त्याला त्या विश्वविद्यालयाचा मुख्य अधिकारी करण्यांत आलें.

० फिख्टे:—जर्मन तत्त्ववेत्ता ( १७६२–१८१४ ) विटेंबर्ग व लिप्झिक येथें अध्ययन करून कॉनिंग्सबर्ग येथील एका गृहस्थाच्या घरीं शिक्षक या नात्यानें तो राहिला होता. त्या ठिकाणीं राहात असतां कॅन्ट नामक प्रख्यात तत्त्ववेत्त्याची व त्याची गांठ पडली व त्या दोघांमध्यें स्नेहभाव उत्पन्न झाला. कॅन्टच्या तत्त्वज्ञानाचा तो पक्का अनुयायी बनला. पुढें जेव्हा येथील विद्यालयांत फिख्टे हा अध्यापक म्हणून काम करीत असतां त्यांचीं मतें नास्तिकवादाकडे झुकूं लागलीं. यामुळें तेथील जागा सोडून त्याला बर्लिन येथें जावें लागलें.

कामगिरी, आपलें शौर्य, धैर्य यांच्याबद्दलची तारीफ तो आपल्या बायको-पाशीं करीत असे. तो एका खेड्यांत राहात होता. एकदा अशी स्थिति झाली कीं, एक अस्वल त्याच्या घरानजीक येऊन ठेपलें. अस्वलाला पहातांच हे राजश्री घाईघाईनें एका जवळच्या झाडावर जाऊन बसले. पण त्याच्या बायकोनें एक शस्त्र घेऊन त्या अस्वलाला ठार मारलें. तेव्हां कांहीं वेळानें यजमानांची स्वारी झाडावरून खालीं उतरली. ही अस्व-लाची गडबड ऐकून शेजारचे बरेच लोक त्या ठिकाणीं जमा झाले. कांहीं जणांनीं त्या गृहस्थाला विचारलें, ' या अस्वलाला मारलें कोणी ? ' तेव्हां तो गृहस्थ ह्मणाला, ' मी आणि माझ्या बायकोनें !' आतां खरोखर तशी स्थिति होती काय ? नाहीं, मुळींच नाहीं. या न्यायानें एखादी गोष्ट होऊन गेली म्हणजे मग ती मीं केली किंवा ख्रिस्ती धर्मानें केली, असें म्हणणें सोपें आहे; पण वस्तुस्थिति मात्र निराळी आहे.

## वेदांताचा अप्रत्यक्ष परिणाम.

युरोप व अमेरिका या खंडांतील सर्व सुधारणा, भौतिक शास्त्रांतील झाडून सर्व शोध, तसेंच तत्त्वज्ञानांतील प्रगति म्हणजे वेदान्तरहस्यें प्रत्यक्ष कृतींत उतरण्याचा परिणाम होय. वेदान्त याचा अर्थ स्वातंत्र्य–जडाच्या पलीकडे जाऊन पोहोंचणें असा आहे. अर्थात् हे सर्व शोध, ही प्रगति, स्वातंत्र्यबुद्धीची–स्वाधीनतेची–केवळ शारीरिक गरजा आणि आवश्यकता यांच्या अतीत स्थितीची दर्शक होय. ही सर्व प्रगति अजाणतां वेदान्त अंमलांत आल्यामुळें झालेली आहे, मग तुह्मीं पाहिजे तर याला खरा ख्रिस्तीधर्म असेंहि ह्मणा. खरा ख्रिस्ती धर्म हा वेदान्ताहून भिन्न नाहीं. इकडचे लोक नेहमीं म्हणतात कीं, ' आम्ही जगांतून गुलामगिरीचें उच्चाटन केलें व अनेक सुधारणा घडवून आणल्या. ' यावर राम म्हणतो, ' तसें खरोखर झालें असतें तर ती कितीतरी चांगली गोष्ट होती ! ' पण या लोकांचें म्हणणें क्षणभर कबूल केलें आणि गुलामगिरीला जगांतून फांटा मिळाला आहे, असें मान्य केलें तरी ही स्थिति ख्रिस्ती धर्मामुळें झाली, असें म्हणतां येत नाहीं. गुलामगिरी नाहींशी व्हावी, असा ख्रिस्ती धर्माच्या अंगांत कांहीं अजब गुण असता, तर पूर्वींच्या सतराशें वर्षांत तो कां प्रगट झाला नाहीं ? अर्थात् या विधानांत मुळींच तथ्य नाहीं.

गुलामगिरी नाहींशी झाली, ही गोष्ट खरी; पण त्याचें कारण निराळेंच आहे. तें कारण म्हणजे अमेरिकेंत युरोपियन लोक येऊन राहूं लागले, त्याचा इतर राष्ट्रांशीं परिचय वाढूं लागला, त्यांचीं मनें उदार व संस्कृत होऊं लागलीं हेंच होय. वेदान्त व्यवहारांत आणण्याचाच हा परिणाम होय. यामुळें-या प्रवृत्तिपर वेदान्तामुळें गुलामगिरीला फांटा मिळाला, ख्रिस्ती धर्मामुळें नव्हे! आपल्या राजकीय व सामाजिक परिस्थितीमुळें लोकांचीं अंतःकरणें जागृत झालीं, यामुळें अशी स्थिति झाली. सर्व चांगल्या गोष्टींचें श्रेय ख्रिस्तीधर्माकडे द्यावयाचें तर ० इन्क्विझिशनसारख्या जुलुमी संस्था, चेटक्यांना जाळणें, गिलोटिनवर* चढावणें, असले अनन्वित प्रकार युरोपांत एके काळीं राजरोसपणें चालू होते, यांचाहि दोष ख्रिस्ती धर्माच्या माथीं लादावयास नको काय? प्रत्यक्ष सान्फ्रान्सिस्को येथेंहि हे सर्व प्रकार एके काळीं चालू होते. केवढी ही भयंकर स्थिति! पण असल्या अमानुष प्रकारांसंबंधानें विवेचन करणें रामाला प्रशस्त वाटत नाहीं.

---

० इन्क्विझिशन: या शब्दाचा मूळ अर्थ गुन्ह्याची चौकशी; शोध करणें असा आहे. पुढें हा शब्द रोमन कॅथोलिक धर्मगुरूंनीं स्थापन केलेल्या न्यायासनास लावण्यांत येऊं लागला. धर्मद्वेष्ट्या मनुष्यांना देहान्तप्रायश्चित्त देण्याचा सपाटा युरोपांत चवथ्या शतकापासून चालू असे. व पुढें बाराव्या शतकापासून तर या चौकशीच्या पद्धतीस विशेषस्वरूप येऊं लागलें. फ्रान्स, स्पेन, इटली, जर्मनी वगैरे देशांत या संस्थेनें बरेच दिवस मोठा धुमाकुळ माजविला होता. हें न्यायासनाचें जुलुमी काम ख्रिस्ती धर्मगुरूंच्या हातीं असे व या ठिकाणीं होणारी गुन्हेगारांची चौकशी अत्यंत गुप्तपणें चाले. अठराव्या शतकापासून या अरेरावीस आळा पडत चालला. या इन्क्विझिशनच्या अरेरावीमुळें शेंकडों निरपराधी लोकांनाहि फांशीं देण्यांत आलें.

* गिलोटिन फ्रान्समध्यें पूर्वीं उपयोगांत असलेलें गुन्हेगारांस ठार मारण्याचें एक यंत्र. ज्या गुन्हेगारास देहान्तप्रायश्चित्ताची शिक्षा देण्यांत आली असेल त्याला लांकडाच्या चौकटींत उभा करून त्याच्या मानेवर एक करवतीसारखें पण अतिशय वजनदार असें शस्त्र वरून पडावें व त्यामुळें त्या मनुष्याचा शिरच्छेद व्हावा, अशी योजना सदरहू यंत्रांत केलेली असे. डॉ. गिलोटिन या नांवाच्या मनुष्यावरून सदर यंत्रास गिलोटिन हें नांव देण्यांत आलें होतें.

रामाला विचारण्यांत आलेल्या बाकीच्या प्रश्नांचा विचार आज केला जाणार नाहीं. पुढें केव्हां तरी त्यांचा विचार करण्यांत येईल.

## हिंदुस्थानची राजकीय अधोगति कां ?

दुसरा एक प्रश्न असा आहे कीं, हिंदुस्थानची स्थिति राजकीय दृष्ट्या अधोगतीची कां ? आक्षेपकांचें म्हणणें हें कीं, हिंदुस्थानची स्थिति खालावण्याचें कारण वेदान्त होय. पण वस्तुस्थिति याच्या उलट आहे. रामानें तुम्हांला पूर्वीं सांगितलें आहे कीं, तो सर्व राष्ट्रांमधील आहे, त्याचें सर्वांवर सारखें प्रेम आहे; राम हा येथें हिंदुस्थानांतील एक मनुष्य, हिंदु किंवा वेदान्ती अशा नात्यानें आलेला नाहीं; राम म्हणजे राम--सर्वव्यापी--अशा नात्यानें येथें आलेला आहे. हिंदुस्थानातील किंवा अमेरिकेंतील लोकांची खुषामत करावी, हा रामाचा हेतु नाहीं. हिंदुस्थान, अमेरिका किंवा दुसरें कांहीं यांच्या आधारावर राम अवलंबून नाहीं. सत्य, केवळ सत्य हेंच एक रामाचें अधिष्ठान आहे, आणि त्याला जें कांहीं बोलावयाचें तें तो सत्याव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याहि पायावर उभें राहून बोलत नाहीं. कोणाचींहि स्तुतिस्तोत्रें गाण्याचें त्याला कारण नाहीं. पण वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, हिंदुस्थानांतील जनतेच्या मनावर जोंपर्यंत वेदान्ताचा पगडा होता, तोंपर्यंत तो देश ऐश्वर्यसंपन्न होता; त्याची छाप सर्वत्र होती, व सुधारणेच्या उच्च शिखरावर तो आरूढ झालेला होता. पण पुढें कालमानानें वेदान्त हा एका विशिष्ट वर्गाच्या हातीं राहिला, व त्याचा प्रसार जनतेमध्यें करण्यांत आला नाहीं. अशी स्थिति जेव्हां झाली, तेव्हांपासून हिंदुस्थानच्या अपकर्षास प्रारंभ झाला. जनतेमध्यें वेदान्ताचा प्रसार करण्यांत आला नाहीं, इतकेंच नव्हे तर स्थिति अशी झाली कीं, 'मी तुझा गुलाम आहें, हे ईश्वरा ! मी तुझा गुलाम आहें,' ही लोकांची धर्मश्रद्धा होऊन बसली. हा धर्म युरोपांतून इकडे आला. हें विधान तत्त्ववेत्ते व इतिहासकार म्हणविणारांना मोठें चमत्कारिक वाटेल; युरोपांतील लोकांना हें ऐकून आश्चर्य वाटेल. पण हें जें विधान राम करीत आहे, तें कांहीं तो अविचारीपणानें करीत नाहीं; एवढेंच नव्हे तर तें गणितशास्त्रांतील सिद्धान्ताप्रमाणें सप्रमाण सिद्ध करतां येण्यासारखें आहे. आपल्या आत्म्याला कमी किंमतीचें क्षुद्र लेखून आपण किडे, पृथ्वीवर सरपटणारे क्षुद्र जंतु, दुबळे प्राणी, गुलाम,

पापी असें मानणारा हा धर्म-गुलामगिरीचा धर्म हिंदुस्थानांत बाहेरून आणण्यांत आला व देशांतील बहुजनसमाजानें जेव्हां त्या धर्माचा अंगिकार केला, तेव्हांपासून हिंदुस्थानच्या नष्टचर्यास सुरवात झाली. युरोपांतील लोकहि ईश्वराची प्रार्थना करतांना असेंच म्हणतात कीं, 'हे ईश्वरा! आम्ही तुझे बंदे गुलाम आहों;' मग अशी स्थिति असतांहि हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणें राजकीय व सामाजिक दृष्ट्या युरोपांतील लोकांची तेवढी अधोगति कां झाली नाहीं? असा प्रश्न साहजिकपणेंच उद्भवतो. याचें उत्तर देण्यासाठीं राम एक गोष्ट सांगत आहे. सृष्टिशास्त्रवेत्ते व उत्क्रान्तितत्त्ववादी सदरहू गोष्टीचा अनुवाद नेहमीं करीत असतात. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, जीवनकलहांत जे वास्तविकरीत्या जगण्याला-टिकाव धरून राहाण्याला योग्य नसतात, तेच कित्येक प्रसंगीं जगतात; म्हणजे दुर्बलता हीहि केव्हां केव्हां जीवनकलहांत टिकाव धरण्याला कारणीभूत होते.

एकदा पुष्कळसे टोळ एका दिशेनें जात होते. त्यांपैकीं कांहींना आजार होऊन त्यांचे पंख गळाल्यामुळें ते खालीं पडले. व बाकीचे तसेच पुढें उडून गेले; परंतु पुढें जातां जातां एका टेंकडीवर ते जाऊन पोहोंचले; त्या ठिकाणीं एक वणवा पेटलेला असून त्यांत सर्व टोळ सांपडून जळून खाक झाले. या ठिकाणीं जे दुबळे होते ते वांचले, व जे सशक्त होते तेच मृत्युमुखीं पडले!

हिंदुस्थानांतील लोक जेव्हां एखादी गोष्ट बोलून दाखवितात तेव्हां त्याबरहुकूम वागण्याचा त्यांचा निश्चय असतो. ईश्वराची प्रार्थना करतांना जेव्हां ते म्हणत कीं, 'हे ईश्वरा, मी पापी आहें. दुर्दैवी आहें, तुझा बंदा गुलाम आहें,' तेव्हां त्यांची भावना खरोखरच तशी होती; तें नुसतें तोंडदेखलें बोलणें नव्हतें. बहुजनसमाजाच्या अंतःकरणांतून अशा तऱ्हेची प्रार्थना जेव्हां निघूं लागली, तेव्हां कर्मतत्त्वाप्रमाणें-कर्माच्या सक्त व दुर्लंघ्य सिद्धान्ताप्रमाणें-आपल्या भावना फलद्रूप झालेल्या आहेत, असें प्रत्यक्ष पाहण्याची त्यांना वेळ आली. आतां ही निकृष्ट स्थिति ईश्वरानें उत्पन्न केली, असें कदाचित् तुम्ही म्हणाल; पण ईश्वराला काय हातपाय आहेत कीं त्याला कांहीं आकार आहे? अर्थात्, ही स्थिति हिंदुस्थानांतील लोकांच्या कर्मानें ओढवली; त्याबद्दल ईश्वराला दोष देणें गैरशिस्त आहे.

हिंदुस्थानांतील स्थिति तुम्ही स्वतः जाऊन पाहा, म्हणजे रामाचें म्हणणें तुम्हांला पटेल. अमका स्वामी असें म्हणतो, अमक्या साधूचें असें मत आहे, असा अंध विश्वास ठेवलात तर तुमचा गैरसमज होण्याचा संभव आहे. हिंदुस्थानच्या अधोगतीचें मूळ वेदान्तांत नसून वेदान्त कल्पनांच्या ऱ्हासांत—लोकांच्या अज्ञानांत आहे. आतां हिंदुस्थानांतील लोकांची तेवढी अवनति व्हावी, व युरोपांतील लोक आपणांस ईश्वराचे गुलाम म्हणवीत असूनहि त्यांची भरभराट व्हावी असें कां ? याचें उत्तर हें कीं, युरोपांतील लोक धर्मापेक्षां धनाला अधिक मान देतात. आरंभीं सांगितल्याप्रमाणें ईश्वर म्हणजे एक अलंकार, फार तर आपलें घरकाम करणारा एक नोकर, अशासारखी इकडील लोकांची दृष्टि आहे. धर्म ही आपल्या दिवाणखान्यांतील एखादें चित्र किंवा तसबीर यांच्याप्रमाणें शोभा आणणारी एक चीज, अशी इकडच्या लोकांची समजूत आहे. 'हे ईश्वरा, मी तुझा गुलाम आहें,' अशी वरकरणी ईश्वराची लोक प्रार्थना करीत; पण आपणांस ऐहिक ऐश्वर्य मिळावें, अशी त्यांची अंतःकरणांतून निघणारी प्रार्थना असे; व कर्मसिद्धान्ताप्रमाणें याचा परिणाम युरोपांतील लोकांना इष्ट तो झाला व ते लोक संपत्तीच्या, वैभवाच्या शिखरावर जाऊन पोहोंचले. आणि जोंपर्यंत हिंदुस्थानांतील बहुजनसमाजाच्या बुद्धीवर वेदान्ताचा पगडा होता तोंपर्यंत तेहि भरभराटीच्या स्थितींत होते, ही गोष्ट इतिहासावरून सिद्ध होत आहे.

असें पहा, फोनिशियन लोक मोठे बलाढ्य होते, पण हिंदुस्थानावर स्वारी करून त्यांना तो देश जिंकून घेतां आला नाहीं. इजिप्शियन लोकहि पराक्रमानें कमी नव्हते; पण हिंदुस्थानाला पादाक्रांत करून टाकण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नव्हतें. इराणचें राष्ट्रहि एका कालीं प्रबल होतें, पण त्यांच्यांतहि हिंदुस्थानाकडे वक्रदृष्टीनें पाहण्याची ताकद नव्हती. सर्व जगाला आपल्या निशाणाखालीं आणणारे एवढे विक्रमशाली सर्वविश्रुत रोमन बादशहा, पण त्यांचाहि पगडा हिंदुस्थानावर बसलेला नव्हता. ग्रीक लोकांनीं आपलें ऐश्वर्य शतकेंच्या शतकें गाजविलें, पण हिंदुस्थानाकडे वांकड्या नजरेनें नुसतें पाहण्याचीहि शक्ति त्यांच्यांत नव्हती. पुढें शिकंदर 'पराक्रमी शिकंदर' असें भलतेंच नामाभिधान ज्याला दिलें जातें तो—

हिंदुस्थानांत आला. या वेळीं भरतखंडांतील जनतेमधील वेदान्ताचें तेज मावळून गेलें नव्हतें; अशा स्थितींत ज्यानें सर्व ज्ञात जगाला पादाक्रान्त केलें, सर्व इराणी व इजिप्शियन सैन्य ज्यानें आपल्या हुकमतींत ठेवलें, अशा त्या शिकंदरानें हिंदुस्थानावर स्वारी केली; पण पोरस नांवाच्या एका सामान्य राजानें त्याला पूर्णपणें चीत करून सैन्यासह पळावयास लावलें. हें कसें झालें ? असें तुम्ही म्हणाल; तर त्याचें उत्तर हें कीं, त्या वेळीं वेदान्ताची छाप जनतेवर कायम होती. या गोष्टीचें प्रत्यंतर पाहिजे असल्यास त्या वेळच्या ग्रीक लोकांनीं इतिहासांत काय लिहून ठेविलें आहे, स्वतः शिकंदराच्या बरोबरच्या लोकांनीं काय उद्गार काढले आहेत, याची हकीकत वाचा म्हणजे झालें. प्रवृत्तिपर वेदान्ताच्या अंमलाचे ते दिवस होते. लोकांमध्यें त्या वेळीं पाणी खेळत होतें; व यामुळें शिकंदराला मागें हटावें लागलें.

पुढें कालमानानें अशी स्थिति आली कीं, गिझनीच्या महंमदासारख्या एका सामान्य लुटारूनें सतरा वेळां हिंदुस्थान लुटलें! या वेळचा वृत्तांत वाचा म्हणजे वेदान्ताच्या अगदीं विरुद्ध दिशेला जनतेच्या धर्मसमजुतीचें पारडें कसें झुकलें होतें, हे तुम्हांला दिसून येईल. या वेळीं वेदान्ताचा अजिबात ऱ्हास झाला होता असें नाहीं. तर कांहीं मोजक्या भाग्यवानांच्या अंतःकरणांत वेदान्ताचें वास्तव्य होतें; पण बहुजनसमाज त्यापासून पराङ्मुख झाला होता व भरतखंडाची स्थिति खालावण्याचें कारण हेंच होय.

## संन्यास म्हणजे बैरागीपणा नव्हे !

लोक म्हणतील कीं, तुम्हीं आम्हांला सर्वस्वाचा त्याग करण्याचा उपदेश करतां, पण यामुळें आम्ही गरीब होऊं याची वाट काय? पण ही समज निखालस चुकीची आहे. आतां ही गोष्ट मात्र खरी कीं, वेदान्ताचा अभ्यास करण्यासाठीं तुम्हांला अरण्यांत राहून एकान्तवास पतकरावा लागेल—हिमालयासारख्या पर्वतांतील गहनारण्यांत तुम्हांला गेलें पाहिजे. पण एवढ्यावरून वेदान्त ज्या त्यागाचा उपदेश करतो तो त्याग म्हणजे सर्व विषय प्रत्यक्ष टाकणें, अंगाला राख फांसणें, असा अर्थ खास नव्हे. अरण्यांत जाणें हें विद्यार्थ्यांनीं महाविद्यालयांत जाण्यासारखें आहे. तुम्हांला माहीतच आहे कीं, एखादें शास्त्र किंवा तत्त्वज्ञान शिकावयाचें

असलें तर त्यासाठीं आपल्या व्यासंगाला विरोधी किंवा प्रतिकूल अशा सर्व गोष्टींना बाजूला सारून ज्या स्थळीं शांत आणि निर्वेधपणानें आपला अभ्यास चालवितां येईल, अशा एकान्तस्थलाचा आश्रय करावा लागतो. अर्थात् हिंदुस्थानांतील लोक जो अरण्यवास पतकरतात तो सर्व शास्त्रांचें शास्त्र असा जो वेदान्त त्याचें परिशीलन करावें व त्याचा साक्षात् अनुभव घ्यावा, याच हेतूनें पतकरतात. वेदान्त हें रसायनशास्त्रासारखें अनुभवाचें शास्त्र आहे. शास्त्रज्ञानाबरोबर प्रत्यक्ष प्रयोग केल्याशिवाय रसायनशास्त्रासारख्या शास्त्रांत प्रगति होऊं शकत नाहीं; याच न्यायानें जो मनुष्य बौद्धिक ज्ञानाबरोबर—शब्दज्ञानाबरोबर अध्यात्मिक प्रयोग, अनुभव करून घेण्याचा प्रयत्न करणार नाहीं, त्याला वेदान्ताचें ज्ञान कसचें होणार ? तात्पर्य, हें दोन्ही तऱ्हेचें ज्ञान संपादन करण्यासाठीं अरण्यांत जाणें आवश्यक आहे. अरण्यें हीं महाविद्यालयें व विश्वविद्यालयें यांच्यासारखीं होत. त्या ठिकाणीं आत्मज्ञान अंगीं बाणून घेऊन मनुष्य जगांत येतो व त्या ज्ञानाचा लोकांना उपदेश करून तें तत्वज्ञान प्रत्यक्ष व्यवहारांत कसें आणतां येईल, याचा लोकांना बोध करतो. अशा रीतीनें प्रत्येक हिंदूनें किंवा ब्राम्हणानें वागलें पाहिजे. पण अशा ब्रम्हज्ञानसपन्न मनुष्यांपैकीं प्रत्येकानें संन्यासदीक्षा घेतलीच पाहिजे, असा कांहीं सक्त नियम नाहीं. तर कांहीं लोकांना गृहस्थाश्रमी राहून आपलीं ऐहिक कर्तव्यकर्में बजावण्याचें काम करावें लागतें. ज्याप्रमाणें एम्. ए. किंवा डॉक्टर ऑफ सायन्स असल्या पदव्या घेतल्यानंतर सर्वच पदवीधर कांहीं अध्यापक होत नाहींत; तर कांहीं जण अंमलदार होतात. कांहीं जण व्यापारी होतात, तर कांहीं जण अध्यापकाचें काम करतात, त्याचप्रमाणें ही स्थिति आहे. अशा रीतीनें एकदा का हें वेदान्तज्ञान प्राप्त करून घेतलें आणि तें अंगांत मुरलें गेलें ह्मणजे मनुष्याची मनःस्थिति अशी होते कीं, हें सर्व जग त्याचा स्वर्ग—नन्दनवन होतें. व असलें तें जीवित खरोखर भाग्याचें हाय. वेदान्त अंगीं आणणें ह्मणजे शरीर कष्टविणें- बैरागी बनणें, असें जे लोक प्रतिपादन करतात, त्यांना वेदान्ताचें खरें रहस्य समजलें नाहीं. शास्त्रीय विषयांतील शेवटची परीक्षा देऊन अध्यापकाचें काम पतकरणें, अशाच तऱ्हेचा संन्यासदीक्षेचा अर्थ आहे.

## वेदान्त म्हणजे निराशावाद नव्हे.

दुसरी गोष्ट अशी कीं, या वेदान्त धर्माचे प्रवर्तक केवळ संन्यासीच होते असेंहि नाहीं. संसारांत राहून व्यवहारांतील कर्तव्यकर्में दक्षतेनें करणारे गृहस्थाश्रमीहि वेदन्ताचे प्रवर्तक होऊन गेलेले आहेत. वेदान्त म्हणजे कांहीं निराशावाद नव्हे. तसें प्रतिपादन करणारे वेदान्ताचा विपर्यास करणारे होत. वेदान्त हा निराशावाद नाहीं, एवढेंच केवळ नव्हे तर वेदान्त म्हणजे आशावादाची पराकाष्ठा होय.

वेदान्त प्रतिपादन करतो कीं, तुम्ही आपली शरीरनौका या भवसागरांत सुकाणु, होकायंत्र, वल्हीं, शिडें, वायु किंवा विद्युत् यांच्या सहाय्याशिवाय चालविलीत तर त्याचा परिणाम असा होईल कीं, तुमची ही जीवितरूपी नौका खडकावर आपटून फुटल्याशिवाय खास राहणार नाहीं. असें करणें ह्मणजे प्रतिकूल वायु आणि वादळें यांच्या हातांत आपलें जीवित देण्यासारखें घातक आहे. वेदान्त ह्मणतो कीं, हें जग दुःख आणि यातना यांचें माहेरघर असून त्याचें कारण अज्ञान होय. अविद्या—अज्ञान हेंच पातक व आपल्या सर्व दुःखांचें तेंच मूळ होय. व जोंपर्यंत हें अज्ञानाचें आवरण आपल्यावर राहील, तोंपर्यंत आपल्या मागचें दुःख सरणें शक्य नाहीं. परंतु हें अज्ञानावरण नाहींसें होऊन तुम्ही पूर्णज्ञानी झालां ह्मणजे प्रत्यक्ष तुरुंगांतील अंधारकोठडीहि तुम्हांला स्वर्गाप्रमाणें वाटेल. असें झालें म्हणजे जीवितसाफल्य झालें; मग दुःख, त्रास, प्रसंगांत मन गोंधळून जाणें, चित्ताची शांति ढळणें, निराशा, उद्वेग यांचा पगडा बसणें वगैरे विकारांचें नांवहि उरणार नाहीं. ही स्थिति स्पृहणीय नाहीं काय? * हें सत्य नाहीं का? वेदान्त म्हणजे निराशावाद खात्रीनें नव्हे. सर्व जगांतील लोकांना उद्देशून वेदान्त ह्मणतो, 'बाबांनो, तुम्ही आपल्या ठिकाणीं असलेल्या अज्ञानानें या जगाला नरक बनवीत आहां. मायानदींतून पैलतीरास जाण्यासाठीं, माया-

---

* जन्मा आलों त्याचें । आजि फळ झालें साचें ॥ १ ॥
तुम्हीं सांभाळिलें संतीं । भय निरसली खंती ॥ २ ॥
कृतकृत्य झालों । इच्छा केली तें पावलों ॥ ३ ॥
तुका म्हणे काळ । आतां [illegible] न [illegible] ॥ ४ ॥ तुकाराम.

मोहांतून सुटण्यासाठीं ज्ञान संपादन करा—आत्मज्ञान पैदा करा.' वेदान्ताचा सर्वांना असा उपदेश आहे व यांत निराशावादाला बिलकुल जागा नाहीं. या ठिकाणीं हेंहि लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे कीं, या वेदान्तधर्माच्या उपदेशकांमध्यें नुसते संन्यासीच होते असें नाहीं; तर प्रपंचामध्यें राहून व्यवहार करीत असतांहि कित्येकांनीं या ज्ञानाचा प्रसार लोकांत केलेला आहे, व त्यांच्यामध्यें वैराग्य—त्यागबुद्धि कमी होती, असें मुळींच नाहीं.

एकदा एक राजपुत्र (श्रीरामचंद्र) आपलीं ऐहिक कर्तव्यें टाकून अरण्यवास पतकरण्यास तयार झाला होता. त्याचा गुरु या देहाचा पूर्वज (वसिष्ठ) यानें वेदान्तज्ञानाचा त्याला उपदेश केला आणि वैराग्याचें खरें रहस्य काय, याचा ठसा त्याच्या मनावर उत्पन्न केला. याचा पुढें परिणाम हा झाला कीं, त्या राजपुत्रानें पूर्ण वैराग्यसंपन्न होऊन राज्य केलें व अत्यंत प्रतापशाली बादशहा म्हणून त्याची सर्वत्र ख्याति झाली.

कुरुक्षेत्राच्या समरांगणांत उभें राहिल्यानंतर अर्जुनासारख्या वीराला आपल्या क्षात्रधर्माचा कंटाळा येऊन तो आपल्या कर्तव्यापासून पराङ्मुख होऊं पाहात होता. कर्मत्याग करून बैरागी बनावें, असें त्याच्या मनानें घेतलें होतें. परंतु अर्जुनाला अशा रीतीनें विषाद प्राप्त झाला असतां श्रीकृष्णानें वेदान्ताचा उपदेश करून त्याला कर्तव्यतत्पर केलें. श्रीकृष्णाच्या बोधानें अर्जुनाच्या उद्विग्न चित्तांत धैर्य आणि तेज यांची ज्योति प्रज्वलित झाली, व वेदान्तकेसरीच्या गर्जनेनें जागृत झालेल्या त्या नरकेसरीनें कुरुक्षेत्रांत आपला पराक्रम गाजविला.

वेदान्त हा दुर्बलता उत्पन्न करणारा नसून उत्साह आणि सामर्थ्य उत्पन्न करणारा आहे. 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः' असें मुण्डकोपनिषदांत म्हटलें आहे व त्याचा अर्थ हाच कीं, दुर्बल मनुष्याला आत्मज्ञान प्राप्त होणें कधींहि शक्य नाहीं. शरीरानें, मनानें, बुद्धीनें जो खंबीर नाहीं त्याला आत्मानुभव कसचा होणार!

एका मोठ्या राजानें राज्यत्याग करून अरण्यवास स्वीकारला व अरण्यांत जाऊन त्यानें अपरोक्षानुभूति करून घेतली व नंतर राज्यांत परत येऊन राजदंड हातीं घेतला; व आत्मज्ञानसंपन्नतेमुळें त्याचें तें सिंहासनावर आरूढ होणें अधिकच शोभा देऊं लागलें.

वैराग्य—सर्वसंगपरित्याग याचा अर्थ बैरागी बनणें व शरीर कष्टविणें असा नव्हे; तर मग खरी स्थिति आहे तरी काय ? हा मोठा गहन विषय आहे, व त्याचा विचार पुढें केव्हां तरी करूं.

## मांसाहार वर्ज्य कां ?

हिंदु लोक मांसाहार कां करीत नाहींत ? कांहीं लोक याचें उत्तर असें देतात कीं, सर्व प्राणिमात्रांत ईश्वर भरलेला आहे, अशी त्यांची कल्पना असल्यामुळें ते मांस वर्ज्य मानतात. हिंदु लोक मांसाशन करीत नाहींत हें खरें. पण त्याचें कारण मात्र निराळें आहे. त्याचा जास्त विचार करण्याला तूर्त फुरसत नाहीं. परंतु हें तत्व कठोपनिषदांत येणेंप्रमाणें सांगितलें आहेः—"हन्ता चेन्मन्यते हन्तुं हतश्चेन्मन्यते हतम् । उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ *

---

* य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ विजानीतो नायं हन्ति न हन्यते ।। गीता, अ. २।१९.

इंद्रवज्रा.

'हन्ता असें मी,' 'हत मीच' ऐसें ।
जे बोलती अज्ञ न पूर्ण कैसे ? ।।
कीं तत्त्व जें, शाश्वत; हें विलोकीं ।
हन्ता न मी वा हत नाहिं लोकीं ॥ १ ॥

# पुनर्जन्म आणि कौटुंबिक संबंध

( शास्त्रीय शोधसदनांत ता. २७ डिसेंबर १९०२ रोजीं दिलेलें व्याख्यान )

## स्त्रीपुरुषरूपांत दृग्गोचर होणाऱ्या आत्मरूपा !

## बाह्य सौंदर्यांत काय आहे ?



हिंदुस्थानांतील एका धनाढ्य व्यापाऱ्यानें आपल्या शहरांतील लोकांना एकदां मोठी थाटाची मेजवानी दिली. अशा मेजवानीच्या वेळीं बोलावलेल्या मंडळीची करमणूक करण्याकरितां नाच करण्याची हिंदुस्थानांत पूर्वीं चाल असे. आतां ही चाल मोडत चालली आहे. परंतु त्या काळच्या चालीप्रमाणें सदरहू व्यापाऱ्यानें नाचाची व्यवस्था केली होती. मेजवानी होऊन मंडळी बाहेर दिवाणखान्यांत बसल्यावर नर्तकींपैकीं एका नर्तकीनें नाचण्याला व गाण्याला सुरवात केली. ती चीज म्हणत होती ती इतकी ग्राम्य व अश्लील होती कीं, ती कोणालाहि आवडणें शक्य नव्हतें. असें असूनहि ह्या विशिष्ट प्रसंगीं तेथें जमलेल्या लोकांना ती चीज फार आवडली; त्यांना त्या चिजेचा चटका लागून राहिला. असें होण्याचें कारण काय असावें बरें ? हिंदुस्थानांतील तरुण लोक व सद्गृहस्थ यांना असलीं अश्लील आणि अभद्र गाणीं कधींच आवडत नाहींत, हें तुम्हांला माहीत असेल. परंतु ह्या विशिष्ट प्रसंगीं त्या नर्तकीच्या गाण्यानें श्रोतृसमुदायाला इतकें तल्लीन करून सोडलें कीं, त्या गाण्याशिवाय त्यांना दुसरें कांहीं दिसेनासें झालें. तें पूर्णपणें मोहून गेले. या गोष्टीला कित्येक महिने होऊन गेले तरी त्या मेजवानीला जमलेल्या विद्वान् लोकांपैकीं बहुतेक मंडळी रस्त्यांतून जातांना तीच चीज आपल्याशीं गुणगुणत असत. तसेंच तरुण मंडळी तोंडांतल्या तोंडांत गाण्याचीं कडवीं घोळीत असल्याचें आढळून येत असे;

ज्यांनीं म्हणून त्या नर्तकीच्या तोंडांतून ती चीज ऐकली होती, त्या सर्वांना त्या चिजेचा चटका लागून राहिला होता. ती चीज आपल्याशीं गुणगुणत–लकेऱ्या उडविण्यांत ते गुंतलेले आढळत असत.

आतां यावर प्रश्न असा उपस्थित होतो कीं, ह्या सर्व लोकांना त्या गाण्याचें जें इतकें वेड लागलें तें कां लागलें ? मोह कशांत होता ? ' काय हो तुम्हांला तें गाणें इतकें कां आवडलें, त्या गाण्यासंबंधानें इतकी मोहनी कां पडली ! असें तें गीत ऐकलेल्या कोणालाहि विचारलें असतां त्यांतील प्रत्येकजण असेंच म्हणता कीं, 'मोह उत्पन्न झाला म्हणजे ? तें गाणेंच तसें मोहक आहे. गाणें किती सुंदर, किती मधुर, त्यांतील कल्पना तरी किती उच्चतर ! अहाहा ! अप्रतीमच तें. ' परंतु वास्तविक स्थिति तशी नाहीं. तीच चीज पण ह्या विशिष्ट नर्तकीच्या तोंडून ऐकण्यापूर्वी त्यांपैकीं कोणा-लाहि ती आवडली नसती; इतकेंच नव्हे तर ती अत्यंत गर्हणीय व निंद्य वाटली असती. मोहकता त्या नर्तकीच्या सुरांत, सौंदर्यांत, हावभावांत आणि गाण्याच्या ढबींत होती; खरी जादू त्या नर्तकींत होती. परंतु लोकांना मात्र ती गाण्यांतच आहे, असा भ्रम उत्पन्न झाला; पुष्कळ वेळां लोकांची चूक होते ती येथेंच.

## तत्त्वदृष्टीचा अवलंब करा.

जगांत नेहमीं असाच प्रकार घडून येतो. एखादा धर्मोपदेशक उपदेश करूं लागला तर लोक त्याच्या उपदेशाकडे लक्ष न देतां त्याच्या सुंदर चेहऱ्याकडे, मधुर नेत्रांकडे, त्याच्या सुंदर नासिकेकडे, त्याच्या आवाजा-कडे वगैरे बाह्य गोष्टींकडे लक्ष देतात. ह्या अशा सौंदर्यानें मोहित झाल्या-मुळें तो जें जें कांहीं सांगेल तें तें लोकांना गोड लागूं लागतें, तें त्यांना आवडूं लागतें. तो जसें बोलेल चालेल तसेंच लोक बोलूं चालूं लागतात; आणि लोकांची चूक होते ती हीच. त्याच्या उपदेशांत तथ्य किती आहे, सत्य किती आहे, याचा विचार कोणी करीत नाहीं. आतां सांगितलेल्या नर्तकीच्या दृष्टांतांतील चीज स्फूर्तिदायक आहे कीं खरोखर असभ्य आहे, याचा कोणीच विचार करीत नाहीं. धर्मोपदेशकाच्या उपदेशाची छाप, त्याचे हावभाव, बोलण्याचालण्याची ढब, सुस्वरता ह्यांवर अवलंबून

राहते. ह्या बाह्य प्रकारांमुळेंच त्याचा उपदेश लोकांना रोचक व आकर्षक वाटतो.

थोड्या दिवसांपूर्वी येथील मान्य श्रोत्यांपैकीं रामाचा एक मित्र स्वामी विवेकानंद यांच्या संबंधानें बोलतांना म्हणला, स्वामींचे डोळे आणि नाक किती तरी सुंदर! रामानें त्याला विचारलें कीं, 'तुम्ही वक्त्याचा उपदेश ऐकण्याला येतां कीं त्याचा चेहरा पाहण्याला, नाक डोळे पाहण्याला येतां?' पण प्रायः लोक वक्त्याचा चेहरा पाहण्यासच जमत असतात. पुष्कळ वक्त्यांची लोकांवर जी छाप पडते ती त्यांच्या भाषणांतील विषयप्रतिपादनामुळें नसून अभिनयामुळें व भाषणशैलीमुळें पडत असते; पण ही चूक आहे. प्रत्येक गोष्ट बरोबर तोलून पहा. वक्त्याच्या चेहऱ्यापेक्षां त्याच्या उपदेशाकडे अधिक लक्ष द्या. हे शब्द ऐकण्याला मोठे कठोर वाटतील, क्वचित् कोणाला ते भयंकरहि वाटतील. पण **राम व्यक्तींचा अभिमानी नाहीं. राम फक्त सत्याचा अभिमानी आहे. तुम्ही मूर्तिमंत सत्य आहां, तुमचा आत्मा सत्यस्वरूप आहे आणि ह्या अर्थानें राम तुमच्यापुढें–तुमच्या बाह्य शरीरांपुढें नव्हे–मान वांकवतो. रामा**ची बोलण्याची पद्धति तुम्हांला पसंत नसली, रामाची विषय प्रतिपादन करण्याची घाटणी व भाषाशैली हीं जरी तुम्हांला पसंत नसलीं, तथापि राम तुम्हांला बजावून सांगतो कीं, जर तुम्हांला खरोखर शांति पाहिजे असेल, पारमार्थिक आनंद प्राप्त करून घ्यावा अशी तुमची इच्छा असेल, तर रामाचीं भाषणें तुम्हीं ऐकलींच पाहिजेत, रामाच्या व्याख्यानांना जरूर हजर राहिलें पाहिजे; कारण, तीं तुम्हांला सुखी करतील. रामाच्या उपदेशांत सत्य किती आहे, याचा शोध करा, त्यावर विचार करा, मनन करा; घरीं गेल्यावर तुह्मी जें कांहीं ऐकलें असेल त्याचें चिंतन करा आणि तें कृतींत उतरविण्याचा प्रयत्न करा.

आज वेन्दातावर–वैदिक धर्मावर बोलण्याचा रामाचा विचार होता. परंतु रामाला भाराभर प्रश्न विचारण्यांत आले आहेत आणि त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याविषयीं विनंति करण्यांत आलेली आहे. ह्या देशांतील किंवा भूतलावरील कोणत्याहि मनुष्याला सुचणाऱ्या कोणत्याहि प्रश्नांचीं उत्तरें ह्या शहरांत रामाचीं जीं व्याख्यानें होतील, त्या व्याख्यानांतून सहजच

दिलीं जाणार आहेत. एकेक प्रश्न घेऊन त्यावर राम बोलणार आहे. परंतु कांहींना असें वाटतें कीं, आपलेच प्रश्न आधीं घेतले जावे. पण आज रात्रीच्या व्याख्यानांत किंवा कोणत्याहि एका रात्रीच्या व्याख्यानांत किंवा संध्याकाळच्या व्याख्यानांत सर्व प्रश्नांचीं उत्तरें देणें शक्य नाहीं. एकेक रात्रीं व्याख्यानाकरितां एकेक प्रश्न घेतला जाईल. अशा रीतीनें सर्व प्रश्नांसंबंधानें आपण विचार करूं. रामाला विचारलेल्या प्रश्नांत पहिला प्रश्न हा होता कीं, 'पुनर्जन्म जर खरा मानला तर त्यानें कौटुंबिक संबंध तुटत नाहींत काय?' म्हणून तोच विषय आज घेऊं.

## चारित्र्य आणि उपदेश यांमधील फरक.

विषयाला सुरवात करण्यापूर्वीं बायबल, कुराण, वेद आणि गीता यांच्यासंबंधानें दोन शब्द बोलणें जरूर वाटतें. ह्या सर्व धर्मग्रंथांवर लोकांची पूर्ण श्रद्धा आहे; आणि त्याचें कारण काय म्हणाल तर ज्यांना ते अत्यंत पूज्य व प्रिय मानतात, अशा मनुष्यांच्या लेखणींतून ते ग्रंथ उतरले आहेत, हेंच होय. लोकांची विचारसरणी अशा तऱ्हेची असते कीं, ख्रिस्त मोठा महात्मा होता, त्याचें शील वाखाणण्यासारखें होतें, त्याच्या उपदेशाचा परिणाम लोकांना हितकारी होत असे आणि बायबलांत जें वर्णन आहे तें अशा त्या ख्रिस्ताच्या तोंडचें आहे; तेव्हां अर्थात् बायबलांतील शब्दान्‌शब्द आपण प्रमाण मानलाच पाहिजे. ख्रिस्ती लोकांप्रमाणें हिंदु लोकहि असेंच म्हणतात कीं, कृष्णाचें चरित्र अत्यंत पवित्र आहे आणि गीता ज्या अर्थीं अशा त्या श्रीकृष्णाच्या मुखारविंदांतून बाहेर पडली आहे, त्याअर्थीं तींतील प्रत्येक वाक्यावर आपण श्रद्धा ठेविलीच पाहिजे. बुद्धाचे अनुयायी असेंच म्हणतात कीं, बुद्ध फार सच्छील होता आणि धम्मपद हा ग्रंथ त्यानें लिहिला आहे, असें मानलें जातें; तेव्हां बुद्धाकरितां त्याच्या ग्रंथावर सर्वस्वी विश्वास ठेवलाच पाहिजे. त्या ग्रंथांत सत्य किती आहे, ह्यासंबंधानें विचार करण्याची आपणांस जरूरी नाहीं. तो ग्रंथ बुद्धानें लिहिला आहे, एवढ्याचकरितां त्यांतील तत्त्वांवर आपण पूर्ण विश्वास ठेवला पाहिजे. आपणांस स्वतंत्र विचार करून त्यांतील तत्त्वें कसोटीस लावण्याचें काय कारण आहे? नर्तकीच्या गाण्यानें मोहून गेलेल्या लोकांची जी चूक होत होती तशाच प्रकारची

ही चूक नाहीं काय ? अगदीं तशीच ! एखाद्या महात्म्यानें केलेला उपदेश निराळा आणि त्याचें चारित्र्य हें निराळें. कित्येक वेळां असें घडून येतें कीं, एखादा मनुष्य आपल्या कालांत खरोखरच नामांकित आणि अद्वितीय असतो; परंतु त्यानें समाजापुढें मांडलेले सिद्धान्त अपूर्ण किंवा लंगडे असूं शकतात; सत्याच्या कसोटीला सर्वस्वी उतरण्यासारखे नसतात. परंतु त्याच्या अलौकिक जीवनक्रमावरून त्यानें प्रतिपादिलेले सिद्धान्तहि अलौकिक आणि त्रिकालाबाधित असलेच पाहिजेत, असें त्याच्या अनुयायांस वाटतें. लोकांची घोडचूक होते ती येथेंच; आणि हीच घोडचूक निरनिराळ्या धर्मपंथांच्या व मतमतांतराच्या लोकांमध्यें तंटेबखेडे उत्पन्न होण्याच्या मुळाशीं असते. इंग्लंडांतील प्रसिद्ध कवि ऑलिव्हर गोल्डस्मिथ+ याची कविता इतक्या उच्च दर्जाची असे कीं, तो लिहूं लागला म्हणजे एखाद्या देवदूताप्रमाणें लिहितों, अशी त्याच्या एका मित्रानें त्याच्या संबंधानें वाखाणणी केली आहे. याच गोल्डस्मिथ साहेबांची वैद्यकाची जी अत्युच्च एम्. डी.ची परीक्षा तीहि झालेली होती. हा गोल्डस्मिथ विद्वान् होता, त्याच्या खाण्यांत किंवा बोलण्यांत कांहीं विलक्षणपणा नव्हता; तो इतरांप्रमाणेंच खात असे आणि इतरांप्रमाणेंच बोलत असे. परंतु आपण कसें जेवतों आणि कसें बोलतों, याचें वर्णन करतांना तो म्हणत असे कीं, ' खातांना किंवा बोलतांना मी खालचा जबडा हालूंच देत नाहीं. माझा वरचाच जबडा नेहमीं हालत असतो. ' या विषयासंबंधानें + पंडित जॉन्सन याच्याशीं त्याचा कडाक्याचा वाद झाला आणि शेवटपर्यंत ' माझेंच ह्मणणें खरें ! ' असें गोल्डस्मिथ म्हणत राहिला. परंतु सर्वांना हें माहित आहे कीं, जेव्हां आपण खातों पितों किंवा बोलतों, त्या वेळीं आपला खालचाच जबडा हालत असतो; गोल्डस्मिथच्या ह्मणण्याप्रमाणें वरचा जबडा नव्हे. आतां इतकें मात्र खरें कीं, ज्या वेळीं आपण सबंध तोंड हालविण्याचा प्रयत्न करतों, त्या वेळीं आपला वरचा जबडाहि हालतो. पण गोल्डस्मिथ आपलें चुकीचेंच मत घेऊन बसला होता.

---

×गोल्डस्मिथः–इंग्रजी कवि व ग्रंथकार (१७२८–१७७४.)

*जॉन्सनः–प्रख्यात इंग्रजी ग्रंथकार व इंग्रजी भाषेचा कोशकार (१७०९-१७८४)

परंतु गोल्डस्मिथ याची स्वतःची भावना कांहीं असली तरी त्याचें खाणें किंवा बोलणें इतरांहून कांहीं निराळें होत असें नाहीं; तें निसर्गाच्या नियमाप्रमाणेंच होत असे, व त्याचाहि खालचाच जबडा हाले. परंतु हीच गोष्ट, हीच क्रिया, हाच अनुभव त्याला जशाचा तसा वर्णन करतां येईना. तुह्मांला माहीत असेल कीं, एखादी क्रिया करणें हें निराळें आणि ती क्रिया कशी घडते, याची उपपत्ति—याचें रहस्य समजणें हें निराळें, येथील प्रत्येक जण इंग्रजी बोलतो, परंतु त्यांतील फारच थोड्यांना इंग्रजी व्याकरणाचें ज्ञान असेल. प्रत्येक जण आपापल्या परीनें विचार करीत असतो, तर्क बांधीत असतो; परंतु तर्कशास्त्राचें ज्ञान फारच थोड्यांना असतें. आगामी आणि निगामी न्यायशास्त्र थोडेच जाणतात. त्याचप्रमाणें समाजाला आदर्शभूत आणि उदात्त जीवनक्रम असणें हें निराळें आणि अशा जीवनक्रमाचें रहस्य सांगतां येणें, अशा चरित्रक्रमाचीं सयुक्तिक कारणें सांगतां येणें हें निराळें. पण हा भेद लोकांना कळत नाहीं. एखाद्या महात्म्याच्या चरित्राचें पावित्र्य लोक त्याच्या उपदेशावरहि लादतात; त्याचें आचरण जसें निर्दोष तसा त्याचा उपदेशहि निर्दोष असलाच पाहिजे, अशी त्यांची भावना होते; आणि अशा रीतीनें ते त्याच्या उपदेशाचे गुलाम बनतात. पण राम म्हणतो, 'सावध व्हा! सावध व्हा!!'

## पुस्तकी ज्ञान व अंतर्ज्ञान.

ख्रिस्तानें फारच थोडीं पुस्तकें वाचलीं होतीं. परंतु 'मास्टर ऑफ आर्ट्स' किंवा 'डाक्टर ऑफ डिव्हिनिटि' असल्या उच्च पदव्या धारण करणाऱ्या विद्वानांना बायबलमध्यें काय लिहिलें आहे, ह्याचा अर्थ लावण्याला वरच्यावर डोकें खाजवावें लागतें. महंमदानें किती तरी चांगल्या गोष्टी लिहिल्या आहेत. त्यांना ही स्फूर्ति कोठून झाली? त्यांना हें ज्ञान कोठून मिळालें? त्यांची ही सर्व माहिती अस्सल आहे आणि ज्या ठिकाणाहून—ज्या मूळ उगमाहून त्यांना ही माहिती झाली, तें ठिकाण—तो उगम तुमच्यांतहि आहे. मनूजवळहि फारसे ग्रंथ नव्हते. परंतु सर्व हिंदूंना मान्य अशी मनुस्मृति त्यानें लिहिली. होमर+ कवीनें कांहीं भाराभर पुस्तकें

---

+ होमर.--ग्रीक भाषेचा आद्य कवि. ख्रिस्ती शतकापूर्वी एक हजार वर्षांच्या सुमारास तो होऊन गेला.

वाचलीं होतीं असें नाहीं; तथापि त्यानें ईलियड आणि ऑडेसी हीं दोन नामांकित महाकाव्यें लिहिलीं. हीं इतकीं सरस आहेत कीं, त्यांचीं भाषांतरें प्रत्येक भाषेंतून होत आहेत. आरिस्टॉटल* हा एम्. ए. नव्हता. किंवा डी. डी. हि नव्हता; परंतु एम्. ए. होणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या ग्रंथांचें अध्ययन करावें लागतें.

खिस्त किंवा कृष्ण ह्यांना स्फूर्ति कोठून झाली ? त्यांचें तें दिव्यज्ञान त्यांना कोठून प्राप्त झालें ? त्यांच्या अंतःकरणांतून झालें. खिस्त किंवा कृष्ण यांना जर अंतःस्फूर्ति होऊं शकते तर ती तुम्हांलाच कां होऊं नये ? ज्ञान संपादन करण्यासाठीं तुम्हांला तेवढी पुस्तकांची आवश्यकता कां भासावी ? त्यांच्याप्रमाणें तुम्हांलाहि अंतर्ज्ञान कां होऊं नये ? ह्या सगळ्या स्फूर्तींचा, या दिव्यज्ञानाचा उगम, या अतींद्रिय ज्ञानाचा झरा जसा त्यांच्यांत होता तसा तो तुमच्यांतहि आहे. असें आहे तर युगेंच्यायुगें लोटल्यामुळें जें अगदीं शिळेंवासें होऊन गेलें आहे अशा पाण्याबद्दल–दुसऱ्यांच्या ग्रंथांतील उसनें ज्ञान संपादन करण्याबद्दल तुम्ही कां हपापतां ? तुम्हीहि आपल्या अंतःसरोवरांत प्रवेश करून यथेच्छ अमृतपान कां करीत नाहीं ? सर्व दिव्य ज्ञानाचा झरा तुमच्या अंतःकरणांतच आहे।

## कालमान ओळखा !

राम म्हणतो, बाबांनो, पूर्वींचे महात्मे होऊन गेले त्याला बराच काळ लोटला; तुम्ही वर्तमानकालांत राहात आहां; ह्याकरितां हजारों वर्षे मसाला भरून ठेवलेल्या प्रेतांप्रमाणें× राहूं नका. वर्तमानकाल भूतकालाच्या हातांत देऊं नका. हजारों वर्षांपूर्वीं लोकांनीं ज्या गोष्टी सांगितल्या त्या आज जशाच्या तशा घोंटीत बसूं नका. त्या गोष्टी त्यांनीं सांगितल्या तो मनु आज नाहीं, हें लक्ष्यांत ठेवा. तें दिव्य अमृत, तीं दिव्य संजीवनी, तुमच्यांतहि आहे. पूर्व–कालीन थोर पुरुषांचे ग्रंथ वाचावयास घेतले असतां त्यांतील प्रत्येक शब्दाला आपण अंधश्रद्धेनें मान तुकवलीच पाहिजे, अशी भलतीच समजूत करून घेऊ नका. त्यांत जीं तत्त्वें प्रतिपादन केलीं अस-

* प्रख्यात ग्रीक तत्त्ववेत्ता ( खिस्ती शतकापूर्वी ३८४--३२२. )

× प्रेतांमध्यें मालमसाला भरून त्यांना पुरण्याची ईजिप्शियन लोकांत चाल असे.

तील त्यासंबंधानें स्वतः विचार करा, त्यांचें बारकाईनें मनन करा. त्यांतील सत्याचा तुम्ही प्रत्यक्ष अनुभव घेतल्याशिवाय, तीं तत्त्वें तुम्ही आचरणांत आणल्याशिवाय, व्यवहारांत तीं कसोटीस लावल्याशिवाय त्या तत्त्वांचें खरें मर्म तुम्हांला कळणार नाहीं. बायबल, वेद किंवा गीता यांतील तत्त्वांचा तुम्ही ज्या वेळीं स्वतः अनुभव घ्याल त्याच वेळीं त्या ग्रंथांचा खरा अर्थ तुम्हांला समजला, त्यांतील रहस्य तुम्हांला समजलें असें होईल. 'मिल्टनचें हृद्गत समजण्याला मिल्टनच झालें पाहिजे'* अशी इंग्रजींत म्हण आहे. त्याचप्रमाणें ख्रिस्ताचें खरें हृद्गत समजण्याला तुम्हांला स्वतःला ख्रिस्तच झालें पाहिजे. भगवान् श्रीकृष्णाच्या उपदेशाचें रहस्य स्वतः कृष्ण झाल्याशिवाय समजणें शक्य नाहीं. तसेंच बुद्धदेवाच्या ग्रंथांचें खरें इंगित आपण स्वतः बुद्ध होऊं तेव्हांच समजेल. आतां बुद्धदेव झालें पाहिजे, याचा अर्थ काय ? बुद्धदेव होण्याकरितां हिंदुस्थानांत जन्म घेणें जरूर आहे कीं काय ? छे ! छे !! मुळींच नाहीं. ख्रिस्त होण्याकरितां जुडिया प्रांतांत जन्म घेण्याची जरूरी नाहीं. मग जरुरी आहे कशाची ? बुद्ध किंवा ख्रिस्त आम्ही कसे होऊं ? पुढील गोष्टीवरून तुमच्या लक्ष्यांत येईल.

## अंध अनुकरण काय कामाचें !

एक मनुष्य एक प्रेमगीत वाचीत होता. ह्या गीतांत लैली आणि मजनून † यांच्या उत्कट प्रेमाचें वर्णन होतें. ह्या कवनांतील नायक जो मजनून त्याच्या निष्कपट प्रेमाचा त्या मनुष्याच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, त्यानें स्वतः मजनून होण्याचा निश्चय केला. सदरहू कवनांतील नायिका जी लैली तिची तसबीर एकानें त्याला दाखविली. ती तसबीर तो हृदयाशीं धरी, तिच्यावर प्रेमाचे अश्रु ढाळी, व तिचें चुंबन घेई. तिला तो क्षणभरहि विसंबत नसे. परंतु अशानें तो थोडाच मजनून होणार! तुम्हांला ठाऊक असेलच कीं, कृत्रिम प्रेम फार वेळ टिकूं शकत नाहीं. आणि ह्या गृहस्थाचें प्रेम तर नकली होतें. खऱ्या स्वाभाविक प्रेमाचें अनुकरण करतां येणें शक्य नाहीं; आणि हा मनुष्य तर प्रेमाचें अनुकरण

---

*मिल्टन.—प्रसिद्ध इंग्रजी कवी ( १६०८–१६७४. )
स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती । मोरोपंत.

† पान ७५ वरील टीप पहा.

करीत होता. त्याचें हें वर्तन पाहून एक शहाणा गृहस्थ त्याला ह्मणाला, 'बाबारे ! अशानें तूं मजनून कसा होशील ? तुला मजनून बनणें असेल तर लैलीवरच प्रेम करण्याची तुला जरूरी नाहीं. तर मजनूनसारखें शुद्ध प्रेम तुझ्या अंतःकरणांत बाणलें पाहिजे. तुझ्या प्रेमाचा विषय लैलीच असला पाहिजे, असें कांहीं नाहीं. फक्त मजनूनप्रमाणें तुझ्या अंतः-करणांतील प्रेमाची उत्कटता वाढली पाहिजे. मग तुझ्या प्रीतीचा विषय कोणता कां असेना ! मजनून होण्याचा हाच एक मार्ग आहे.'

याच न्यायानें राम ह्मणतो कीं, तुह्मांला जर ख्रिस्त, महंमद, बुद्ध, होणें असेल तर त्यांनीं ज्या ज्या गोष्टी केल्या त्या त्या गोष्टींचें अनुकरण करण्याची तुह्मांला जरूरी नाहीं; त्यांनीं जीं कृत्यें केलीं तीं करण्याचीहि आवश्यकता नाहीं; ते ज्या मार्गानें गेले त्या मार्गाचें अंध अनुकरण कर-ण्याचें कारण नाहीं. * त्यांच्या कृत्यांपुढें आणि उपदेशापुढें आपल्या स्वातंत्र्याचा बळी देण्याची गरज नाहीं; तर त्यांच्यांतील शील तुम्ही आ-पल्या अंगीं आणलें पाहिजे. त्यांच्याप्रमाणेंच तुमच्या भावना तीव्र झाल्या पाहिजेत. त्यांचा आत्मानुभव जितका गहन होता, दिव्य ज्ञान त्यांच्या ठिकाणीं जितक्या पूर्णतनें बाणलें होतें, तितक्या पूर्णत्वानें तें तुमच्या ठिकाणीं बाणलें पाहिजे. त्यांच्यांतील ओज, सामर्थ्य आणि ऐश्वर्य हीं तुमच्या ठिकाणीं विकास पावलीं पाहिजेत—आविर्भूत झालीं पाहिजेत. परंतु ते जसे वागले त्याप्रमाणें तुम्ही वागाल तर मला वाटतें आज तुम्ही ज्या परिस्थितींत आहां ती तुम्हांला पालटावी लागेल. समजा कीं, आज रात्रीं ख्रिस्ताचा जन्म झाला. तर तो काय करील ? तो आपणांस सुळावर चढवूं देईल काय ? अर्थात् नाहीं. तुम्हांला ख्रिस्त होतां येऊन—त्यानें संपादन केलेलें ज्ञान प्राप्त करून घेतां येऊन जिवंतहि राहतां येईल ! आपल्या निश्चित तत्त्वां-करितां ख्रिस्त आपला देह सुळावर चढवूं देण्यास कबूल झाला आणि शोपेनहॉर ह्याला आपल्या मतांकरितां लोकनिंदेचे प्रहार सोशीत आयु-ष्याचे दिवस कसेबसे कंठावे लागले. व आपलीं मतें खरीं आहेत हें

---

* यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि ॥ तैत्तिरीयोपनिषद्, अनुवाक ११

लोकांच्या निदर्शनास आणून देण्याकरितां जिवंत राहणें, हें आपल्या मतांकरितां सुळावर चढण्यापेक्षां खात्रीनें अधिक कठीण आहे.

सारांश हा कीं, कोणत्याहि गोष्टीचा तींतील गुणावगुणांच्या दृष्टीनें विचार करा. तींतील सत्यावरून तिची किंमत ठरवा. अमका महात्मा मोठा होता, त्याचें चरित्र आदरणीय होतें, ह्मणून त्याचा उपदेशहि सर्वथा आदरणीय असलाच पाहिजे, असा भलताच घोटाळ्याचा संबंध जोडूं नका. महात्म्यांच्या चरित्रांचा व उपदेशाचा पृथक पृथक् विचार करा.

## कौटुंबिक संबंध आहेत कुठें ?

आज विचारलेला प्रश्न येणेंप्रमाणें आहे:—' पुनर्जन्म जर खरा मानला तर त्यानें पूर्वींचे कौटुंबिक संबंध तुटल्यासारखे होत नाहींत काय ? " तसेंच ह्या प्रश्नाचा दुसरा भाग असा आहे कीं, ' ज्या लोकांचा या जगांत परस्परांशीं संबंध जडलेला असतो त्यांचा ' स्वर्गांत पुनः तोच नात्यागोत्याचा संबंध राहात नाहीं काय ?' हा प्रश्न फार चांगला आहे. ह्या प्रश्नाचे दोन भाग आहेत. त्याचें आपण क्रमशः विवेचन करूं. ' पुनर्जन्म जर खरा मानला तर त्यानें आमचे कौटुंबिक संबंध तुटत नाहींत काय ?' यावर रामाचा उलट असा सवाल आहे कीं, कौटुंबिक संबंध ह्मणून या जगांत कांहीं आहेत का ? तुह्मांला आप्तेष्ट, गणगोत म्हणून कोणी आहेत का ? विचार करा. एका मनुष्याला एक मुलगा आहे. हा मुलगा अज्ञानदशेंत असेपर्यंत बापाजवळ राहील; परंतु तो एकदा का मोठा झाला, वयांत आला, त्याला नोकरी लागून दोन पैसे मिळूं लागले ह्मणजे त्याला अशी भीति वाटूं लागते कीं, आपण मेहनत करून जे पैसे मिळवतों त्यांचा फायदा आपला बाप घेईल. त्याचें कुटुंब निराळें होतें, त्याचा परिवार निराळा होत जातो, त्याचे हितसंबंध निराळे होतात व तुमच्याकडे तर तो बापापासून वेगळा राहूं लागतो. आतां त्या मुलाचा आणि बापाचा संबंध गेला कोठें ? कित्येक वेळां असेंहि होतें कीं, मुलगा नोकरीकरितां हिंदुस्थान, जर्मनी वगैरे दूरदूरच्या देशांत जातो आणि बाप पोट भरण्याकरितां तिसऱ्याच एखाद्या देशांत जातो. आतां कुटुंबसंबंध किंवा मायापाश तो कोठें राहिला ? मायापाश किंवा आप्तेष्टसंबंध ही केवळ कल्पना आहे. 'मी नारायण, माझा सब वासुदेव,' यांत खरोखर संबंध कोठें

आला ? हीं नुसतीं नांवें होत. मायापाश ही मिथ्या कल्पना होय. हा केवळ अर्थवाद होय !

मायापाश अशी खरोखरीच एखादी वस्तु आहे कीं काय, याचा आपण विचार करूं. कल्पना करा कीं, एका मुलाचा या ठिकाणीं जन्म होतो आणि एक मुलगी दुसऱ्या एका ठिकाणीं जन्मास येते. मुलगा अमेरिकन तर मुलगी जर्मन ! त्या दोघांचें पुढें लग्न होतें. मुलीचे आप्तेष्टसंबंध जर्मनींतले आणि मुलाचे अमेरिकेंतले ! अशा स्थितींत दोघांचें लग्न झालें. आतां त्यांचें पूर्वीचे संबंध गेले कोठें ? त्या दोघांच्या लग्नामुळें त्यांतून एक नवीनच संबंध उत्पन्न झाला. परंतु समजा, पुढें कांहीं वर्षांनीं त्यांनीं घटस्फोट केला. तसें झालें म्हणजे नवरा दुसरी बायको करतो व त्याची स्त्री पुनर्विवाह करते. पूर्वींचीं तीं नवराबायको ना ? मग त्यांचा तो पूर्वींचा संबंध आतां राहिला कोठें ? असले पतिपत्नीसंबंध तुमच्याइकडे तर एका जन्मापुरते तरी कायम राहातात काय ? एकाच आईबापांच्या पोटीं आलेलीं भावंडें एकाच घरांत वाढतात. बहिणीभावांचा त्यांचा संबंध स्वाभाविक असतो. कुटुंब ह्या दृष्टीनें त्यांचें इतर नातेवाईकांशीं भिन्न भिन्न नातें असतें. परंतु मुलगा मोठा होऊन उद्योगधंद्याकरितां आस्ट्रेलिया देशांत जातो, तेथें तो लग्न करतो व त्या ठिकाणीं त्याचा मोठा गोतवळा जमतो. त्याच्या बहिणीचें एका फ्रेंच गृहस्थाशीं लग्न होतें व ती फ्रेंच बाई होते. त्यांचे पूर्वींचे संबंध आतां कोठे आहेत ? आज विचारलेला प्रश्न हा आहे कीं, 'पुनर्जन्म जर खरा मानला तर मग पूर्वींचीं कुटुंबबंधनें त्यामुळें तुटत नाहींत काय ? पण आतांपर्यंतच्या विवेचनावरून ही गोष्ट तुमच्या लक्ष्यांत आली असेलच कीं, ह्या जन्मींचे संबंध सुद्धां जर कायम राहात नाहींत तर मग पुढच्या जन्माची गोष्टच कशाला ! मुळीं बंधच जर नाहींत तर या जन्मीं किंवा अन्य जन्मीं तुटावयाचें तें काय ? वास्तविक बंध कांहीं पदार्थच नाहीं.

## पुनर्जन्माचें रहस्य.

परंतु कौटुंबिक संबंध म्हणून कांहीं वस्तु खरोखर अस्तित्वांत आहे व ती आपल्या प्रयत्नानें या जन्मीं आपणांस कांहीं काल राखतां येते, असें क्षणभर गृहीत धरलें, तर मग या जन्मांतील आप्तसंबंध जन्मांतरीं तुटण्याचें

कांहीं कारण नाहीं. हेंच तुमच्या प्रश्नांतील दुसऱ्या भागाचें उत्तर आहे. कल्पना करा कीं, तुम्हांला अनेक मुलेंबाळें आहेत. त्यांपैकीं एक मूल मेलें. तें मरूं नये, त्याचा आपला संबंध तुटूं नये, अशी तुमची मनापासून इच्छा आहे. परंतु तुमच्या इच्छेला न जुमानतां मृत्यूनें तें मूल तुमच्यापासून हिरावून नेलें. आतां या उदाहरणांत तुमचा आप्तसंबंध तुमची इच्छा नसतांहि ह्या जगांतच तुटला गेला. परंतु यावर कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, या जगांत नाहीं तर 'स्वर्गा'त तरी आपले तुटलेले संबंध पुनः जडले जातील, या जगांत तुटलेले नात्यागोत्याचे धागेदोरे पुनः पूर्ववत् सांधले जातील; व तसे ते सांधले जावे, यासाठीं हे लोक 'स्वर्गा'-ची कल्पना करतात. परंतु असला काल्पनिक 'स्वर्ग'मनःसृष्टींतून उत्पन्न करण्यांत अर्थ नाहीं. आपलीं या जन्मांतील नातींगोतीं जन्मांतरीं तशींच कायम टिकावीं, अशी जरी आपली कितीहि उत्कट इच्छा असली तरी त्यासाठीं भूगोलज्ञानाला ज्याचा पत्ता माहित नाहीं, भौतिक शास्त्रांनांहि ज्याचा ठाव लागूं शकत नाहीं, अशा एका काल्पनिक 'स्वर्गा'चें अस्तित्व स्थापन करणें व त्याच्यावर आंधळेपणानें विश्वास ठेवणें रास्त नाहीं. पुनर्जन्माच्या तत्त्वाप्रमाणें सामान्यतः या जन्मींचे कौटुंबिक संबंध, हीं नातींगोतीं जन्मांतरीं टिकणें शक्य नाहीं. कारण, पुनर्जन्माचा सिद्धान्त 'मनुष्य हा आपल्या दैवाचा नियन्ता आहे,' ह्या तत्त्वावर स्थापन झालेला आहे. आपले या जन्मींचे आप्तेष्टसंबंध आपणच स्वतः स्वेच्छेनें उत्पन्न करून घेतले आहेत, आणि ते एका जन्मापुरतेच आहेत. कल्पना करा कीं, एखाद्या देहावर तुम्ही आपल्या हयातींत अत्यंत प्रीति केलेली आहे. आतां तुम्ही मरण पावलां म्हणजे मृत्यूनंतर तुम्ही नवा देह धारण कराल व त्याचप्रमाणें ज्या मनुष्यावर तुह्मी प्रीति करीत होतां तो मनुष्यहि नवा देह धारण करील, व त्या नव्या देहांत तुमचा त्याचा संबंध जडेल. परंतु मागचा देह पुढील जन्मांत कायम राहणें मात्र अशक्य आहे. आतां सध्यांच्या जन्मांत त्या मनुष्यावर तुमचें मुळींच प्रेम नव्हतें, त्या मनुष्याचें मुखावलोकनहि करूं नये, अशी तुमची इच्छा आहे, अशी कल्पना करा; तर मात्र पुनर्जन्माच्या सिद्धान्ताप्रमाणें तुम्ही नवा देह धारण केलात ह्मणजे त्या मनुष्याशीं तुमचा कोणत्याच प्रकारचा संबंध येणार नाहीं. जे तुमचे ह्या जन्मींचे शत्रु किंवा मित्र

असतील, ज्यांच्यावर तुम्ही प्रेम करतां किंवा ज्यांचें तुमचें हाडवैर आहे, अशा प्रकारचे मनुष्य पुढील जन्मींहि तुमच्यावर लादण्यांत येतील, त्यांचा तुमचा पूर्वींचाच दैहिक संबंध कायम राहील, असा कांहीं सिद्धांत नाहीं. जन्मांतरीं नव्या देहांत जे जे संबंध उत्पन्न होतील, त्यांचें स्वरूप तुमच्या सध्यांच्या भावनांवरून ठरणार आहे. पुनर्जन्माचें तत्त्व त्यांच्या आड येऊं शकत नाहीं. ज्या मनुष्यांचा तुम्ही तिरस्कार करतां, ज्यांच्या-बद्दल तुह्मांला अतिशय भीति वाटते, त्या व्यक्ति तुमच्यावर लादण्याचें काम वेदान्त करीत नाहीं. एखादी स्त्री आपल्या नवऱ्यापासून काडी मोडून निघून गेली, व त्याची पुनः भेटहि होऊं नये अशी जर तिची इच्छा असली, तर त्या दोघांची कर्मतत्त्वाच्या नियमाप्रमाणें जन्मांतरीं मुलाखतहि होणार नाहीं. त्यांच्या त्यांच्याशींच तिचा पुढल्या जन्मीं संबंध येईल.

## ख्रिस्ती लोकांची 'स्वर्गा'ची कल्पना.

सदरहू विषयासंबंधानें लोकांचे अनेक गैरसमज आहेत. त्या सर्वांचा विचार क्रमशः करण्यांत येईल. सध्यां आपण यूरोप व अमेरिका या खंडांतील सर्व लोकांचा ज्या बाबतींत गैरसमज झालेला आहे, अशी बाबत घेऊं. ही बाबत ह्मणजे 'स्वर्ग' होय. ही 'स्वर्गा'संबंधाची कल्पना खऱ्या खिस्तोपासकांची आहे असें म्हणण्यापेक्षां, देवाऐवजीं देवळांचा खेळखंडोबा करणाऱ्या नामधारी व ढोंगी लोकांची आहे, असें ह्मटलें असतां तें जास्त शोभण्यासारखें आहे. या स्वर्गासंबंधाची कांहीं लोकांची कल्पना किती असबद्ध आहे! स्वर्ग ह्मणजे अशी एक जागा आहे कीं, ज्या ठिकाणीं सर्वांना एकाच दर्जानें राहातां येते, अशी इकडील लोकांची कल्पना आहे परंतु सत्याच्या दृष्टीनें अशी स्थिति खरोखर संभवनीय आहे कीं काय, याचा जरा शांत चित्तानें विवेकपूर्वक विचार करा, अशी राम तुम्हांला विनंति करीत आहे.* अल्पामध्यें—परिच्छिन्नतेमध्यें पूर्ण सुख असणें कधीं तरी शक्य आहे का? मर्यादित स्थिती-मध्यें खऱ्या सुखाचा लवलेश तरी असणें संभवेल काय? ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे. आजपर्यन्त जे जे लोक मृत्युमुखीं पडले, जे जे पुढें पड-

* भूमा एव सुखं नाल्पे सुखमस्ति । छांदोग्योपनिषद्.

तील, एवढेंच नव्हे तर आजच्या रात्रीं हिंदुस्थान, ऑस्ट्रेलिया, अमेरिका वगैरे देशांत जे जे मृत्यु पावत असतील असे सर्व लोक तुमच्या त्या 'स्वर्गा'त येऊन राहाणार, हें उघड आहे. आतां इतक्या सर्व स्पर्धा करणाऱ्या लोकांचा गराडा तुमच्याभोंवतीं पडला असतां तुमच्या वांट्याला सुख कसचें येणार? काउपर* कवीनें आपल्या एका काव्यांत अलेक्झांडर सेल्किर्क या नांवाच्या नायकाच्या मुखांत जी कल्पना घातली आहे, ती तुम्हांला माहीत आहेच. ती कल्पना अशीः—

### वसंततिलका.

मी ईश या अखिल दृश्य चराचराचा।
लंघूं शके सुरपती न मदीय वाचा॥
वज्रासही भय मदीय बघोनि अस्त्रा।
तो काल का मजपुढें मिरवील शस्त्रां?॥ १॥

तुह्मी एखाद्या गाडींत बसलां ह्मणजे ती सबंध गाडी आपल्या एकट्यासाठीं असावी, त्यांत दुसऱ्या कोणी बसूं नये, अशी तुमची इच्छा असते. दुसरा मनुष्य गाडींत आला तर तुमचें पित्त जरा तरी खवळतेंच! तुम्ही एखाद्या खोलींत बसलां व तुह्मांला भेटण्यासाठीं कोणी पाहुणा आला तर मालक घरांत नाहींत म्हणून सांगण्यास तुह्मी आपल्या नोकराला सांगतां; असला तुमचा संकुचित स्वभाव आहे!

समजा, तुमच्या मालकीचें एक घर व जमीनजुमला आहे. तुमच्या शेजारीं राहणाऱ्या दुसऱ्या एका इसमाचें तुमच्याचप्रमाणें घर असून शेतवाडी आहे. आतां अशा स्थितींत आपल्या शेजाऱ्यापेक्षां आपल्याजवळ जास्त संपत्ति असावी, अशी स्वाभाविकपणें तुमच्या मनांत इच्छा उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. जगांत कोणताहि धर्म कसलाहि उपदेश करो, वेद कांहींहि प्रतिपादन करोत, आपल्या शेजाऱ्यापेक्षां आपण अधिक श्रीमान् असावें, आपल्या भोंवतालचे लोक आपल्या बरोबरीचे—समान दर्जाचे असूं नयेत, ते आपल्या छापेंत असावेत, आपण त्यांच्यापेक्षां वरचढ असावें, अशी महत्वाकांक्षा तुमच्या मनांत स्वभावतःच



* काउपरः—इंग्रजी कवि (१७३१—१८००)

उद्भवल्यावांचून राहणार नाहीं. कांहीं खिस्ती लोकांना–यांना हाडाचे खिस्ती असें नांव देतां येत नाहीं—एखादा बुद्धानुयायी, मुसलमान किंवा हिंदु आपल्या शेजारीं बसलेला केव्हांहि खपत नाहीं; अशी प्रत्यक्ष वस्तुस्थिति नाहीं काय ? ही गोष्ट राम स्वानुभवावरून सांगत आहे. या लोकांना इतर धर्मीयांचें दर्शन सुद्धां खपत नाहीं; त्यांना वाटतें, त्यामुळें आपल्या सुखांत कांहीं व्यत्यय येईल ! मग अशी स्थिति ' स्वर्गांत ' हि दिसून आली, आपल्या भोंवतीं खिस्त, बुद्ध यांच्यासारखे आपणाहून कितीतरी पटीनें श्रेष्ठ असे महात्मे तुम्हांला तेथें दिसून आले–व ते तसे तेथें दिसून येणारच–म्हणजे तुमच्या सुखाचा भंग होणार नाहीं काय ? या मुद्याचा जरा बारकाईनें विचार करा.

ज्या ठिकाणीं भेद–विषमता आहे त्या ठिकाणीं सुख होणें शक्य नाहीं. व्यवहारांत आपल्या आनंदवृत्तीमध्यें अंतर पडतें तें कशानें ? अर्थात् भेदाच्या योगानें–प्रत्येक मनुष्याला आपण ' एकमेवाद्वितीयम् ' असावें, आपणाशीं स्पर्धा करणारा कोणी मनुष्य असूं नये असें वाटतें. अर्थात्, ही गोष्ट निश्चित आहे कीं, बायबलमध्यें ज्या ' स्वर्गा ' चें वर्णन करण्यांत आलें आहे, असा तुमचा गैरसमज झालेला आहे, त्या 'स्वर्गा'मध्यें– तो खरा आहे असें मानलें तरीहि–तुम्हांला सुख भोगतां येणें अशक्य आहे.

## 'स्वर्गांत भेटणें' म्हणजे काय ?

आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, बायबलमधील ' स्वर्गा ' चें वर्णन करणारीं जीं वाक्यें आहेत त्यांचा संयुक्तिक अर्थ कसा लावावयाचा ? ' आपण स्वर्गांत भेटतों, ' असें बायबलमध्यें एक वाक्य आहे. ' आपण स्वर्गांत भेटतों. ' 'आपले सर्व आप्तेष्ट स्वर्गामध्यें भेटतात, ' असल्या वाक्यांतील खरें इंगित काय ? बायबलमधील ज्या ' नव्या करारा ' मध्यें ' आपण स्वर्गांत भेटतों, ' हें वाक्य आहे त्यामध्यें दुसरेंहि असें वाक्य आहे कीं, ' स्वर्ग हा आपल्या ठिकाणीं आहे, ईश्वर हा आपल्यामध्यें आहे; ' याचा अर्थ हाच कीं, ' स्वर्ग ' हा आपल्या हृदयांत आहे, बाहेर कोठें नाहीं. ' स्वर्गा ' चें राज्य हें बाह्य जगांत कोठें तरी आहे, आकाशामध्यें आहे, आकाशांतील अनंत ताऱ्यांमध्यें कोणत्या तरी एखाद्या ताऱ्यावर ' स्वर्गा ' चें राज्य आहे, असा भलताच समज करून घेऊं

नका. ईश्वर हा आकाशांतील एखाद्या ताऱ्यावर बसलेला आहे, असा ग्रह करून घेऊं नका. त्या बापड्या ईश्वरावर कांहीं दया करा; तो आकाशांतील ढगांमध्यें बसला असेल तर त्याला थंडी नाहीं का वाजणार ? ढगांतील थंडीनें तो बिचारा गारठून देखील जाईल ! सारांश, ईश्वर आपल्या हृदयांत आहे, 'स्वर्ग' हा आपल्या अंत:करणांत आहे, हें ध्यानांत ठेवा. थोडा विचार केलात म्हणजे ही गोष्ट तुमच्या बुद्धीला पटल्याशिवाय राहणार नाहीं.

## ईश्वरी साक्षात्कार म्हणजेच खरा 'स्वर्ग.'

ईश्वरी साक्षात्काराची--पूर्णानंदाची स्थिति संपादन करा, परमात्म्याशीं पूर्ण तादात्म्य पावा, ज्याला 'निर्वाण' म्हणून म्हणतात, ती स्थिति या देहांतच प्राप्त करून घ्या; ब्रम्हानुभवाचा दिव्य आनंद भोगा. ती स्थिति म्हणजेच खरा 'स्वर्ग' होय. तसें झालें म्हणजे तुम्ही प्रत्यक्ष 'स्वर्ग' व्हाल. तुम्हांला 'स्वर्गा'त जावयाचें नसून तुम्हीच स्वर्ग व्हाल. त्या ठिकाणीं सर्व विश्वाशीं तुमचें तादात्म्य होईल. सर्व मृत्यु पावलेल्या लोकांशीं, सर्व विद्यमान् मनुष्यांशीं, एवढेंच नव्हे तर पुढें जन्मास येणाऱ्या सर्व भावी मनुष्यांशीं तुम्ही तादात्म्य पावाल. खरा स्वर्ग--बायबलमध्यें वर्णन केलेला 'स्वर्ग' तुम्ही समजतां तो नव्हे--तुमच्यामध्यें आहे, व अशा त्या 'स्वर्गा'मध्यें--आत्मस्वरूपामध्यें आपण सर्व भेटणें शक्य आहे. जो जीवन्मुक्त झाला, या देहांत असतांहि जो मुक्त झाला--तो जित्या आणि मेलेला सर्व मनुष्यांशीं तादात्म्य पावलेला असतो. तसेंच भविष्यकाळीं उत्पन्न होणाऱ्या सर्वांशीं तद्रूप झालेला असतो. फार लांब कशाला ? आकाशांतील कोट्यवधि तारे, तसेंच यच्चयावत् पशुपक्षी व जीव यांना तो आपल्या आत्म्यामध्यें पाहातो.* आपलें वास्तविक स्वरूप--परमात्मत्व त्याच्या प्रत्ययास आलेलें असतें, एक व अद्वितीय असें सत्य व नित्य ब्रह्म आपण असा त्याचा अनुभव असतो. ज्याला 'अज्ञेय ईश्वर' असें नांव देण्यांत येतें, तेंच तो झालेला असतो. सर्व भूतांमध्यें वास करीत असलेलें सत्तत्त्व आपण आहों,

* यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ गीता, अ. ४।३५.

या अनुभवामुळें तो यच्चयावत् भूतांना आत्मस्वरूपामध्यें भेटतो; त्यांना आपणांमध्यें पहातो.

आतां एक विशेष रहस्याची गोष्ट तुम्हांला सांगण्यांत येणार आहे.

## निष्काम—निरिच्छ बना.

जगांतील लोकांच्या अंतःकरणामध्यें विषयवासना दृढमूल झालेल्या असतात. विषयोपभोगांसाठीं त्यांचें अंतःकरण नेहमीं तळमळत असतें. ज्या विषयांवर त्यांची प्रीति असते—ज्या वस्तूंच्या मागें त्यांचें मन धांव घेतें, त्या आपल्याला प्राप्त व्हाव्या, ज्या प्राप्त झाल्या त्या कधींहि नाहींशा होऊं नयेत, अशी त्यांची अंतःकरणपूर्वक इच्छा असते आणि त्यासाठीं त्यांचे अहोरात्र प्रयत्न चाललेले असतात. परंतु इतकें करूनहि त्यांत त्यांना फारच थोडे वेळां यश प्राप्त होतें; आपले प्रयत्न निष्फळ होत असल्याचाच त्यांना बहुधा अनुभव येतो; व अशी स्थिति झाली म्हणजे उद्विग्नता आणि निराशा यांचा पगडा त्यांच्या मनावर बसतो; वैषयिक प्रीति, भोगेच्छा यांच्या योगानें ते वेडे बनतात व जगांतील अनित्य वस्तूंसाठीं झुरण्यांत मातेरें करून घेतात. अशी शोचनीय स्थिति कां होते ? याचें कारण हें कीं, त्यांना आत्मस्वरूपाचा अनुभव—साक्षात्कार नाहीं हेंच होय. आपले स्नेही आपल्याला भेटावे अशी जर तुम्हांला इच्छा असेल, सर्व संपत्तीनें आपण होऊन आपल्या गळ्यांत माळ घालावी असें जर तुम्हांला वाटत असेल, तर राम ह्मणतो, हे प्रेमपाशांत गुरफटलेल्या लोकांनो ! ऐहिक धनाच्या प्राप्तीसाठीं लाळ घोंटणाऱ्या भ्रमिष्टानों ! तुम्ही आपल्या अंगांतील शक्तीचा फुकट अपव्यय करीत आहां. + तुम्ही ज्या लोकांवर प्रेम करतां—ज्यांच्यावर तुमची अत्यंत आसक्ति जडली आहे, त्यांच्यामागें तुम्ही लागण्याऐवजीं त्यांनींच तुमच्यामागें लागावें असें जर तुम्हांला खरोखर वाटत असेल, तर जगांतील सन्मानासाठीं हपापलेल्या व तो प्राप्त न झाल्यामुळें हिरमुसलेल्या लोकांनों ! रामाच्या उपदेशाचें मनन करा व त्याप्रमाणें आपला वर्तनक्रम ठेवा. हें जें गुह्य—हितगुज तो तुह्मांला देऊन ठेवीत आहे, त्याप्रमाणें तुम्ही वागूं लागलां ह्मणजे तुमच्या प्रीतिचे—इच्छेचे सर्व विषय तुमच्या पायांशीं आपोआप लोळत येतील.

+ निजहित सांडुनि विषयसुखास्तव घालविसी वय वांयां रे ।

तुम्हांला आत्मसाक्षात्कार करून घेतलाच पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाहीं. बायबलच्या भाषेंत बोलावयाचें असलें तर तुम्ही 'स्वर्गा'त गेलेंच पाहिजे व त्या ठिकाणीं तुमच्या इच्छा तृप्त झाल्याच पाहिजेत. स्वर्गांत सर्वांना भेटणें, याचा अर्थ काय? याचा अर्थ हाच कीं, ऐहिक प्रेम-वैषयिक प्रेम, हें खरें प्रेम नव्हे. एखाद्याजवळ प्रेमाची याचना करणें, याला प्रेम हें नांव द्यावयाचें झालेंच तर तें प्रेम म्हणजे भिकाऱ्याचें-दरिद्र्याचें प्रेम होय. **असल्या सर्व क्षुद्र प्रेमाला तुम्ही आपल्या हृदयांतून जेव्हां हांकलून द्याल, तेव्हांच खऱ्या ईश्वरी प्रेमाचा तुमच्या ठिकाणीं उदय होईल.** प्रेम ही कांही हुकूम करून मिळणारी वस्तु नव्हे. 'तूं माझ्यावर प्रेम कर,' असा एखाद्याला हुकूम केला तर तो आपणावर प्रेम करण्याऐवजीं आपला तिरस्कार मात्र करूं लागेल. **इच्छा टाकून दिली म्हणजेच इच्छेचा विषय प्राप्त होतो, असा या जगतांतील नित्य शाश्वत् नियम आहे.** एखाद्या वस्तूची आपण इच्छा केली म्हणजे ती वस्तु आपणापासून दूर दूर पळूं लागते; पण तीच इच्छा टाकून द्या, म्हणजे ती वस्तु पायाशीं आलीच म्हणून समजा. तात्पर्य, **पूर्णपणें निरिच्छ व्हा म्हणजे जग तुमच्यापुढें लोटांगणें घालूं लागेल.** लोक म्हणतात, 'मागा म्हणजे मिळेल, आणि ठोका ('स्वर्गा'चा दरवाजा) म्हणजे उघडेल.' बायबलमधील या वाक्याचें खरें ह्रद्गत लोकांच्या लक्ष्यांत येत नाहीं. वास्तविक स्थिति अशी आहे कीं, मागा म्हणजे कधींच मिळणार नाहीं, व ठोका म्हणजे मुळींच उघडणार नाहीं. एखादा भिक्षेकरी तुमच्या नजरेस पडला म्हणजे तुम्हांला त्याचा तिटकारा येत नाहीं का? भिक्षा मागणाऱ्या लोकांना तुमच्या इकडे तर रस्त्यांतून फिरण्याची सुद्धां मुभा नाहीं; त्यांना एकदम तुरुंगांत टाकण्यांत येतें. राम एकदां तुरुंग पाहण्यास गेला असतां त्याला त्या ठिकाणीं स्थिति अशी दिसून आली कीं, बहुतेक कैदी भिकारी म्हणून तेथें टाकण्यांत आले होते. दारिद्र्य हाच काय तो त्यांचा गुन्हा! भिकाऱ्यांना उद्देशून इकडचे लोक नेहमीं असेंच म्हणतात कीं, 'अरे, आमच्यामागें तुमची रिकामकी पिरपिर कां? अनाथगृहांत जा, काम करा आणि पोटाची खांच भरा!' इकडची खरी स्थिति अशीच नाहीं का?

तुम्हांला ईश्वराची भेट तर पाहिजे. परंतु दरिद्रीपणानें त्याच्याकडे जाण्याची, मलिन मोघावानें ईश्वराची भेट घेण्याची तुमची इच्छा आहे.

पण अशा स्थितींत ईश्वराला भेटण्याची तुम्हांला परवानगी कशी मिळणार! एखाद्या राजाची मुलाखत घ्यावयाची असली तर तुम्हांला उंची पोषाख घालून त्याच्याकडे गेलें पाहिजे. याच न्यायानें ईश्वराची भेट तुम्हांस पाहिजे असली तर निरिच्छपणाचा–निष्कामतेचा पोषाख अंगावर चढवून गेलें पाहिजे. सर्व इच्छा, कल्पना यांचा अजिबात त्याग केला पाहिजे.

'स्वर्गाचें राज्य (आत्मसाक्षात्कार) संपादन करा म्हणजे बाकीच्या गोष्टी तुमच्याकडे अनायासें चालून येतील' हा सिद्धान्त आहे.

कर्मतत्त्व प्रतिपादन करतें कीं, मनुष्याचें दैव त्याच्या स्वतःच्या हातीं आहे. आपली सर्व परिस्थिति आपण निर्माण करतों; एवढेंच नव्हे तर ज्या मातापितरांच्या पोटीं आपण जन्मास येतों त्यांची निवडसुद्धां आपणच करतों. हें विधान दिसण्यांत चमत्कारिक आणि निराधार असें वाटेल. परंतु हें सत्य आहे, केवळ सत्य आहे.

कर्मतत्त्वाप्रमाणें (कर्मतत्त्वाचा सांगोपाग विचार राम करणार नाहीं; तर सदरहू विषयास आवश्यक तेवढ्याच भागाचें विवेचन करण्यांत येणार आहे.) स्थिति अशी होते कीं, कोणत्याहि वस्तूची प्राप्ति व्हावी, अशी तुमच्या अंःतकरणाला तळमळ लागून राहिली म्हणजे ती वस्तु तुम्हांला प्राप्त होत नाहीं. अशी स्थिति झाली व पुष्कळ खटपट करूनहि तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं, तुमची इच्छा विफल झाली म्हणजे तुम्ही निराश होतां, त्या वस्तूचा तुम्हांला कंटाळा येतो; व असें झालें म्हणजे जिच्याकरितां तुम्ही एवढी घडपड केलीत ती वस्तु तुम्हांला प्राप्त होते, असा कर्माचा नियम आहे.

आपण चालतों कसे, हें तुम्हांला माहीतच आहे. चालतांना आपल्याला एक पाऊल जमिनीवर ठेवावें लागतें व दुसरें पाऊल वर उचलावें लागतें. वर उचललेलें पाऊल नंतर आपण पुढें टाकतों व दुसरें पाऊल वर उचलतों. ह्या न्यायानें कर्मतत्त्वाप्रमाणें सर्व गोष्टी व्हाव्या, आपल्या मनांत येणाऱ्या सर्व इच्छा तृप्त व्हाव्या, अशी जर तुमची मनापासून इच्छा असेल तर तुम्ही आपल्या इच्छा–कामना यांना रजा दिली पाहिजे; व अशा रीतीनें कांहीं काल वासनारहित स्थितींत गेल्यानंतर तुमच्या मनांत (प्रारब्ध कर्मानें) उत्पन्न होणाऱ्या सर्व इच्छा तृप्त होतील. सामान्यतः कर्मतत्त्वाच्या

फक्त एका अंगाचाच—ईश्वरापाशीं जें जें मागावें तें तें मिळतें ह्या अंगा-चाच—तेवढा लोक विचार करितात, दुसऱ्या अंगाचें म्हणजे निरिच्छपणाच्या तत्त्वाचें विवेचन फारच थोड्या ग्रंथांत केलेलें दिसून येतें. परंतु राम तुम्हांला सांगत आहे कीं, तुमच्या झाडून सर्व इच्छा तृप्त झाल्याच पाहिजेत; फलद्रूप झाल्याच पाहिजेत. तुमच्या मनांत ज्या ज्या आकांक्षा असतील त्यांतील प्रत्येक यशस्वी झाल्याशिवाय राहाणार नाहीं. परंतु हें सर्व एका अटीवर अवलंबून आहे. ती अट ही कीं, तुमच्या इच्छा सफल होण्याच्या पूर्वीं त्यांच्याबद्दलची त्यागबुद्धि तुमच्या अंगीं दृढ झाली पाहिजे. हें वैराग्य तुमच्या चित्तांत बाणलें म्हणजे तुमच्या इच्छा परिपूर्ण झाल्याच म्हणून समजा.—ज्यांनीं 'हर्मेटिक ब्रदरहुड' या संस्थेपुढें झालेलीं पूर्वीचीं व्याख्यानें ऐकलीं नसतील, अशा लोकांना हा मुद्दा चांगला समजणें शक्य नाहीं. तसें असल्यास पुनः केव्हां तरी या मुद्याचें विवेचन करण्यांत येईल.

## सारेंच नश्वर.

दुसरी एक गोष्ट आतां सांगावयाची आहे. बहुतेक लोकांची अशी इच्छा असते कीं, आपले कौटुंबिक संबंध, नातींगोतीं सदोदित अशींच कायम राहावीं. परंतु अशा सर्व लोकांना उच्च स्वरानें असें सांगितलें पाहिजे कीं, ' बाबांनो, आपले सर्व ऐहिक आप्तेष्टसंबंध कायम राखण्या-संबंधाच्या तुमच्या कल्पना फुकट आहेत. असें होणें तत्त्वतः अशक्य आहे. असली भलतीच आशा तुम्हीं मनांत बाळगली आहे तिला अजिबात फांटा द्या. ' या जगांतील कोणती गोष्ट शाश्वत आहे ? सर्वांचा केव्हांना केव्हां तरी नाश झालाच पाहिजे. जें जें दिसतें तें तें सर्व अशाश्वत असल्यामुळें तें कायम टिकण्याची इच्छा करणें हा निवळ वेडेपणा आहे. ही मूर्खप-णाची—अज्ञानाची कल्पना आपल्या मनांतून काढून टाका, असल्या भ्रामक विचारांना आपल्या चित्तांत मुळींच थारा देऊं नका, असें राम तुम्हांला पुनः पुनः बजावून सांगत आहे. या जगांत शाश्वत, नित्य, टिकाऊ असें कांहीं असलें तर तें तुमचें परमात्मस्वरूप, ईश्वरत्व होय. बाकीच्या सर्व वस्तु लय पावल्याच पाहिजेत. हें शरीर कायम टिकणें अशक्य आहे. जें संकुचित—मर्या-दित आहे, त्याला मरण हें ठेवलेलें आहे. हें शरीर कोणत्या तरी युक्तीनें हजारों वर्षें टिकवितां आलें तरी अखेरीस पंचत्वाला जाणारच; तुम्ही कांहींहि

केलेंत तरी तुम्हांला मृत्यु कायमचा टाळतां येणें सर्वथा अशक्य आहे. स्थित्यंतर हा जगाचा त्रिकालाबाधित नियम आहे. हा आपला भूगोल, आकाशांतील कोटयवधि तारे, एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष सविता, या सर्वांचा केव्हांना केव्हां तरी अंत म्हणजे स्थित्यंतर निश्चयानें होणार. मरणाची गोष्ट सोडून दिली तरी आपलें हें शरीर प्रतिक्षणीं बदलत आहे. जुन्या गोलकांचा नाश होऊन नवीन गोलक उत्पन्न होत आहेत, व अशा रीतीनें दर सात वर्षांनीं आपल्या देहाचें अजिबात रूपांतर होतें.

हाच न्याय आपले सर्व आप्तेष्टसंबंध, नातीं गोतीं यांस तंतोतंत लागू पडतो. आपला गोतवळा नेहमी बदलत जाणार. सबब आपला गोतवळा कायम राखण्यासंबंधाचे विचार डोक्यांतून काढून टाका.

( शार्दूलविक्रीडित. )

वारे वाहुत खालती, परंतु या जन्मस्थला आपगा ।
ज्वाला शीत वमो हुताश, अशनी वंदो भिवोनी नगा ॥
मारो जीव सुधा, दिवाकर रवी अंधार देवो तरी ।
सारें नश्वर हें असे, दिसत जें मिथ्या न ही वैखरी ॥

जगांतील कोणत्याहि अशक्य गोष्टी एक वेळ शक्य होतील. पण विश्वाच्या अनित्यतेसंबंधाचा हा सिद्धान्त कधींहि फिरणार नाहीं. व तुमची यापेक्षां कांहीं निराळी समजूत असली तर ती निखालस चुकीची आहे. या जगांत आपण केवळ चार दिवस राहणारे पाहुणे म्हणून आलेले आहों. एखाद्या समुद्रामध्यें ज्याप्रमाणें निरनिराळे लांकडाचे ओंडके चार दिशांनीं यदृच्छेनें एकत्र जमतात, परंतु ते कांहीं वेळ एकत्र राहतात न राहतात तों एखादी प्रचंड लाट येऊन त्यांना परत दूर फेंकून देते. आतां ते पांगलेले ओंडके पुनः एका ठिकाणीं जमणार नाहींत असें नाहीं. ते निसर्गाच्या लीलेनें पुनः एका जागीं वाहून येतील, किंचित्काल एकमेकांजवळ राहातील, पण निसर्गाच्या नियमाप्रमाणें पुनः विभक्त केले जातील. या जगांत जन्मास येणाऱ्या जीवांची स्थिति हुबेहूब अशाच मासल्याची असते.* आपल्या जीवितक्रमांतहि हाच प्रकार दिसतो.

* यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ ।
समेत्यच व्यपेयातां तद्वत् भूतसमागमः ॥

आपल्या कुटुंबांतील आई, बाप, बहिणी, भाऊ हे दिवसांतून कांहीं कांहीं तास एकत्र जमतात, पण बाकीच्या वेळीं ते उद्योगधंद्यासंबंधानें निरनिराळ्या ठिकाणीं जातात. पुनः कांहीं वेळ एक ठिकाणीं जमतात; जेवणखाण, गप्पागोष्टी यांत कांहीं वेळ घालवतात व रात्रीं निजण्याच्या वेळीं फिरून निरनिराळ्या जागीं जाऊन निजतात. ही जी स्थिति आपल्या लहानशा कुटुंबांतील माणसांची आपण प्रत्यक्ष पाहातों, तीच विश्वाच्या अफाट कुटुंबासंबंधानें आहे. आपले इष्टमित्र, नात्यागोत्याचीं माणसें नित्य एकाच ठिकाणीं कायम कशीं राहातील ? आणि जर वस्तुस्थिति अशी आहे तर लहान मुलांप्रमाणें बालिशवृत्ति कां धारण करतां ? हे संबंध तुटले ह्मणजे मुलाप्रमाणें कां रडतां ? या जगाच्या मुळाशीं नित्य, शाश्वत, त्रिकालीं अबाधित असणारें जें सत्तत्त्व आहे, त्याचा विचार कां करीत नाहीं ? अशाश्वताचा संग्रह करण्यापेक्षां शाश्वताचा विचार तुमच्या डोक्याला कां शिवत नाहीं ? हें चिंतन जास्त महत्त्वाचें नाहीं काय ? जें प्राप्त झालें असतां तुमच्यापासून नाहींसें होण्याची कधीं धास्ती बाळग- ण्याचें कारण नाहीं, अशा आपल्या आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेण्याचा, त्याची अनुभूति करून घेण्याचा ध्यास तुह्मी आपल्याला कां लावून घेत नाहीं ? जगांतील क्षुद्र आणि अनित्य वस्तूंच्या—या मृगजलाच्या—मागें धांवत जावून आपल्या नित्य सुखाला—आत्मस्वरूपानुभवाच्या आत्यन्तिक आनंदाला कां मुकतां ? ०

हिंदुस्थानांत एका मुलीचें नुकतेंच लग्न झालें होतें. लग्नाचा सोहळा झाल्यानंतर एकदा ती नवी नवरी, तिच्या नणंदा, सासू अशा मखेनें

---

० अशाश्वत संग्रह कोण करी ॥ ध्रु० ॥
चिरगुट चिंध्या जोडुनि कंथा । गोधडी हेचि बरी ॥ १ ॥
नित्य नूतन देइल माधव । भिक्षा हृचि बरी ॥ २ ॥
कोण करी घर सोपे माड्या । विवरीं वस्ति बरी ॥ ३ ॥
आत्मस्त्रीसुत परकी होती । ठेविति भूमिवरी ॥ ४ ॥
अमृत म्हणे मज भिक्षा डोहळे । उठति अशा लहरी ॥ ५ ॥



अमृतराय.

गोष्टी बोलत बसल्या होत्या. त्या मुलीचा नवरा बाहेर गेलेला होता, अशा वेळीं त्यांचें भाषण चाललें होतें. त्या नव्या नवरीच्या नणंदांनीं जाणून बुजून आपल्या नव्या भावजयीला खिजविण्यासाठीं आपल्या भावाची—तिच्या नवऱ्याची—निंदा करण्यास सुरवात केली. त्या अनेक प्रकारांनीं त्याच्याबद्दल टाकून बोलूं लागल्या. त्यावेळीं राम त्या ठिकाणीं हजर होता. त्या नणंदांनीं केलेली चेष्टा, त्याचप्रमाणें त्या नव्या नवरीनें आपल्या नणंदाच्या टीकेला दिलेलें चतुर व मार्मिक उत्तर रामानें ऐकलें. ती ह्मणाली. 'वन्सं, तुमचं आपलं ठीक आहे; तुम्हांला काय, इथं चार दिवस राहायचं आहे. पण एखाद्या लहान मुलाप्रमाणं मी जर तिकडच्यांवर रुसून बसूं लागलें तर माझं कसं चालेल ? मला तिकडच्याबरोबर सगळा जन्म काढायचा आहे ना ? ”

या गोष्टींतील नवऱ्यामुलीइतके तरी शहाणे व्हा. या जगांतील सर्व ऐहिक संबंध, सर्व नातींगोतीं शाश्वत टिकणें असंभवनीय आहे. तुम्हांला आपला सारा जन्म, नित्य, सनातन अशा आत्म्याबरोबर काढावयाचा आहे. तो संबंध तोडून तुमचें चालावयाचें नाहीं. अशा त्या आत्म्याचें स्वातंत्र्य कां गमावतां—कां विकतां ? व अज्ञानांत दिवस कां काढतां ? आपल्या परमात्म्याचें ऐश्वर्य प्रकट कां करीत नाहीं ? कांहीं तरी सारासार विचार करा.

## बुद्धाचें वैराग्य.

एका वेळीं बुद्धदेवाकडे एक इसम आला व आपल्या बापाला भेटण्यास जाण्याविषयीं त्यानें त्याला आग्रह केला. तुम्हांला माहीत असेल कीं, बुद्ध हा एका सार्वभौम राजाचा मुलगा होता. परंतु त्याला वैराग्य उत्पन्न होऊन त्यानें अरण्यवास स्वीकारला, व भिक्षुवेष धारण करून त्यानें सर्वत्र संचार केला. त्याच्या ठिकाणीं वैराग्य इतकें कडकडीत बाणून गेलें होतें कीं, तो केवळ अयाचित वृत्तीनें राहात असे. भिक्षा मागण्यासाठीं तो कोणाच्या घरीं जात नसे; तो रस्त्यांतून सरळ जात असे, व आपल्याजवळच्या भिक्षापात्रांत कोणी अन्न घातलें तर तेवढ्यावरच तो आपला उदरनिर्वाह करी. आपल्या शरीराचा योगक्षेम कसा चालेल, याची तो बिलकुल चिंता करीत नसे. कोणीं कांहीं दिलें तर ठीक, नाहीं तर दिवस

तसाच काढावा, असा त्याचा नेहमींचा क्रम असे. या त्याच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें बुद्धदेवानें आपल्या बापाच्या राज्यांत प्रवेश केला; व रस्त्यांतून पूर्ण संन्यस्तवृत्तीनें, भिक्षुवेषानें तो चालला होता. अशा पूर्ण स्थितीच्या ज्ञानी मनुष्याला भिकारी, भिक्षेकरी असें नांव देणें गैर आहे. जो कोणापाशीं कांहीं मागत नाहीं, जो सर्वस्वी निरपेक्ष बनला, अन्न-आच्छादनाकरितांहि जो याचना करीत नाहीं, एवढेंच नव्हे तर स्वतःच्या शरीराविषयींहि जो पूर्ण बेफिकीर, अशा मनुष्याला भिकारी कसें म्हणावयाचें ? तो सर्व राजांचा राजा, सम्राट् असें म्हणणेंच न्याय्य होय.

अशा रीतीनें निरिच्छ व उदासवृत्तीनें बुद्धदेव रस्त्यांतून चालला होता. ही बातमी त्याच्या बापाला समजली व लगेच तो त्या ठिकाणीं आला. आपला मुलगा—राजपुत्र भिकाऱ्याच्या वेषांत पाहतांच राजाचें अंतःकरण कळवळलें. तो मोठ्यानें शोक करूं लागला, व आपल्या मुलाची समजूत करण्याच्या हेतूनें तो म्हणालाः—'प्रिय राजपुत्रा, तूं हें काय मांडलें आहेस? राजाच्या—सार्वभौम बादशहाच्या पोटीं जन्मास येऊन हा असला भिकाऱ्याचा वेष तूं धारण केलास, तेव्हां तुला म्हणावें तरी काय ? अरे, तुझ्या आजापणजांनीं राज्याचा गाडा हांकला, पण रस्त्यांतून भिक्षा मागत फिरण्याचें लाजिरवाणें काम कधीं केलें नाहीं. मग तुलाच अशी बुद्धि कोठून उत्पन्न झाली ? आपल्या कुलाच्या दिव्य कीर्तीला काळिमा फांसण्याचें नीच काम करूं नको. आपल्या पूर्वपरंपरेचा अभिमान बाळग व पूर्वजांप्रमाणें राज्य करून त्यांची कीर्ति अधिक उज्वलित कर. मी सांगतों तें ऐक; निदान माझ्या शब्दांकरितां—माझ्या इभ्रतीकरितां तरी हा भिक्षुवेष टाकून दे.'

यावर स्मित करून बुद्धदेव आपल्या बापाला म्हणालाः—'महाराज, कुलासंबंधानें म्हणाल तर ते सर्व संबंध आतां मागें पडले. मीं आपल्या पूर्वजन्मांचें स्मरण करून पाहिलें, तर त्यांत मला आपण म्हणतां त्याहून निराळाच प्रकार दिसतो. माझे पूर्वजन्मांतले पूर्वज हे भिक्षूच होते. असें पहा, दोन रस्ते निरनिराळ्या बाजूंनीं येऊन एकमेकांना ओलांडून जातात. याच न्यायानें तुम्हीं अनेक जन्मांपासून एका दिशेनें आलां व मी दुसऱ्या दिशेनें आलों. तुमची माझी ह्या तिठ्यावर—या जन्मांत गांठ

पडली. आतां मी आपल्या मार्गानें पुढें चाललों व तुम्हीहि आपल्या मार्गानें बेलाशक जा. '

## तुम्ही कोण व तुमचे कोण ?

आतां आप्तसंबंध कोठें आहेत ? कौटुंबिक संबंध ते कोठें राहिले ? हें सांगा पाहूं. यावर तुम्ही म्हणाल कीं, आमचीं मुलेंबाळें तर आहेत ना ! याला उत्तर म्हणून आतां कांहीं गोष्टी राम तुम्हांला सांगणार आहे. राम आतां ज्या कांहीं गोष्टी सांगणार आहे, त्या तुमच्या पाश्चात्य सुधारणेच्या दृष्टीनें तुम्हांला ग्राम्य किंवा अश्लील अशा वाटतील, पण त्याबद्दल तुम्ही त्याला क्षमा कराल अशी आशा आहे.

तुम्ही ह्मणतां, ' हीं मुलेंबाळें आमचीं आहेत. हा आमचा मुलगा; याचा पिंड आमच्यापासून—आमच्या रक्तापासून उत्पन्न झाला;' असें ह्मणून तुम्ही त्याला आलिंगन देतां, आपल्यापासून त्याला क्षणमात्र दूर होऊं देत नाहीं. तो मुलगा आपला आहे, सबब त्याचा व आपला कधींहि वियोग होऊं नये, असें तुमचें ह्मणणें असतें. पण त्या मुलाप्रमाणें ज्या उवा तुमच्या अंगावर उत्पन्न होतात, त्याहि तुमच्याच नाहींत काय ? कारण, त्या तुमच्याच रक्तापासून, घामापासून उत्पन्न झाल्या आहेत. मग असें असतां त्यांचा आपला वियोग कधीं होऊं नये, असें तुम्हांला कधीं वाटत नाहीं इतकेंच काय, त्यांना तुह्मी मारून टाकतां. आतां वास्तविक पाहिलें तर आपल्या कांहीं मुलांना मारणें व कांहींना प्रेमानें कवटाळणें, हें अप्रशस्त आणि अन्यायाचें कृत्य नाहीं काय ? यावरून तुह्मी आपल्या मुलांशीं निष्ठुरपणानें वागावें, त्यांच्या गरजांकडे दुर्लक्ष्य करावें, असें रामाचें तुम्हांला सांगणें आहे, असा अर्थ नाहीं. राम तुह्मांला जो उपदेश करतो तो हाच कीं, सर्व जगावर आत्मत्वानें प्रेम करण्यास शिका. मग तुह्मी आपल्या मुलांवर प्रेम करूं नये, असें तो प्रतिपादन करील काय ? रामाच्या उपदेशाबद्दल आपला गैरसमज करून घेऊं नका. त्याच्या प्रतिपादनाचें तात्पर्य हें कीं, आपल्या कौटुंबिक प्रेमाला आपल्या अध्यात्मक प्रगतीच्या मार्गांत आड येऊं देऊं नका. आपल्या नात्यागोत्यांवर प्रेम करण्याच्या भरीं भरून आत्मसाक्षात्कार करून घेण्यांत

कसूर करूं नका; असले सर्व व्यत्यय बाजूला सारून आपली प्रगति अस्खलित चालूं द्या.

ज्याला तुह्मी राम ह्मणतां त्या ह्या शरीरानें जेव्हां संन्यासाश्रम स्वीकारला आणि सर्व कौटुंबिक संबंधाला अखेरची रजा दिली, ऐहिक ऐश्वर्याच्या महत्वाकांक्षेला अजिबात झुगारून दिलें, तेव्हां कांहीं लोकांनीं त्याला विचारलें, ' महाराज, आपण संन्यस्त झालां आहां हें खरें; पण आपल्या बायकामुलांची, नातेवाइकांची काय वाट ? जे विद्यार्थी आपल्या मदतीची अपेक्षा करीत होते, त्यांचा कांहीं तरी विचार आपण केला आहे काय ?' असा प्रश्न रामाला करण्यांत आला. यावर राम ह्मणतो, आपले शेजारी कोण ! जरा सूक्ष्म विचार करा. ज्या मनुष्यानें रामाला हा प्रश्न विचारला तो, राम ज्या महाविद्यालयांत अध्यापकाचें काम करीत होता, त्याच महाविद्यालयांत अध्यापक होता. त्याला रामानें विचारलें ' अहो, आपण ह्मणतां तें ठीक आहे; पण मी ह्मणतों कीं, आपण महाविद्यालयांत अध्यापकाचें काम करतां; पण आपल्या बायकामुलांचें ज्ञान आपल्याइतकें आहे का ? तुमची आत्या, आजी, तुमचे चुलत भाऊ यांची तुमच्याइतकी विद्वत्ता आहे का ? ' यावर ' नाहीं ' असें त्यानें उत्तर दिलें. तेव्हां राम ह्मणाला, ' तर मग तुह्मी विद्यालयांत येऊन येथील विद्यार्थ्यांना व्याख्यानें देण्याऐवजीं तीं आपल्या कुटुंबांतील मंडळीपुढें कां देत नाहीं ?' यावर त्यानें उत्तर दिलें, ' त्यांना तीं समजणार नाहींत म्हणून.' नंतर त्या प्रश्नाचा रामानें आपल्या स्नेह्याला बरोबर उलगडा करून दिला. राम ह्मणाला, "असें पहा, आपले आप्तेष्ट, बायकामुलें, नोकरचाकर, आपली आजी, आपली आत्या, आपले चुलत बंधु, आपले कुत्रे हे आपले खरे शेजारी नव्हत. कुत्रा हा प्राणी जरी तुमचा नेहमींचा सोबती असला, तुह्मांला सोडून तो कधीं जात नाहीं, व अज्ञ लोकांच्या दृष्टीनें तो जरी तुमचा कायमचा सोबती असला तरी तो तुमचा खरोखरी संबंधी नाहीं. तुह्मी आपल्याला कोण ह्मणून समजतां ? तुमचें स्वतःचें खरें स्वरूप काय ! हें शरीर तुह्मी खास नव्हे; ज्याला परमात्मा म्हणून म्हणतात तो तुम्ही आहां. परंतु तुम्ही युरोपांतील तत्त्वज्ञानांत मुरलेले असल्यामुळें तुह्मांला हें मान्य होत नाहीं.

विचार करणारें मन आम्ही आहों, असें कदाचित् तुम्ही म्हणाल. ठीक आहे. तसें गृहीत धरलें तरीहि मनाच्या ज्या उच्च स्थितींत तुम्ही संचार करीत असाल त्या स्थितींत जे लोक असतील तेच तुमचे संबंधीं होऊं शकतील. जे जे विद्यार्थी किंवा बी. ए. एम्. ए. वगैरे पदव्या धारण करणारे जे लोक तुम्ही जीं पुस्तकें वाचतां तींच पुस्तकें वाचीत असतील, ज्या विषयांचें मनन तुम्ही करीत असाल त्या विषयांचें मनन जे करीत असतील, तेच तुमचे शेजारी–संबंधी असें म्हणतां येईल. ज्या वेळीं तुम्ही आपल्या खोलींत एखाद्या विषयाचें अध्ययन करीत असतां त्या वेळीं लोक म्हणतात, 'तो अमका मनुष्य खोलींत वाचीत आहे.' आतां खरें पाहूं गेलें तर तुम्ही त्या वेळीं खोलींत असतां कीं विचारांत असतां, हें शपथेवर सांगा पाहूं ! तुम्ही जरी बाह्यतः खोलींत असलां, तुमचा आवडता कुत्रा तुमच्या मांडीवर बसलेला असला, तुमचीं मुलें जरी खोलींत आलीं असलीं, तरी त्यापैकीं कशाचेंहि तुम्हांला भान राहात नाहीं. तात्त्विक विचाराच्या उच्च भूमिकेंत तुम्ही त्या वेळीं आहां व तुमच्या त्या मनःस्थितींत जे जे लोक असतील ते ते तुमचे होत; ते तुमचे शेजारी होत, तुमचें शरीर ज्या जागीं असेल तेथील मुलेंबाळें किंवा कुत्रीं हीं तुमचीं खास नव्हत. तुमच्याच विचाराच्या भूमिकेंत असणारे, तेवढे तुमचे खरे संबंधी. तुम्हांला ते अगदीं जवळ होत. अशा रीतीनें विचार केला असतां आपले आप्तेष्ट, नातेवाईक हे आपले कसे नव्हत, हें तुमच्या लक्ष्यांत येईल. तुम्ही ज्या घरांत राहातां, त्याच घरांत उंदीर, डांस, पिसवा, कुत्रीं, मांजरें, वगैरे राहातात, पण ते सर्व तुमचे नातेवाईक, संबंधी असें खात्रीनें म्हणतां येणार नाहीं.'

## प्रेम म्हणजे साधर्म्य.

'अहो राजश्री, आपल्याला पुनर्जन्मासंबंधानें विचार कर्तव्य असेल तर आपल्याला पुढचा जन्म कोणता यावा, तें मेहेरबानी करून सांगा पाहूं. आपल्या अज्ञानी आजीच्याच कुलांत पुनः जन्माला यावें, असें आपल्याला कधीं तरी वाटेल काय ? अर्थात् नाहीं. ज्या ठिकाणची सर्व परिस्थिति तुम्हांला अनुकूल होईल, ज्या ठिकाणीं तुमच्या विचारांचे लोक असतील, अशा ठिकाणीं तुम्ही जन्माला याल. आज ज्या कुटुंबांत तुम्ही

जन्माला आलां आहां, त्याच्याहून निराळ्या कुटुंबांत तुम्ही पुढें जन्माला याल. तुमच्या त्या त्या काळच्या मानसिक उन्नतीच्या मानानें तुमची जन्म-परिस्थिति प्रत्येक वेळीं निश्चित केली जाईल. एका जन्मीं एका कुलांत तर दुसऱ्या जन्मीं दुसऱ्या कुलांत, अशा रीतीनें तुमची परिस्थिति एकसारखी बदलत राहणार. प्रेम याचा अर्थ काय ? प्रेम म्हणजे विचारांचें—मनोभूमिकेचें—भावनांचें साधर्म्य होय. व ज्या व्यक्तींमध्यें अशा प्रकारचें सामर्थ्य वसत असतें, त्यांच्यामध्यें प्रेम आहे, असें आपण म्हणतों. समजा, एखाद्या मनुष्यावर आपलें प्रेम आहे; त्या प्रेमाच्या योगानें त्याचें हित तें आपलें हित, त्याचें सुख तें आपलें सुख, अशी स्वाभाविक स्थिति होते. ज्याच्या योगानें त्याला दुःख होतें त्याच्या योगानें आपल्यालाहि दुःख होतें. प्रेमाचा सहज स्वभाव असा आहे. आतां प्रेम वास्तविक पाहिलें तर आत्मविषयक असतें. दुसऱ्या मनुष्यावर त्याच्यासाठीं आपण प्रेम करीत नाहीं, तर आत्म्यासाठीं करतों. प्रेम हें आत्म्याव्यतिरिक्त दुसऱ्या कशावरहि असणें शक्य नाहीं. कल्पना करा कीं, क, ख, ग हे तीन मनुष्य आहेत. क व ख यांच्यामध्यें कांहीं समानधर्म आहेत, तसेच ते क व ग यांच्यामध्येंहि आहेत. परंतु, क व ख यांच्यापेक्षां क व ग यांच्यामध्यें जास्त साधर्म्य आहे असें समजा. आतां अशी स्थिति असली तर कचें मन खपेक्षां ग-कडे जास्त ओढलें जाईल."

आपले जुने कौटुंबिक संबंध बदलत जाऊन नवे संबंध उत्पन्न होतात, याचें कारण हेंच होय. मनुष्यांमनुष्यांमधील साधर्म्यालाच प्रेम ही संज्ञा दिली जाते. व ज्या दोन व्यक्तींमध्यें हें सामर्थ्य अत्युच्च स्थितीला जाऊन पोहोंचलेलें असतें, त्यांच्यामध्येंच पूर्ण प्रेम उत्पन्न होतें.

"या मुद्याचा विचार करतां करतां दुसऱ्या एका मुद्याचा आपणांस विचार करावयास पाहिजे. हा दुसरा मुद्दा अतिशय महत्वाचा आहे. हा मुद्दा म्हणजे निर्भयपणा. भीति कशी उत्पन्न होते, भीतीचें कारण काय, असा प्रश्न आहे. आपले सर्व कौटुंबिक संबंध सध्यां आहेत त्याप्रमाणें व त्या स्थितींत भविष्यकाळीं नित्य कायम राहावे, अशी आपली नेहमीं इच्छा असते. व आपल्या सर्व भीतीचें कारण हेंच होय*. लोक म्हणतात,



*भयं द्वितीयाभिनिवेशतः स्यात् । रामगीता.

' भिऊं नका, भिऊं नका ! ' पण हें बोलणें किती असंबद्धपणाचें आहे ! भीतिग्रस्त होऊं नका, असा उपदेश करणें म्हणजे भीति ही आपल्या हातांत आहे, भीतीवर आपली सत्ता आहे, असें गृहीत धरण्यासारखें आहे. परंतु वास्तविक स्थिति अशी आहे कीं, भीति ही आपल्यावर सत्ता गाजवीत असते, तिचा आपल्यावर पगडा असतो. भीति नाहींशी कशी करावी, हा एक स्वतंत्र विषय आहे व त्याचा विचार पुढें केव्हां तरी करण्यांत येईल.

उपनिषदांतील कांहीं भागाचें भाषांतर वाचून दाखवून नंतर राम ' बस्स ! ' करणार आहे. रामाची अशी इच्छा आहे कीं, हिंदुस्थानांतील एक तरी शब्द तुम्ही शिकलेंच पाहिजे !

' आत्मा हा अणूपेक्षां अणु आणि महतापेक्षां महत् आहे. '
' तो जीवाच्या बुद्धिरूपी गुहेमध्यें अधिष्ठित झालेला आहे. '
' ज्याच्या ठिकाणीं विषयांबद्दल वैराग्य उत्पन्न झालें आहे, '
' असा मनुष्य शुद्धसत्त्वाचा उदय झाल्यानंतर आत्म्याचें स्वरूप पाहतो.'
' आत्मा हा उपाधिभेदामुळें स्थिति, गति, नित्यानित्य अशा विरुद्ध'
' धर्मांनीं युक्त दिसतो; पण विवेकी मनुष्याला त्याचें स्वरूप '
' सहज अनुभवतां येतें. सर्व शरीरामध्यें आत्मा असून तो अशरीरी'
'आहे म्हणजे त्याला कोणतेंहि शरीर नाहीं. सर्व अवस्थांमध्यें असून'
' तो अवस्थातीत आहे. अशा त्या व्यापक आत्म्याचें स्वरूप '
' अनुभूत करून घेतल्यानंतर ज्ञानी सर्व शोकाच्या पलीकडे '
' जाऊन पोहोंचतो. '*

---

* अणोरणीयान्महतो महीयानात्मास्य जन्तोर्निहितो गुहायाम् ॥ तमक्रतुः पश्यति वीतशोको धातुः प्रसादान्महिमानमात्मनः ॥ आसीनो दूरं व्रजति शयानो याति सर्वतः ॥ कस्तं मदामदं देवं मदन्यो ज्ञातुमर्हति ॥ अशरीरं शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितम् । महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥

कठोपनिषद्, प्रथमाध्याय,
द्वितीयवल्ली अनुवाक २०।२१.

# विवाहसंबंध व आत्मसाक्षात्कार *

( ता. २८ डिसेंबर १९०२ रोजीं दिलेलें व्याख्यान )

## भलतेंच तर्कशास्त्र लढवूं नका



वेदान्त विषयावरील कांहीं आक्षेप रामापुढें मांडण्यांत आले आहेत. थोड्या दिवसांखालीं एक इसम म्हणाला कीं, 'वेदान्त हेंच जर हिंदु लोकांचें तत्त्वज्ञान असलें तर त्यावरून एका गोष्टीचें-हिंदुस्थानची राजकीय दृष्ट्या अधोगति कां झाली, याचें नक्की अनुमान करण्याला चांगली जागा आहे.' दुसरा एक मनुष्य म्हणाला कीं, ' वेदान्त हा धर्म—हें तत्त्वज्ञान जगांतील कोणत्याहि धर्मापेक्षां—तत्व-ज्ञानापेक्षां अत्यंत श्रेष्ठ—उदात्त आहे, असें जर तुमचें म्हणणें तर हिंदु-स्थान देश दुर्दशेंत राहावा व खिस्ती राष्ट्रें तेवढीं उन्नतीच्या शिखरावर आरूढ व्हावीं, या स्थितीची उपपत्ति तुम्ही कशी लावतां ? "

सदरहू प्रश्नांचीं उत्तरें आज देण्यांत येणार नाहींत. कारण या प्रश्नांचें विवेचन राम करूं लागला तर आजचा ठरलेला विषय बाजूला राहील. पुढें केव्हां तरी या प्रश्नांचीं उत्तरें देण्यांत येतील, व हिंदुस्थानची अधो-गति वेदान्तामुळें झाली असें ज्यांचें मत आहे, ते रामाचीं उत्तरें ऐकून आश्चर्यचकित झाल्याशिवाय राहणार नाहींत. या विषयाचा विचार कर-ण्याला आज फुरसत नाहीं. श्रोतृसमुदायाला रामाची एवढीच विनंति आहे कीं, व्याख्यानापैकीं थोडासा भाग ऐकून उतावळे होऊन एकदम

---

* ' पातकाची मीमांसा ' हा व्याख्यानाचा विषय म्हणून आरंभीं ठरला होता; परंतु ' विवाहित मनुष्याला आत्मसाक्षात्कार होणें शक्य आहे का ? ' असा एक प्रश्न स्वामींना विचारण्यांत आला होता. व या विषयावरच त्यांचें व्याख्यान झालें.

सिद्धान्त ठोकून देऊं नका; तर रामाचें म्हणणें काय आहे, तें शेवटपर्यंत ऐकून घेऊन नंतर आपलीं मतें बनवा.

कुराणांतील एका वचनांत पुढील आशयाचा मजकूर आहे:– " अनीतीच्या मार्गानें जा; व्यसनांत गढून जा; दारूबाजी आणि विषय-सुख यांत मग्न व्हा; म्हणजे तुमचें अधःपतन झाल्यावांचून राहणार नाहीं."

एक मुसलमान गृहस्थ दारूबाजी आणि विषयसुखलालसा यांत गढून गेलेला होता. त्याची स्थिति अवलोकन करून एका मुल्लानें त्याला पुष्कळ उपदेश केला. ' दारुबाजीसारख्या व्यसनांत काळ घालविणें म्हणजे आपल्या कुराणाच्या आज्ञांचें उल्लंघन करणें होय. सबब असल्या व्यसनांपासून परावृत्त हो. ' अशा तऱ्हेचा बोध केला. पण यावर तो दारूबाज मुसलमान म्हणाला:–'हें पहा ! कुराणांतच काय लिहिलें आहे तें पहा! ' ' खा, प्या आणि मजा करा, विषयसुखांचा यथेच्छ उपभोग घ्या. ' हे कांहीं माझ्या पदरचे शब्द नाहींत, हे प्रत्यक्ष कुराणांतील शब्द आहेत. आपलें धर्मशास्त्र–कुराण असा उपदेश करतें कीं, मनुष्यानें खुशाल मद्य-प्राशन करावें आणि विषयसुखांचा मनसुराद उपभोग घ्यावा. '

यावर तो मुल्ला म्हणाला:–'मित्रा, तूं हें काय मांडलें आहेस ? कुराणांतील ज्या उताऱ्यासंबंधानें तूं बोलत आहेस, त्यांतील पहिला भाग तूं पाठ म्हणून दाखविलास; पण त्या उताऱ्याचा पुढचा भाग वाचून पहा ' ' तुमचा अधःपात झाल्याशिवाय राहणार नाहीं ! ' हें ऐकून त्या दारूबाजानें उत्तर केलें:–' या जगांत एकहि मनुष्य असा सांपडणार नाहीं कीं, ज्याला कुराणाच्या सर्व आज्ञा आपल्या आचरणांत आणतां येतील. मी आपला या उताऱ्यांतील अर्धा भाग अमलांत आणून दाखवतों. सर्वच गोष्टी अमलांत आणाव्या, असें कोठें शास्त्र आहे ? एक मनुष्य एखाद्या वचनाचा एक भाग पाळील तर दुसरा मनुष्य दुसरा भाग पाळील. सबंध कुराणाप्रमाणें कोणत्याहि मनुष्याला वागतां येणें अशक्य आहे. अशा स्थितींत त्या वचनांतील सर्व भागाप्रमाणें मीं वागावें, याबद्दल तुमचा तरी एवढा हट्ट कां ? त्या वचनाचा अर्धा भाग मला अंमलांत आणूं द्या, मग पुढें जें काय व्हावयाचें असेल तें होईल ! '

सदरहू गोष्टींतील मुसलमानाचें तर्कशास्त्र लढवूं नका; तर सर्व विषय प्रथम ऐकून घ्या, व नंतर तुम्हांला जो कांहीं सिद्धान्त काढावयाचा असेल तो काढा, असें राम तुम्हांला विनंति करून सांगत आहे.

## एकीएक !

एकदां रामाजवळ एक सोन्याचें घड्याळ होतें. त्याच्या सांखळींत अडकविलेल्या वस्तूंमध्यें बाहेरून घड्याळयासारखें दिसणारें एक होकायंत्र होतें. तें होकायंत्र मुळींच चालत नसे. पण त्याची मौज अशी होती कीं, एका विशिष्ट तऱ्हेनें त्याचे कांटे फिरविले म्हणजे त्यांतून एक ठोका ऐकूं येत असे–नेहमीं एकीएक, द्वैताला जागाच नाहीं. असलें एकीएक तत्त्व तुम्ही आहां, हें ध्यानांत ठेवून देश, काल, व निमित्त यांच्या पलीकडे जाऊन पोहोंचा. तुम्ही देशकालादिकांचे स्वामी आहां, त्यांच्यावर तुमची सत्ता आहे, तुमच्यावर त्यांची सत्ता नाहीं. ते केवळ तुमच्या कल्पनेंचे खेळ आहेत–दोन, तीन हीं सर्व मिथ्या असून फक्त एक मात्र कालाच्या अतीत आहे, बंधमुक्त आहे.

प्रश्न:—विवाहित मनुष्याला आत्मसाक्षात्कार होणें शक्य आहे का ?

या विषयाचा ऊहापोह केला तर त्यापासून तुम्हांला फार उपयोग होईल. पण तो मोठा चमत्कारिक विषय आहे. तो तुम्ही शेवटपर्यंत ऐकून घेतला पाहिजे. कदाचित् या देशांतील कल्पना निराळ्या असल्यामुळें असल्या विषयाचें विवेचन लोकांना पटणार नाहीं ! पण त्याची रामाला पर्वा नाहीं. तुमच्या खऱ्या कल्याणाचाच फक्त राम विचार करतो.

## साक्षात्काराची आवश्यकता.

या प्रश्नाला वेदान्ताचें असें उत्तर आहे कीं, जो मनुष्य आजारी आहे त्यालाच औषध देण्यांत येतें, ज्याची प्रकृति चांगली आहे त्याला औषधाचें कारण नाहीं. जे मनुष्य जग आणि जगांतील दुःख, मोह यांच्यामध्यें गुरफटून गेलेले असतात अशांना आत्मसाक्षात्काराची अत्यंत आवश्यकता आहे; व आत्मसाक्षात्कार करून घेणें, ही गोष्ट विवाहित मनुष्याला जितकी सुलभ आहे, तितकी ती अविवाहित मनुष्याला नाहीं. आतां ही गोष्ट मात्र विसरतां कामा नये कीं, विवाहित मनुष्याला आत्मसाक्षात्कार

सुलभ आहे, याचा अर्थ असला मनुष्य पद्धतशीर व सारासारविचारपूर्वक वागणारा असेल तर, असा घेतला पाहिजे. एरव्हीं अविवेकी आणि अविचारी अशा विवाहित मनुष्याला आत्मसाक्षात्कार होणें कधींच शक्य नाहीं; एवढेंच नव्हे तर असला मनुष्य नेहमीं अधोगतीला जाईल. पति आणि पत्नी यांच्यामधील संबंध कोणत्या तत्त्वावर असला पाहिजे याचें बरोबर ज्ञान नसल्यामुळें मोठा घोटाळा होतो–अतिशय दुःख व आपत्ति ओढवते. असला महत्त्वाचा आणि सर्वांना अत्यंत उपयोगी विषय टाळून कसें चालेल ! या प्रश्नाच्या एका भागाचा म्हणजे विवाहापूर्वी आवश्यक असलेल्या पूर्वतयारीचा–शिक्षणाचा विचार आजच्या व्याख्यानांत केला जाणार नाहीं. हा विषय व्यापक असल्यामुळें त्याचें विवेचन पुढें केव्हां तरी करण्यांत येईल.

रामाचें लग्न झाल्यानंतर त्यानें आणि त्याच्या पत्नीनें ब्रह्मचर्यव्रतानें दोन वर्षें काढलीं. ही नुसती कल्पना नव्हे तर, प्रत्यक्ष घडलेली स्थिति आहे.

## अध्यात्ममार्गांतील अडथळे.

वास्तविक विचार केला तर विवाह हा कांहीं अनर्थावह आहे असें नाहीं; तर विवाहित स्त्रीपुरुषांमध्यें जी मनाची दुर्बलता उत्पन्न होते, तीच काय ती अनर्थकारक असते. भीति, विषयासक्ति, विषयावर–आकारमात्रावर प्रेम हे अध्यात्मप्रगतीच्या मार्गांतील मोठाले अडथळे होत. आपल्या स्वतःच्या तसेंच आपल्या स्त्रीच्या देहावर आत्मबुद्धीनें प्रीति करणें, स्त्री ही आपली आहे, अशा प्रकारची ममत्वाची–मालकीची कल्पना असणें हा मोठा दोष होय; व विवाहित स्त्रीपुरुषांच्या मनामध्यें असल्या वैषयिक व क्षुद्र विचारांचा पगडा जोंपर्यंत दिसून येईल, तोंपर्यंत त्यांना आत्मसाक्षात्कार होण्याची गोष्टहि बोलावयास नको.

## विवाहाचा उपयोग व दुरुपयोग.

कल्पना करा कीं * पेनिलोपप्रमाणें दिवसा केलेलें विणकाम जर

---

*पेनिलोपः–पेनिलॉप ही ग्रीक दंतकथेंतील प्रसिद्ध नायक ऑडेसिअस याची पत्नी. ऑडेसिअस हा इथाका प्रांताचा राजा होता. ग्रीक व ट्रोजन लोकांचें

आपण रोज संध्याकाळीं उलगडून टाकूं लागलों तर आपलें हातीं घेतलेलें विणकाम पुरें होणार कसें ? जो मनुष्य आपण स्वतः केलेल्या कार्यांचा आपण स्वतःच नाश करतो, त्याचें तें अंगीकृत कार्य जन्मांत तरी पूर्ण होण्याची शक्यता आहे का ? अर्थात् नाहीं. यासाठीं वेदान्त सर्वांना जोरानें सांगतो कीं, 'बाबांनो ! दुर्बलपणा टाकून द्या आणि अंगीं सामर्थ्य आणा. ज्याला तुम्ही प्रेम म्हणून नामाभिधान देतां तें तुमचें वैषयिक प्रेम--देहात्मबुद्धीचें प्रेम हें खरें प्रेम नव्हे. ईश्वरी प्रेम हेंच खरें आणि दिव्य प्रेम होय. असलें तें दिव्य प्रेम संपादन करा, तें आपल्या अंगांत चांगलें मुरलें जाऊं द्या.' हें दैवी प्रेम आपल्या अंगीं बाणून घेण्याचा प्रयत्न करणें, हें एखादा पट विणण्यासारखें आहे व देहाभिमान,

---

कौरवपांडवांच्या भारतीय युद्धाप्रमाणें प्रसिद्ध युद्ध झाल्याची पुराणकाळची दंतकथा आहे. व हें युद्ध हा होमर कवीच्या इलियड नामक महाकाव्याचा विषय होय. ऑडेसिअस हा ग्रीक पक्षाकडील प्रसिद्ध सरदार असून याच्या पराक्रमामुळें व विशेषतः मुत्सद्दीपणामुळें ग्रीक लोकांनां युद्धांत जय मिळून ट्राय शहर काबीज करतां आलें. या युद्धानंतर ऑडेसिअस हा गलबतांत बसून आपल्या राज्यांत परत जात असतां दैवी आपत्तीमुळें त्याला फार हाल सोसावे लागले. या प्रवासाचें वर्णन ऑडेसी या काव्यांत होमरकवीनें केलें आहे. इकडे इथाका येथील कांहीं सरदारांनीं ऑडेसिअस याच्या गैरहजिरींत पेनिलोप हिनें आपणाशीं विवाह करावा म्हणून तिच्याशीं मागणी घातली. परंतु आपला पति परत येईतोंपर्यंत या सरदारांना प्रत्यक्ष नकारार्थी उत्तर न देतां त्यांना झुलविण्याच्या हेतूनें तिनें एक नामी युक्ति योजली. आपल्या सासऱ्याकरितां एक पट विणीत असल्याचा तिनें बहाणा केला व तो पुरा झाला म्हणजे 'तुमच्यापैकीं योग्य वराशीं लग्न करण्यास मी तयार आहें,' असें तिनें सरदारांना आश्वासन दिलें. परंतु दररोज संध्याकाळपर्यंत विणलेला पट ती रोज रात्रीं उलगडून टाकी व पुनः दुसऱ्या दिवशीं नवीन कामास सुरवात करी. असा पेनिलोप हिचा क्रम चालला होता. पुढें कांहीं वर्षांनीं तिचा पति अनेक जिवावरच्या संकटांतून सुदैवानें बचावून आपल्या भूमीस परत आला व आपल्या पत्नीसाठीं मागणी करण्यासाठीं आलेल्या सरदारांस त्यानें मारून टाकलें.

ममत्वबुद्धि, विषयप्रीति यांच्या विचारांना मनांत थारा देणें म्हणजे एखादा विणलेला पट उलगण्यासारखें आहे. स्त्री आणि पुरुष यांनीं परस्परांच्या देहांवर प्रीति करणें–बाह्य सौंदर्यानें भुलून जाणें, रूपावर आसक्त होणें म्हणजे त्यांनीं आपण होऊन अध्यात्मदृष्टीनें आपला नाश करून घेण्या-सारखें आहे. हा अधोगतीचा निश्चित मार्ग होय. याचा अर्थ लोकांनीं मुळीं लग्नच करूं नये, असा कोणींहि समजूं नये. लग्नांत दोष नाहीं, लग्नाचा–स्त्रीपुरुषसंबंधाचा दुरुपयोग करण्यांत दोष आहे. वेदान्ताचें रहस्य समजावून घ्या व ह्या संबंधाचा–विवाहसंबंधाचा उपयोग करून घ्या, व आत्मोन्नति साधा. विवाह केल्यानें आपल्या अध्यात्मिक प्रगतीस मोठा फायदा होण्यासारखा आहे. पण तो केव्हां? तो करून घेतला तर होणार! आत्मोन्नतीला जो व्यत्यय म्हणून वाटतो, तोच विवाह आपल्या प्रगतीला खात्रीनें साहाय्यकारक होईल. कोणत्याहि गोष्टीचा योग्य तो उपयोग करून घेणें हें कौशल्याचें काम आहे. वेदान्त हें कौशल्य तुम्हांला प्राप्त करून देईल. परंतु विवाहानें विषयासक्ति वाढत असेल, त्यामुळें आपण कामासक्त बनत चाललों, विषयोपभोगानें तृप्ति होण्याऐवजीं आपणांमध्यें विषयलोलुपता जास्त वाढूं लागली, आपण जर केवळ शिश्नोदरपरायण बनूं लागलों तर विषयशृंखलेंत आपण आपल्याला जास्त बद्ध करीत आहोंत, अधोगतीच्या खळग्यांत आपण खोलखोल पडत आहों असें होईल, हें पक्कें लक्ष्यांत बाळगा.

मोठमोठे संत महंत हे स्त्रीचा निषेध करतात. स्त्री म्हणजे पातकांची राशि, नरकाचें द्वार असा त्यांचा म्हणण्याचा इत्यर्थ आहे. कल्पना करा, एक दारूबाज मनुष्य रस्त्यांतून चालला आहे. त्याच्या खिशांत दारूची बाटली आहे. ती इतकी मोठी आहे कीं, खिशाच्या बाहेर तिचा कांहीं भाग आला असून रस्त्यांतून जाणारा येणाराला ती दारूची बाटली दिसण्या-सारखी आहे. अशा रीतीनें तो मनुष्य चालला असतां समोरून येत असलेला एक धर्मोपदेशक त्याला दिसला. सदरहू मनुष्यानें तुरुंगाकडे जाण्याचा रस्ता कोणता, म्हणून त्याला प्रश्न केला. इतक्यांत त्या धर्मोपदे-शकाचें लक्ष त्या दारूबाज मनुष्याच्या खिशांतून बाहेर डोकावणाऱ्या दारूच्या बाटलीकडे गेलें; तेव्हां आपल्या हातांतील काठी त्या गृहस्थाच्या खिशाकडे करून तो धर्मोपदेशक म्हणाला, 'मित्रा तोच, तोच मार्ग!

तोच जवळचा मार्ग !! तो तुला खात्रीनें बरोबर तुरुंगांत नेऊन सोडील !!' दारूच्या बाटलीप्रमाणेंच स्त्री ही पातकाचें—नरकाचें द्वार असें पुष्कळांनीं वर्णन केलें आहे. परंतु हा स्त्रीविषयक सरसहा निषेध रामाला पसंत नाहीं. त्याचें मत याहून भिन्न आहे. आधुनिक वैवाहिक संबंध मनुष्याला संसार-बंधनांत अधिकाधिक गुरफटून टाकतो. परंतु ही कांहीं ईश्वरी योजना नव्हे. स्त्रीपुरुषसंबंध हा जर अधोगतीचा खात्रीचा रस्ता आहे असें मानलें तर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, ज्या ईश्वरानें बायबल लिहिलें त्यानें पुरुषाच्या अंतःकरणांत स्त्रीशीं विवाह करावा, अशी इच्छाच मुळीं कां उत्पन्न केली ? या प्रश्नाला सयुक्तिक उत्तर देतां येणें शक्य नाहीं. वास्तविक पाहिलें तर लग्नसंबंध म्हणजे कांहीं गुन्हा नव्हे. या संबंधांत खरोखर गूढार्थ भरलेला आहे व तो संबंध जर नरकाला साधनीभूत होत असेल तर त्याचें कारण विवाहसंबंधाचें अज्ञान हेंच होय. आपल्या अधोगतीच्या दोषाचें खापर अज्ञानाच्या माथीं आहे, विवाहसंबंधाशीं त्याचा कांहीं एक संबध नाहीं. हें अज्ञान कोणत्या उपायांनीं नाहींसें करावें, हा काय तो प्रश्न आहे. शून्याला वास्तविक पाहिलें तर कांहीं किंमत नाहीं. शून्य हें दशांश चिन्हाच्या उजव्या हाताला ठेवलें तर त्या एकंदर संख्येची किंमत किती तरी कमी होते; पण तेंच शून्य जर दशांश चिन्हाच्या डाव्या बाजूला ठेवलें तर त्या संख्येची किंमत वाढते. यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं, शून्याला कांहीं किंमत नाहीं, पण त्याच्या स्थानावरून त्याची किंमत होत असते. हाच न्याय विवाहसंबंधाला लागू आहे. विवाहांत तत्त्वतः कांहीं दोष नाहीं, आपण त्याचा जसा उपयोग करून घेऊं, त्यावर त्याचें महत्व अवलंबून आहे.

पुरुषाला स्त्रीसंभोगासंबंधानें इतकी आसक्ति कां असावी ? या प्रश्नाचा उलगडा केला पाहिजे. नाहीं तर विवाहासंबंधाचा मुद्दा लक्ष्यांत येणार नाहीं. स्त्रीसंगाची आसक्ति हीच मनुष्यांना गुलाम बनवते. आतां स्त्रीपासून सुख होतें असें तुम्ही म्हणाल; पण हें म्हणणें खास चुकीचें आहे. स्त्रीमध्यें सुख नाहीं—जडापासून सुख होणें शक्य नाहीं.

## जडांत—द्वैतांत सुख नाहीं.

वस्तूमध्यें कधीं सुख नसतें; जडापासून सुख कसें मिळणार ? तसें असतें

तर स्त्री व पुरुष यांच्यापासून परस्परांस नेहमीं सुख व्हावयास पाहिजे. पण तसें सुख होत असल्याचा प्रत्यक्ष अनुभव नाहीं. स्त्रीसंभोगांत सुद्धां एका विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे गेल्यावर भोग्य स्त्रीचा मनुष्याला तिटकारा-वीट येतो. अशा स्थितींत स्त्रीपासून नित्य सुख होतें असें म्हणतां येत नाहीं. पुरुष नपुंसक असला तर त्याला स्त्रीपासून सुख लाभेल काय? कल्पना करा, स्त्री रोगी आहे, व्यभिचारी आहे, किंवा पुरुष आजारी आहे; तर पुरुषाला स्त्रीसंभोगापासून सुख मिळेल काय? द्वैतांत सुख नाहीं, व स्त्री आणि पुरुष यांना विषयसंभोगांत जें सुख मिळतें तेंहि जेव्हां त्यांना आपल्या देहाचा पूर्णपणें विसर पडतो, दोघांचीं मनें एक होतात, तेव्हांच होतें. त्या वेळीं जी स्थिति होते ती अवर्णनीय आहे. त्या वेळीं स्त्रीपुरुषांचें देहभान नाहींसें होतें, आपल्या भोंवतालच्या जगाची त्यांना कल्पनाहि उरत नाहीं, दोघांची पूर्णपणें एकात्मता होते, द्वैत पार नाहींसें होतें. यावरून ही गोष्ट स्पष्ट होते कीं, द्वैताचा सर्वस्वी लय होणें म्हणजेच सुख होय. सुख होण्याला देहादिकांचा विसर व्हावा लागतो; मग तें सुख वैषयिक सुख असो किंवा आत्मस्वरूपाचें असो. वेदान्त प्रतिपादन करतो कीं, सुख हें बाह्य विषयांत नाहीं, आत्म्यांत आहे. सुख हें बाहेरून कोठून पैदा होत नसतें, त्याचा झरा आपल्या हृदयांतच आहे. आत्मा हा सर्व शक्तिमान्, आनंदस्वरूपी आहे, व तेंच आपलें पारमार्थिक स्वरूप होय; मग तुमची कल्पना कांहींहि असो. धन व ऋण विद्युत्प्रवाह एकत्र झाले म्हणजे त्या ठिकाणीं विद्युद्दीपाप्रमाणें प्रकाश दिसूं लागतो. त्याचप्रमाणें स्त्री व पुरुष यांच्या संभोगकालीं स्थिति उत्पन्न होते. दोघांच्या संभोगापासून तिसऱ्याची उत्पत्ति होते, ती विजेच्या ठिणगीप्रमाणें असते. द्वैत नाहींसें झालें म्हणजे अद्वैत—ईश्वरत्व शिल्लक राहातें. 'मनुष्य हा ईश्वराचा पुत्र' असें जें म्हणतात, त्याचें कारण हेंच होय. स्त्री व पुरुष हीं मूलतत्त्वामध्यें प्रवेश करतात, देहाचें विस्मरण होतें, जगाचा लय होतो. अशा रीतीनें आत्मा हा यच्चयावत् जाति, धर्म, वर्ण यांना ग्रासून टाकतो. जगांतील सर्व भेद हे अन्नाप्रमाणें असून मृत्यु—काल हा या सर्वांचा नाश करून टाकतो. परंतु कालस्वरूपी परमात्मा हा मृत्यूलाहि गट्ट करून टाकतो. मृत्यु हाहि परमात्म्याचें तोंडीं लावणें होय*

* मृत्युर्यस्योपसेचनम् । श्रुति.

परमात्म्यापासून सकल विश्वाची उत्पत्ति होते, व अखेरीस त्याच्यामध्यें सर्वांचा लय होतो.

परंतु अज्ञानी मनुष्यांना वेदान्तरहस्य समजत नाहीं; त्यांना आत्मज्ञान नसतें; यामुळें सुखाचा खरा उगम कोठून आहे, हें त्यांना समजत नाहीं; व बाह्य विषयांनीं ते भुलून जातात, बाह्य सौंदर्याचा त्यांना मोह पडतो, व सुख जडामध्येंच आहे, आकारमात्रांत आहे, अशी त्यांची विपरति कल्पना होते.

एखादा मनुष्य अरण्यांत बसलेला आहे, अशी कल्पना करा. त्याच्या शेजारीं एक पुस्तक पडलेलें आहे; इतक्यांत वीज चमकते व त्याला वाटतें कीं, पुस्तकाच्या योगानें वीज उत्पन्न झाली. ही त्याची मूर्खपणाची कल्पना दुसऱ्या कोणी कितीहि सांगितलें तरी त्याच्या डोक्यांतून जात नाहीं. याच न्यायानें स्त्रीपुरुषांच्या संयोगापासून जें सुख होतें तें आपण उत्पन्न करतों, अशी त्यांची भलतीच कल्पना होते. पण खरी स्थिति अशी आहे कीं, द्वैतांत सुख नाहीं. अद्वैत–ईश्वरत्व हेंच सुखाचें खरें उगमस्थान होय.

या विवेचनापासून आपण कोणतें तत्त्व शिकावयाचें ? तें तत्त्व हें कीं, जडापासून–विषयांपासून सुख होतें, ही कल्पना खोटी आहे व ती तुम्ही आपल्या डोक्यांतून अजिबात काढून टाका; व ज्याच्यापासून नित्य सुख प्राप्त होतें, अशा त्या आत्म्याचें–परमात्म्याचें अहर्निश चिंतन चालूं द्या. हा ध्यास तुम्ही सदोदित चालू ठेवलांत म्हणजे तुम्हांला विषयसुखांची पर्वा वाटेनाशी होईल. तो परमात्मा अनंत, सच्चिदानंदस्वरूपी आहे, ज्योतींची ज्योति तोच आहे, चंद्रसूर्यादि सर्व तोच आहे, तो दिक्कालादिकांच्या अतीत आहे. त्या अनंत चैतन्यस्वरूपी महासागरांत उत्पन्न होणाऱ्या लाटा, भोंवरे म्हणजेच चराचरांतील भासमान होणाऱ्या सर्व वस्तु होत. लाटांचा आकार आपल्याला भिन्न दिसतो, परंतु त्यांत येथून तेथून एकच पाणी ओतप्रोत भरलेलें असतें. त्याचप्रमाणें आपल्याला बाह्यतः भासमान होणारे भेद हे आकारामुळें दृश्यमान होतात. पण सर्व आकारांमध्यें एकच निराकार तत्त्व–परब्रह्म व्यापून राहिलें आहे. आपली दृष्टि नेहमीं बाह्य आकारावर असते, व आपल्या सर्व मोहाचें मूळ हेंच होय. एक मुलगा

नदीच्या कांठीं उभा होता. त्या नदींतील लहरींचा चाललेला खेळ पाहून त्याला मोठें कौतुक वाटलें व ' ही पहा केवढी मोठी लाट !' असे उद्गार त्याच्या तोंडून आपोआप बाहेर पडले. आतां लाट ह्मणजे वास्तविक पाहिलें तर पाण्याहून भिन्न आहे, अशी स्थिति नाहीं. पण त्या लहान मुलाला लाटेच्या आकाराचेंच विशेष नवल वाटलें. लाटेचा आकार व लाट हें नांव यांनीं तो मुलगा फसला. याच न्यायानें जगांतील लोक नामरूपाच्या–मायेच्या योगानें मोह पावत आहेत.* चराचरांत एकच अखंड परमात्मतत्त्व सर्वत्र भरून राहिलेलें असतां त्यांना द्वैत–' मी ' ' तूं ' पणा भासतो, व त्याच्यावर त्यांची दृष्टि स्थिर झालेली असते. सृष्टीमधील विविधता ही आकारदृष्टीनें आहे, तत्त्वदृष्टीनें नव्हे लाटा एकमेकांवर आपटल्या ह्मणजे फक्त पाणी–जसें आहे तसें–दिसतें, त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांचा संयोग झाला ह्मणजे द्वैतभाव नाहींसा होतो व फक्त अद्वैत राहतें. द्वैताचा नाश झाल्यामुळें सुख होतें, ही गोष्ट लोकांच्या ध्यानांत येत नाहीं, सुख आत्म्यापासून होत असून जिवांना तें बाह्य विषयांपासून होतें असा भास होतो. एका वेदान्ती मनुष्यानें एका लहान मुलाला सोनें कसें असतें तें सांगण्यासाठीं एक आंगठी दाखवली व सांगितलें 'हें पहा ! सोनें ह्मणतात तें हें.' यावर त्या मुलानें विचारलें, ' वाटोळेपणा ह्मणजे सोनें कीं काय ?' वेन्दान्ती मनुष्यानें उत्तर दिलें, ' नाहीं !' मुलगा ह्मणाला ' पिंवळेपणा ह्मणजे तरी सोनें का ?' वेदान्ती मनुष्यानें सांगितलें, ' छे ! छे ! ! ' मुलगा बोलला ' मग वजन हें तरी सोनें का ? ' यावरहि ' नाहीं ' असें उत्तर त्याला मिळालें; पुढें दुसऱ्या कांहीं सोन्याच्या चिजा त्या वेदान्ती मनुष्यानें त्याला दाखविल्या, तेव्हां त्याला सोन्याची बरोबर कल्पना आली.

## नामरूपातीत व्हा.

एकदा बिरबलानें बादशाला विचारलें, ' महाराज, जगांत डोळस माणसांची संख्या जास्त आहे कीं, आंधळ्या माणसांची ? ' बादशहाचें

* दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ गीता, अ. ७।१४

म्हणणें पडलें कीं, 'आंधळे लोक जगांत असले, तरी एकंदरींत त्यांची संख्या थोडीच असणार.' बिरबलाचें मत याच्या विरुद्ध होतें. आपलें म्हणणें सिद्ध करण्यासाठीं बिरबलानें एक कापडाचा तुकडा घेऊन डोक्याला गुंडाळला, व लोकांना विचारलें, ' हें काय आहे ? ' कांहीं इसमांनीं लगेच उत्तर दिलें, ' पागोटें. ' अशाच रीतीनें दुसरा कापडाचा तुकडा त्यानें अंगावर पांघरला व तसाच प्रश्न केला. ' ही शाल आहे ' असें या प्रश्नावर लोकांनीं पुनः उत्तर दिलें. नतर आणखी एक दोन कापडाचे तुकडे घेऊन त्यानें असेच प्रश्न पुनः पुनः केले. त्यांवर याच आशयाचीं उत्तरें लोकांकडून त्याला मिळालीं. तेव्हां बादशहाकडे वळून बिरबल म्हणाला, 'हे सर्वजण डोळे असून आंधळे आहेत. कोणी म्हणतो, ' ही शाल आहे, ' कोणी ह्मणतो ' हें पागोटें आहे. ' पण 'कापड आहे' म्हणून कोणीच सांगत नाहीं. नामरूपानें हे सर्व लोक घोटाळ्यांत कसे पडले हें पाहिलेंत ना ? ' यानंतर बादशहाला बिरबलाचें म्हणणें बरोबर पटलें.

याकरितां आत्मज्ञान संपादन करा. सोन्याचें स्वरूप समजावून घ्यावयाचें असलें तर सोन्याचे तुकडे करण्याचें कांहीं कारण नाहीं. तत्त्व ओळखा म्हणजे झालें. जेव्हां जगांतील कोणतीहि वस्तु आपण पाहतों तेव्हां आकारावर आपली दृष्टि असते, त्यांतील सत्तत्वाचें आपल्याला स्मरण होत नाहीं. आत्मतत्त्व अनुभूत करून घ्या म्हणजे नंतर तें सर्वत्र व्यापून कसें राहिलें आहे, याचें तुम्हांला नेहमीं अनुसंधान राखतां येईल.

विवाह हा धर्माच्या विरुद्ध आहे असें मानूं नका. तर सुख हें आत्म्यापासून होतें हें लक्ष्यांत ठेवून श्रवणमनननिदिध्यासानें आत्मज्ञान संपादन करा. आपल्या ठिकाणचा द्वैतभाव काढून टाका, व जन्मबंधाचें कारण जें अज्ञान तें नाहींसें करून अद्वैतानुभवांत मुरून जा.

परमात्मत्व हें आपलें वास्तविक स्वरूप होय. अखिल विश्वही आपल्या कल्पनेची एक लहर आहे, तो केवळ भास होय. या मृगजलाच्या पाठीमागें आपण काय म्हणून लागावें ? आपल्या सर्व कामना, विषयेच्छा, या देहात्मबुद्धीचा परिणाम होत. त्या सर्व विवेकानें मारून टाका; आपली इच्छाशक्ति जोरदार करा व आत्मस्वरूपाची [illegible] करून घेतल्या-

शिवाय राहूं नका. ती आत्मज्योति तुमच्या हृदयांत प्रज्वलित झाली, ह्मणजे तुमच्या वासनांचा आपोआप क्षय होईल. विजेचा दिवा झाला तरी अंधारांत त्याची किंमत; सूर्यप्रकाशापुढें त्याचें तेज काय टिकणार ! अर्थात्, आपलें चित्त चैतन्याकार करण्याचा अभ्यास करा, ह्मणजे हृदयांतील वासनांचें दहन झालेंच ह्मणून समजा. विषयसुखेच्छा अजिबात नाहींशी होण्याला स्वरूपाचा बोध होणें हाच काय तो उपाय आहे.* विषय खरे आहेत अशी जोंपर्यंत आपली कल्पना आहे, तोंपर्यंत त्यांचा खरा त्याग होणें अशक्य आहे, अस्वाभाविक आहे. वैवाहिक संबंधाला नांवें ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. यासाठीं आत्मसाक्षात्कार करून घेऊन आपल्या उन्नतीचा मार्ग आक्रमण करा.

विश्व हा एक अद्भुत चमत्कार आहे, आणखी निराळ्या चमत्कारांची काय आवश्यकता आहे ! आपल्या सर्व पातकांचें मूळ भीति हेंच होय. आत्मज्ञानाचा अग्नि हा आपलीं पातकें समूळ भस्म करण्याचा उपाय आहे. वासना जाळून टाका ह्मणजे तुह्मी पवित्रतेचे—मांगल्याचे मूर्तिमंत पुतळे बनाल. + हाच खरा धर्म होय. याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि धर्माचा उपदेश निसर्गाविरुद्ध आहे.

### इंद्रवज्रा.

ये वा न ये तूं मजमाजिं पाहीं ।
दूरीं वसें सन्निध वा कुठेंही ॥
माझ्यांत तूं राहसि वागतोसी ।
छे ! मीच तू हें नच जाणतोसी ॥ १ ॥

### रथोद्धता.

होय तन्मय मदीय रूपिं रे ।
सौख्यसागरिं न दुःख तैं उरे ॥

---

* एवं बुद्धेः परं बुध्द्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ गीता, अ. ३।४३.

+ वासना जाळूनि शुद्ध करा । शुद्ध करा मन देहातीत व्हावें । वस्तूसी ओळखावें तुका ह्मणे । तुकाराम.

हो धनी, न भव जेंवि सेवक ।
मत्स्वरूपिं रत; भोगिं तें सुख ॥ २ ॥

याच स्वाभाविक, न्याय्य आणि शास्त्रीय पद्धतींचें हिंदुस्थानांतील लोक अवलंबन करतात. त्या देशांत स्त्री ही पुरुषाच्या अध्यात्मिक उन्नतीच्या आड न येतां उलट त्याला साहाय्य करते.

आत्मानुभव झाल्यानंतर रामानें दोन वर्षें गृहस्थाश्रमांत काढलीं. त्या स्थितींत राहात असतां रामानें आपल्या पत्नीला वेदान्त शिकविला. गंध उगाळणें, फुलें आणणें वगैरे पूजेचें साहित्य जमविण्याचें काम ती नेहमीं करीत असे. तसेंच आत्मचिंतनांत ती निमग्न असे. ती देवाची पूजा करी; त्याच्यापुढें नमस्कार घाली व नंतर रामाकडे परमात्मभावनेनें पाही व ॐ चा जप करी. आपल्या रामाच्या हृदयांत ती परमात्म्याला पाही. प्रत्येक जण दुसऱ्यांत आत्म्याला पाहात असे. पत्नीच्या अध्यात्मिक प्रगतीला राम मदत करीत असे. अशा रीतीनें महिनेच्या महिने गेले, पण वैषयिक प्रीतीचें नांव नाहीं! दोघेंहि स्वतंत्रपणानें राहूं लागलीं. स्त्री व पुरुष हा भाव दोघांपैकीं एकाच्याहि मनाला शिवत नसे. मग बद्धता राहाणार कशी ?

संसारांत दुःख होतें तें संकुचित भावनांमुळें, मालकीच्या कल्पनांमुळें होतें. तसें झालें म्हणजे स्त्रीपुरुषांचे हितसंबंध भिन्न होतात व तंटे उपस्थित होतात. म्हणून वेदान्ताचें रहस्य समजून घेऊन मुक्त व्हा. जगांत खरोखर बंध आहेत कोठें ? सर्व बंध मानीव--कल्पनेचे खेळ आहेत. आपल्या मुलांबाळांनाहि स्वतंत्र राहूं द्या. स्वातंत्र्यामुळें मुलें बिघडतील, ही कल्पना अगदीं खोटी आहे. अशा रीतीनें वागूं लागलां म्हणजे जग हेंच तुमचें नंदनवन बनेल ध्यानांत ठेवा, ईश्वर कधींहि फसला जाणार नाहीं.

ॐ! ॐ!! ॐ!!

# इतस्ततः

—:०:—

## चित्तशुद्धीचा अभ्यास



आत्मानुभव प्राप्त व्हावा, अशी लोकांना प्रबळ इच्छा असते; त्यासाठीं त्यांचे प्रयत्नहि चालू असतात. निरनिराळ्या मंत्रांचा ते एकाग्रतेनें जपहि करतात; परंतु असे प्रयत्न करीत असतांहि त्यांत त्यांना यश येत नाहीं. तुम्हांला खरोखर दिव्यज्ञान प्राप्त करून घेणें असेल, आत्मानुभवाची माधुरी चाखणें असेल, तर स्वतःच्या मनःसरोवरांतील असंख्य स्वार्थी इच्छांना पृष्ठभागावर काढा, व ह्या स्वार्थी कामना एकामागून एक दाबून टाका. अहंकारमूलक क्षुद्र वासना टाकून देऊन सद्वासना धरा; चांगले चांगले निश्चय व संकल्प करा. अशा रीतीनें तुम्ही मनःसरोवरांतून कुवासना काढून टाकल्या म्हणजे त्यांतील पाणी शुद्ध होईल—तें अमृत होईल, तें सर्व चराचराला आनंददायक होईल. मग निंदकाच्या निंदेचें विष जरी त्यांत कालवलें तरी त्या विषाचेंहि अमृतच होईल; भगवान् श्रीविष्णूच्या पदाम्बुजांतून वाहणाऱ्या गंगोदका-प्रमाणें तें तुमचे क्लेश हरण करून तुम्हांला व इतरांना पावन करील. सारांश, तुमचें मन शुद्ध झालें म्हणजे मग तुमच्या इच्छांपासून इतरांना इजा होणार नाहीं व इतरांच्या दुष्ट इच्छांचाहि तुमच्यावर परिणाम होणार नाहीं इतकेंच नव्हे तर तुम्हांला जे शत्रु म्हणून मानीत असतील ते सुद्धां मित्र होतील.*

---

* अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥
यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ गीता, अ. १२।१३,१५
चित्त शुद्ध तरी शत्रुमित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ॥१॥
विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥२॥

तुमच्यांत जे अवगुण असतील ते शोधून काढा आणि त्यांचें एकदम निर्मूलन करा. आपणांमधील विषयवासना ह्या आपल्या मनाची एकाग्रता होऊं देत नाहींत. व चित्तशुद्धि आणि एकाग्रता ह्यांच्याशिवाय खरी तन्मयता होणें शक्य नाहीं. स्वरूपाच्या ठिकाणीं मन एकाग्र करूं लागलां ह्मणजे ज्या वासना तुमच्या आत्मचिंतनाच्या आड येतात त्याचें उच्चाटन करा; त्यांना जाळून टाका. आत्मोन्नतीच्या मार्गांतील अडचणी तुमच्या तुम्हीच शोधल्या पाहिजेत, व त्या तुमच्या तुह्मीच दूर केल्या पाहिजेत. अमेरिकेंत ह्या विषयांसंबंधानें लोकांकडून बरींच व्याख्यानें देण्यांत येतात. परंतु असल्या नुसत्या व्याख्यानांपासून तुह्मांला कांहींच लाभ होणार नाहीं. आत्मोन्नतीचा मार्ग तुमचा तुम्हीच शोधून काढला पाहिजे. आपणच स्वतःचे व्याख्याते—मार्गदर्शक बनलें पाहिजे. एरव्हीं आपली अध्यात्मिक उन्नति कधींहि होणार नाहीं.

रात्रीं झोंपण्यापूर्वीं बिछान्यावर स्वस्थ चित्तानें बसून आपल्या दोषांचा, कुवासनांचा विचार करा. आपल्या ठिकाणच्या कोणत्या स्वार्थी इच्छा मारल्या पाहिजेत, कोणते अवगुण काढून टाकले पाहिजेत, ह्यासंबंधानें मनाला प्रश्न करा. मनांतील पापवासना आपल्या स्मृतिफलकावर लिहून ठेवा. बायबल, गीता, उपनिषदें किंवा तत्त्ववेत्ता इमर्सन*याचे ग्रंथ वाचा; असल्या ग्रंथांचें अध्ययन ह्या कामीं तुह्मांला अत्यंत उपयुक्त होईल. मोह किंवा लोभ ह्यांचें तुमच्या ठिकाणीं वास्तव्य असेल तर आतां सांगितलेल्या अध्यात्मिक ग्रंथांच्या साहाय्यानें ह्या दोषासंबंधानें विचार करा. हे दोष कसे उत्पन्न झाले, त्यांचें निर्मूलन कां झालें पाहिजे, हे दोष आपल्या अध्यात्मिक उन्नतीच्या आड कसे येतात, ह्यासंबंधानें मनन करा. हे दोष काढून टाकून मन उन्नत करा आणि ॐ या मंत्राचा जप चालवा. मनांतील कुवासनांचें उन्मूलन झालें अशी तुमची खात्री झाली म्हणजे त्या स्मृतिफलकावरून पुसून टाका. त्यांना आपण मारून टाकलें अशी

---

दुःख तें देईल सर्व सुखफळ। होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥
आवडेल जीवां जीवाचिये परी। सकळां अंतरीं एक भाव ॥ ४ ॥
तुका ह्मणे कृपा केली नारायणें। जाणिजे तें येणें अनुभवें ॥ ५ ॥
तुकाराम.

* इमर्सनः—प्रख्यात अमेरिकन तत्त्ववेत्ता व कवी (१८०३–१८८२)

तुमच्या मनाची दृढ भावना झाली ह्मणजे मग त्यासंबंधानें पुनः मनांत विचारहि आणूं नका. स्वतःशींच विचार करून आत्मविचाराच्या बळावर एकामागून एक ह्या वासनारूपी राक्षसांचा शिरच्छेद करा. आपल्या मनांतील कुवासना ज्यानें त्यानें स्वतः विचाराग्नीनें दग्ध करून टाकल्या पाहिजेत. कुवासनांच्या उपपत्तीचा विचार करतांना नेहमीं ॐ या मंत्राचा जप चालूं द्या. हा घोष चालू असला, ह्या दिव्य ध्वनीचे संस्कार तुमच्या मनावर होत असले, ह्मणजे त्याची तुमच्या मननाला—एकाग्रतेला मदत होईल. अशा रीतीनें कुवासनांचें मूळ तुह्मांला सांपडलें म्हणजे त्याला पायांखालीं चिरडून टाका व सामर्थ्यवान् बना. विवेकबलानें कुवासनांचा नाश करणें, अर्थात् चित्तशुद्धि होणें हा आत्मज्ञानाचा पहिला धडा होय.

आपलें नानाप्रकारचें अज्ञानच सर्व दुःखाचें मूळ होय. बाह्य वस्तूं-पासून सुख प्राप्त करून घेण्याची कल्पना, सुख कोठें बाहेर आहे ही भावना, आपलें शरीर ह्मणजेच आपण, ही देहाभिमानाची चुकीची समजूत, अर्थात् स्वरूपासंबंधानें—आत्म्यासंबंधानें अज्ञान, अविद्या, हेंच सर्व दुःखांचें आणि आपत्तीचें आदिकारण होय. सर्व चराचराच्या मुळाशीं असलेलें सत्तत्त्व आपणच आहों, अशी एकदा खात्री पटल्यावर ह्याचा अनुभव झाल्यावर मग दुःखाच्या संवेदना तुह्मांला कोठून होतील? प्रवृत्तींचा पगडा तुमच्यावर कसा बसूं शकेल? नैतिक सिद्धान्त हे गणित शास्त्रांतील सिद्धान्ताप्रमाणें त्रिकालाबाधित नाहींत, असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. पण तें साफ चुकीचें आहे. गुहेंत जाऊन शांतपणानें विचार करा, गहन अरण्यांत बसून मनन करा; एकान्तांत बसा ह्मणजे भोंवतालचीं झाडें व भिंती तुमच्या विरुद्ध अभिप्राय देत आहेत, तुमचें अनुमान चुकीचें आहे असें जोरानें जाहीर करीत आहेत, असें तुह्मांला आढळून येईल. ज्यांना खरें कारण समजत नाहीं, ज्यांना वास्तविक ज्ञान नसतें तेच परिस्थितीशीं भांडतात, परिस्थितीच्या नांवानें खडे फोडतात. दैवी नियम त्रिकालाबाधित असतात, हें ध्यानांत ठेवा. देवाच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याचा प्रयत्न केलात तर तुमचेच डोळे फुटतील, हें विसरूं नका? पापवासना केल्या ह्मणजे त्यांचे परिणाम भोगलेच पाहिजेत. असल्या दैवी नियमांची सत्यता क्रमाक्रमानें तुमच्या प्रत्ययास

आणून देतां येईल. आणि ती सत्यता तुह्मांला पटली म्हणजे क्षुद्र व स्वार्थी वासनांना तुम्ही मनांत थाराहि देणार नाहीं.

तुमच्या कुवासना मोडल्या, सदिच्छा—आपल्या स्वरूपासंबंधाचे संकल्प—तुमच्या हृदयांत बाणले ह्मणजे तुह्मांला वाटेल तितका वेळ मन एकाग्र करतां येईल.

एकाग्रता साधण्याला खाण्यापिण्यांतहि नेमस्तपणा ठेवणें जरूर आहे. अगदीं अन्न वर्ज करणें किंवा अन्नावर यथेच्छ ताव मारणें, हीं दोन्हींहि टाळणें जरूर आहे. * कित्येक वेळीं अन्नवर्जन स्वाभाविकच होत जातें. एकंदरींत ह्या बाबतींत स्वाभाविक प्रवृत्तीनें चालणें चांगलें. अमुक एक नियम करणें व त्या नियमाच्या अंकित होणें चांगलें नाहीं. सर्व बाबतींत स्वतंत्रतेनें चाला, स्वाधीन रहा.

हिंदुस्थानांत कांहीं दिवस एकाग्रतेला अनुभवानें फार अनुकूल ठरलेले आहेत. पौर्णिमेचा दिवस फारच उत्तम. त्या दिवशीं सात्विक आहार—फलाहार करून दिवसा किंवा रात्रीं एकान्तांत बसून मनाचें एकाग्र करण्याचा प्रयत्न करा म्हणजे एकाग्रतेला तो दिवस किती अनुकूल आहे, हें तुमच्या प्रत्ययास येईल.

ॐ ! ॐ ! ॐ !

---

* नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥
युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ गीता, अ. ६-१६-१७.



# सुखसंवाद *



## विश्वव्यापी धर्म



प्रश्नः—( सर्व ) लोकांवर सारखाच अंमल चालविणारा असा एकच धर्म कधीं होऊं शकेल काय ?

उत्तरः—ह्या प्रश्नाचें उत्तर होकारार्थीं तसेंच नकारार्थींहि देतां येईल. मनुष्यांवर सत्ता गाजविणारे धर्म यापुढें चालणार नाहींत. तसे धर्म इतःपर लोकांना खपणार नाहींत. भविष्यत्कालांत कोणताहि धर्म आपल्या अनुयायांवर आपलें वर्चस्व चालवूं शकणार नाहीं. लोक धर्माचे ताबेदार राहणार नाहींत, तर धर्मालाच लोकांच्या ताब्यांत राहावें लागेल.

प्रश्नः—एकच धर्म सर्व मनुष्यांवर सारखीच सत्ता चालवूं शकेल काय?

उत्तरः—नाहीं. भविष्यत्कालांत कोणताहि धर्म मनुष्यांवर आपली सत्ता गाजवूं शकणार नाहीं. जगांतील धर्म, निरनिराळ्या ( धार्मिक किंवा धार्मिकेतर ) संस्था, नियम, कायदेकानू हे मनुष्यांकरितां आहेत. त्यांच्याकरितां मनुष्यें नाहींत हें लक्ष्यांत ठेवा. नियम व कायदेकानू हे माझ्याकरितां माझ्या कल्याणाकरितां—आहेत. संस्थाकरितां आणि नियमांकरितां मी जन्मलेला नाहीं. मनुष्यजातीवर सत्ता गाजविण्याऐवजीं उलट मनुष्यांची सेवा करणारा—त्यांना उपकारक-मार्गदर्शक होणारा धर्मच ह्यापुढें टिकूं शकेल. सर्व लोकांना सारखाच मान्य व संमत असा एखादा विश्वव्यापी धर्म असूं शकेल कीं नाहीं? ह्या मुद्यासंबंधानें रामाचें उत्तर असें आहे कीं, असा एक विश्वव्यापी धर्म असूं शकेल. आतां यावर असा प्रश्न उद्भवतो कीं, असा तो विश्वव्यापी धर्म कोणता? तो धर्म कोणत्या लक्षणांनीं युक्त

---

* करी सूखसंवाद जो ऊगमाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ।। —रामदास.

असेल, हें सांगण्यापूर्वी रामाला आगाऊ हें सुचवून ठेवणें जरूर वाटतें कीं, अशा त्या धर्माला कोणतेंच नांव असणार नाहीं; तो नामातीत राहील.

विश्वव्यापी धर्म कोणता म्हणाल तर सर्व शास्त्रांच्या कसोटीस उतरणारा वेदान्त होय. वेदान्त ह्याच तो विश्वव्यापी धर्म. पण धर्म ह्या शब्दाची तुम्ही काय व्याख्या करतां? धर्म म्हणजे तुमच्या धर्मप्रवर्तकांनीं केलेल्या आज्ञा, त्यांचीं प्रमाणवचनें, धर्म. म्हणजे डोळे मिटून पाळावयाच्या आज्ञांचें एक बाड, धर्म म्हणजे वाढ खुंटलेली व एका ठिकाणीं जखडून टाकलेली एक वस्तु अशी तुमची समजूत असेल तर ती निखालस चुकीची आहे. जागे व्हा, डोळे उघडा, आणि विचार करा. अगदीं दूरच्या भविष्यत्कालांतहि असल्या संकुचित अर्थाचा—कल्पनांचा धर्म टिकूं शकणार नाहीं. असें पहा कीं, भौतिक शास्त्रांचा अभ्यास करणारे, ज्ञानाच्या उच्च प्रदेशांत काय काय चाललें आहे ह्याचा शोधक बुद्धीनें विचार करणारे विद्वान् आज विद्यमान आहेत. अशा प्रकारचे स्वतंत्र बुद्धीचे लोक धर्मप्रवर्तकाच्या प्रमाणवचनांच्या व आज्ञांच्या अतीत असतात; त्या आज्ञांचा आणि वचनांचा त्यांच्यावर अंमल चालणें शक्य नाहीं. खऱ्या धर्माचा हेतु आपल्याला स्वतन्त्र—स्वाधीन—मुक्त करण्याचा आहे, मतमतांतरांच्या शृंखलांत जखडून टाकण्याचा नाहीं, हें ध्यानांत ठेवा. सर्व चराचराचे आपण स्वामी आहों, सर्व वस्तुमात्रावर आपलीच सत्ता आहे, ही उच्चतम भावना मनुष्यमात्रांत जागृत करणें, त्याच्या वास्तविक स्वरूपाची त्याला ओळख पटवून देणें, त्याला स्वाधीन—स्वतंत्र करणें हाच धर्माचा वास्तविक हेतु आहे. धर्मपुस्तकांत दिलेल्या वचनांचे दास बनवणें, हें कांहीं धर्माचें इतिकर्तव्य खात्रीनें नव्हे.

## नांवांत काय आहे ?

हा खिस्ताचा धर्म, हा बुद्धाचा धर्म, हा महंमदाचा धर्म अशीं जीं प्रत्येक धर्मास भिन्नत्वदर्शक नांवें देण्यांत येतात, त्या नांवांमुळेंच जगांत फार घोंटाळा माजला आहे. बौद्ध आणि खिस्ती हीं दोनच नांवें घ्या, ह्या दोन धर्मांच्या अनुयायांच्या विचारांत केवढी तफावत आढळते !

बुद्धधर्मानें हिंदुस्थानचे चार तुकडे केले. चार निरनिराळे पंथ ह्या

अद्वैतभूमींत उदय पावले. बौद्ध धर्माचे खुद्द चिनांत निरनिराळे सात पंथ आहेत.

एक मनुष्य आपणांस हिंदु म्हणवतो. त्याचें ख्रिस्ती किंवा मुसलमान ह्यांच्याशीं पटत नाहीं. असें कां? ह्याचें कारण एवढेंच कीं, त्याला हिंदु ह्या नांवाचा अभिमान असतो आणि त्या नांवाकरितां तो आपले प्राण खर्च करण्यासहि तयार होईल. परंतु, हिंदु लोकांच्या विचारांचें तुम्ही पृथक्करण कराल, त्यांचें सूक्ष्म रीतीनें अवलोकन कराल, तर तुम्हांला असेंच आढळून येईल कीं, स्वतःला ख्रिस्त म्हणविणाऱ्या ख्रिस्त्यांच्या विचारांपेक्षां त्यांचे विचार ख्रिस्ती धर्माशीं अधिक जुळते आहेत. असें असूनहि हिंदू हें नांव धारण करणाऱ्या लोकांविषयीं त्यांना अधिक प्रेम वाटतें, त्यांच्याकडेच त्यांचा जास्त ओढा असतो.

## जगाचा भावी धर्म.

जगाच्या भावी धर्मासंबंधानें दोन शब्द सांगणें रामाला जरूर वाटतें. भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाचा सर्वत्र प्रसार झाला—खेड्यापाड्यांतूनहि त्यांची लोकांना माहिती झाली, वेदान्ततत्त्वांचा प्रत्येक खेड्यांतून व झोंपडींतून प्रवेश झाला; सारांश, सर्वत्र वेदान्त दुमदुमून राहिला म्हणजे सर्वांच्या उपयोगी पडणारा, सर्वांची चाकरी करणारा असा एकच धर्म जगांत टिकूं शकेल; आणि असा सर्वोपकारक धर्म म्हटला म्हणजे वेदान्त धर्मच होय. सर्व शास्त्रांचें शास्त्र, सर्व धर्मांचा धर्म जो वेदान्त त्याचा सर्वत्र प्रसार होण्याची, त्यानें सर्व जगाला व्यापून टाकण्याची वेळ अगदीं नजीक आली आहे. परंतु वेदान्त ह्या नांवासंबंधानें कोणीहि अभिमान धरतां कामा नये. बुद्धाच्या अनुयायांनीं बुद्ध ह्या नांवाचा अभिमान सोडला पाहिजे. सारांश, कोणत्याहि नांवांत कांहीं विशेष नाहीं; हें समजून त्याचा अभिमान टाकला पाहिजे.

'स्वर्ग' प्राप्तीसंबंधानें तुमच्या धर्माप्रमाणें तुमच्या कांहीं विशिष्ट समजुती आहेत. अशा स्थितींत दुसऱ्या धर्माचे लोक येऊन तुम्हांला सांगतात कीं, "स्वर्ग प्राप्तीकरितां आमच्याच धर्माची कल्पना ग्राह्य मानली पाहिजे.' जणूं काय स्वर्गाच्या दरवाज्याच्या किल्ल्या एकट्या त्यांच्याच पैगंबराजवळ आहेत!

ह्यावर रामाचें असें म्हणणें आहे कीं, असला बुद्धिभेद करण्यास असली उठाठेव करण्यास—असला उपद्व्याप करण्यास तुम्हांला बिलकुल अधिकार नाहीं. आपल्या मतांपासून आत्महित होईल किंवा नाहीं, हें पहाण्याचें काम ज्याचें त्याचें आहे. दुसऱ्यांनीं त्या बाबतींत पडण्याचें काय कारण आहे ? अर्थात् नाहीं. ज्याचा धर्म ज्यानें त्यानें ठरवावयाचा आहे. देव ज्याचा त्यानें शोधून काढावा. अमक्या देवाला भजा आणि अमक्या धर्माचा आश्रय करा, असा दुसऱ्यास उपदेश करण्याचा आपणांस अधिकार नाहीं, असें वेदान्ताचें म्हणणें आहे.

प्रश्नः—जे लोक आत्महत्या करतात त्यांच्या आत्म्याचें काय होतें ?

उत्तरः—प्रत्येक जण आत्महत्याच करतो, असें रामाचें म्हणणें आहे. कोणत्याहि कारणानें मरणारा प्रत्येक मनुष्य रामाच्या दृष्टीनें आत्महत्या करतो. इतर कारणांनीं मरणाऱ्या लोकांचें विशेष काय होतें ? कांहींच नाहीं. त्याचप्रमाणें आत्महत्या करणाऱ्या लोकांचें विशेष असें कांहींच होत नाहीं. प्रारब्धानें ठरलेली मनुष्याची या जगांतील कामगिरी पुरी झाल्याशिवाय कोणालाहि मरण येणें शक्य नाहीं. मग लोक मरतात कसे ? अज्ञानामुळें आणि दुष्ट वासनांमुळें. लोक स्वतःला संसारांत अशा रीतीनें गुरफटून घेतात कीं, स्वतःच्या शरीराचा नाश होईल—मरण येईल—तर फार चांगलें होईल, असें त्यांना वाटूं लागतें. अंतःकरणापासून तें मरणाची इच्छा करूं लागतात; आणि त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना मरण येतें, असा कर्मतत्त्वाचा सिद्धांत आहे. पापवासनांच्या भरीस पडल्यामुळें लोक रोगग्रस्त होतात आणि ह्या निरनिराळ्या रोगांनीं खितपत अंथरुणावर पडलें असतां पूर्वींच्या पापवासना फलद्रूप होऊं लागतात. अशी स्थिति झाली ह्मणजे त्यांना मरण यावेंसें वाटूं लागतें आणि त्याप्रमाणें मरण येतें. ह्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां सर्व लोक आत्महत्या करणारेच होत, असें ह्मटलें पाहिजे.

## पूर्व जन्मांची स्मृति.

प्रश्नः—पूर्व जन्मांची आपणांस स्मृति असणें शक्य आहे काय ?

उत्तरः—पूर्व जन्मांची स्मृति करणारा किंवा पूर्वजन्मांतील गोष्टी आठवण्याचा प्रयत्न करणारा मनुष्य [illegible] झाल्यावर

ज्याला आणखी चार पांच रस्ते ओलांडावयाचे आहेत, अशा एखाद्या प्रवाशाप्रमाणें आहे. आतां, कल्पना करा कीं, असा प्रवासी आपण ज्या ठिकाणाहून निघालों, त्या ठिकाणाची चौकशी करूं लागला, आपण कोण-कोणते रस्ते ओलांडून आलों त्या रस्त्यांचीं नांवें आठवूं लागला, घटके-पूर्वी आपण कोठें होतों, प्रहरापूर्वी आपण कोणत्या ठिकाणाला येऊन पोहोंचलों होतों, यासंबंधानें तो विचार करूं लागला; तर त्याचा हा प्रयत्न निरर्थक आणि निरुपयोगी समजला जाणार नाहीं काय? मनुष्यानें दृष्टि पुढें ठेवावी; पुढचा पोंच ठेवावा. मागें पहाण्यांत अर्थ काय? त्यापासून यत्किंचित् तरी लाभ होण्याचा संभव आहे काय? तुमचे आजपर्यंत कित्येक जन्म झाले, कित्येक रस्ते तुह्मी चालून आलां; आतां तुह्मांला पुढें जावयाचें आहे, तडक पुढें गेलांत तरच तें रास्त होईल; दरम्यान् मध्येंच थांबलां तर स्वतःच्या प्रगतीला अडथळा केल्यासारखें होईल; आपण होऊन आपलें नुकसान केल्यासारखें होईल. ह्मणून राम ह्मणतो पुढें सरा.

प्रश्नः—जड देहांत जाग्रत असतां त्याच वेळीं सूक्ष्मांतहि काम करणें शक्य आहे काय? 'ब्रह्मविद्येचे अध्यापक' सांगतात कीं, हें शक्य नाहीं.

उत्तरः—या प्रश्नांत बऱ्याच मुद्यांचा अंतर्भाव होतो; परंतु, त्या सर्वांचा सविस्तर विचार करण्यास आज वेळ नाहीं. 'ब्रह्मविद्येच्या अध्यापकां'चें 'नाहीं' हें उत्तर बरोबर आहे. कारण, स्थूल शरीराचे व्यापार चालू असतांना मनाला तेथें असावें लागतें.

मनोव्यापार हे केवळ मनाच्या द्वारेंच होतात; त्यांना शरीराच्या सहा-य्याची अपेक्षा नाहीं. परंतु सर्वच शारीरिक व्यापार हे केवळ शरीरानेंच होऊं शकत नाहींत. त्यांना मनाच्या सहाय्याची अपेक्षा असते. इतकेंच नव्हे तर शरीराचे बहुतेक सर्व व्यापार मन करूं शकतें. जगांत जीं मोठ-मोठालीं कार्यें झालेलीं आपल्याला दिसतात तीं सर्व मनानें झालेलीं असतात. प्रत्यक्ष शरीरानें तीं स्थूलरूपानें व्यक्त होतात इतकेंच. तारायंत्रें, जहाजें हीं आपल्या मानसिक कल्पनांचीं मूर्त स्वरूपें होत. ह्या सर्व जड वस्तु शरीराच्या सहाय्यामुळेंच मूर्त स्वरूप पावूं शकल्या. जहाजें बांधण्या-करितां किंवा तारायंत्रें तयार करण्याकरितां हातांची आवश्यकता लागते.

आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, मन हें कर्ता आहे कीं करण आहे? यावर रामाचें असें उत्तर आहे कीं, मन हेंहि कर्ता नसून करण—साधन आहे. मोठमोठाल्या इमारती, शिल्पकलेचीं नामांकित कामें, मोठमोठालीं जहाजें या सर्वांचा नकाशा प्रथम मनाच्या द्वारें तयार केला जातो आणि शरीराच्या द्वारें त्या मनांतील नकाशाला मूर्त स्वरूप प्राप्त होतें.

ब्रह्मानुभव करून घेण्याला तुह्मांला स्थूलाचा व सूक्ष्माचा अशा दोहों-चाहि उपयोग करून घेतला पाहिजे. परंतु हेंहि विसरतां कामा नये कीं, सूक्ष्मांतील—मनोभूमिकेंतील संस्कार व्यक्त करणें आणि ब्रह्मज्ञान ह्या गोष्टी अगदीं भिन्न आहेत. आत्मसाक्षात्कार होण्याला तुह्मांला स्थूल सूक्ष्माच्या पलीकडे गेलें पाहिजे, त्या दोहोंचाहि त्याग केला पाहिजे. कारण, ह्या दोन्ही भूमिका ह्मणजे लोकच होत—भ्रमरूप होत. मोक्षाची स्थिति ह्या सर्वांच्या पलीकडे आहे.*

प्रश्नः—परमेश्वर जर सर्वशक्तिमान् आहे आणि आपण परमेश्वर आहों तर आपणांस डोळ्यांनीं ऐकतां कां येऊं नये? आणि कानांनीं पहातां कां येऊं नये?

उत्तरः—स्वतःच्या अवयवांसंबंधानें हे माझे पाय, हें माझें नाक, हे माझे डोळे, हे माझे हात, असें तुह्मी मोठ्या ऐटीनें सांगत असतां. असें जर आहे—हे सर्व जर तुमचे आहेत, यावर जर तुमची सत्ता आहे, तर

* ब्रह्मविद्येचे आचार्य' मनुष्याच्या उत्क्रान्तीच्या आमच्या शास्त्रांत सांगि-तलेल्या सात भूमिका मानतात. त्यांचीं नांवें:—(१) भूलोक, (२) भुवर्लोक, (३) स्वर्लोक, (४) महर्लोक, (५) जनोलोक, (३) तपोलोक, (७) सत्यलोक. मनुष्य एका वेळीं एकाच भूमिकेंत काम करूं शकतो. परंतु कांहीं असामान्य व्यक्ति मात्र एका वेळीं दोन दोन तीन तीन भूमिकांत किंवा लोकांत काम करूं शकतात. परंतु या अपवादभूत व्यक्तीहि प्रायः तसें करीत नाहींत. कारण, तसें करण्यांत मानसिक शक्तींना फार ताण बसतो, परंतु तसें करणें मात्र त्यांना शक्य आहे, असें 'ब्रह्मविद्येच्या आचार्यां'चें मत आहे. परंतु हे सर्व लोक झाले तरी मोक्षाच्या दृष्टीनें स्वप्नकल्पनांप्रमाणें भ्रमरूप अर्थात् मिथ्या होत, ह्या वेदान्ताचा मत सिद्धान्त आहे.

मग तुह्मी तरी कानांनीं कां पहात नाहीं ? डोळ्यांनीं कां ऐकत नाहीं ? परमेश्वर जर सर्वशक्तिमान् आहे, तर त्या परमेश्वराला त्याच्या मर्जीप्रमाणें वागूं द्या. आपले सर्व शारीरिक व मानसिक व्यापार परमेश्वराच्या सत्तेनेंच चाललेले असतात, आपल्या इच्छेनें नव्हे. परमेश्वर सर्व चराचराला व्यापून राहिला आहे. परमेश्वर जर कोणावर अवलंबून असता तर मात्र तुमच्या लहरींप्रमाणें आणि इच्छांप्रमाणें तो वागला असता! तो तसें करीत नाहीं, याचें कारण तो तुंमचे नियम, कायदेकानू यांनीं बांधला गेलेला नाहीं. तो नित्यमुक्त असून स्वतःच्या इच्छेप्रमाणें वागत असतो. निरानिराळ्या इच्छा करणारें मन तुह्मी खास नव्हे. त्याचप्रमाणें हें शरीरहि तुह्मी नव्हे, असें राम तुह्मांला बजावून सांगत आहे. तुह्मी जर केवळ मन असतां तर तुह्मांला तुमच्या इच्छेप्रमाणें वागतां आलें असतें. तसें असतें तर तुमच्या इच्छेप्रमाणें तुह्मांला आपलें शरीर वागवतां आलें असतें. तसेंच तुह्मी जर शरीर असतां तर शरीराच्या व्यापारांचा ताबा तुमच्या मनावर चालला असता. परंतु तसें होत नाहीं. कारण, मन व शरीर तुह्मी नव्हे. सर्व चराचर ज्याच्या सत्तेनें चालतें, सर्व जगाची उलाढाल ज्याच्या सत्तेनें होते, असा जो परमेश्वर तोच तुह्मी आहां. मन निरनिराळ्या इच्छा करीत असतें. परंतु, ह्या इच्छा, हे संकल्प म्हणजे कांहीं तुह्मी नव्हे. तुह्मी याच्या पलीकडे जाऊन पोहोंचा. ज्याच्यामुळें झाडें वाढतात, ज्याच्या सत्तेमुळें पक्षी आकाशांत उडतात तेच तुम्ही आहां. तुम्ही परमेश्वर आहां, परमेश्वर तुम्हीच आहां. ईश्वरत्व हा तुमचा एक विशेष गुणधर्म आहे असें नाहीं; तर मूर्तिमंत ईश्वरच तुम्ही आहां.

प्रश्नः—बुधादि निरनिराळ्या गोलांचीं स्थित्यंतरें कसकशीं होत जातात, कोणकोणत्या मंडलांतून व अंतर्मंडलांतून त्यांना फिरावें लागतें, वगैरे विषयांचें अध्ययन साक्षात्कार होण्याला आवश्यक आहे कीं काय?*

---

*'ब्रह्मविद्ये'च्या ग्रंथांमध्यें लेडबिटर यांनीं लिहिलेला 'गूढजीवन' (इनर लाईफ) ह्या नांवाचा एक ग्रंथ आहे. सूर्यग्रहमालेंत बुध, शुक्र, मंगळ वगैरे सात ग्रह असून त्यांची निरनिराळया मंडळांतून आणि अंतर्मंडाळांतून उत्क्रांति कसकशी होत जाते वगैरे विषयांचें सविस्तर वर्णन सदरहू ग्रंथामध्यें करण्यांत आलेलें आहे. आपली पृथ्वी ही चौथ्या मंडलां-

उत्तरः—जोंपर्यंत तुम्हांला अविद्येनें ग्रासलें आहे, जोंपर्यंत तुम्ही आत्मज्ञानसंपन्न झालां नाहीं, तोंपर्यंत असल्या कृत्रिम साधनांची तुह्मांला आवश्यकता भासत राहील; तीं तुम्हांला हवींशीं वाटतील. लहानपणीं आपणांला खेळणीं हवींशीं वाटतात, पण आपण मोठें झालें म्हणजे तीं फेंकून देतों. त्याचप्रमाणें तुम्हांला पारमार्थिक ज्ञान प्राप्त झालें म्हणजे भूलोक, स्वर्लोक वगैरे खेळणीं तुम्ही फेंकून द्याल. पण आत्मज्ञान होई-पर्यंत ह्या खेळण्यांनीं स्वतःची करमणूक करून घेतल्याशिवाय तुह्मांला गत्यंतर नाहीं. ज्ञान ह्मणजे काय ? अज्ञानाचा नाश. ज्ञान हें एखाद्या शिडीवर चढून जाण्यासारखें, व अज्ञान हें शिडीवरून खालीं उतरण्यासारखें आहे, असें म्हटलें तरी चालेल. या ठिकाणीं खालीं आणि वर हे शब्द सापेक्ष आहेत.

ऐहिक विषयांत अधिकाधिक मन गुंतविणें हेंच अज्ञान, आणि पार-मार्थिक विषयाकडे लक्ष लावणें हेंच ज्ञान. पदार्थविज्ञानशास्त्र असें सिद्ध करून दाखवतें कीं, प्रकाश आणि अंधकार हीं भिन्न नाहींत; तर तीं एकच आहेत. भिन्नत्व फक्त त्यांच्या कमीजास्त प्रमाणावर असतें. एखाद्या अंधाऱ्या खोलींत वसा, थोडा वेळ गेल्यावर डोळ्यांतील बाहुली विकास पावते आणि तुह्मांला दिसूं लागतें.

पूर्वी जो अंधकार म्हणून वाटत होता तोच प्रकाश होतो. त्याचप्रमाणें ज्ञान आणि अज्ञान हीं परस्परविरोधी नाहींत. दोन्ही एकाच जातीचीं आहेत. त्यांच्यामधील फरक फक्त कमजास्त प्रमाणाचा आहे. जोंपर्यंत तुम्ही अज्ञानांत आहां तोंपर्यंत ज्ञानाचा शिडीच्या अगदीं खालच्या पाय-रीवर आहां. ह्या खालच्या पायरीवर असतांना निरनिराळ्या साधनांनीं स्वतःची करमणूक करून घेतल्याशिवाय तुम्हांला चैन पडणार नाहीं. परंतु जसजसे तुम्ही वरच्या पायऱ्यांवर जाल तसतसे हे सर्व पोरखेळ तुम्ही टाकून द्याल.

---

तील चौथ्या अंतर्मंडलांत सध्यां आहे व त्यावरील सध्यांची मनुष्यसृष्टि चंद्रलोकावरील पशुसृष्टींतून उत्क्रान्ति पावून बनलेली आहे, अशा आशयाचें वर्णन ह्या ग्रंथांत केलेलें आहे.

प्रश्न:—' अशब्द शब्द '+ या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, 'देवात्मा' व ' जीवात्मा ' हे दोन्ही एकत्र असूं शकणार नाहींत. दोहोंपैकीं एकाचा नाश झालाच पाहिजे. दोन्ही एकत्र असणार नाहींत. वेदान्ताचेंहि मत असेंच आहे काय ?

उत्तर:—देहाची अहंता गळाल्याशिवाय आत्मतत्त्व समजणें शक्य नाहीं. परंतु ' देहाचा आत्मा ' आणि ' जीवाचा आत्मा ' ह्या शब्दांचा अर्थ इकडील लोक समजतात त्याहून निराळा असला पाहिजे, असें रामाचें मत आहे. ब्रह्मानुभव होण्याला देहाची अहंता गळाली पाहिजे; अहंभाव, मीपणा नाहींसा झाला पाहिजे. देहात्मबुद्धि नाहींशी झाल्याशिवाय परमात्म्याशीं तादात्म्य पावतां येणार नाहीं. बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झालेलें चैतन्य—भासमान होणारें चैतन्य—आपण—आत्मा आहों, ही कल्पना नाहींशी झाली पाहिजे. आणि ह्या दृष्टीनें ' ब्रह्मविद्येच्या आचार्या ' चें वरील विधान अगदीं बरोबर आहे. अज्ञानमूलक विचारसरणीला एकदम फांटा दिला पाहिजे. हें शरीर म्हणजेच मी—आत्मा ही समजूत अज्ञानमूलक असून हें अज्ञान प्रथम नाहींसें केलें पाहिजे.

' देहात्मा ' व ' जीवात्मा ' हे शब्द जर अशा अर्थानें वापरले असतील कीं, देह ह्या जगांत आहे आणि जीव दुसरीकडे, स्वर्गात आहे;

+ ' अशब्द शब्द ' हें एक लहानसें पुस्तक ब्लाव्हाटस्की नामक विदुषीनें लिहिलें आहे. यांत ' ब्रम्हविद्यामंडळां'तील थोड्याशा खऱ्या गूढवादी लोकांकरितां एकोणचाळीस उपदेश दिले आहेत. हे उपदेश ' सोन्याच्या उपदेशांचें पुस्तक' नामक मूळ ग्रंथांतून फार काळजीपूर्वक निवड करून बाईनें घेतले आहेत. ह्या पुस्तकांतील कांहीं उपदेश बुद्धाच्या काळच्या पूर्वीचे आहेत व कांहीं त्यानंतरचे आहेत. ह्या मूळ उपदेशांतील कांहीं तांब्याच्या पत्र्यांवर तिबेटी भाषेंत व कांहीं ( भलत्यालाच त्यांतील रहस्य समजूं नये, म्हणून) चित्रलिपींत लिहिलेले आहेत. हे सर्व उपदेश आपल्याला माहीत आहेत; परंतु त्यांतील सर्व उपदेशांचें ग्रहण करण्याइतकी लोकांत अद्याप पात्रता नसल्यामुळें त्यांतील फक्त एकोणचाळीस उपदेशच ह्या पुस्तकाच्या द्वारें जगापुढें मांडले आहेत, असें बाईनीं पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे.

तसेंच देहाचा आत्मा निराळा आणि जीवाचा आत्मा निराळा, हे दोन्ही आत्मे निराळे आहेत तर ती इकडील लोकांची चूक आहे. देह आणि जीव यांचा आत्मा—परमात्मा एकच आहे.

जीव ( स्पिरीट ) ह्या शब्दासंबंधानें इकडे बऱ्याच चुकीच्या समजुती आढळतात. तत्त्वज्ञानाच्या भाषेंत ज्याला मन असें ह्मणतात तें मन म्हणजेच जीव, असा जरी जीव शब्दाचा अर्थ घेतला, तथापि मन आणि देह ह्यांचा आत्मा एकच आहे. मन आणि शरीर ही दोन्हीं एकच आहेत; तीं एकाच जातीचीं आहे. दोहोंतील फरक जातीचा नसून कमी जास्त प्रमाणाचा, तत्वाच्या अंशाचा आहे.

देह आणि मन हीं एकच आहेत; हें आतां भौतिकशास्त्रांनीं सिद्ध केलें आहे. तत्त्ववेत्ते असें प्रतिपादन करतात कीं, जड आणि शक्ति हीं एकच आहेत; त्यांत भेद नाहीं. ' वस्तूंतील परमाणु हे केवळ शक्तीचें केंद्र आहेत, ' ही गोष्ट लिब्निट्स* ह्या तत्त्ववेत्त्यानें प्रथम यूरोपच्या निदर्शनास आणली. पण वस्तु म्हणजे परमाणुसमुदाय आणि परमाणु म्हणजे शक्ति ही गोष्ट हजारों वर्षांपूर्वींच हिंदुस्थानांत माहीत होती. लिब्निट्सचें हें मत आतां भौतिक शास्त्रांनीं सप्रमाण सिद्ध करून दाखविलें आहे. लॉर्ड केल्विन ह्या प्रसिद्ध शास्त्रवेत्त्यानें एका निबंधांत गणितांतील सिद्धान्तांच्या साहाय्यानें असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, वस्तु आणि शक्ति हीं एकच आहेत. मग वस्तु आणि तींतील जीव हीं भिन्न कशीं म्हणतां येतील ? वस्तु आणि जीव ह्या शब्दांऐवजीं वस्तु आणि मन असा जरी °लॉर्ड केल्विन ह्यांच्या लिहिण्याचा अर्थ असला तरी रामाच्या ह्मणण्याला बाध येत नाहीं. कारण, जीव ( स्पिरिट ) याला तुम्ही शक्ति म्हटलेंत किंवा मन ह्मटलेंत तरी अर्थ एकच आहे. जीवाचा कोणताहि अर्थ केलात तरी वस्तु आणि जीव हीं दोन्हीं एकच आहेत. भिन्न नाहीत.

* लिब्निट्सः—जर्मन तत्त्ववेत्ता आणि गणितशास्त्रज्ञ. (११४६–१६१६)

° लॉर्ड केल्विन—इंग्लंडांतील प्रख्यात पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ गणितशास्त्रवेत्ता. (१८२४—१९०७)

उंच पर्वतावर जाऊन बसा. हिमालय पर्वतावर अपूर्व वनश्री तुमच्या नजरेस येईल. त्या ठिकाणीं पुष्पांचा सुगंध तुमच्या घ्राणेंद्रियांना संतुष्ट करील, पक्ष्यांचीं मंजुळ गीतें, निर्झरांचा खळखळ आवाज, वाऱ्याचा सोंसाटा हीं तुमच्या कानांवर पडतील. हीं सर्व काय आहेत ? पुष्पांचा परिमल, पक्ष्यांचें गायन, निर्झरांचा खळखळ आवाज ह्या सर्व वस्तूच नव्हेत का ? हे जड पदार्थच नव्हेत का ? परंतु ह्या सर्व जड वस्तूंचें ( त्या ठिकाणीं ) शक्तींत, विचारांत, आनंदांत, परमात्मभावनेंत, रूपांतर होत असतें. सुस्वर गायनाच्या रूपानें तें आपल्याला तल्लीन करतें, उच्चतम कल्पना आपल्या अन्तःकरणांत उदित करतें. अशा ठिकाणीं बाह्य वस्तूंचें विचारांत रूपांतर होत असल्याचें आपण प्रत्यक्ष अनुभवतों. तुमचीं हीं मोठमोठालीं घरें, प्रचंड जहाजें, हीं शहरें, हे पुरुष, ह्या स्त्रिया हीं वास्तविक काय आहेत ? एका काळीं हीं सर्व केवळ कल्पनारूप नव्हतीं काय ? घराची योजना-रचना प्रथम मनांत होते आणि मग तें बाह्य सृष्टीमध्यें बांधलें जातें.

पाण्याचें बाष्प होतें किंवा बाष्पाचें फिरून पाणी बनतें; त्याप्रमाणें हिमालयावर जड वस्तूंचें विचारांत-कल्पनांत रूपांतर होतें. ह्यावरून सिद्धान्त काय निघतो ? हाच कीं, वस्तु आणि मन किंवा देह आणि मन हीं अभेदरूप आहेत. तसेंच वरील उदाहरणावरून हेंहि सिद्ध होतें कीं, देह आणि मन हीं जर भिन्न असतील तर त्यांचें एकमेकांवर कार्य होणार नाहीं; पहिल्याचें दुसऱ्यांत व दुसऱ्याचें पहिल्यांत रूपांतर होणार नाहीं.

## परिच्छिन्नतेच्या कल्पना टाका.

फारसी भाषेंत एक सुंदर काव्य आहे. ह्या काव्याचा सारांश असा आहे कीं, दुःखाश्रूच्या रूपानें एक उदकबिंदु ढगांतून खालीं पडला. सद्-रहू उदकबिंदूला खेदाचें कारण विचारलें असतां तो म्हणाला, ' मी किती लहान, अल्प व क्षुद्र आहें ! हा महासागर किती विस्तीर्ण व अगाध आहे ! त्याला पाहून माझ्या क्षुद्रपणाचें मला वाईट वाटतें. ' त्यावर त्याची अशी समजूत घालण्यांत आली कीं, ' बाबारे, वृथा खेद

करूं नको; बिंदु ह्या तुझ्या क्षुद्रतादर्शक नांवाकडे तूं लक्ष देऊं नकोस. तसेंच तूं आपल्या अल्प आकृतीकडे पाहून शोक करूं नकोस. नामरूपाच्या पलीकडे दृष्टि ठेवून तुझें वास्तविक स्वरूप काय आहे, ह्याचा विचार कर. तूं क्षूद्रबिंदु असलास तरी पाणीच नाहीं काय ? आणि सिंधूमध्यें तरी पाण्याशिवाय दुसरें काय आहे ? तो तरी पाणीच नव्हे का ? तूं आपल्या स्वतःला दिक्कालादिकांनीं मर्यादित समजूं नकोस. दिक्कालादिकांच्या पलीकडे नजर पोहोंचवून आत्मस्वरूप–जलरूप ओळख. ' एकाच वस्तूच्या बरोबर असणाऱ्या ( दुसऱ्या ) वस्तु परस्पर बरोबर असतात. आपण स्वतःला दिक्कालादिकांनीं मर्यादित समजतों म्हणून दुःखी होतों. आपण ह्या सर्वांच्या पलीकडे आहों, हें अनुभूत करून घ्या. वस्तु आणि जीव किंवा देह आणि जीव हीं एकच आहेत, इतकेंच नव्हे तर सर्व एकच आहेत.* सद्वस्तु ही–आत्मा हा–दिक्कालादिकांनीं मर्यादित नाहीं. सर्व चराचर आपणांमध्येंच आहे. स्वप्नामध्यें आपण जंगलांत फिरत आहों, पर्वतावर बसतों आहों, नदीकांठावर फिरत आहों, असें पाहातों; म्हणजे जंगल, पर्वत, व नद्या ह्या आपणांहून भिन्न आहेत असें पाहातों; परंतु वास्तविक त्या बाहेर कोठें नसून आपणांतच आहेत. आपणच त्या सर्व आहोंत. त्या जर बाहेर कोठें असत्या, आपणांहून भिन्न असत्या, तर पर्वताच्या भारानें आपली झोंपण्याची खोली दबून गेली असती; परंतु तसा अनुभव येतो काय ? नाहीं. याचें कारण हेंच कीं, तीं सर्व आपणांतच आहेत; आपणांहून भिन्न नाहींत.

याच न्यायानें वेदान्त प्रतिपादन करतो कीं, मनोलोक, जीवलोक वगैरे सर्व लोक किंबहुना सर्व चराचर आपणांतच आहे. परंतु अविद्येमुळें–अज्ञानामुळें ते आपणांत नसून आपण त्यांत आहों, असें आपणांस वाटतें. हातावरील आरशांत स्वतःचें प्रतिबिंब पाहणाऱ्या स्त्रीला जसें आपण आरशांत आहों असें वाटतें, त्यांतलाच हा प्रकार आहे. परंतु ज्याप्रमाणें आरशांत पाहणारी स्त्री त्यांत नसून उलट आरसाच तिच्या हातांत असतो, त्यांत आपलें प्रतिबिंब तिला दिसत असतें, त्याप्रमाणें हें अखिल विश्व आपणाबाहेर नसून फक्त आपलें प्रतिबिंब आपल्याला बाहेर दिसत असतें.



* वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः । गीता, अ. ७।१९.

संवाद किंवा संभाषणें दोन प्रकारचीं असतात. बौद्धिक आणि हार्दिक. बौद्धिक संवाद हवे तसे करतां येतात, व युक्तिवादात्मक प्रश्नांचीं उत्तरेंहि तेव्हांच देतां येतात. परंतु हार्दिक किंवा स्फूर्तिजन्य संवादांचें तसें नाहीं.

(निरनिराळ्या)पशुपक्ष्यांचे ध्वनि निरनिराळे असतात. त्यांपैकीं कोणाला मोराच्या आवाजाचें अनुकरण करतां येतें; तर कांहींना कोंबड्याप्रमाणें आरवतां येतें; कोणाला डुकराप्रमाणें हुबेहुब ध्वनि करतां येतो. अनुकरणांत कुशल असलेल्यांना त्या त्या पशुपक्ष्यांचे ध्वनि वाटेल तेव्हां काढतां येतील. परंतु त्यांना मोराला टाहो करण्यास किंवा कोंबड्याला आरवण्यास लावतां येईल काय? किंवा मोराचा टाहो अथवा कोंबड्याचें आरवणें, त्यांच्या इच्छेविरुद्ध अशा लोकांना बंद करतां येईल काय? अर्थात् नाहीं. कारण, ते स्वतंत्र आहेत. ते स्थल व काल ह्यांनीं मर्यादित होऊं शकत नाहींत. हिमालयावर निर्झरांच्या खळखळ आवाजापासून, वनपुष्पांच्या परिमलापासून किंवा झुळझुळ वाहणाऱ्या पाण्यापासून जें (प्रेम) गीत उत्पन्न होतें तें विचारांत पर्यवसान पावतें व नंतर तें कोठें जातें कोणास ठाऊक! तें विनाश पावतें असें आपणांस वाटतें काय? छे! वस्तूचा विनाश होणें कधींहि शक्य नाहीं. तर मग त्याचें काय होतें? तें गीत झाडें जपून ठेवतील, नद्या पाठ करतील, भूमि लिहून ठेवील. त्याचा स्वीकार करण्यासारखा, त्याचें रहस्य समजण्याजोगा लायक मनुष्य मिळेपर्यंत वातावरणांत तें तसेंच संचार करीत राहील.

सर्व उदात्त विचार स्फूर्तिजन्य-ईश्वरप्रेरित असतात. त्यांचा उगम परमेश्वरच आहे. हें माझें, तें माझें असें म्हणणाऱ्या अहंवृत्तींत ते खात्रीनें उगम पावत नाहींत. प्रासादिक वाणी, स्फूर्तिजन्य विचार, अहंभाव, देहबुद्धि नाहींशी झाल्यावरच अंतःकरणांत उदय पावत असतात. रामाचें म्हणणें असें आहे कीं, जगांतील प्रत्येक उच्च ग्रंथ प्रासादिक आहे. 'बायबल' हाच देवाचा ग्रंथ नसून इमर्सन, डार्विन, शेक्सपिअर वगैरेंचे ग्रंथहि देवाचे—प्रासादिक होत. कारण, अहंभाव—अहंता तात्पुरती तरी गळाल्याशिवाय असले ग्रंथ निर्माण होणें शक्य नाहीं.

## विवाहित स्थितींत आत्मसाक्षात्कार होईल काय?

प्रश्नः—विवाहित मनुष्याला आत्मानुभव करून घेणें शक्य आहे काय? स्वरूपाचें यथार्थ ज्ञान त्याला होऊं शकेल काय?

उत्तर:—निःसंशय शक्य आहे. वानप्रस्थ आणि संन्यासी यांच्यापेक्षां गृहस्थाश्रमांत राहणाऱ्या विवाहित लोकांकरितांच वेदान्त विशेषेंकरून सांगितला आहे, हें सिद्ध करून देतां येईल. हिमालयांत जाऊन एकांतवास करणाऱ्या महात्म्यांपेक्षां प्रपंचांत रहाणाऱ्या विवाहित लोकांकरितांच मुख्यतः वेदान्ताचा उपदेश आहे.

प्रत्येक कुटुंबांत आपण असें पाहतों कीं, आपली स्त्री अधिक सुखी कशी होईल, ही नवऱ्याची इच्छा असते; तसेंच नवऱ्याला अधिक सुख कसें प्राप्त होईल, ह्याविषयीं स्त्री नेहमीं खटपट करीत असते; परंतु, परस्परांना अधिक सुखी करण्याविषयीं उभयतांची मनःपूर्वक इच्छा असूनहि परिणाम काय होतो ? त्यांच्या इच्छेप्रमाणें कार्य घडून येतें काय ? छे ! उलट तीं दोघें एकमेकांच्या नाशाला, दुःखाला कारण होतात. आतां ह्या विपरीत परिणामाचा दोष कोणाच्या माथीं मारावयाचा ? परस्परांना अधिकाधिक सुखी करण्याच्या त्यांच्या सदिच्छांना ह्या दुष्परिणामाबद्दल जबाबदार धरावयाचें काय ? नाहीं ! तर त्यांच्या अज्ञानालाच जबाबदार धरलें पाहिजे. तें अज्ञान त्यांच्या इच्छा सफल होऊं देत नाहीं. आपलें खरें सुख कशांत आहे, खरें कल्याण कशानें होईल, याचें त्यांस यथार्थ ज्ञान नसतें, आणि हें अज्ञानच प्रपंचांतील सर्व दुःखांचें आणि आपत्तींचें मूळ होय. लोकांची कल्पना अशी असते कीं, एकमेकांच्या विषयवासना आणि भोगेच्छा तृप्त करण्यास मदत केली असतां आपणांस अधिकाधिक सुखी होतां येईल. नवरा बायको जेव्हां परस्परांच्या कामुकतेचें चोज करतात, तेव्हां असें करण्यानें आपण एकमेकांचें कल्याण करीत आहोंत, असें त्यांना वाटत असतें; परंतु, असें करण्यानें त्यांचा देहाभिमान मात्र वाढत जातो. एकमेकांच्या मनोवृत्तींचें आणि मनोविकारांचें कौतुक करण्यांत परस्परांचें कल्याण आहे, असें अज्ञानामुळें ह्या लोकांना वाटत असतें. सर्व दुःखांच्या मुळाशीं असलेलें हें अज्ञान नाहींसें केलें पाहिजे. हें अज्ञान दूर झालें म्हणजे प्रत्येक कुटुंब सुख आणि शान्ति यांचें आगर बनून राहील.

## निसर्ग काय शिकवतो ?

ईश्वराचे नियम, निसर्गाचे नियम आपणांस बदलतां येणार नाहींत, हें ध्यानांत ठेवा. आपण परमेश्वर आहों, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं, हा

अनुभव झालाच पाहिजे, असा देवाचा व निसर्गाचा नियम आहे. ह्या जगांतील मूर्खपणाचे व शहाणपणाचे सर्व प्रकार, लोकांना प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरीतीनें सन्मार्गाकडे खेंचीत आहेत; आपण परमेश्वरच आहों, तो आपणांहून भिन्न नाहीं, ह्याचा अनुभव करून घेण्याकडे त्यांचें लक्ष ते खेंचीत असतात. डोक्यावर नागवी तरवार धरली आहे, हें लक्ष्यांत बाळगून प्रत्येकानें वेदान्ततत्त्वांचें रहस्य समजावून घेतलेंच पाहिजे. प्रत्येकानें वेदान्ती बनलेंच पाहिजे.

वेदान्ताचा विजय होण्याला, त्याचें ग्रहण करण्याविषयीं तुम्हांला भाग पाडण्याला कत्तलींची आणि जाळपोळीची जरूरी नाहीं. वेदान्ताला आपले सिद्धान्त पटविण्याला तरवारीच्या धारेची आवश्यकता नाहीं. निसर्गाचे नियम हेच आत्मोन्नतीच्या मार्गावर लोकांना पुढें पुढें ढकलणारे, आत्मानुभव करून घेण्याकडे लोकांची प्रवृत्ति करणारे, देवाचे सैनिक होत; निसर्गाचे कायदे हेच वेदान्ताचे शिपाई! यास्तव वेदान्ताचें ग्रहण तुम्ही केलेंच पाहिजे, न करून चालणार नाहीं. वेदान्ताचा आश्रय करणें अपरिहार्य आहे.

तुमच्या शेजाऱ्याचें खरें कल्याण कशांत आहे, ह्याचें जर तुह्मांला यथार्थज्ञान होईल, तर तुमचे सर्व व्यवहार निसर्गाच्या नियमानुसार होत जातील. आणि तसें झालें असतां प्रत्येक कुटुंब, प्रत्येक घर—मग तें राजाचा भव्य राजवाडा असो किंवा गरिबाची भिकार झोंपडी असो, प्रत्यक्ष स्वर्गच होईल. येथल्या येथें स्वर्गसुखाचा तुह्मांला अनुभव येईल.

## आत्मानुभवाचें ध्येय.

निसर्गाच्या नियमांप्रमाणें खरें सुख कशांत आहे हें पाहूं गेलें असतां, ईश्वर आपणांहून निराळा नाहीं, आपणच ईश्वर आहों, ह्याचा प्रत्यक्ष अनुभव होणें, ह्यांतच आपलें कल्याण आहे, असें तुमच्या प्रत्ययास येईल. आपण दिक्कालादिकांनीं मर्यादित नाहीं, आपण सर्वस्वी स्वतंत्र आहोंत, हें ज्ञान होण्यांत तुमचें खरें कल्याण आहे, आणि आपण ईश्वरच आहों, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं, सर्वसत्ताधीश, अनंत असा जो परमात्मा तो आपणच, असा अनुभव झाल्याशिवाय मर्यादितपणाच्या तुमच्या कल्पना कधींच दूर होणार नाहींत; तुमचें स्वातंत्र्य तुम्हांला पट-

णार नाहीं. ' मी अमक्याचा मुलगा ' ही भावना जितकी दृढ झालेली असते, तितकीच ' मी परमेश्वर आहें ' ही भावना दृढ झाली, तितक्याच तीव्रतेनें ती तुमच्या अंतःकरणांत बाणली, इतकेंच नव्हे तर ईश्वरभावना तुमच्या रोमरोमांत इतकी भिनून गेली ह्मणजे ' मी अमक्याचा मुलगा ' ही पूर्वींची भावना तुह्मांला स्वप्नाप्रमाणें मिथ्या भासूं लागेल. त्या भावनेचें पूर्ण विस्मरण झालें म्हणजेच तुह्मांला खरें ज्ञान झालें असें म्हणतां येईल. आत्मानुभवाचें ध्येय हेंच होय.

आपलीं सर्व दुःखें आणि आपत्ति आपणांला आत्मानुभवाच्या मार्गाकडेच ओढीत असतात. ह्या विषयासंबंधानें तूर्त इतकेंच सांगून ठेवलें म्हणजे पुरे कीं, परमात्मभावनेप्रत आपण पोहोंचावें, आपलें ईश्वरत्व आपल्या प्रत्ययास यावें, अशीच निसर्गाची रचना—योजना आहे, ही गोष्ट गणितांतील सिद्धान्ताप्रमाणें तुम्हांला पटवून देतां येईल. ' आपण ईश्वर आहों, ' ह्या भावनेप्रत न पोहोंचण्यांतच आपल्या दुःखांचें मूळ आहे. दिक्कालादिकांच्या मर्यादा नाहींशा करा, वासनांचीं बंधनें तोडा, आणि परमात्मभावनेंत स्थिर व्हा; स्वतःच्या ईश्वरत्वाचा अनुभव करून घ्या म्हणजे पापपुण्याच्या कल्पना उरणार नाहींत. पापपुण्यादि द्वंद्वाच्या आपण पलीकडे आहों, आपणच पूर्ण ब्रम्ह आहों, असें तुमच्या प्रत्ययास येईल.

आत्मानुभव एकदम प्राप्त होण्यासारखा नाहीं. ध्यानधारणादि साधनांच्या योगानें क्रमाक्रमानें वासनांचें निर्मूलन केल्यावर, दृश्याचें मनांतून संमार्जन झाल्यावरच तो प्राप्य आहे. * आत्मानुभवाला काळ हा लागणारच. ह्या आपल्या शरीराचीहि वर्तमान स्वरूपांत उत्क्रान्ति होण्यास लक्षावधि वर्षें लागलीं आहेत हें विसरूं नका.

तुमच्या पूर्वकालीन असंख्य जन्मांपैकीं एखाद्या जन्मांत तुम्ही एखादी वनस्पति असाल; एखाद्या जन्मांत आफ्रिकेंत गुलाम म्हणून राबत असाल; दुसऱ्या एखाद्या जन्मांत दुसऱ्याच एखाद्या देशांत व समाजांत तुम्हीं जन्मलां असाल; अशा रीतीनें ह्या जन्मांत येईपर्यंत तुमच्या शरीराचीं अनेक रूपांतरें आणि स्थित्यन्तरें झालीं असलीं पाहिजेत.

---

* तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळ घडी आल्याविण ॥
तुकाराम.

घर पाडून टाकण्यासहि वेळ लागतो हें खास; परंतु तें बांधण्यास जितका वेळ लागतो त्याच्यापेक्षां किती तरी अल्प काळांत तें पाडून टाकतां येतें. पुरेशी सुरूंगाची दारू असेल–स्फोटक दारू असेल, किंवा तशाच प्रकारची पुरेशी अन्य शक्ति असेल तर घर एकदम जमीनदोस्त करतां येईल.

वासनांच्या क्षयाच्या रूपानें शरीराचे बंध पुष्कळांना तोडून टाकतां येत नाहींत; ह्याचें कारण हें कीं, हें देहरूपी घर उडवून देण्याला त्यांच्याजवळ भक्ति, ज्ञान, वैराग्य यांचा पुरेसा दारूगोळा नसतो.

केवळ बुद्धीच्या द्वारा जरी तुम्ही ह्या वेदान्ततत्त्वज्ञानाचें आकलन केलेंत वेदान्ताचे सिद्धान्त तुमच्या बुद्धीला पटले, ते अंत:करणांत बिंबून त्यांचें रहस्य तुम्हांला समजलें, तरी तुमचें काम झालें. मग तुम्ही प्रपंचांत–मुलाबाळांत राहिलांत तरी तुम्ही मुक्तच आहां. प्रपंचाच्या उपाधि मग तुम्हांला जन्ममरणाच्या फेऱ्यांत अडकविण्यास समर्थ होणार नाहींत. वेदान्ताचें एकदा ग्रहण केलेंत म्हणजे ह्याच जन्मांत ‘ अहं ब्रह्मास्मि ’ ह्याचा अनुभव घेण्यास कर्म, उपासना व ज्ञान अशा पायरीपायरीनें मोक्षाकडे जाण्याचें तुम्हांला कारण नाहीं. परंतु आत्मसाक्षात्कार झालेल्या पुरुषांना मृत्यूनंतर जीं सुखें प्राप्त होतात म्हणून लिहिलें आहे तीं सुखें तुम्हांला प्राप्त करून घेणें असतील तर वेदान्ताचीं तत्त्वें तुमच्या बुद्धीला पटवून घ्या, त्यांच्या सत्यतेविषयीं तुमची खात्री करून घ्या व नंतर तीं तत्वें विचारांत आणि आचारांत आणण्याचा तुम्ही प्रयत्न करा. त्या तत्त्वांवर श्रद्धा ठेवून त्याप्रमाणें वागा. म्हणजे त्यांची फलश्रुति तुम्हांला खात्रीनें प्राप्त होईल.

## ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं.

कर्ममार्गाचा अवलंब केल्यानें मोक्ष प्राप्त होतो, असें ‘ जुन्या करारां’त लिहिलें आहे; भक्तिपंथानें गेलें असतां मोक्ष साध्य होईल, असें ‘ नव्या करारां’त म्हटलें आहे असें सांगतात. परंतु वास्तविक पाहिलें असतां खरा ‘ स्वर्ग ’–नित्यानंदाची मोक्षाची स्थिति ज्ञानानेंच प्राप्त होते. केवळ कर्मानें मोक्षप्राप्ति होणें शक्य नाहीं. तसेंच केवळ येशू खिस्तावर श्रद्धा

ठेवल्यानेंच परमपदाची—'स्वर्गा'ची प्राप्ति होणार नाहीं. ज्याला मोक्ष म्हणून म्हणतात तो कोठून बाहेरून आणावयाचा नाहीं. आत्मबोध—आत्मज्ञान म्हणजेच मोक्ष. तुम्हांला आत्मज्ञान झालें कीं तत्क्षणीं तुम्हीं मुक्तच आहां.

ज्ञान दोन प्रकारचें आहे. बौद्धिक आणि अनुभवजन्य. आत्म्याचा अपरोक्ष अनुभव हेंच खरें ज्ञान. ह्या जिवंत ज्ञानानें किंवा जिवंत भक्तीनें, प्रत्यक्ष ब्रह्मानुभवानेंच मोक्षप्राप्ति होऊं शकते. अपरोक्षानुभूतीशिवाय मोक्ष नाहीं. स्वरूपापासून ढळा कीं, नानाप्रकारचीं दुःखें तुमच्या पाठीस लागलींच म्हणून समजा. याकरितां स्वरूपाचें अखंड अनुसंधान ठेवणें जरूर आहे.

आत्मज्ञान संपादन करण्याच्या कामीं स्त्रीपुरुषांनीं एकमेकांस सहाय्य केलें पाहिजे; तसें तीं करतील, जिवंत भक्ति, आत्म्याचें अपरोक्ष ज्ञान संपादन करण्याच्या कामीं तीं एकमेकांना मदत करतील तर तीं एकमेकांस परम पदास पोंहोंचविणारीं खिस्त किंवा सद्गुरुच बनतील. परंतु बहुतेक कुटुंबांतून याच्या अगदीं विपरीत प्रकार आढळत नाहीं काय? क्षुल्लक स्वार्थाकरितां ज्याप्रमाणें जुडासनें खिस्ताचा विश्वासघात केला त्याप्रमाणें स्वतःच्या क्षुल्लक चैनीकरतां नवराबायको एकमेकांशीं प्रतारणा करीत नाहीं काय?

## प्रपंचांत परमार्थ.

प्रपंचांत राहून आपणांस परमार्थ साधतां येत नाहीं, ह्याचा दोष कुटुंबरचनेकडे नसून आपल्या अज्ञानाकडे आहे. ह्या अज्ञानामुळेंच आपण संसारबंधनांत अधिकाधिक गुरफटले जात असतों. कौटुंबिक संबंधाचा दुरुपयोग हाच आपल्या सर्व दुःखास कारण होतो. कौटुंबिक संबंधाचें वास्तविक स्वरूप न ओळखल्यामुळें पत्नी ही जूडासप्रमाणें दीडदमडीच्या स्वार्थाकरितां—क्षणिक विषयसुखाकरितां नवऱ्याला विकण्याला तयार होते. तीस रुपड्यांकरितां नवऱ्यानें आपला आत्मा खुशाल विकावा, असें तिला वाटूं लागतें; आपल्या रंगमहालास शोभा आणणाऱ्या दोन चार चैनीच्या वस्तु घेतां याव्या किंवा शरीरास भूषविणारे दोनचार दागिने घेतां यावे, एवढ्याकरितां—ह्या क्षुद्र स्वार्थाकरितां ती स्वतःचा आत्मा विकण्यासही

तयार होते. नवऱ्याचेंहि वर्तन अशाच प्रकारचें असतें. नवऱ्याला असें वाटतें कीं, बायको ही माझी आहे, तिच्यावर माझी सत्ता आहे, आणि म्हणून तिनें माझ्या इच्छेप्रमाणें वागावें. बायकोला वाटतें कीं, नवरा हा माझा आहे, त्यानें माझ्या तंत्राप्रमाणें चालावें; स्त्रीपुरुषसंबंधाच्या वास्तविक स्वरूपासंबंधीं हे जें उभयतांचें अज्ञान तेंच प्रपंचांतील दुःखांना आणि तापांना कारण होतें. क्षुद्र स्वार्थरूपी जूडास आमच्या घरांत घोंटाळा माजवीत असतो. त्याला प्रथम हांकलून लावला पाहिजे. 'दुसऱ्यानें माझ्या तंत्राप्रमाणें वागावें,' हें जें नवऱ्याला आणि बायकोला— दोघांनाहि वाटत असतें, तें नाहींसें झालें पाहिजे. उभयतांनीं परस्परांचें पूर्ण स्वातंत्र्य ओळखण्यास शिकलें पाहिजे.-उभयतांना उभयतांच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें पाहिजे.

बैलाच्या गळयांत दावें घालून त्या दाव्यानें बैलाला धरून ठेवण्याचा प्रयत्न केलात म्हणजे बैल उलट तुम्हांला धरून ठेवीत असतो. सर्व प्रकारची मालमत्ता, सर्व प्रकारची मालकी—सत्ता हीं बंधनेंच होत. 'हें माझें, तें माझें,' हे मालकीपणाचे—ममत्वाचे विचार लोकांच्या डोक्यांतून जातील, याचनेची वृत्ति बदलून त्यागाची वृत्ति लोकांच्या अंगीं बाणेल, वैराग्य उत्पन्न होईल तर प्रत्येक घर नंदनवन होऊं शकेल, असें वेदान्त प्रतिपादन करतो. पतिपत्नीनें यथाशक्ति एकमेकांच्या सुखांत भर टाकण्याचा मनःपूर्वक प्रयत्न करावा. पण अमुक पाहिजे म्हणून कोणी कांहीं मागूं नये व अमुक मिळेल अशी अपेक्षाहि करूं नये. यदृच्छेनें जें काय मिळेल त्यावर संतुष्ट राहण्याची त्यांना संवय लागली म्हणजे हवी ती गोष्ट त्यांना प्राप्त होत जाईल. प्रत्यक्ष स्वर्गच त्यांच्या हृदयांत भरून राहील.

'मला हें द्या' 'मला तें आणा,' असें तुम्हीं ह्मणत असतां, व तुमची इष्ट वस्तु तुम्हांला आणून दिली ह्मणजे तेवढ्यापुरतें तुम्हांला बरें वाटतें. परंतु कांहीं वेळानें ती वस्तु तुमच्याकडून काढून घेतली म्हणजे तुम्हांला वाईट वाटतें. त्या वस्तूबद्दल तुम्हांला तळमळ वाटूं लागते. सारांश, वासना हें सर्व दुःखाचें मूळ आहे. खरा रोग हाच आहे. ह्या वासनांमुळेंच मनाला शांति प्राप्त होत नाहीं.

वासना तृप्त झाली—अर्थात् वांछित पदार्थ प्राप्त झाला म्हणजे तुम्हांला सुख प्राप्त होतें असें क्षणभर गृहीत धरलें, तथापि वस्तूची इच्छा आणि प्राप्ति ह्यांच्या दरम्यानचा काळ दुःखांत–तळमळींतच गेला नाहीं काय ? शिवाय वस्तुप्राप्तीनंतर तिच्या उपभोगापासून झालेलें सुख तरी चिरकालिक असतें का ? छे ! तसेंहि नाहीं. तेंहि केवळ क्षणिकच असतें.

मोबदल्याची अपेक्षा न करतां अहेतुकपणें तुम्ही दान कराल तर दानांतच खरें सुख आहे, असें तुमच्या प्रत्ययास येईल. सुख हें आपल्या मानण्यावर आहे. ज्यांत सुख आहे असें आपण मानूं, त्यातच आपल्यास सुख आढळेल. दुसऱ्यापासून घेण्यांत–प्रतिग्रहांत सुख आहे, अशी भावना करूं नका. तर दुसऱ्याला देण्यांत—दानांत-त्यागांत सुख आहे असें माना. त्यागानें तुम्हांला सुख होईल.

तुमच्या देवस्थानाच्या धर्मादायनिधीला आपण कांहीं रक्कम दिली, म्हणजे आपल्याला समाधान वाटतें, हा तुम्हांला अनुभव असेलच. ह्मणून राम ह्मणतो कीं, याचक बनू नका. दाते व्हा. त्यागी बना. म्हणजे तुम्हीच मूर्तिमंत सौख्य व्हाल.

प्रत्येक कुटुंबांत सुखसमाधान नांदावें, अशी इच्छा असल्यास नवराबायकोनें याचकवृत्ति सोडून दातृत्वशील बनलें पाहिजे. दातृत्व ही गृहसौख्याची गुरुकिल्ली आहे. आतां दान कशाचें करावयाचें म्हणाल तर प्रत्येकानें यथाशक्ति दुसऱ्याला ज्ञानदान करावें. जो आपल्या बुद्धीप्रमाणें बायकोच्या अध्यात्मिक उन्नतीला मदत करतो तोच खरा नवरा; आणि यथाबुद्धि नवऱ्याला आत्मज्ञान संपादन करण्याच्या कामीं मदत करते तीच खरी बायको. नियम हा असा आहे.

## चूडालाख्यान.

पूर्वीं एकदां हिंदुस्थानांत * शिखिध्वज या नांवाचा एक महापराक्रमी

* योगवासिष्ठ हा वेदान्तविषयावरील एक अप्रतिम ग्रंथ आहे. ह्या ग्रंथाचीं सहा प्रकरणें असून त्यांतील शेवटच्या ह्मणजे निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धांतील ७७ पासून ११० पर्यंतच्या सर्गांत चूडाला आणि शिखध्वज यांचें आख्यान आहे. चूडाला राणी ही मोठी ज्ञानी असून तिला योगसिद्धीहि

सार्वभौम राजा होऊन गेला. आत्मानुभव करून घेण्याची त्याला इच्छा झाली. परंतु, त्याबरोबर त्याला असेंहि वाटलें कीं, प्रपंचांत राहून साक्षात्कार होणें शक्य नाहीं. त्याकरितां प्रपंचाचा त्यागच केला पाहिजे. राजाची चूडाला नामक राणी असून ती फार ज्ञानी होती. प्रपंचांत राहूनहि परमार्थ साधतां येईल, असा ती राजाला बोध करी; परंतु 'यःकश्चित् बायको ही! आपल्याला ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी कसल्या सांगणार!' असल्या कोत्या समजुतीनें तो तिच्या उपदेशाकडे मुळींच लक्ष देत नसे. प्रपंचांत राहून परमपदाची प्राप्ति शक्य नाहीं, अशी राजाची दृढ समजूत झाल्यामुळें राणीच्या हातांत राज्याचीं सूत्रें सोंपवून—राज्याचा, स्त्रीपुत्रादिकांचा—

---

अनुकूल होत्या. राजाला आत्मबोध करण्याचा आरंभीं तिनें प्रयत्न केला. परंतु अरण्यवास पत्करल्याशिवाय वेदान्तज्ञान होणें शक्य नाहीं, अशी त्याची समजूत असल्यामुळें राणीच्या उपदेशाकडे दुर्लक्ष करून तपश्चर्या करण्यासाठीं त्यानें अरण्याचा रस्ता धरला. कांहीं कालानंतर त्याला ताळ्यावर आणण्याचा निश्चय करून राणीनें आपल्या अंगांतील सिद्धींच्या योगानें यतिरूप धारण केलें आणि वैराग्याच्या खऱ्या लक्षणांचा बोध करून राजाला आत्मज्ञानसंपन्न केलें. यतिरूपांत तिनें आपलें नांव कुंभ असल्याचें सांगून नारदापासून आपली उत्पत्ति कशी झाली, यासंबंधाचा वृत्तांत कथन केला. राजाच्या ठिकाणीं उत्पन्न झालेलें वैराग्य किती दृढ आहे, याची कसोटी पाहण्याच्या हेतूनें दुर्वासाच्या शापाची व त्यामुळें आपण रात्रीं स्त्रीरूपधारी बनत असल्याची हकीगत तिनें सांगितली. नंतर मदनिका हें नांव धारण करून तिनें राजाशीं विवाह केला. अशा रीतीनें दिवसा यति व रात्रीं पत्नी अशा स्थितींत प्रत्यक्ष भोग भोगीत असतांहि राजाचें चित्त भोगासक्त झालें नाहीं, हें पाहून कुंभवेषधारी राणीला हर्ष झाला. परंतु राजाच्या मनाची खरोखर क्रोधरहित स्थिति झाली आहे कीं नाहीं, याची परीक्षा पाहण्यासाठीं एका रात्रीं परपुरुषास आलिंगन देत असल्याचा देखावा तिनें राजास दाखविला. त्याचाहि यत्किंचित् परिणाम राजाच्या मनावर झाला नाहीं, असें पाहतांच राणीनें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. पुढें चूडाला आणि शिखिध्वज यांनीं राज्यांत प्रवेश करून अनेक वर्षें राज्य केलें. आत्मज्ञान प्राप्त झाल्यामुळें राज्य करीत असतांहि राजाच्या चित्ताची समता कधीं ढळली नाहीं.

सर्वस्वाचा त्याग करून तो आत्मज्ञानार्थ हिमालयांत गेला. राजाला हिमालयांत जाऊन एक वर्ष झालें असेल नसेल तोंच राणीनें राजाला परमसुखाची प्राप्ति करून देण्याचा एक उपाय योजला. एके दिवशीं तिनें संन्याशाचा वेष धारण केला, आणि ज्या पर्णकुटींत राजा एकान्तसेवन करीत होता त्या पर्णकुटींत ती गेली. ती तेथें पोहोंचली त्या वेळीं राजा आत्मचिंतनांत निमग्न होता. ती तेथेंच जवळ उभी राहिली. वेषांतरामुळें त्यानें तिला ओळखलें नाहीं. आज मोठा संन्यासी आपल्या येथें आला हें म्हणून राजाला फार संतोष वाटला. त्यानें अर्घ्यपाद्यादिकानें त्याची संभावना केली.

यतिवेषधारी राणीहि ह्या वेळीं ब्रह्मानंदमग्न दिसत होती. तिला उद्देशून राजा म्हणाला, 'भगवन्! मला उद्धरण्याकरितां आपल्या रूपानें भगवानच येथें आले आहेत असें मला वाटतें.' तिनें उत्तर केलें, 'तुझा तर्क अगदीं बरोबर आहे.' त्याला स्वबोध करण्याचें तिच्या मनांत होतें आणि त्याप्रमाणें तिनें केलेंहि. ती म्हणाली, 'राजा, तुला परमानन्दस्थितीची प्राप्ति करून घेणें असेल तर सर्वस्वाचा त्याग केला पाहिजे.' तिच्या बोलण्याचें राजाला आश्चर्य वाटलें आणि प्रत्युत्तरादाखल तो बोलला, 'महाराज, माझ्या साम्राज्याचा मीं त्याग केला, माझ्या स्त्रीपुत्रादिकांना मीं सोडलें, तरी मीं सर्वस्वाचा त्याग केला नाहीं, असें आपण म्हणतां याचा अर्थ काय?' ती म्हणाली, 'ह्या सर्वांना सोडून तूं येथें आलास हें खरें. परंतु वास्तविक पाहूं गेलें तर तूं कशाचाहि त्याग केला नाहींस.'

राणीच्या बोलण्याचा त्याला कांहींच उलगडा होईना. त्यानें फिरून तोंच प्रश्न केला, 'महाराज, विचार करा. खरा त्यागी मी नाहीं काय? माझें साम्राज्य, माझें घरदार ह्यांचा मीं त्याग केला नाहीं काय?' ह्यावर राणी म्हणाली, 'राजा! तूंच विचार करून पहा तूं आपणांला सर्वसंगपरित्यागी म्हणवतोस, परंतु तुझी ममत्वबुद्धि, तुझा अहंकार सर्वस्वी नष्ट झाला आहे काय? कांहीं वस्तूंच्या ठिकाणीं तुझें ममत्व अद्याप जडलेलें नाहीं काय? सर्व वस्तूंविषयीं तुझें चित्त अत्यंत विरक्त झालें आहे काय?' राजा म्हणाला, 'होय, मी पूर्ण विरागी आहें असें मला वाटतें. ही पर्णकुटी, हा दंड आणि जल ठेवण्याचा हा कमंडलु ह्यांशिवाय माझ्याजवळ

काय आहे?' 'पण ह्या तरी वस्तु तूं आपल्या म्हणवतोस ना?' राणीनें उत्तर केलें, 'मग अशा स्थितींत तुला विरक्त कसें म्हणतां येईल? ह्या वस्तूंच्या ठिकाणीं तुझें ममत्व आहेच कीं नाहीं? जोंपर्यंत एखाद्या वस्तूच्या ठिकाणीं मनुष्याचें ममत्व आहे, तें माझें अशी त्याची भावना आहे, तोंपर्यंत त्याला त्यागी ही पदवी कशी प्राप्त होणार? ममत्व म्हटलें म्हणजे बंधन आलेंच. क्रिया आणि प्रतिक्रिया ह्या सापेक्ष असतात. त्याप्रमाणें आपण एखाद्या वस्तूवर स्वामित्व ठेवलें कीं, त्या वस्तूचें आपणांवर स्वामित्व झालेंच पाहिजे ममत्व आलें कीं तज्जन्य बंधन आलेंच. अहंकार सर्वस्वी गळल्याशिवाय खरा त्याग, पूर्ण वैराग्य संभवतच नाहीं.' राणीचें हें उत्तर ऐकून राजानें लगेच पर्णकुटीला आग लावून दिली, दंड नदींत फेंकून दिला आणि कमंडलु अग्निनारायणाला अर्पण केला. आतां आपण निर्मम झालों असें समजून राजा मोठ्या आनंदानें बोलला, 'यति महाराज, आतां तरी मी खरा त्यागी बनलों कीं नाहीं?' राणीनें उत्तर केलें, 'बा राजा! ह्या बाह्य जड वस्तूंचा त्याग करून का कोठें अंगीं वैराग्य बाणतें? तूं पर्णकुटीचा नाश केलास खरा; पण साडेतीन हातांचा हा तुझा जड देह आहेच कीं नाहीं! त्या देहाच्या ठिकाणीं तुझें ममत्व अद्याप आहेच कीं नाहीं! हा माझा देह अशी तुझी श्रद्धा अद्याप आहेच कीं नाहीं! देहाचा अहंकार जागृत असतांना ह्या वस्तूंचा नाश केल्यापासून लाभ कोणता?' त्या यतिवेषधारी राणीचें हें उत्तर ऐकून राजा स्वतःशीं विचार करूं लागला. थोडा वेळ विचार केल्यावर त्यानें अग्निकाष्ठें पेटविलीं आणि त्यांत तो उडी मारणार, इतक्यांत राणी त्याला म्हणाली, 'बाबारे, अशा रीतीनें देहाचा नाश करून तुझें प्राप्तव्य तुला प्राप्त होईल का? कल्पना कर, तूं अग्नींत आपली आहुति दिलीस; पण तुझें शरीर दग्ध झाल्यावर अवशिष्ट काय राहील?' राजा ह्मणाला, 'शरीराची राख होईल, रक्षा अवशिष्ट राहील.' 'कोणाची राख?' राणीनें प्रश्न केला. राजा म्हणाला, 'या माझ्या देहाची राख.' राणी म्हणाली, 'अजून राखेच्या ठिकाणीं तुझें ममत्व शिल्लक आहेच! अर्थात्, हें ममत्व नष्ट न झाल्यामुळें, अहंकार न गळाल्यामुळें शरीराचा नाश होऊंनहि तुला वैराग्य प्राप्त झालें नाहीं!' ह्यावर बराच वेळ विचार करून राजा म्हणाला, 'मग मी त्याग तरी कशाचा करूं आणि कसा करूं, कीं जेणें करून पूर्ण वैराग्य माझ्या ठिकाणीं बाणेल?'

शिखिध्वज राजाच्या या प्रश्नावर ती चूडाला महाराणी बोलली, ' हें शरीर कोणाचें ? ' राजानें उत्तर केलें, ' माझें ! ' ' मग या शरीराचा त्याग कर. ' तिनें प्रत्युत्तर केलें. ' हें मन कोणाचें ? ' तिनें राजाला प्रश्न केला. राजा म्हणाला ' माझें. ' राणी ह्मणाली, ' मग त्या मनाचाहि त्याग कर. ' यानंतर राजानें त्या तापसवेषधारी राणीला अनेक प्रश्न विचारले. राजानें तिला प्रश्न केला, ' माझें स्वरूप काय ? हें शरीर जर मी नव्हे तर शरीराव्यतिरिक्त दुसरें कांहीं तरी मी असणें जरूर आहे; तसेंच मी जर हें मन नव्हे तर मनाहून भिन्न असें कांहीं तरी मी असलों पाहिजे, हें निर्विवाद आहे. शरीर आणि मन यांच्या व्यतिरिक्त असा मी कोण ? माझें स्वरूप काय ? ' राणी ह्मणाली, ' तुझा तूंच विचार कर म्हणजे मी कोण ? कोऽहं ? ह्याचा तुला शोध लागेल. ' त्यावर राजानें पुष्कळ विचार केला; तेव्हां त्याला हें कोडें उलगडलें व ' तोच मी, सोऽहं, सर्व देवांचा देव, सर्व प्रभूंचा प्रभु, परब्रह्म तें मींच ' असा त्याला अनुभव झाला. ह्याचा अनुभव झाल्यावर तो म्हणाला, ' ह्या परब्रह्माचा मात्र मला त्याग करतां येणार नाहीं. इतर सर्व वस्तुचा त्याग करतां येईल. कारण, त्या असत् आहेत. पण ब्रह्म सत्य आहे आणि मीच तें आहें. '

' दातृत्वाला–त्यागाला सुरवात स्वतःच्या कुटुंबापासून होते. ' अशी इंग्रजी भाषेंत एक ह्मण आहे. या ह्मणीचा अर्थ असा कीं, आधीं अगदीं जवळच्यांचें कल्याण आणि मग लोककल्याण. याच न्यायानें आपणांस अत्यंत प्रिय आणि आवडत्या अशा गोष्टींचा त्याग प्रथम केला पाहिजे. ' हें मीं करतों, ह्या कार्याचा कर्ता मी आहें, ह्या पदार्थाचा भोक्ता मी आहें ' ह्या कर्तृत्वाच्या आणि भोक्तृत्वाच्या कल्पनेचा प्रथम त्याग केला पाहिजे. हा मीपणा शरीराचें स्तोम माजवीत असतो. त्याला प्रथम फांटा द्या–नाहींसा करून टाका. ' माझी बायको, माझें शरीर, माझें मन, माझीं मुलें ' ह्या विचारांना एकदम रजा द्या. ह्या भावनांचा क्षय झाल्याशिवाय, तसेंच देहाची अहंता गळाल्याशिवाय आत्मानुभव कधींहि होणार नाहीं, हें लक्ष्यांत ठेवा.

## खऱ्या वैराग्याचें लक्षण.



केवळ अरण्यवास पतकरल्यानें तुमच्या अंगीं त्याग बाणला, वैराग्य

बाणलें असें ह्मणतां येत नाहीं. कारण, तुम्ही जरी संसाराचा त्याग केला असला, तथापि अहंकाराचा देहाभिमानाचा त्याग केलेला नसतो, अहंकारानें तुम्हांला सोडलेलें नसतें. ' हें मीं केलें, तें मीं केलें, ' किंवा ' हें मीं करीन, तें मी करीन, ' अशा प्रकारचे अहंभावमूलक विचार तुमच्या डोक्यांत घोळत असतात. ममत्वाच्या तुम्ही अंकित असतां. सर्व तापस्यांचा अहंभाव पूर्णपणें गळालेला असतो असें नाहीं. तसेंच प्रपंचांत राहणारे सर्वच वासनांच्या जाळयांत गुरफटलेले असतात असेंहि नाहीं. प्रत्यक्ष राज्यैश्वर्यांत राहणारे राजेहि क्वचित् पूर्ण परित्यागी असूं शकतात.

' हें माझें, तें माझें ' ह्या भावना ज्याच्या नाहींशा झाल्या, ज्याचा अहंकार गळाला तोच खरा विरागी, तोच खरा त्यागी. ' हें मीं केलें, तें मीं केलें ' अशा प्रकारचा अहंकर्तृत्वभाव ज्याच्या ठिकाणीं वसत आहे, त्याला त्यागी असें कसें म्हणतां येईल ? जेव्हां मनुष्याचा क्षुद्र अहंकार नाहींसा होईल, जेव्हां त्याला सद्वस्तूचें ज्ञान होईल, स्वरूपाचा यथार्थ बोध होईल, ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' ह्याचा अनुभव येईल, ' अनंत असा तो मी सत्य तें मी, सर्व चराचराची चालक—नियामक शक्ति मी, सर्व विश्वाचा स्वामी मी, तसेंच आकाशांतील तारका मीच, चंद्रसूर्यादि ग्रह मीच, पृथिव्यापतेजादि पंचमहाभूतें मी, हीं सर्व माझींच स्वरूपें आहेत, माझ्या इच्छाशक्तीचे हे सर्व खेळ आहेत, ' अशा अनुभवाप्रत जेव्हां मनुष्य जाऊन पोहोंचेल, तेव्हां तो त्यागीपदाचा अधिकारी होईल. तेव्हांच त्याला खरा त्यागी असें म्हणता येईल.

शिखिध्वज राजाच्या कथानकांत पुढें असें वर्णन आलेलें आहे कीं, कुंभ नांव धारण केलेली ती राणी तापसी वेषांत त्या ठिकाणीं कांहीं दिवस राहिली. दुर्वासाच्या शापामुळें आपलें रात्रीं स्त्रीरूप होतें असें राजाला सांगून त्या रूपांत मदनिका या नांवानें तिनें त्याच्याशीं विवाह केला. अशा रीतीनें कांहीं काल लोटल्यानंतर राजाच्या वैराग्याची परीक्षा करण्याच्या हेतूनें परपुरुषाशीं व्यभिचार करीत असल्याचा प्रत्यक्ष देखावा तिनें राजाला दाखविला. आपली स्त्री मदनिका ही परपुरुषावर आसक्त झालेली आहे, असें राजाला दिसल्यानंतर मदनिका राजाला बोलली, ' प्राणनाथ, मला क्षमा करावी. मी आपल्या

पातिव्रत्य धर्माला आंचवलें. तरी या दासीला क्षमा करावी अशी आपल्या चरणांजवळ माझी प्रार्थना आहे.' राजा तिच्याकडे वळून ह्मणाला, " मुली ! तुझ्या या भाषणाचा अर्थ काय ? तूं क्षमा कशाबद्दल मागतेस ? आणि कां मागतेस ? हें शरीर माझें आहे, अशी माझी कल्पना असती; तूं माझी बायको हें अज्ञान माझ्या ठिकाणीं राहिलें असतें, अज्ञानमूलक अहंभाव राहिला असता, तर तुझ्या दुर्वर्तनानें मला दुःख झालें असतें; अज्ञानाचा निरास झाल्यामुळें ह्या देहावर मी पतिपणाचा आरोप करीत नाहीं; दुसऱ्यांना बांधण्याकरितां किंवा दुसऱ्यांकडून बांधले जाण्याकरितां वासनांचा रज्जू मी बाळगीत नाहीं. माझें असें ह्या जगांत आतां कांहीं उरलेलें नाहीं; तसेंच 'हा माझा नवरा' अशा तऱ्हेचें दुसऱ्यांचें बंधनहि मला उरलेलें नाहीं. 'हें माझें, तें माझें' ह्या संकुचित भावनांचा अस्त झाला असून 'मी अनन्त आहें' ही भावना हृदयांत दृढ झाली आहे. ह्मणून ह्मणतों, मुली ! तूं पातिव्रत्यापासून भ्रष्ट झालीस म्हणून कष्टी होऊं नकोस, तुला अजून आपली उन्नति करून घेतां येईल. अशुद्ध वासनांना चिकटून बसलेल्या आणि पापाकडे प्रवृत्ति झालेल्या तुझ्यासारख्या कित्येक मुली ह्या जगांत आहेत. सर्व विश्वाला प्रकाशित करणारा मी असल्यामुळें सर्वांचा स्वामी—सत्ताधीश मीच आहें. सर्वच जेथें मी आहें, तेथें कोणावर रुसूं आणि कोणावर खूष होऊं ! "

आपण व्यवहारांत असें पाहतों कीं, आपल्या शेजाऱ्यानें एखादें पाप केलें तर त्याबद्दल आपल्याला दुःख होत नाहीं; परंतु जर का आपल्या बायकोनें पापाचरण केलें, कीं लगेच आपणांस मरणप्राय दुःख होतें. हा असा फरक आपलेपणाच्या कल्पनेमुळें—ममत्वबुद्धीमुळें उत्पन्न होतो.

राजाची ही विरक्तता पाहून त्याला स्वरूपाचा बोध करण्याचा आपला हेतु सिद्धीस गेला हें पाहून राणीला मोठें समाधान वाटलें. प्रसन्न होत्साती ती परत आपल्या राज्यांत गेली. राजा आतां राज्यांत परत आला तरी हरकत नाहीं, असा विचार करून थोड्याच दिवसांनीं ती पुनः राजाजवळ जाऊन हात जोडून ह्मणाली, 'महाराज, आपण साक्षात् देव आहां. आपण कोठेंहि राहिलां तरी सारखेंच आहे. हिमालय आणि राजवाडा हीं आपल्याला आतां भेद राहिलेला नाहीं. कारण, सर्व आपणच

आहों, ज्ञा आपणांस आतां अनुभव झालेला आहे.' त्यावर राजा बोलला, ' मी सर्वत्र व्यापून राहिलों आहें. मी नाहीं असें एकहि स्थळ नाहीं. हीं सर्व शरीरें माझींच आहेत, माझेच ते मनोविलास आहेत. ज्ञानाला हे अन्तवन्त देह वस्तुतः नाहींतच. ज्यांना तत्त्वज्ञान झालें नाहीं, अज्ञांनाच हें शरीर सत्य भासतें; पण हें सर्व जग हें आपल्या मनानें निर्माण केलें आहे, ही गोष्ट सप्रमाण सिद्ध करून देतां येईल. हें विधान कित्येकांना धाडसाचें वाटेल, परंतु तें अक्षरशः खरें आहे.'

राजाचें हें भाषण ऐकून राणीला मोठी धन्यता वाटली. नंतर चतुरंग दळ बोलावून मोठ्या समारंभानें ती राजाला परत आपल्या राजधानींत घेऊन गेली. राजा पुनः पूर्वींप्रमाणें राज्यकारभार पाहूं लागला. तो राजवाड्यांत गेल्यानंतर पूर्वींप्रमाणें सर्व प्रकारच्या भोग्य पदार्थांनीं वेष्टिलेला असे; परंतु त्यांची वास्तविक किंमत त्याला समजली असल्यामुळें त्यांच्या जाळ्यांत तो सांपडला नाहीं. जितेंद्रिय बनल्यामुळें आकर्षण विषयांचें त्याच्यावर चालत नसे. अशा रीतीनें विदेह स्थितींत अनासक्त बुद्धीनें त्यानें कित्येक वर्षें राज्य केलें. तो राज्य करीत होता खरा; परंतु त्याला आपल्याला राजा ह्मणतां येईल काय ? त्याला राजा न ह्मणतां साक्षात् परमेश्वर ह्मटलें पाहिजे. तेंच नांव त्याला साजेल. खरें वैराग्य ह्मणतात तें हेंच. खऱ्या वैराग्यनिष्ठाला सोन्याच्या लगडी सारख्याच, आणि गोट्याहि सारख्याच; मऊ परांच्या गाद्या सारख्याच आणि कांट्यांचा बिछाना सारखाच; राजवाडा सारखाच आणि झोंपडीहि सारखीच.

' ह्याला शिवूं नको, त्याला स्पर्श करूं नको ' असें इकडील लोक नेहमीं ह्मणत असतात; परंतु हिंदु लोक ह्मणतात कीं, कसलीहि आसक्ति ठेवूं नका. पण त्याच्याबरोबर द्वेष आणि मत्सर ह्यांनाहि आपल्या अंतःकरणांत थारा देऊं नका, असें त्याचें म्हणणें असतें.

तपश्चर्या—तापसी वृत्ति ही मोक्षाची शिडी आहे; तें मोक्षप्राप्तीचें—तत्त्वज्ञानाचें एक साधन आहे, असें हिंदु लोक समजतात. आपणच परमेश्वर आहों, ही भावना दृढ होणें, ह्याच साक्षात्कार. कृत्रिम वैराग्यानें साक्षात्कार कधींहि होणार नाहीं, हें लक्षांत ठेवा. चूडाला राणीनें शिखिध्वज राजाला

क्रमाक्रमानें साक्षात्कार कसा करून दिला, हें आतां सांगितलेल्या गोष्टींत तुम्ही ऐकलेंच आहे. अशा रीतीनें प्रपंचांत राहूनहि पतीनें पत्नीला व पत्नीनें पतीला आत्मोन्नतीच्या कामीं मदत करतां येईल. प्रपंचांत घर बसल्या स्वर्गसुखाचा अनुभव घेतां येईल.

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !



# आरण्यक संवाद

## विद्याचारसंपन्नता

### आळशी कोण ?



एका गार दगडाची उशी केली आहे, तीरावरील वालुकेचा बिछाना केला आहे, एक पाय चैनींत दुसऱ्या पायावर टाकला आहे, सभोंवतालच्या स्वच्छ ताज्या हवेचें मनःपूर्वक प्राशन चाललें आहे, तेजोमय प्रकाशाचें मोठ्या आनंदाचें चुंबन चाललें आहे, तोंडानें ॐ चा जप सुरू आहे; नदीचा प्रवाह ॐच्या उच्चाराला ताल धरीत आहे, अशा रीतीनें ( साक्रामेन्टो ) नदीच्या तीरावर देवदारू वृक्षाखालीं राम स्वस्थ पडला असतां त्याला भेटावयास गेलेल्या एका गृहस्थानें–एका उपटसूळ विद्याचारसंपन्नानें–अर्धवट थट्टेनेंच प्रश्न केला कीं, " आशिया खंडांतील आळशीपणा तुम्ही अमेरिकेंत कां आणतां ? हा ऐदीपणा टाकून जगांत या; आणि कांहीं सत्कृत्य करा. "

" माझ्या प्रिय आत्म्या ! " रामानें उत्तर केलें, " सत्कृत्य करण्या-संबंधानें म्हणशील तर सत्कृत्यें करण्याचा–परोपकाराचा धंदा आजमितीस

जवळजवळ गुदमरून जाण्याच्या बेतांत आलेला नाहीं का? त्या धंद्यांत आधींच गर्दी उडून गेलेली नाहीं का? म्हणून ह्मणतों, मला माझ्या तंत्रानेंच चालूं द्या. मला आणि माझ्या रामाला त्या गर्दींत कशाला खेंचतां? आळशीपणा आपण म्हणालां नव्हे? पौर्वात्य आळशीपणा! बरें, पण आपण आळशीपणा कशाला म्हणतां? रूढीच्या—संप्रदायाच्या दलदलींत धडपड करीत राहाणें, नव्या नव्या चालींच्या आणि तऱ्हांच्या प्रवाहाबरोबर आपणांस वाहूं देणें, दिखाऊपणा आणि डामडौल यांच्या कूपांत निरर्थक वजनाप्रमाणें आपणांस बुडूं देणें, संग्रहाच्या ममत्वाच्या तळ्यांत स्वतः गटंगळ्या खात राहाणें, आणि जो वेळ वास्तविक ईश्वरचिंतनांत घालवायचा तो द्रव्यार्जन करण्यांत घालवणें आणि उलट यालाच 'सत्कृत्य' असें गौरवदर्शक नांव देणें, हा आळशीपणा नव्हे काय? बोलण्यांत तर राहोच, पण पोषाखांत, खाण्यांत, चालण्यांत, झोंपण्यांत, हंसण्यांत, आणि रडण्यांत—सारांश, प्रत्येक व्यवहारांत लोक सांगतील तसें चालावें—रूढीच्या तंत्रानें वागावें—त्यांत तुम्ही यत्किंचित्‌हि स्वतंत्रता ठेवूं नये, तुमचा सर्व जीवितक्रम रूढीच्या हुकुमाप्रमाणें ठरवला जावा, हा तेवढा आळशीपणा नव्हे काय! ऐहिक सुखांकडे लक्ष पुरवून स्वतःच्या ईश्वरत्वाकडे दुर्लक्ष्य करणें—तें गमावणें हें भयंकर आलस्यच नाहीं काय! तुमची ही सर्व धांदल आणि धडपड कशाकरितां चालली आहे! सर्वशक्तिमान् ह्मणून मानला गेलेला हा पैसा हा परमेश्वर प्राप्त करून घेण्याकरितांच कीं नाहीं! इतरांप्रमाणें आपणांजवळहि द्रव्यसंचय असावा एवढ्याकरितांच ना? पण द्रव्यसंचय करून तरी तुह्मी करणार काय? ह्या द्रव्यसंचयाचा हेतु काय? इतरांप्रमाणें चैन करावी हाच ना? पण हा हेतु द्रव्यसंचयाच्या मागें लागल्यानें साध्य होईल काय! नाहीं. * सुखोपभोगाच्या—उपभोग्य वस्तूंच्या मागें लागण्यांत खरें सुख नाहीं. दुसऱ्यांच्या मतानें चालणाऱ्या भोळसटांनो! परप्रत्ययनेयबुद्धि मूर्खांनो! आपलें खरें सुख लांबणीवर कां टाकतां? निसर्गसिद्ध अशा या उद्यानांत, पर्वतांवरून खळखळत वाहात

---

* न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ महाभारत.

येणाऱ्या ह्या सुंदर निर्झराच्या तीरावर बसून आपल्या आप्तेष्टांच्या—ज्यांच्याशीं तुमचा खरा संबंध आहे, ज्यांच्यापासून तुमचें रक्त, तुमचें शरीर हीं बनलीं आहेत अशा—स्वच्छ, स्वतंत्र हवा, रजताप्रमाणें चमकणारे बालकिरण, चंचल जलतरंग, आणि तृणाच्छादित हिरवी गार पृथ्वी ह्या तुमच्या अत्यंत जवळच्या नातलगांच्या सहवासाचा—समागमाचा लाभ तुम्ही कां घेत नाहीं ? विद्याचारसंपन्न म्हणून मिरवणाऱ्या राष्ट्रांनीं जातिभेदरूपी चामड्याच्या वाद्यांनीं आपणांस जखडून टाकलें आहे ! हे विद्याचारसंपन्न लोक आपल्या इतर बांधवांपासून आपणास दूर करतात, इतकेंच नव्हे तर स्वतंत्र, खुल्या आणि मोकळ्या अशा निसर्गापासून पराङ्मुख होतात. सहजमनोहर आणि स्वाभाविक अशा आयुष्यक्रमापासून स्वतःला दूर सारतात; ह्या सर्वांना ते आंचवतात—नव्हे आपण होऊन आंचवून घेतात; आणि मोठमोठ्या दिवाणखान्यांत वस्तुतः अंधारकोठड्यांत स्वतःला कोंडून ठेवतात; ते ह्या विस्तीर्ण जगांतून स्वतःला हद्दपार करून घेतात. इतर जीवसृष्टीपासून स्वतःला बहिष्कृत करून घेतात. पशु आणि वनस्पति ह्यांपासून आपणांस अलग ठेवतात. श्रेष्ठता, इभ्रत, कुलीनता आणि मानमान्यता, ह्यांच्या खोट्या कल्पनांच्या भरीस पडून हे लोक आपणांस इतरांपासून दूर सारीत असतात. ह्याचा परिणाम असा होतो कीं, ते एकांतामध्यें कुजत पडतात. म्हणून राम म्हणतो, बाबांनों ! स्वतःवर दया करा व भलतींच वेडं डोक्यांत शिरवून स्वतःचा नाश करून घेऊं नका."

## संपत्तीनें खरें सुख मिळेल काय ?

गोरगरिबांकडून लुच्चेगिरीनें धुत्रून काढून स्वतःच्या तिजोरींत भरलेल्या संपत्तीनें मोठमोठ्या उपाहारगृहांत जाऊन वीट येईपर्यंत तुम्हांला मेजवान्या झोडतां येतील. ह्या संपत्तीमुळें, फिकट, निस्तेज चेहरे, आणि बाह्यात्कारी हंसतमुखपणा आणि कृत्रिम आविर्भाव ह्यांची तुम्हांला जोड प्राप्त करून घेतां येईल; दिवाणखाने ह्मणून मानल्या जाणाऱ्या पण वस्तुतः कृत्रिमतेच्या दुर्गंधीनें भरून गेलेल्या अंधारकोठडींत तुह्मांला संपत्ति अडकावून टाकील ! शरीर आणि मन यांना उद्दीपित करणाऱ्या सर्व प्रकारच्या अस्वाभाविक गोष्टी तुमच्या मनाला सर्वकाळ व्यग्र करून

सोडतील, व त्याला स्वस्थता अशी केव्हांहि मिळूं देणार नाहींत. ह्या संपत्तीनें खरें सुख तुम्हांला प्राप्त होतें काय? मग ह्या भ्रमाकरितां—ह्या काल्पनिक सुखाकरितां इतकी घडपड कां? इतका द्राविडीप्राणायाम कशाला? एकदम खऱ्या सुखाला—आत्मसुखाला काबीज करा. या; आतांच्या आतां येथें बसल्या जागीं त्या सुखाचा अनुभव घ्या. या; माझ्या प्रमाणें ह्या गवतावर स्वस्थ पडा. व ह्या जागीं आत्मसुखाचा अनुभव घ्या.

आपल्या आयुष्याच्या सुखाचा विमा उतरण्याकरितां—जीवित सुखानें घालविण्याकरितां सोन्याची आणि चांदीची हांव बाळगण्यांत आयुष्याचे दिवस फुकट घालवूं नका. पैशांच्या बाजूनें श्रीमंत होऊन परंतु कालाच्या बाजूनें—व्यर्थ कालक्षेपाच्या बाजूनें गरीब होऊन आयुष्याच्या सुखाचा विमा उतरतां येईल काय? हे भ्रान्त अमर्त्या! सुख संपादन करण्यासाठीं असल्या खोट्या विम्यावर तूं विश्वास ठेवूं नकोस. आपल्या जीवनकलहाचें खोट्या सबबीवर व्यर्थ समर्थन कां करतोस? कारण, त्यापासून मिळणारें सुख हें निःसशय भ्रामक आहे!

ऐहिक ऐश्वर्यांच्या आणि सुखांच्या मागें लागून मनुष्य सृष्टिसौंदर्याच्या स्वाभाविक सुखाला कसा पारखा होतो, हें इंग्रजी कवि वर्डस्वर्थ याच्या पुढील उद्गारांवरून चांगलें व्यक्त होतें.

## चाल भूपाळीची.

### (ज्यां चरणापासोनि जान्हवी.)

खुळे किती जन ऐहिक विषयीं अहोरात्र रमती ॥
मिळविति उधळिति घन तनु झिजउनि नेणुनि आत्मगति ॥ धृ ॥
निसर्गसुखसागरीं न पोहाति कुणीहि या जगतीं ॥
'मी कोण असें, काय असे मम' तत्त्व न हें बघती ॥
विधुवदनातें अवलोकुनियां नील नभीं वरतीं
महिवरी सागरासि येई प्रेमभरें भरती ॥
रविकमलांपरि मंद पवन जरि मिटुनि मुखा बसती ॥
आत्मदृष्टिनें प्रभुचीं स्तोत्रें प्रेमें गुणगुणती ॥
तादात्म्यनादहीना हें गान काय कळतें।

विस्मरे स्वस्वरूपा गति कशी तया मिळते ।
प्रतिबिंब ईश्वराचें हृदयांत केंवि पडतें ।
नको नको शहरांत राहणें नको खुळी प्रगती ॥
नको नको बाजार खुळ्यांचा ग्रामिं बरीं वसती ॥ १ ॥
वाजागाजा डामडौल या पोकळ शृंगारीं ॥
वीट पुरा ये, सुधारणा ही बहिरंगी सारी ॥
उषा वरुण इन्द्राग्नि यावरी असो सदा ममता ॥
चराचरीं या पूज्यभाव मम मनीं वसो समता ॥
विश्वाच्या या देवायतनीं विश्वनाथ रमतां ॥
तद्गुण गाया जन हृदयामधिं नुपजे स्फूर्ति लता ॥
पारखे सकल झाले या निसर्ग सुखधारा ॥
दाविती दिव्य तत्त्वें देवता बहु उदारा ।
प्राशुनी मोह मदिरा नेणती सुधाधारा ।
निसर्गाचिया सुराबरोबर सूर न कधिं धरिती ॥
धनसुतदारा यांतचि लंपट जन हे भूवरती ॥ २ ॥

## पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृति.

उन्नत म्हणून मानलीं गेलेलीं यूरोपांतील आणि अमेरिकेंतील राष्ट्रें वास्तविक पुढें गेलेलीं नसून फक्त ऱ्हासाच्या मार्गांत पुढें पुढें पावलें टाकीत आहेत. उन्नति ही अध्यात्मिक किंवा बौद्धिक असली पाहिजे. उन्नतीचा ओघ मनुष्याला अध्यात्मविषयाकडे नेणारा असला पाहिजे, आपल्या मिथ्या शरीराची सुखवृद्धि करण्याकडे असतां कामा नये. भौतिक संपत्ति जमवणें किंवा प्रपंचांतील अनवश्यक गरजा वाढविणें, ही निःसंशय प्रगति नव्हे. उत्तमोत्तम ग्रंथ लिहिणें, आणि पवित्रतेनें आणि स्वतंत्रतेनें काल घालविणें, हा प्राचीन आर्यांचा जीवितक्रम असे. ते निरिच्छ असत; संग्रहाची—मालकीची कल्पना त्यांना शिवतीह नसे. त्यांच्या आदर्शभूत रहाणींत कालमानाप्रमाणें योग्य तो फेरफार करून तोच कित्ता आपण गिरविला पाहिजे.

इकडील वर्तमान संस्कृति ही तिच्या मुख्य प्रातव्यापासून बाजूला वळली आहे; राजमार्ग सोडून आडमार्गाला लागली आहे. ज्यांचे भाव

कमीजास्त होतात, अशा गहुं बाजरीप्रमाणेंच मनुष्य इकडे लेखला जातो. पण तुमचा भाव कोण लावणार ? तुमची किंमत करण्यास कोणीहि समर्थ नाहीं, हें लक्ष्यांत ठेवा; आणि स्वतःसंबंधाच्या क्षुद्र कल्पनांना एकदम फाटा द्या. कारण तुम्ही ईश्वर आहां.

## आर्यांचें संन्यासाचें ध्येय

अवडंबराच्या प्रिय भक्तांनो ! तुम्हांला आर्यांचें संन्यासाचें ध्येय केवळ मनोराज्यासारखें निरर्थक आणि अव्यवहार्य वाटत आहे; पण बाबांनो ! सावध रहा. तुम्ही स्वप्नांत–भ्रमांत आहां; तुम्हांला झोंपेंतून हालवून जागें करून खरी स्थिति तुमच्या प्रत्ययास आणून देण्याचा काल अगदीं जवळ आला आहे. असें करण्याला आतांच योग्य काळ आहे. आत्मज्ञानाच्या योगानें आत्म्यासंबंधानें प्रेम वाटणें व त्यामुळें भ्रामक शरीरासंबंधानें वैराग्य असणें हें प्रेमयुक्त वैराग्य होय. व असलें वैराग्य सध्यांच्या विद्याचारसंपन्न मनुष्यांत बिलकुल नसल्यामुळें हीं विद्याचारसंपन्न माणसें म्हणजे अधिक अनुभवी आणि अधिक शहाणीं अशीं जंगली माणसेंच होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं ! विद्याचारसंपन्न जगाच्या थाटमाटानें, लखलखाटानें, कृत्रिमपणानें, बाह्योपचारांनीं आणि द्रव्यार्जनाच्या हव्यासानें दिपून भारले जाऊं नका. हीं सर्व फोल आहेत, असें अनुभवानें ठरलें आहे. मुशींत घालून त्यांचें सत्त्व पाहिलें गेलें आहे. तीं कसोटीला उतरलीं नाहींत. गवत किंवा लांकडें ह्याप्रमाणेंच तीं भुरभुर जळून नाश पावणारीं ठरलीं. तुमच्या ह्या विद्याचारसंपन्न राष्ट्रांत केवढा विलक्षण देखावा दृष्टीस पडतो ! राष्ट्रांतील अर्धे लोक अन्नान्न करून प्राण सोडतांना आढळतात, तर बाकीचे उघड उघड उधळपट्टी, अतिरिक्त ऐषआराम, फाजील आणि अनवश्यक सामानसुमान, अत्तरादि सुगंधी द्रव्यांच्या कुप्या, कृत्रिमपणा, ओढून ताणून जीव आणल्यासारख्या चालीरीती, सारांश, सर्व प्रकारच्या मोल्यवान् क्षुद्र वस्तु, दरिद्री संपत्ति, आणि पोकळ अवडंबर ह्यांत मग्न झालेले–बुडून गेलेले नजरेस येतात !

मानसिक श्रम किंवा शारीरिक श्रम हे आरोग्य आणि दीर्घायुष्य ह्यांच्याशीं विरोधी नाहींत. परंतु त्यांत लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट एवढीच कीं, पुष्कळ मानसिक श्रम करणाराला फारसे शारीरिक श्रम होणार

नाहींत, आणि पुष्कळ शारीरिक श्रम करणाराला मानसिक कष्ट तितके सहन होणार नाहींत. परंतु जगांत आपण असें पहातों कीं, कांहीं लोक काबाडकष्ट करून जगत आहेत ( किंवा वास्तविक पाहिलें तर मरत आहेत ) आणि कांहीं अतिरिक्त मानसिक श्रमांमुळें बुद्धीला फार ताण बसत असल्यामुळें मरत आहेत कुटुंबांतील कांहीं माणसांना फक्त कोरडी भाकरी मिळावी, आणि कांहींना वरचें नुसतें लोणी मिळावें, तशांतलाच हा प्रकार नाहीं काय ?

## खरे दरिद्री कोण ?

' हें माझें, तें माझें, ' असें ह्मणणारे, ममत्वाला चिकटून बसणारे हेच जगांतील खरेखुरे स्वयंनिंदित दरिद्री आणि कंगाल ! हक्काच्या आणि वारसाच्या कल्पना डोक्यांत घेऊन बसणारे तेच खरे शुद्र; मालकीच्या कल्पनांना चिकटून बसणारे हेच खरे अंधारकोठड्यांत ठेवलेले खरे स्वयं-बद्ध बंदिवान; कींव करण्यासारखे क्षुद्र जन्तु कोणी असतील तर ते द्रव्याच्या मागें लागलेले श्रीमंतच होत ! हे आत्महत्त्या करणारे लोक, संपत्तीच्या घाणेरड्या धुळींत गुदमरून स्वतःचा नाश करून घेणारे आणि स्वतःला आढ्यतेनें राजे आणि महाराजे ह्मणविणारे होत. अज्ञानांध कूपाच्या तळाशीं गटंगळ्या खाणारे आणि फिरून स्वतःला पंडित आणि तत्त्ववेत्ते ह्मणविणारे, दुबळेपणा आणि भित्रेपणा ह्यांच्या चिखलांत अडकलेले आणि फिरून त्या दुबळेपणालाच सामर्थ्य म्हणून फुकारणारे होत; ह्याना स्वतःच्या हास्यास्पद स्थितीबद्दलच मोठा अभिमान वाटत असतो; ते इतके भ्रान्त बनलेले असतात कीं, कोरड्या जमिनीवरच मासे पाणूं लागतात ! संपत्ति आणि संचय यांच्या पाशांत सांपडलेल्या ह्या दीन अनाथ लोकांना, देहदंड भोगणाऱ्या ह्या विलक्षण तपस्व्यांना जागृत करून मोक्षाचा मार्ग दाखविणें जरूर आहे.

समाजांतील विशिष्ट वर्गांचे विशिष्ट हक्क नाहींसे करा; तसेंच संपत्ति, ज्ञान, पदव्या आणि अधिकार ह्या संबंधाच्या सर्व खोट्या समजुतींचा तुमच्यावर जो अंमल चाललेला आहे तो पार झुगारून द्या. समता हेंच सुख. राक्षसी लोभ, जें दिसेल त्याच्यावर झडप घालणें, ही पशुवृत्ति आणि तिच्याहूनहि निंद्य अशी जी संग्रहाची आणि संचयाची घातक प्रवृत्ति

ह्यांच्यामुळेंच लोकांची सारखी घडपड, आरडाओरड आणि चडफडाट--आक्रोश चाललेला असतो. उद्दामपणा आणि वृथा महत्वाकांक्षा ह्यांच्या विषमज्वराला शांत करा. ' ताबा म्हटला कीं ताबेदारी आलीच,' हें त्रिकालाबाधित सत्य प्रत्येकाच्या कानांत पुरतेपणीं ओतलें--भरलें गेलें पाहिजे.

विद्याचारसंपन्नतेच्या किंवा भोंवतालच्या जगांतील आचारविचाराच्या दडपणानें दडपले जाऊं नका. सत्याचें अन्वेषण करणारांनों! प्रागतिक म्हणून समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांच्या थाटमाटानें आणि दिखाऊ अवडंबरानें मोहून जाऊं नका. त्यांचीं अर्थशास्त्रें हीं केवळ नजरबंदी आहे, जादू आहे, कल्पितगोष्ट आहे, शुद्ध कादंबरी आहे, हें लक्ष्यांत ठेवा; आणि त्यांचा ' नगद धर्म ' किंवा ' निष्ठुर सत्य ' म्हणजे पोरांची हवेंत उडविण्याची म्हातारी किंवा भुताचें कोलीत आहे, हें विसरूं नका. ह्या विसाव्या शतकांत असा काल लवकरच येणार आहे कीं, ज्या वेळीं आजच्या प्रागतिक राष्ट्रांना आपली राज्यव्यवस्था किंवा लोकांची रहाणी बदलून तिला स्वातंत्र्याच्या आणि वेदान्ताच्या तत्त्वाप्रमाणें नवीन आकार आणि नवीन स्वरूप द्यावें लागेल. संग्रहाच्या--ममत्वाच्या कल्पनेचा त्याग करण्यांत आणि वेदान्तसंमत असें जें वैराग्य त्याचें रहस्य समजून त्याचप्रमाणें वागण्यांतच व्यक्तींची किंवा राष्ट्रांची घडगत आहे, त्यांना दुसरा तरणोपाय नाहीं.

द्रव्यसंचयाच्या रोगानें ग्रस्त झालेल्या सर्व सुशिक्षित पाश्चात्य राष्ट्रांत अशा कांहीं चळवळी जोरानें सुरू झाल्या आहेत कीं, ज्या पोरांच्या खेळांतील मोराप्रमाणें स्वतःला जमिनींत गाडून घेणाऱ्या क्षुद्र किड्यांना संग्रहाच्या भ्रमांतून लौकरच जागें केल्याशिवाय राहाणार नाहींत. त्यागाचा--संन्यासाचा अंमलच सर्व जगाला सुखी करील. व तसें झालें म्हणजे सर्वत्र स्वतंत्रता नांदूं लागेल.

प्रश्नः--एखाद्या नवीन धर्माचा पुरस्कार करण्याचा आपला विचार आहे काय ?

उत्तरः--राम कोणत्याच धर्माचा किंवा पंथाचा वकील किंवा तरफदार नाहीं. सत्याला वकिलीची किंवा तरफदारीची आवश्यकताच नसते. तें आपला आपणच पुरस्कार करीत असतें. राम फक्त त्या सर्वशक्तिमान्

प्रभूच्या इच्छेला प्रतीकार करीत नाहीं इतकेंच; तो सर्व मतांच्या बाबतींत समत्व राखतो-सर्वांचें सारखेंच ग्रहण करतो, आणि प्रकाशाला स्वच्छंदानें चमकूं देतो. मग तो प्रकाश कोणत्याहि स्वरूपानें चमको. हें शरीर, मन आणि सर्वच अग्नीनें भस्म होऊंद्या. ईश्वराचा—सत्याचा संदेश लोकांत प्रसार पावल्याबरोबर तो संदेश आणणाराच्या देहाला लोक विसरतील आणि त्याच्या संदेशाकडेच लक्ष पुरवितील तर किती बहार होईल बरें !

प्रश्नः—आपण एखाद्या धर्माचे संस्थापक म्हणून येथें आलां आहां किंवा केवळ प्रवर्तक म्हणून आलां आहां ?

उत्तरः—मी संस्थापकहि नाहीं किंवा प्रवर्तकहि नाहीं. धर्मसंस्थापन किंवा धर्मप्रवर्तन हीं दोन्हीं कामें मी हलक्या दर्जाचीं समजतों. मी स्वतः परमेश्वर आहें, तसेंच आपणहि परमेश्वरच आहां. शरीर हें माझें साधन आहे, माझा निरोप पोहोंचविण्याचें साधन आहे.

प्रश्नः—आपला संदेश फलद्रूप होणार नाहीं. आपला उपदेश ग्रहण करण्याला येथील लोकांची अद्याप तयारी नाहीं. अर्थात्, आपला उपदेश येथें व्यर्थ आहे.

उत्तरः—मग मला काय त्याचें ! मी सत्य आहें आणि सत्य हें रंक आणि दोकडा ह्यांचा हिशेब पहात बसत नाहीं. सत्य म्हणजे कांहीं लोकांना आवडण्याकरितां तयार केलेली एक दीड दमडीची चीज निःसंशय नव्हे. सत्य हें आज पटलें नाहीं तर उद्यां पटेल, परवां पटेल. युगेंच्या युगें—अनंतकाल माझा आहे. ख्रिस्ताचा जरी त्याच्या देशबांधवांनीं अव्हेर केला, तथापि सर्व जगानें त्याचा सत्कार केला, त्याच्या उपदेशाचें ग्रहण केलें. तत्कालीन पिढ्यांनीं त्याचा छळ केला, तथापि भावी पिढ्या त्याच्याच होत्या कीं नाहीं ! भावी पिढ्यांनीं तर त्याच्या आज्ञा शिरसामान्य केल्या ना ?

प्रश्नः—आपली विचारसरणी इतिहाससंमत नाहीं.

उत्तरः—तुह्मी वाचलेला इतिहास अधुरा आहे. हें तत्त्व इतिहासाच्या ज्या भागांत लिहिलें जाणार आहे, तो भाग आपण वाचलेला नाहीं. इतिहास हा जोरदार इच्छाशक्तीपुढें—मग ती इच्छा एका व्यक्तीची कां असेना—वांकत असतो. परंतु सध्यां तुह्मीं ज्याला इतिहास ह्मणून समजतां

त्यांत अगदीं वरवरच्या कारणांचाच तेवढा विचार केलेला असतो. खऱ्या अन्तस्थमूलगत कारणांचा त्यांत विचार झालेला नसतो.

प्रश्नः—भावनासाधर्म्य म्हणजेच खरें प्रेम असें इमर्सन म्हणतो. व आपण तर एक विलक्षण प्रकारचे—सर्वसंमत धर्माला विरोध करणारे मनुष्य दिसतां. आपलीं मतें कोणाशींच जुळत असल्याचें दिसत नाहीं. सबब आपलें आयुष्य अगदीं प्रेमशून्य अर्थात् कष्टमय असलें पाहिजे !

उत्तरः—ह्या विश्वरूपी माझ्या चित्रांकडे निरनिराळ्या भूमिकांवरून पाहण्यांत मला मोठी मौज वाटते. एखादे वेळीं पुराणमतवादी म्हणून तीं मागाहून कशी दिसतात हें मी पाहातों, तर एखादे वेळीं उदारमतवादी प्रागतिक म्हणून समोरून तीं कशी दिसतात, ह्याचें मी मनन करतों. कधीं राम ( किंवा पुराण ) ह्या दृष्टीनें त्यांचें उजव्या बाजूला उभें राहून निरीक्षण करतों. तर एखादे वेळीं ' गडगडणारा उषःकाल ' ह्या मासिकाचा समालोचक ह्या नात्यानें त्यांचें डाव्या बाजूनें परीक्षण करितों. हे सर्व बाजूचे देखावे माझे आहेत, ते मीं उत्पन्न केलेले आहेत. ज्या वेळीं एखादी स्त्री ताक करीत असते त्या वेळीं तिच्या उजव्या व डाव्या दोन्ही हातांतील अंसण्या तीच ओढीत असते. त्याचप्रमाणें सर्वच मतें माझीं असल्यामुळें इतरांशीं माझा मतभेद कसा असूं शकेल ? निरनिराळ्या तरंगांच्या रूपानें उसळणारा प्रेमाचा सागर मीच आहें. मीं सर्वांहून भिन्न आहें, त्यांचा साक्षी आहें. ह्यावरूनच मी सर्व आहें—व्यापक आहें हें सिद्ध आहे. द्वैतांत अद्वैत तें हेंच. म्हणून ह्मणतों कीं, या आणि ह्या तीरावर बसून ह्या अद्वैत सुखाचा अनुभव घ्या.

प्रश्नः—आपलें म्हणणें मला मोठें गूढ वाटतें. सर्व बाबतींत अगदीं भिन्न अशा व्यक्तींचें ऐक्य किंवा तादात्म्य संभवेल तरी कसें ?

उत्तरः—तुम्ही म्हणतां तसें वरवर पाहणाराला वाटतें खरें, वरवर पाहतां आपलें ऐक्य शक्य दिसत नाहीं; परंतु, आपण सर्व एकच आहों, ह्यांत तिलमात्र शंका नाहीं. लंगड्या तत्त्वज्ञानाला सर्व जीवांचें ऐक्य सिद्ध करतां येत नसेल; आमच्या दुबळ्या इंद्रियांना तें सप्रमाण दाखवितां येत नसेल; परंतु तें आहे ह्यांत संदेह नाहीं. ज्या वेळीं ब्रम्हानुभव होतो त्या वेळीं सर्व आभासाचा—भ्रमाचा नाश होतो. विश्वव्यापी प्रेम अंगांत बाणलें, सर्वत्र प्रेमभाव वाढला म्हणजे जें कांहीं दिसतें तें



सर्व आपणच आहों असें वाटतें, ' तत्वमसि ' ह्याचा प्रत्यय येतो. प्रत्यक्ष परमेश्वर–परब्रम्ह तें आपणच आहों.

प्रश्नः—परमेश्वराला तें परब्रम्ह असें कसें म्हणतां ? नपुंसकलिंगी सर्वनाम कसें वापरतां ?

उत्तरः—कांहीं लोक ' आकाशांतील बाप ' म्हणून त्या देवाची प्रार्थना करतात. अर्थात्, त्याच्या संबंधानें बोलतांना तो हेंच सर्वनाम वापरलें पाहिजे. कांहीं लोक देवाला माता म्हणून भजतात; त्यांच्या दृष्टीनें देवाला ती म्हणूनच संबोधिलें पाहिजे. फारसी कवींप्रमाणें इतर कांहीं लोक देवाला आपली ' प्रिया ' समजून त्याची आराधना करतात. अर्थात्, देवासंबंधानें कोणतेंहि सर्वनाम वापरण्यापूर्वी देवाचें लिंग ठरविलें पाहिजें ! देव पुरुष आहे, स्त्री आहे कीं बालक आहे, हें ठरविलें पाहिजे.

प्रश्नः—मग देव खरोखर आहे तरी कोण ?

उत्तरः—देव तो नाहीं, तीहि नाहीं, तत्‌हि नाहीं, तर सत् आहे.



# गणेश महादेव आणि कंपनी,

## ६२१ गिरगांव रोड–मुंबई

## यांचीं आजकालचीं पुस्तकें.

निवडक लेख:—(ले.–श्री. नारायण गोविंद चापेकर, बी. ए. एल् एल्. बी. फर्स्टक्लास स. जज्ज् ठाणें.) विविध ज्ञानविस्तार, धर्मजागृति, विश्ववृत्त वगैरे भारदस्त मासिकांच्या वाचकांना श्री. चापेकर यांच्या लेखांचा परिचय आहे. वेगवेगळ्या महत्वाच्या विषयांवर त्यांचे अनेक लेख आजवर प्रसिद्ध झालेले आहेत; त्यांपैकीं विशेष महत्वाचे व टिकाऊ स्वरूपाचे लेख या पुस्तकांत संकलित केलेले आहेत.

'वैदिक धर्म' (लेखांक चार) 'रामायण' 'ऐतरेय ब्राह्मण,' 'संतांची कामगिरी' वगैरे लेख धार्मिक प्रवृत्तीच्या वाचकांच्या ज्ञानांत भर टाकतील; तर 'मराठी मासिकें' 'मराठी भाषेवरील सावट' वगैरे लेखांमध्यें महाराष्ट्र भाषेचा अभ्यास करणारांना महत्वाची माहिती मिळेल. हिंदुस्थानची चलनपद्धती हा विषय फार महत्वाचा व अत्यंत गुंतागुंतीचा आहे; या विषयावर प्रस्तुत संग्रहामध्यें सहा लेख घातले आहेत. चलन-पद्धतीच्या गुंतागुंतींत गुरफटून गेलेल्या वाचकांची या लेखांमुळें बरीच सोडवणूक होईल. विशिष्ट विषयांचा अभ्यास करणारांना हे लेख बोधप्रद वाटतील त्याचप्रमाणें सामान्य वाचकांचें चित्त आकर्षित करून घेतील असेहि लेख या संग्रहांत घातले आहेत. एकूण प्रौढ विद्यार्थ्यांना या लेखां-मध्यें शास्त्रशुद्ध माहितीचें आगरच सांपडेल यांत शंका नाहीं.

शाळांमधून विषय शिकवीत असतांना विद्यार्थी अनेक प्रश्न उपस्थित करतात व प्रौढ विद्यार्थ्यांचे पुढेंहि अनेक शंका उभ्या राहतात; त्यांच्या शंकानिरसनासाठीं अशीं पुस्तकें शाळांच्या ग्रंथसंग्रहामध्यें त्याचप्रमाणें सार्वजनिक वाचनालयांमध्येंहि असणें अत्यंत अवश्य आहे. पृ. सं. ४२५, कापडी बांधणी किं. २॥ रु.

गोमांतकः—( कवि–"महाराष्ट्रभाट" ) मराठ्यांच्या इतिहासांत पानिपतच्या रणसंग्रामाइतका हृदयस्पर्शी भाग नाहीं. हिंदुस्थानांत हिंदवी साम्राज्य स्थापन करणें ही मराठ्यांची राजकीय व धार्मिक महत्वाकांक्षा होती. धार्मिक व राजकीय जुलुमानें गांजून गेलेल्या मराठ्यांच्या हृदयांत 'हर हर महादेव' चा धर्म उद्भूत झाला. महाराष्ट्रांतल्या लोकांनीं एकजूट होऊन मुसलमानांचा जुलूम उलथून पाडला पण गोमांतकांतील हिंदूंवर धार्मिक जबरदस्तीचा जो कहर गुदरला त्यापुढें मुसलमानांचा जुलूम कांहींच नाहीं असें म्हणावें लागतें.

गोमांतकांतलि जुलूम जबरदस्तीला बळी पडलेल्या एका हिंदी कुटुंबाची करुण कहाणी या काव्यांत ग्रथित केलेली आहे. काव्याचा आरंभ अत्यंत करुण रसांत होऊन त्याचा परिपोष वीर रसांत होत गेलेला आहे. गोमांतकांत निर्माण झालेल्या एका हिन्दी वीराला भवितव्यतेच्या प्रवाहांत देशोदेशीं भटकावें लागतें व शेवटीं तो अटक पानिपतच्या रणसंग्रामांत प्रसिद्धीस येऊन अमर होतो असा ह्या काव्याचा कथाभाग आहे.

पानिपतच्या रणसंग्रामावर 'महाराष्ट्रभाट' हें एक महाकाव्य लिहीत आहेत; 'गोमांतक' हा त्या काव्यांतील एक भाग आहे, असें असलें तरी हा भाग कथानकदृष्ट्या स्वयंपूर्ण आहे. अगदीं वृत्तापासून काव्य लेखनाची पद्धति नवी असल्यानें गोमांतक हें काव्य महाराष्ट्रसरस्वतीलाहि वेगळी दिशा लावण्याइतकें सामर्थ्याचें आहे. सुंदर कापडी बांधणी, किं. २ रु.

---

माधवानुजः—( ले.–कै. डॉ. का. ह. मोडक, कल्याण. ) दहा-बारावर्षांपूर्वींच्या वेगवेगळ्या मासिकांच्या व वृत्तपत्रांच्या फायली चाळून त्यांमधील कविता वाचावयाची सोय असलेलीं ग्रंथसंग्रहालयें व इतका उद्योग अंगीं असणारे वाचक दुर्मिळ असल्यामुळें आजच्या पिढीला माधवानुजांचें नांव फारसें माहीत नाहीं. माधवानुजांचे समकालीन श्री. केशवसुत, रे. टिळक इत्यादि कवींची कविता संकलितरूपांत प्रसिद्ध झाल्यामुळें आज वाचकांच्या डोळ्यासमोर आहे. श्री. माधवानुजांची कविता अशाच महत्वाची असल्यामुळें, ती कवींचे चिरंजीवांकडून संपादित करवून घेऊन मुद्दाम छापिली आहे.

गेल्या दहा बारा वर्षांत मराठी कवितेला नवें वळण लागलें आहे. त्यापूर्वींची कविता बालबोध वळणाची, विनयवती व जीवाला समाधान देणारी होती. हल्लींची कविता उत्तान व उच्छृंखल असून तिजमुळें मनांतील विकार मात्र जागृत होतात. हा फरक कोणासहि नाकबूल करतां यावयाचा नाहीं. माधवानुजांची कविता जुन्या बाळबोध वळणाची आहे. त्यांची भाषा सरळ असून अर्थबोध सहज होतो. हल्लींच्या कवींची कविता मात्र वाचावी, त्यांच्या चरित्राकडे पाहूं नये असाच प्रकार बहुधा असतो. उच्छृंखल तरुणांनीं तशाच तरुणांसाठीं लिहिलेले उत्तान प्रलाप असें त्यांच्या कवितांचें वर्णन करावें लागेल. पण श्री. माधनुजांचे बाबतींत असा प्रकार नाहीं. प्रस्तावनाकारांनीं म्हटल्याप्रमाणें श्री. माधवानुज हे कवितेपेक्षां चांगले होते. त्यांनीं आपली कविता सभ्य कुटुंबांसाठीं लिहिलेली असल्यामुळें ती वाचतांना, ऐकतांना व समजावून देतांना कोणासहि शरम वाटणार नाहीं.

शाळांमधून विद्यार्थ्यांना कविता शिकवितांना येणारी मुख्य अडचण म्हणजे विषय शृंगारिक असल्यास त्याची फोड कशी करावयाची ही होय; पण प्रस्तुत पुस्तकांतील उतारे शिकावितांना अशी अडचण उपस्थित होणें शक्य नाहीं, म्हणून प्रत्येक शाळेच्या ग्रंथसंग्रहालयांत ' माधवानुज ' ठेवणें अत्यंत जरूर आहे; माधवानुजांच्या कवितेचा हा गुण जाणूनच शाळाखात्यानें त्यांच्या कांहीं स्फुट कविता मराठी क्रमिक पुस्तकांमध्यें घातल्या आहेत. त्याचप्रमाणें घरोघर हा ग्रंथ अत्यंत प्रेमानें व आदरानें वाचण्यांत येणार असल्यामुळें प्रत्येक लायब्ररीमध्येंहि या पुस्तकाची प्रत ठेवणें अत्यंत अवश्य आहे.

महाराष्ट्रांतील सुशिक्षित सभ्य कुटुंबांमध्येंच व ठिकठिकाणच्या सार्वजनिक ग्रंथालयांमध्यें अशा वाङ्मयाचा प्रसार होणार आहे हें जाणून आणि वडिलांनीं मुलांना, भाऊबहिणींनीं व मित्रांनीं एकमेकांना नजर करावें अशा प्रतीचें हें पुस्तक आहे अशी आमची खात्री असल्याकारणानें आम्ही या पुस्तकाची छपाई व बांधणी उच्च दर्जाची केलेली आहे. कापडी व सोनेरी बांधणी, अँटिक कागद, सुवाच्य व मोठा टाइप, चित्रित मुखपृष्ठ, माधवानुजांचें चित्र व हस्तलेख यामुळें पुस्तक अरसिकालाहि संग्राह्य वाटेल यांत शंका नाहीं. कवीचें चरित्र त्यांच्याच चिरंजीवांनीं लिहिलेलें पुस्तकास जोडलें आहे. पृष्ठें [illegible] किं. १ रु.

वीर वैरागीः—( भाषांतरकार–दे. भ. गणेश दामोदर सावरकर. ) मराठे, रजपूत व शीख या तीन जातींनीं आपल्या मर्दुमकीच्या जोरावर हिंदुस्थानच्या इतिहासांत अढळ स्थान मिळविलें आहे. मुसलमानी सत्तेबरोबर झालेला शिखांचा लढा अत्यंत त्यागमय व हृदयस्पर्शी आहे. या इतिहासांतील एक प्रमुख नेता, वीर वैरागी याचें चरित्र

पंजाबचे प्रख्यात दे. भ. प्रो. भाई परमानंद, एम्. ए.

यांनीं हिंदी भाषेंत लिहिलें आहे. मूलतः उज्वल असलेला हा विषय भाई साहेबांनीं अत्यंत जिव्हाळ्यानें सजविला आहे. अशा या ग्रंथाचें भाषांतर केलेलें असल्यामुळें तें किती श्रेष्ठ दर्जाचें वठलें असेल हें निराळें सांगणें नकोच. शिवाय या पुस्तकास,

दे. भ. बॅ. विनायकराव सावरकर.

यांची ताजी मूळ कविता–‘ अमरमृत ’–ही जोडलेली आहे. चौदा वर्षांच्या घोर शिक्षेनंतर व तपश्चर्येनंतर सावरकरबंधूंची महाराष्ट्रसरस्वतीस ही पहिलीच सलामी आहे. तीन हद्पार देशभक्तांच्या लेखणीचा हा त्रिवेणी संगम या ग्रंथांत झालेला असल्यामुळें हा ग्रंथ हस्तगत करून घ्यावयाची त्वरा करावी. किंमत फक्त १ रुपया.

---

कुठें:—( लेखिका–सौ. कमळाबाई सोहनी. ) सामाजिक कादंबऱ्या लिहिण्याची दिशा जवळ जवळ ठरून गेलेली असल्यामुळें आज प्रसिद्ध होणाऱ्या बहुतेक सर्व कादंबऱ्या एकाच ठशाच्या निघतात आणि म्हणून त्या अगदीं नीरस वाटतात. या कादंबरींत लेखिकेनें नव्या लेखनपद्धतीचा पुरस्कार केलेला असल्यामुळें आरंभापासून शेवटपर्यंत वाचकाचें मन अगदीं वेधून राहतें. शिक्षण घेत असतांना तरुण कुमारिकांच्या चित्तांत उत्पन्न होणारे विचार व विकार पुरुषांना रंगवितां येत नाहींत, मुलींच्या संभाषणाचा ओघ, त्यांचे मनोविकार, त्यांचीं ध्येयें वगैरे विषय रंगविण्यांत लेखिकेनें आपल्या कौशल्याची कमाल केली आहे. दोनतीन वर्षांपूर्वीं मासिक मनोरंजनांत प्रस्तुत लेखिकेची ‘संधिप्रकाश’ ही कादंबरी प्रसिद्ध होत असतांनाच अत्यंत लोकप्रिय झाली होती. लेखिकेची ही कादंबरी पूर्वीपेक्षांहि अधिक सरस वठली आहे असा कित्येक साहित्यसेवकांचा अभिप्राय पडल्यावरून ही कादंबरी निघत आहे. किंमत १ रु.



---

शृंगेरीची लक्ष्मीः—( ले.–प्रो. चिंतामण गंगाधर भानू. ) प्रो. भानू यांच्या तात्विक व ऐतिहासिक ग्रंथांच्या लोकप्रियतेची साक्ष सर्वांना पटलेली आहेच. प्रोफेसर साहेबांनीं लिहिलेली पहिली ऐतिहासिक कादंबरी महाराष्ट्रापुढें मांडण्याची संधि आम्हांला लाघली आहे.

'शृंगेरीची लक्ष्मी' ही नाना फडणवीसांच्या काळांतील रहस्यपूर्ण कथा आहे. शृंगेरीच्या मठाच्या संरक्षणासाठीं नायिकेनें केलेल्या कारस्थानांची हकीकत अत्यंत मनोवेधक आहे. मुख्य कथेच्या ओघांतच लेखकानें पेशवाईतील समाजास्थितीहि कौशल्यानें रंगविली आहे.

प्रोफेसर साहेबांच्या नव्या कादंबरीची ही वातमी ऐकतांच महाराष्ट्र वाचक मोठ्या उत्सुकतेनें पुस्तकाची मागणी करतील अशी आमची खात्री आहे. किंमत २ रु.

---

सं. सैतानी संक्रांतः—( लेखक–विनायक रामचंद्र चौगुले. ) राजा हा परमेश्वराचा प्रतिनिधि आहे ही भावना हृदयांत भिनलेली असल्यामुळें राजनिष्ठा हा प्रजेचा महत्वाचा गुण होय अशीच सर्वांची ठाम समजूत असते. ह्या भावनेच्या अस्तित्वामुळेंच राजांना जणूं काय स्वैरपणाचा सनदशीर हक्कच प्राप्त होतो ! सुखामागें लागलेल्या मनुष्याच्या लालसेला मर्यादा नसत; त्याचप्रमाणें राजाला एकदां जुल्म करावयाची चटक लागली कीं, ती निसर्गतःच अमर्याद होते. पण प्रजेच्या सहनशीलपणाला मर्यादा असते; स्वाभिमान व स्वसंरक्षण या भावनांचा राजनिष्ठेशीं विरोध उत्पन्न झाला कीं, त्या झगड्यांत नेहमीं प्रजेचाच विजय होतो यांत संदेह नाहीं. दुर्गुणी राजाविरुद्ध बंड उभारणें हा राजद्रोह राजाच्या प्रजाद्रोहानंतरच उत्पन्न होतो. कठिण प्रसंगीं प्रजेला आपल्या पित्याविरुद्ध, राजाविरुद्ध बंड पुकारावें लागतें. त्याचप्रमाणें कधीं कधीं सद्वर्तनी पुत्रालाहि आपल्या दुर्गुणी पित्याविरुद्ध बंड उभारावें लागतें. राजनिष्ठा व स्वाभिमान आणि पितृभक्ति व सत्यनिष्ठा यांमध्यें उत्पन्न होणारा हा विरोध श्री. चौगुले यांनीं या नाटकांत अत्यंत कुशलतेनें रंगविला आहे. मनोहर स्त्री संगीत नाटक मंडळीचे या नाटकाचे यशस्वी प्रयोग जागोजाग सुरूं आहेत. रसिक वाचकांनीं हें मनोहर नाटक वाचायास विसरूं नये. ७ फोटोसह. किं. १ रु.



---

स्वराज्याचा श्रीगणेशाः—( इ. स. १६४६ ते १६४८ लेखक–श्री. नाथमाधव. ) शिवाजी राजांनीं तोरणा किल्यावर स्वराज्याचें तोरण लावलें व तेथें सांपडलेल्या खजिन्याच्या जोरावर दुसऱ्या किल्यांचें काम सुरू करून स्वातंत्र्याचा पाया घातला. तो सर्व वृत्तांत या कादंबरींत अत्यंत हृदयंगम रीतीनें रंगविला आहे. परस्त्रीला मातेसमान मानणाऱ्या महाराजांनीं सुभेदाराच्या लावण्यसंपन्न व तरुण सुनेला वस्त्रालंकार देऊन परत पाठविलें —हा अंतःकरण उचंबळविणारा प्रसंग या कादंबरींत आला आहे. बजाजी निंबाळकर मुसलमान झाला होता त्याला हिंदू धर्मांत परत घेऊन राजांनीं स्वराज्य व स्वधर्म यांचें निकटवर्तित्व किती उत्कृष्ट रीतीनें व सप्रमाण सिद्ध कलें, तें या कादंबरींत मनोहर शब्दांत रंगविलें आहे. उद्यम कथानकहि अत्यंत चित्तवेधक आहे. किं. २। रुपये.

---

स्वराज्याची घटनाः—( इ. स. १६४८ ते १६६२ ले.–श्री. नाथमाधव.) नुस्तें तोरण व तें तोरण ज्या वाड्याला अलंकृत करतें तो वाडा यांमध्यें जमीन अस्मानचा फरक आहे म्हटलें तरी चालेल. केवळ घाडसाच्या जोरावर तोरणा किल्ला काबीज करण्यासारखीं कार्यें किती तरी सरदारांच्या हातून झालीं व त्यानंतरहि ते केवळ सरदारच राहिले. वाडा उभारावयाचें ठरल्यानंतर कांहीं उंचवटे खोदून टाकावे लागतात तर कांहीं खड्डे भरून काढावे लागतात. स्वराज्य संस्थापनेचेंहि असेंच आहे. शिवाजी राजांना स्वराज्य उभारावयाचें होतें, त्यांना स्वतःसाठीं टोलेजंग इमारत बांधावयाची नव्हती आणि म्हणूनच त्यांचे कार्यांत अधिक विघ्नें उभीं राहिलीं ! पण हवीं तीं व हवीं तितकीं संकटें उभीं राहिलीं तरी तीं उधळून देउन आपण स्वराज्य मिळवणारच हें राजांनीं या काळांत सिद्ध केलें. राजद्रोहाच्या भीतीनें स्वराष्ट्राशीं द्रोह करण्यांत पातक नाहीं असें मानणारे लोक, त्याचप्रमाणें स्वहितापुढें स्वराज्याची मातबरी न दिसणारे अदूरदृष्टि लोक त्या काळींहि महाराष्ट्रांत होतेच. त्यांचा बीमोड केल्याशिवाय स्वराज्यवृक्ष फोंफावणार नाहीं हें शिवाजी राजांना ठाऊक होतें. विधायक कार्यांचे आरंभीं होणारी घटना विघातक असते. जावळीकर मोऱ्यांचा वध, अफझुलखानाचा वध, बाजी घोरपड्याचा वध, मुधोळकरांचा वध, वगैरे थरारून सोडणारे अनेक प्रसंग या कादंबरींत चटकदारपणें रेखाटले आहेत. किं. २। रुपये.



---

स्वराज्याची स्थापनाः—( इ. स. १६६२ ते १६७४ ले.—श्री. नाथमाधव.) बारीक सारीक संकटांनीं न डगमगतां वीर पुरुष कार्यसिद्धीचा मार्ग तसाच आक्रमण करीत राहिला कीं त्याचा कस पाहण्याकरितां परमेश्वर त्याचेवर महान् संकटाचा घाला पाठवितो. शिवाजी राजांवर दक्षिणेतील बादशहानीं पाठविलेले लहान मोठे सरदार फजीत पावून परत येत आहेत हें पाहून जगदीश्वर होऊं पाहणाऱ्या दिल्लीश्वरानें मिर्झा राजे जयसिंगांना दक्षिणेंत पाठवून राजांना कैद करून दिल्लींत आणलें. राजांनीं तुरुंगाची त्याचप्रमाणें शहाजादीच्या गोड शब्दांचीं बंधनें तोडून दक्षिणेंत परत येऊन स्वराज्याचा उद्योग पुन्हां अधिक जोमानें हातीं घेतला. हें हृदयंगम कथानक या कादंबरींत सजविण्यांत आलें आहे. पुण्यांतील शाइस्तेखानावरील हल्ला, सुरतची लूट, गड आला पण सिंह गेला, छत्रसालाची भेट वगैरे मनोवेधक प्रसंग या कादंबरींत आले आहेत. अस्तनींतल्या निखाऱ्यांचा महाराष्ट्रास शापच आहे ! आणि या शापाचें प्रत्यंतर राजांना आलेलें दाखविलेलें असल्यामुळें तर या कथानकाला विशेषच रंग चढला आहे, किं. २। रुपये.

---

स्वराज्याचा कारभारः—( इ. स. १६७४ ते १६८० ले.—श्री. नाथमाधव) राज्याभिषेकानंतर शिवाजीमहाराजांनीं राज्यव्यवस्थेचें काम हातीं घेतलें. त्यावेळीं महाराजांनीं जी मांडणी केली त्याच पद्धतीनें मराठेशाहीचा कारभार चालला. कालमानाप्रमाणें व राज्यविस्ताराबरोबर त्यामध्यें फरक करावे लागले हें खरें; पण त्या नियमाबद्दल ढिलाई झाली तेव्हांच मराठेशाहीची घडी विस्कटली हीं तत्त्वें कोणतीं तें इतिहासकारांनीं नमूद केलें आहे. पण तींच तत्वें कशीं व कां अमलांत आणलीं व त्यांचे फायदे काय झाले हे विशिष्ट प्रसंग आधाराला घेऊन लेखकानें स्पष्ट करून दाखविलें आहे. त्यावेळीं युवराज असलेल्या संभाजीचे तारुण्यांतील चाळे दिसूं लागले होते. त्याच्या अमदानींत महाराष्ट्रावर केवढें संकट येणार आहे याची प्रस्तावनाच जणूं काय या कादंबरींत आलेली आहे. शिवाजी राजांचा काळ होईपर्यंतचा मजकूर आलेला असल्यामुळें ही कादंबरी हृदयस्पर्शी झाली आहे. किं. २। रुपये.



---

**स्वराज्यावरील संकटः**—( इ. स. १६८० ते १६८९ ले.–श्री. नाथमाधव.) संभाजी राजांच्या कारकीर्दीचा हृदयद्रावक वृत्तांत या कादंबरींत आला आहे. नुकत्याच स्थापन झालेल्या स्वराज्याच्या गादीवर असला राजा आल्यामुळें महाराष्ट्राची कशी धूळधाण उडाली हें लेखकानें कुशलतेनें दाखविलें आहे. मदिरेच्या निशेंत गुंग होऊन नाचरंगाच्या आधीन झाल्यामुळें संभाजीच्या निधड्या शौर्याचा महाराष्ट्राला मुळींच उपयोग झाला नाहीं. स्वराज्याच्या गादीवर येणाऱ्या राजावर केवढी मोठी जवाबदारी असते व त्या पदासाठीं सर्व सुखांचा होम करणें कितीं जरूर आहे हें संभाजीच्या कारकीर्दीवरून स्पष्ट झालें. शिवाजी राजांच्या कारभारामुळें महाराष्ट्रांत स्वामिनिष्ठा कळसाला पोंचली होती; संभाजीच्या क्रूरपणाच्या कसोटीला ही स्वामिनिष्ठा कसदार ठरली तेव्हांच राजाराम महाराजांच्या अमदानींत महाराष्ट्राला पुन्हां स्वराज्य प्राप्त झालें. या कादंबरींत स्वामिभक्तीचा कडेलोट त्याचप्रमाणें फितुरीचा कळस लेखकानें स्फूर्तिदायक व हृदयद्रावक रीतीनें रंगविला आहे. राजकुंवर, येसूबाई, खंडोबल्लाळ, सूर्याजी पिसाळ, कलुषा कबजी वगैरे पात्रांचें वैशिष्ट्य दाखविण्याकरितां लेखकानें सुंदर प्रसंगांची कुशलतेनें योजना केली आहे. किं. २। रुपये,

---

**जोसेफ मॅझिनीः**—( लेखक–श्री. स. आ. जोगळेकर बी. ए. प्रस्तावना लेखक–दे. भ. न. चिं. केळकर.) मॅझिनी, गॅरिबॉल्डी, काव्हूर व व्हिक्टर इम्यॅन्युएल या चौघांच्या कार्यामुळें गेल्या शतकांत इटलीची परक्यांच्या दास्यांतून सुटका झाली. इटलीच्या स्वातंत्र्यसाधनाचें संपूर्ण श्रेय सर्वस्वीं एकाच व्यक्तीला देतां येणें शक्य नाहीं हें उघड आहे. पण पारतंत्र्यांतहि सुख मानणाऱ्या इटलीच्या हृदयांत मॅझिनीनें स्वातंत्र्याची चैतन्यपूर्ण चळवळ जागृत करून स्वातंत्र्याला पात्र व्हतयार अशी मनोभूमिका इटलीमध्यें मॅझिनीनेंच तयार केली. स्वातंत्र्याचें व्रत घेतलेल्या मॅझिनीला राज्यकर्त्यांच्या कृपेनें हालअपेष्टा भोगाव्या लागल्या पण ज्या गोष्टी इटलीला प्राप्त होतील अशी तरुण मॅझिनीला कल्पनाहि त्यझाली नाहीं त्याच गोष्टी सिद्ध झालेल्या पाहण्याचें भाग्य त्याला लाघलें. म्हणूनच मॅझिनीचें चरित्र जितकें स्फूर्तिदायक तितकेंच हृदयद्रावक आहे. मॅझिनीच्या आत्मचरित्रात्मक टीपांचें भाषांतर जागोजाग जोडलेलें असल्या-

मुळें पुस्तकाची माधुरी अधिकच वाढली आहे. अनेक ग्रंथांचें अनेक वर्षें अध्ययन व मनन करून अंतःकरणपूर्वक लिहिलेल्या या चरित्राच्या उत्कृष्टतेची साक्ष महाराष्ट्रांतील अनेक विद्वानांनीं दिलेली आहे. पृष्ठें ३२५. उत्कृष्ट निमकापडी बांधणी किं. फक्त २ रुपये.

---

मानवी कर्तव्यें:—( ले.—श्री. स. आ. जोगळेकर बी. ए. प्रस्तावना ले. डॉ. ना. दा. सावरकर. ) इटालियन देशभक्त जोसेफ मॅझिनी याच्या 'Duties of Man' या निबंधसंग्रहाचें श्री. जोगळेकर यांचें हें भाषांतर अत्यंत सरस वठलें आहे. मॅझिनीचें सर्व तत्वज्ञान या निबंधांत ग्रथित झालें आहे. क्रांतिकारकांत मॅझिनी जसा अग्रगण्य तसेंच क्रांतिकारक वाङ्मयांत मानवी कर्तव्यें हें पुस्तकहि अग्रगण्यच होय. अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा नागरिक असल्यामुळें मॅझिनीनें या निबंधांत नागरिकत्वाचें उत्कृष्ट विवेचन केलें आहे. प्रत्येक तरुणानें हें पुस्तक वाचावें आणि प्रत्येक कुटुंबांत तें वाचलें जावें. मॅझिनीचीं सात्विक व उज्वल तत्वें आचरणांत आणणारे तरुण तयार होण्यास विद्यार्थिदशेंतच हें पुस्तक अवश्य वाचलें जावें. पृष्ठें १२५ सुंदर कापडी बांधणी. किं. १ रुपया.

---

श्री एकनाथ चरित्र:—(ले.—श्री. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.) संतांचीं परम पवित्र चरित्रें सर्वत्र लोक मोठ्या आवडीनें वाचतात. संसाराच्या रोजच्या अडचणींनीं गांगरलेल्या मनुष्याला अशीं चरित्रें वाचून समाधान प्राप्त होतें. अहंकार, मोह वगैरे रोज दृष्टीस पडणाऱ्या व्यावहारिक गोष्टींपासून हीं चरित्रें सर्वस्वीं अलिप्त असल्यामुळें संतांच्या संगतींत मनुष्याच्या मनावर जमलेला मळ नाहींसा होतो. हा विषय मुळांतच अत्यंत मनोहर आहे. श्री. पांगारकरांच्या प्रेमळ व अधिकारी लेखणींतून निघाल्यामुळें हें चरित्र अत्यंत बहारीचें वठलें आहे. वारकऱ्यांची भाविकता; आधुनिक काव्य, चरित्रें व चर्चा यांच्या वाचनानें उत्पन्न होणारी सुशिक्षित रसिकता व ऐतिहासिक सत्यासत्याचा कांटेतोल विचार करणारी चिकित्सकता हे तीनहि गुण या चरित्रांत उत्कृष्ट रीतीनें प्रकट झालेले असल्यामुळें एकनाथ—चरित्रानें महाराष्ट्र वाङ्मयांत कायमचें स्थान मिळविलें आहे. नाथांचे पूर्वज, गुरू, जीवन—चरित्र त्यांचा गौरव वगैरे प्रकरणांमध्यें

चरित्राची मांडणी केलेली असून जागोजाग नाथांच्या प्रेमळ काव्यांतील उतारे सटीक दिलेले असल्यामुळें सदर चरित्र विद्यार्थ्यांना व साहित्य-भक्तांना अत्यंत महत्वाचें वाटेल यांत शंका नाहीं. अस्पृश्योद्धाराची सध्यांची चळवळ महाराष्ट्राला नवी नाहीं, एकनाथ हे खऱ्या जिव्हाळ्याचे अस्पृश्योद्धारकच होते याविषयीं अत्यंत महत्वाच्या आख्यायिका चरित्रकारांनीं दिल्या आहेत. एकंदरींत आबालवृद्धांना आणि सर्व दर्जाच्या व सर्व मतांच्या लोकांना आवडेल असा हा ग्रंथ असल्यामुळें तो घरोघर वाचला जावा अशी आमची खास शिफारस आहे. किं. १२ आणे.

---

भक्तिमणिमाला:—( लेखक—ह. भ. प. ल. रा. पांगारकर बी. ए. ) भागवत हा भक्तिप्रधान ग्रंथ सकल संतमान्य व अत्यंत लोकप्रिय आहे. भागवताचा घोष चालू असतो तेव्हां हजारों स्त्रीपुरुष श्रवणार्थ लोटतात. भक्तिप्रेमाचीं रहस्यें अमृतमधुरवाणीनें प्रकट करणारा भागवताच्या जोडीचा दुसरा ग्रंथ नाहीं. भागवत हा ग्रंथ इतक्या योग्यतेचा आहे तरी त्याची ग्रंथसंख्या फार मोठी असल्यामुळें त्याचें पठण करणें भाविकांना फार जड जातें. म्हणून ह. भ. परायणांनीं हा ग्रंथ भाविकांसाठीं तयार केला आहे. " भागवत महोदधींत बुडी मारल्यापासून जे दिव्यमणी नजरेंत भरले ते म्यां गोळा केले आहेत." भागवतांतून निवडून काढलेल्या या सुभाषितांचें गोड व सोपें भाषांतर मूळ श्लोकांना जोडलेलें असून शिवाय महाराष्ट्रीय साधुसंतांचीं वचनें जागोजाग दिलेलीं असल्यामुळें मणिमाला अत्यंत मौल्यवान झाली आहे. सार्थ सुभाषितसंग्रह या दृष्टीनें संस्कृतचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना व भक्तिप्रेमानें ओथंबलेल्या पवित्र वचनांचा संग्रह या दृष्टीनें भाविकांना हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे यांत शंका नाहीं. किं १॥ रुपया.

---

अजिंक्य तारा:—( लेखक–' किर्लोस्कर खबर'चे सहसंपादक श्री. नायण हरी आपटे.) संभाजी राजांच्या कारकीर्दींत मराठेशाहीचें सिंहासन खिळखिळें झालें. मेराठशाहीला तेज, सामर्थ्य व दरारा हीं पूर्ववत प्राप्त व्हावींत म्हणून राजा राम महाराजांच्या नेतृत्वाखालीं मराठे वीरांनीं मर्दुमकीची शिकस्त केली. रायगडावर शिवछत्रपतींनीं राजधानी स्थापन केली त्यावेळीं त्यांचें बरेंचसें राज्य डोंगरी मुलुखांत होतें. राजाराम महाराजांच्या

अमदानींत मराठ्यांचें राज्य पुन्हां मोकळ्या मैदानांत स्थापन होऊं लागलें होतें. नव्या राज्याला साजेशा सोईस्कर जागीं नवी राजधानी स्थापावी हा राजाराम महाराजांचा हेतू त्यांच्या निधनानंतर ताराबाईसाहेबांनीं सिद्धीस नेला. सातारचा किल्ला अजिंक्यतारा मराठ्यांनीं काबीज केल्यानंतर तेथेंच बालराजा शिवाजी यांचा राज्यारोहण समारंभ झाला. अजिंक्यतारा काबीज-करण्याच्या कारस्थानाचा वृत्तांत या कादंबरींत रंगविण्यांत आला आहे. श्री. आपटे यांची भाषा साधी पण चटकदार असून कथानक मांडण्याची व रंगविण्याची त्यांची हातोटी अतिशय मार्मिक आहे. श्री. आपटे यांच्या सर्वच कादंबऱ्या लोकप्रिय आहेत—पण त्या सर्वांत अजिंक्य—तारा ही कादंबरी विशेष रंगली आहे आणि विषय ऐतिहासिक असल्यामुळें अत्यंत लोकप्रिय झालेली आहे. ही या कादंबरीची दुसरी आवृत्ति आहे व तीहि संपत आलेली आहे ही एकच गोष्ट तिच्या गुणांची निदर्शक आहे. किं. १॥ रुपया.

---

ग्रेट ब्रिटनची शासनपद्धतिः—( लेखक—श्री. रंगनाथ विष्णु ललित बी. ए. एल् एल्. बी. प्रस्तावनाकार.—रा. ब. चिंतामणराव वैद्य ) दे. भ. वैद्य आपल्या प्रस्तावनेंत म्हणतातः—"जगतांतील राष्ट्रांच्या राज्यपद्धतींत इंग्लंडांतील शासनपद्धति श्रेष्ठ आहे; तिची तपशीलवार माहिती हल्लींच्या काळीं प्रत्येक सुशिक्षित मनुष्यास असणें अवश्य आहे. श्री. ललित यांनीं केलेला हा ग्रंथ फारच उपयुक्त आहे." सदरहू पुस्तक सोप्या भाषेंत लिहिलेलें असून मराठी वाचकांच्या सोयीसाठीं त्यांनीं नेहमींच्या परिचयांतील प्रतिशब्द वापरले आहेत. अमेरिकेचे प्रेसिडेंट स्वर्ग-वासी. वुड्रो वुइल्सन यांच्या ग्रंथाच्या आधारानें हा ग्रंथ तयार केलेला असल्यामुळें त्यांतील माहिती साधार अशी आहे. इंदूरच्या मराठी साहि-त्योत्तेजक पारिषदेनें सदरहू पुस्तकास बक्षिस दिलेलें असल्यामुळें त्याच्या उत्कृष्टपणाची दुसरी हमी द्यावयास नकोच. किंमत फक्त. दहा आणे.

---

निकोलाय लेनिनः—( लेखक—श्री. रा. गो. भिडे. प्रस्तावना लेखक—दे. भ. दा. वि. गोखले बी. ए. एल् एल्. बी. ) हल्लींची



सर्व राष्ट्रें साम्राज्य व सत्ता यांच्या मागें लागलीं आहेत आणि सर्व

भांडवलवाले लोक कामकऱ्यांना गुलामगिरींत परत ढकलूं पहात आहेत; अर्थात् साम्राज्यसत्ता व भांडवलशाही यांचें सहकार्य झालें असून हीन स्थितींतल्या लोकांना त्याच अवस्थेंत डांबून ठेवण्यासाठीं त्यांचे अटोकाट यत्न चालले आहेत. बोल्शेव्हिझम् म्हणजेच कामकरी व गोरगरीब यांचा उद्धार; बोल्शेव्हिझमचें उच्चाटन करण्यासाठीं जगांतील सर्व सत्ताधारी व भांडवलवाले एकजूट झालेले आहेत; त्यांची ही जूट उलथून टाकून गोरगरीबांची परस्परांच्या साहाय्यासाठीं व उद्धारासाठीं एकजूट निर्माण करण्यासाठीं कार्ल मार्क्स् व त्याच्या पंथांतील लोकांनीं अभूतपूर्व चळवळ केली. युरोपियन राज्यांमध्यें सर्वांत अधिक अनयंत्रित सत्ता रशियन झारच्या हातीं असल्यामुळें तेथेंच ही चळवळ अत्यंत आवेशानें सुरूं झाली व ती लेनीननें यशस्वी करून लोकशाही स्थापन केली. लेनिनच्या तोडीचा विद्वान व कार्यकर्ता पुरुष या शतकांत झालाच नाही असें म्हटलें असतां फारशी हरकत नाहीं.

श्री. भिडे यांनीं हें चरित्र अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. बोल्शेव्हिझमचीं तत्त्वें कसकशीं उत्क्रांत होत गेलीं हें त्यांनीं रूसो, मार्क्स वगैरे समाजसत्तावाद्यांच्या तत्वांसह सुसंगतपणें दाखविलें आहे. लेनीनच्या कार्याचीं मूलभूत तत्वेंहि या ग्रंथांत स्पष्ट करण्यांत आलीं आहेत. परिशिष्टामध्यें रशियन लोकशाहीचा मूलभूत कायदा व संघटना दिलेली असल्यामुळें आधुनिक राजकारणाचा अभ्यास करणारांना हें पुस्तक फार मनोरंजक व महत्वाचें वाटेल यांत शंका नाहीं. जगांतील सर्व चळवळीमध्यें प्रमुख अशा या चळवळीची माहिती मिळविणें आजच्या काळीं अत्यंत अवश्य आहे. किंमत १२ आणे.

---

महात्मा गांधी चरित्रः—(लेखक—श्री. सीताकांत. प्रस्तावना लेखक—बॅ. मुकुंद रामराव जयकर. एम्. एल्. सी.) श्री. सीताकान्त यांचे लेख समजण्यास सोपे असून मोठे उत्साहदायक असतात. मूळांतच सात्विक प्रवृत्तीच्या लेखकाला महात्मा गांधींच्या चरित्रासारखा विषय मिळाल्यामुळें हा ग्रंथ किती सरळ वठला असेल हें वेगळें सांगणें न लगे. हें चरित्र केवळ भाविक अंधभक्तीनें लिहिलेलें

सून त्यामध्यें महात्माजींच्या जीवनाची समतोल चर्चा केलेली आहे व त्यांच्या तत्वज्ञानाची उत्क्रांतिहि दाखविलेली आहे. बॅरिस्टर जयकर आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं हेंच ह्या चरित्राचें वैशिष्ट्य आहे. महात्माजींना अंधभक्तांची उणीव नसल्यामुळें भाविक अनुयायांनीं लिहिलेल्या चरित्रांमध्यें त्यांच्या जीवनाचें रहस्य व यशापयशाचें मर्म वाचकांच्या लक्षांत येत नाहीं. आज हिंदुस्थानांत महात्माजींच्या तोलाचा मनुष्य नाहीं; देशांतील राजकारणावर त्यांचें वजन अझूनहि पुष्कळ आहे; तेव्हां त्यांच्या चरित्राची माहिती असणें हिंदवासियांना अवश्य आहे. किं. २। रुपये.

---

सं. नवजीवनः—(लेखक—श्री. कृ. ना. आस्नोडकर.) सामाजिक नाटकें लिहिण्याचें काम फार महत्वाचें व जबाबदारीचें आहे; कारण सामाजिक जीवनाला उपयुक्त अशा तत्वांचें शिक्षण मनोरंजक रीतीनें हंसत खेळत जनतेला पटवून देणें फार अवघड आहे. हें काम श्री. अस्नोडकर यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडलें आहे. समाजाला नेहमीं अनेक प्रकारचे रोग जडलेले असतात. अर्धवट शिक्षणामुळें स्वैरपणा अंगीं आलेल्या स्त्रिया संधि व कुसंगति यांची जोड मिळतांच बेफाम होतात; त्याच प्रमाणें समाजसेवक या बड्या नांवाखालीं लपणारे बदमाष लोक आपल्या नीच हेतूच्या पूर्ततेसाठीं स्त्रियांच्या भावनाप्रधान मनोवृत्तीचा कसा फायदा घेतात व सुजनांच्या उदाहरणानें मन पुन्हां ताळ्यावर आलें म्हणजे उच्च मनोवृत्तीचे स्वार्थत्यागी खरेखुरे समाजसेवक कसे निर्माण होतात हें या नाटकांत श्रीं. अस्नोडकरांनीं हृदयंगम रीतीनें रंगविलें आहे. किंमत फक्त दहा आणे.

---

मराठी रियासत; मध्यविभाग ३. पानिपत प्रकरणः—(ले.—रियासतकार श्री. गो. स. सरदेसाई, बी. ए.) हा त्यांचा ग्रंथ आम्ही नुकताच प्रसिद्ध केला आहे. पानपताएवढी मोहीम मराठी अमदानींत झाली नाहीं व पानपताएवढें अपयशहि मराठ्यांना आलें नाहीं. ह्या अंतःकरण उचंबळविणारा प्रसंग या ग्रंथांत सांगोपांग सांगितला आहे. मराठ्यांचे व शत्रूचे सरदार अमूक अमूक

प्रकारचें वर्तन कां करते झाले, त्यांचीं कारणें पूर्व परिस्थितींत व त्यांच्या स्वभावघटनेंत किती होतीं याचाहि विचार लेखकानें केलेला आहे. रघुनाथरावाच्या उत्तरेकडील पहिल्या स्वारीपासून नानासाहेब पेशव्यांच्या मृत्यूपर्यंतचा इत्थंभूत वृत्तांत यांत आला आहे. शाहूकालीन प्रसिद्ध घराण्यांच्या हकीगती यांत दिल्या असून सदाशिवरावभाऊंचा उत्तरेकडील प्रवासमर्गाचा नकाशाहि जोडला आहे. आजवर उपलब्ध झालेल्या सर्व साधनांचा पूर्ण विचार करून श्री. सरदेसाई यांनीं हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ निर्माण केला आहे. स्वदेशी इतिहासाचा अभिमान ज्यांच्या रोम-रोमांत भिनलेला आहे असे मराठे, लेखकाच्या श्रमाचें चीज करतील अशी आमची खात्री आहे.

ग्लेज कागद. पूर्ण कापडी व सोनेरी बांधणी किंमत फक्त २ रुपये.

---

ब्रिटिश रियासत; पूर्वार्धः—( ले.–श्री. गो. स. सरदेसाई. )
ह्या भागाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर बरीच ऐतिहासिक माहिती नव्यानेंच प्रकाशांत आली; त्याचप्रमाणें प्रथमावृत्तीवर झालेल्या टीका व आलेल्या सूचना या सर्व सामुग्रीचा उपयोग करून रियासतका-रांनीं ही नवी आवृत्ति तयार केली आहे. हल्लींच्या दिवसांत विद्यार्थ्यांस व सामान्य वाचकांसहि ह्या विषयाचें ज्ञान असणें अत्यंत अवश्य आहे. आशिया व युरोप या दोन खंडांचा संबंध कसा आला व त्या संबंधाचें स्वरूप कसें उत्क्रांत होत गेलें, याचें ज्ञान करून घेणें हें प्रत्येक देशा-भिमानी मनुष्याचें कर्तव्य आहे. व्यापारामुळेंच हिंदुस्थानला सुवर्णभूमी हें नांव मिळालें होतें. पाश्चात्यांनीं हा व्यापार काबीज करण्यासाठीं जी निकराची चढाओढ मांडली तींत ब्रिटिश लोक अखेर यशस्वी झाले. त्यांनीं प्रथम आमच्या व्यापाराच्या व कारागिरांच्या नाड्या हातीं घेतल्या व मग त्या आंखडल्या. व्यापारामागून आमचीं राज्यें त्यांच्या हातीं गेलीं. हा सर्व प्रकार कसा झाला याचें विस्तृत व साधक बाधक विवेचन या पुस्तकांत केलेलें आहे. ईस्ट इंडिया कंपनीची रचना, व्यापारावरील हुकमतीसाठीं इंग्रज व फ्रेंच यांमध्यें झालेलीं युद्धें, या काळांत प्रसिद्धीस आलेल्या अनेक व्यक्तींचीं चरित्रें वगैरे अत्यंत महत्त्वाची माहिती या

पुस्तकांत अतिशय मनोरंजक रीतीनें रंगविली आहे. पाश्चात्यांच्या व्यापाराचा इतिहास, पोर्तुगीज व डच लोकांची अमदानी; फ्रेंच, निजाम व मराठे; सिराजुद्दौला व क्लाइव्ह वगैरे महत्वाचे विभाग या पुस्तकांत आलेले आहेत. प्रौढ विद्यार्थ्यांनीं हें पुस्तक जरूर संग्रही ठेवावें. हल्लीं सर्व शाळांमधून हा काळ शिकविण्यांत येत असल्यामुळें विद्यार्थ्यांना विषय नीट समजावून देतां यावा म्हणून प्रत्येक शिक्षकानें या पुस्तकाचा अवश्य अभ्यास करावा. आफ्रिका खंडास वळसा देऊन पाश्चात्य कसकशा मार्गानें वसाहती करीत आले हें दर्शविणारा जगाचा नकाशा व तत्कालीन प्रमुख पुरुषांचीं चित्रें पुस्तकास जोडलीं आहेत. सोनेरी कापडी बांधणी. किं. ३॥ रु.

---

छापत आहे !

प्रमुख इंग्रजी वृत्तपत्रांनीं वाखाणलेला ग्रंथ !

हिंदुधर्मावर एक मुद्देसूद, स्फूर्तिदायक व चटकदार

प्रवचन !

## 'मराठा' कृत 'हिंदुत्व'

इंग्रजीचें मराठी भाषांतर !

भाषांतरकारः—डॉ. ना. दा. सावरकर

किं० १ रु.

छापत आहे !] स्वामी रामतीर्थ [नांवें नोंदवा !

# यांचे समग्र ग्रंथ.

---

(नवी आवृत्ति, ६ भाग, बांधणी फक्त कापडी, दर भागास रु. २॥.)

---

हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनाची व संघटनेची चळवळ नव्या जोमानें सुरू झालेली आहे. हिंदुधर्माच्या चैतन्याचें रहस्य वेदांतांत आहे हें निर्विवाद आहे. उपनिषदादि प्राचीन ग्रंथांमध्यें या वेदांताचीं तत्त्वें स्पष्ट केलेलीं आहेत, पण या ग्रंथांतील विषयाची मांडणी तत्त्ववेत्त्याशिवाय इतर सर्व-साधारण लोकांना सुगम होण्यासारखी नसल्यानें अव्वल इंग्रजी अमदानीं-तील पिढ्या या वेदांताला पारख्या झाल्या होत्या. हिंदु—समाजांत

**व्यावहारिक वेदान्त व नवचैतन्य**

निर्माण करावयाची चळवळ स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांच्या नेतृत्वाखालीं सुरू झाली. त्यांनीं केलेलें लोकजागृतीचें कार्य अनेकविध होतें. त्यांत त्यांनीं केलेलें वाङ्मयात्मक कार्य आज विशिष्टतेनें आपले उपयोगीं पडेल.

**स्वामी रामतीर्थांचे समग्र ग्रंथ**

मूळ इंग्रजींत संकलित केलेले आहेत. महाराष्ट्र वाचकांना स्वामिजींच्या जिवंत वाणीचा लाभ मिळावा म्हणून 'विहारी' कर्ते कै. भा. वि. फडके, बी. ए. व कै. रा. वा. बर्वे बी. ए. यांनीं ह्या ग्रंथाचें भाषांतर मराठींत आणण्याचा अवाढव्य उद्योग हातीं घेतला.

स्वामिजींच्या समग्र लेखांच्या प्रथमावृत्तींचे बारा भाग निघाले होते. स्वामिजींच्या ओजस्वी लेखांनीं महाराष्ट्र वाचक इतके मोहून गेले होते कीं, प्रत्येक भाग निघतांच तो खलास होई. बरींच वर्षें दुर्मिळ झालेल्या या चैतन्यपूर्ण वाङ्मयाची पुनरावृत्ति काढण्याचें काम आम्ही हातीं घेतलें असून पूर्वींच्या बारा भागांतील मजकूर आतां सहा भागांत पुरा होणार आहे. तरी संपूर्ण सेटकरितां नांवें नोंदवून ठेवावींत.

पत्ता:—गणेश महादेव आ. कं. गिरगांवरोड, मुंबई.

